ओंकार ट्रस्ट

# कल्याणी २०११

## आधुनिक महिपती श्रीदासगणु महाराज विशेषांक



सदा प्रभुपदावरी निजसमर्पिलीसे तनू । कथेत मन गोविले कमल मालिकेरी जणू ।।
मुखातुन जसा झरा सगुणभक्तिचा वाहतो । समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।




गोरटे येथील श्रीदासगणु महाराजांची वस्त्र समाधी



## उद्याच्या उज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)
'विसावा' अनिकेत सोसायटी नं. १
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७
टेलिफोन क्र. ०२०-२४२१००४७
मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये
नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक
ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१
कलम ८० ग खाली आयकर सवलत











ओंकार ट्रस्ट २०११ चा **''आधुनिक महिपती श्रीदासगणु महाराज''** विशेषांक, संपादक सौ. कल्याणी अशोक शिवले (उज्वला काळे), ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९ येथे छापून श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, ट्रस्टी यांनी 'विसावा' अनिकेत सोसायटी क्र. १, बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७ येथे प्रकाशित केला आहे.

टीप : १) सदरचा विशेषांक **फक्त खासगी वितरणासाठी** आहे.
२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

**अक्षरजुळणी आणि छपाई**
प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९. फोन : २५४६०२१६

# अध्यक्षीय मनोगत

माागे वळून पहाता (१९९१-९९)

ओंकार न्यासाची स्थापना जुलै १९९१ मध्ये झाल्यानंतर काही महिन्यांतच कात्रज जवळील गुजरवाडी- निंबाळकरवाडी येथे एका टेकडीवर एक एकर जागा खरेदी करण्यात आली, ज्याकरीता सुरुवातीच्या काळात बरीचशी रक्कम त्यावेळच्या विश्वस्तांनी स्वत:च उभी केली होती. त्यावेळी या व आसपासच्या गावात काहींच सुविधा नव्हत्या. रस्ताही अतिशय कच्चा होता. अशावेळी न्यासाने, सुरुवातीला भाड्याच्या जागेत व नंतर कै. डॉ. एम. एन. हर्डीकरांनी दिलेल्या देणगीतून प्रसुतीगृहाची इमारत बांधून सुसज्ज असे प्रसुतीगृह सुरू केले, जेणेकरून तेथील स्त्रियांना पुण्यात यावे लागू नये.

सुरुवातीची काही वर्षे गरजू स्त्रियांनी त्याचा लाभ घेतला तथापि पुणे शहर वाढल्यानंतर शेजारची खेडीही वाढली. रस्ते झाले. त्यामुळे न्यासाच्या प्रसुतिगृहाची मागणी कमी होऊ लागली. कारण तेथून पुण्याला येण्यासाठी सर्व प्रकारची वाहतुकीची साधने उपलब्ध झाली. तथापि न्यासातर्फे शाळांतून संस्कार वर्ग, नेत्रचिकित्सा शिबिरे, सर्वसाधारण रोगनिदान शिबिरे भरविणे चालूच होते. सरुवातीपासून 'कल्याणी विशेषांक' व १९९७ पासून 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' सामाजिक क्षेत्रात चांगले काम करणाऱ्या व्यक्ती अथवा संस्थांना देणे सुरू केलेले आहे.

२००० पासून पुढे...

२००० साली न्यासाने सामाजिक गरज लक्षात घेऊन अनाथ मुले दत्तक घेण्याचे ठरविले व त्याकरिता १६०० चौरस फूट क्षेत्रफळाची नवीन इमारत बांधण्यात आली. सध्या दुसरी ते अकरावी वयोगटातील ९ मुले-मुली या योजनेचा लाभ घेत आहेत. त्यांची शैक्षणिक प्रगती चांगली आहेच, पण त्याबरोबर त्यांना सुसंस्कारीत केले जात आहे, ह्याचे सर्व श्रेय तेथे राहणाऱ्या न्यासाच्या विश्वस्त श्रीमती मालतीताई निमोणकर यांना जाते.

यावर्षीचा २० वा 'कल्याणी वार्षिक विशेषांक' संतकवी श्रीदासगणू महाराज यांच्या साहित्यावर काढण्यात येत आहे, ज्याचे प्रकाशन स्वाध्याय परिवार मुंबईच्या अध्वर्यु सौ. धनश्री तळवलकर (दीदी) यांच्या शुभहस्ते होणार आहे. त्याचप्रमाणे या वर्षीचा १४ वा 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' पर्यावरण क्षेत्रात स्पृहणीय काम करणाऱ्या श्री. दिलीप कुलकर्णी यांना प्रदान करण्यात येणार आहे.

न्यासाने २०१०-११ मध्ये केलेल्या कार्याचा आढावा 'वाटचाल' या सदरात आपल्या माहिती करता देण्यात आलेला आहे. तसेच यंदाच्या अंकातील साहित्यविषयक माहिती 'संपादकीय' मध्ये मिळेलच.

आमच्या कल्याणी विशेषांकाचा एक विजिगिषू वाचक वर्ग तयार झालेला आहे व हा वर्ग अंकाची दरवर्षी आतुरतेने वाट पहात असतो. या वर्षीचा अंकही सर्व सुजाण वाचकांना आवडेल असा आम्हांस विश्वास वाटतो.

आपणही आमच्या कार्यात प्रत्यक्ष सहभाग घेऊन, देणगी रूपाने अथवा संस्कार वर्ग घेऊनही आपला खारीचा वाटा उचलू शकता. देणगीदारांना ८० ग अंतर्गत प्राप्तीकरात सूट मिळते.

न्यासाचे सर्व देणगीदार, जाहिरातदार, प्रायोजक तसेच आम्हाला दरवर्षी लेख देणारे सर्व मान्यवर लेखक, कवी व न्यासास इतर अनेक प्रकारे मदत करणारे सर्व आपण, या सर्वांचे आभार मानून हे मनोगत येथे पुरे करतो.

धन्यवाद!

- म. वा. सरदेशपांडे

॥श्रीपांडुरंग॥

प्रतिवर्षाप्रमाणे 'कल्याणी' चा विशेषांक प्रकाशित होतो आहे. यंदाचा अंक श्रीदासगणू महाराजांच्या जीवनचरित्राचा मागोवा घेणारा विशेषांक आहे ही अतीव आनंदाची बाब आहे. प्रत्येक वर्षी एका संतांच्या जीवनचरित्राचा सांगोपांग विचार करणारा अंक समाजाच्या हातामध्ये देणे हा आपला विशेषच आहे.

संतांचे जीवनचरित्र आणि वाङ्मय समाजाला दिशा देणारे असते. मानवी जीवनाचे ऐहिक आणि पारलौकिक कल्याण संतवाङ्मयातूनच कळते. मानवी जीवनामध्ये भिन्न-भिन्न स्तरावरून निर्माण होणाऱ्या सर्व समस्यांचे निराकरण संतवाङ्मय व संतचरित्रामधून होते. म्हणूनच महाभारताने म्हटले आहे,

तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना: नैको ऋषिर्यस्य मतं प्रमाणम् ।
धर्मस्य तत्वं निहितं गुहायां महाजनो येन गत: स पंथा: ॥

कालिदासानेही 'सतां संदेह पदेषु वस्तुषु प्रमाणमन्त:करणं प्रवृत्तय: ।' असे म्हटले आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

श्रुती स्मृतीचे अर्थ । आपणचि होउनि मूर्त ।
अनुष्ठाने जगा देत । वडिल जे हे ॥
तयांची आचरिता पाउले । सात्विक श्रद्धा चाले ।

तर 'वाचा बोलो वेद नीति । करू संती केले ते ॥' असे श्रीतुकाराममहाराज म्हणतात.

अलिकडच्या काळामध्ये संतविचाराने आणि वाङ्मयाने समाजाला दिशा देणारे तप:पूत, स्वच्छ आणि तेजस्वी जीवन म्हणजे दासगणू महाराजांचे जीवन होय. त्यांनी महाराष्ट्राला दिलेल्या सोप्या, रसाळ चरित्रांमुळेच 'जीवन कसे असावे' याचा विचार होऊ लागला. त्यांचे काव्य, त्यातील माधुर्य, त्याला अनुभवातून दिलेला पारमार्थिक स्पर्श, सहजता, ओज, औचित्य हे सर्वच विद्वानांना चकित करणारे आहे. त्यांचे स्वत:चे चरित्रही असे अलौकिक आहे. वाणी आणि लेखणीने 'देव मस्तकी धरून अवघा हलकल्लोळ' त्यांनी केला. त्यांच्या वाङ्मयातून प्रकटणारी तळमळ ही पुढील अनेक पिढ्यांची दिग्दर्शक आहे. 'प.पू. नारायणस्वरूप वरदानंदभारतींच्या रूपाने त्यांनी महाराष्ट्राला जे देणं दिले त्याचे उपकार महाराष्ट्र आजन्म फेडू शकणार नाही. असो.

आपणास सहस्रश: धन्यवाद व शुभेच्छा !

भवदीय,

भानुदासमहाराज देगलूरकर.

# संपादकीय

संत तुकडोजी महाराज म्हणतात,

**सत्संगाविण ज्ञान मिळेना सद्गुरू बोधाचे**

**करावया सत्संग पाहिजे वाचन शास्त्राचे....**

शास्त्राचा मतितार्थ सोपा, सुलभ करून सांगतात संतमंडळीच. ते म्हणतात अरे ''तुझ्या जाणीवेची बुद्धी वापर नरदेह आणि इतर योनी यातील फरक जाणून घे'' जन्ममृत्यूच्या पिंजऱ्यात अडकलेला जीवरूपी राघूने जागे व्हावे, मुक्तीचे द्वार उघडावे यासाठी कळकळीने पुन्हा पुन्हा सांगणारी वाणी असते संतवाणीच. अशी संतशिकवण सर्वांपर्यंत पोहोचावी या उद्देशाने संस्थापक कार्यवाह कै. सौ. वसुंधरा सातवळेकर यांनी 'कल्याणी' वार्षिक अंकास सुरुवात केली. आत्तापर्यंत विविध संतांवर १९ अंक प्रकाशित करून ट्रस्टने संत शिकवण जास्तीत-जास्त लोकांपर्यंत पोहोचवण्याचा प्रयत्न केला आहे. यंदाच्या विसाव्या 'कल्याणी' विशेषांकाचे संत आहेत 'आधुनिक महिपती श्रीदासगणू महाराज'.

श्रीदासगणूंचे वैशिष्ट्य हे आहे की, त्यांनी श्रीसाईबाबांच्या सूचनेनुसार अनेक संतचरित्रे लिहिली आहेत. त्यांच्या भक्तिरसपूर्ण, रसाळ आणि ओघवत्या कवित्वाने वाचकांना, भाविकांना भारून टाकले आहे. प.पू. अनंतराव आठवले त्यांच्या काव्याचा परिचय करून देताना म्हणतात, 'संतकवि श्रीदासगणू महाराजांच्या काव्याचा परिचय करून देणे ही एक अत्यंत अवघड गोष्ट आहे. कारण त्यांच्या काव्याचा विस्तार सागराप्रमाणे आहे. त्याची खोली समुद्राप्रमाणे आहे. त्यातील विचार-मौक्तिके वर आणणे हे अतिशय श्रमाचे काम आहे.'

श्रीदासगणूंच्या वाङ्मयाचा विचार करता त्यांची साहित्य संपदा महाकाव्ये, किर्तनाख्याने, खंडकाव्ये, पोवाडे, श्लोकबद्ध अष्टके, ओवीबद्ध स्तोत्रे, स्फुटपदे, शिष्यबोध, टीकाग्रंथ, बोधकथा या स्वरूपांत उपलब्ध आहे. त्यांचे चरित्र त्यांच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना या बरोबरच त्यांच्या साहित्यातील स्तोत्रे, अष्टके, पदे, कीर्तन आख्याने यांचा मागोवा या अंकात घेतला आहे. त्यांच्या 'गजानन विजय' या घरोघरी पोहोचलेल्या ग्रंथाचे रसग्रहण आणि उद्धवागमन या महाकाव्याचे सुंदर विवेचन आपणास इथे वाचायला मिळेल. भक्तीलीलामृत, भक्तीसारामृत या सारख्या महाकाव्यातील भक्तिरसाची गोडी चाखायला मिळेल. त्यांचे राष्ट्रप्रेम, समाजप्रबोधन कसे होते हेही काही लेखांवरून कळून येईल. थोडक्यात सांगायचे तर त्यांच्या विपुल साहित्य भांडाराचा अल्पसा का होईना आस्वाद सर्वांना घेता यावा असा प्रयत्न या अंकात केला आहे.

अंक यशस्वी होण्यात मोलाचा वाटा आहे तो गोरटे येथील दासगणू प्रतिष्ठान, डॉ. ग. प्र. परांजपे, डॉ. सौ. कल्याणीताई नामजोशी, श्री. महेश आठवले, नांदेडकर कुटुंबीय, श्री. प्रकाशराव मेंहेदळे कुटुंब यांचा. ओंकार ट्रस्ट त्यांचे सदैव ऋणी राहील. नेहमीप्रमाणे अंकातील मान्यवर लेखकांनी लेख देऊन आम्हाला उपकृत केले आहे. जाहिरातदार, देणगीदार यांचे पाठबळ तर आहेच. त्यांचे आम्ही आभारी आहोत. गेली १९ वर्षे संपादक पदाचा कार्यभार यशस्वीपणे सांभाळणाऱ्या श्रीमती रजनी काळे वयोपरत्वे हे काम करू शकत नसल्याने हे काम माझ्याकडे आले आहे. त्यांच्या इतकी यशस्वी मी होऊ शकेल का नाही माहित नाही पण त्यांच्या आणि इतर विश्वस्तांच्या साह्याने वाटचाल करण्याचा प्रयत्न नक्कीच करेन. कल्याणीच्या 'दासनवमी' विशेषांकात संपादकीय मध्ये 'कल्याणी' बद्दलचे त्यांचे मनोगत त्यांनी काव्यात सादर केले होते. त्या काव्यपंक्ती इथे पुनर्मुद्रीत करून त्यांच्या कार्याचा गौरव व्हावा असे मला वाटते.

**अमृताचा कुंभ ठेवियला स्वर्गी ।**
**दुर्लभ तो जना कलियुगी ।।१।।**

**अमृताची गोडी न कळे आम्हा ।**
**पाजी गोरस पान्हा 'कल्याणी' ।।२।।**

**कल्याणीची छाया आम्रवृक्षापरी ।**
**देई शितलता चंद्रापरी ।**
**नभीचा भास्कर विश्वास प्रकाशी ।**
**तैसे कल्याणीचे तेज अज्ञानासी ।।३।।**

**गुरूकृपा झाली भक्त जनावरी**
**कृपेची साऊली बालकावरी ।।४।।**

**भावतो सर्वा ज्ञानामृता गोरस ।**
**तृप्त भक्तजन तियेवरी ।।५।।**

**सौ. कल्याणी शिवले** (उज्वला काळे)

**टीप :**

१) या अंकातील लेखांत काही ठिकाणी श्रीदासगणू महाराजांचा उल्लेख ति. दादा असा तर श्री. अ. दा. आठवले यांचा उल्लेख श्रीवरदानंद भारती किंवा ति. अप्पा असा आलेला आहे. कृपया वाचकांनी नोंद घ्यावी.

२) दुर्मिळ असे श्रीदासगणु महाराजांचे विचारधन सर्वांपर्यंत पोहोचावे म्हणून 'विवेक दृष्टी व समन्वय' आणि 'श्रीमत् दासगणुच्या साहित्यातील राष्ट्रीय विचारधन' हे लेख 'श्रीदासगणु स्मरण महोत्सव स्मरणिका' यातून पुनर्मुद्रित केले आहेत.

# वाटचाल २०१०-११

ओंकार ट्रस्टची स्थापना झाल्यापासूनच्या कार्याचा मागोवा ट्रस्टच्या अध्यक्षांनी त्यांच्या मनोगतामध्ये घेतला आहेच. इ.स. २०१०-११ मध्ये झालेली वाटचाल थोडक्यात अशी.

दि. १२ ते १५ मार्च २०१० संस्थेच्या संस्थापक कार्यवाह कै.सौ. वसुंधरा सातवळेकर यांच्या स्मरणार्थ ३ दिवसांची प्रवचनमाला आयोजित करण्यात आली होती. विषय होता रुक्मिणी स्वयंवर आणि वक्ते होते समर्थभक्त- श्रीसुनीलजी चिंचोलकर अर्थातच त्यांच्या ओघवत्या वाणीने प्रवचने श्रवणीय झाली.

दि. १७ एप्रिल २०१० रोजी 'कल्याणी' भगवान रामकृष्ण परमहंस विशेषांकाचे प्रकाशन स्वामी गोविंद देवगिरी महाराज (पू. किशोरजी व्यास) यांचे शुभहस्ते झाले. अंक सर्वांना खूप आवडला हे वाचकांच्या प्रतिक्रियांवरून कळून आले. स्वामीजींनी आपल्या अध्यक्षीय भाषणातून सांगितले होते, ''जगातील मोठ्या समस्या निर्माण होतात त्या धर्मामुळे. धर्माच्या अभ्यासाशिवाय समस्या सुटणार नाहीत, आत्मदर्शन जागृत होते तोच खरा धर्म'' सर्वांच्या विचारांना चालना देणारे हे प्रकटन होते. समारंभाला रामकृष्ण मठ पुणेचे अध्यक्ष स्वामी भौमानंदजी तसेच स्वामी सुवेज्ञेयानंदजी महाराज, रामकृष्ण मठ हेही विशेष अतिथी म्हणून उपस्थित होते. सन २०१० चा वसुंधरा कृतज्ञता पुरस्कारही याचवेळी पू. महाराजांच्या हस्ते 'सावली सेवा ट्रस्ट' या संस्थेस प्रदान करण्यात आला. रेड लाईट एरियातील मुलांसाठी काम करणाऱ्या या संस्थेच्या श्रीमती मृणालीनी भाटवडेकर यांनी तो स्वीकारला. सत्काराला उत्तर देताना काम करताना कोण कोणत्या अडचणींना तोंड द्यावे लागले हे सांगितले, हे ऐकून श्रोत्यांची मने गहिवरून आली.

दरवर्षी देण्यात येतात त्याप्रमाणे १५/७/२०१० रोजी शालांत परिक्षेत संस्कृतमध्ये प्रथम आलेल्या कु. प्राजक्ता सुरेश ब्रह्मे आणि मराठीमध्ये प्रथम आलेल्या कुमार अजिंक्य सुभाष जाधव या दोघांना पारितोषिके देण्यात आली. उच्च शिक्षणासाठी गरिब व होतकरू विद्यार्थ्यास देण्यात येणारी शिष्यवृत्ती यंदा सिद्धी विनायक कॉलेज ऑफ आर्टस अॅण्ड कॉमर्स मधील कु. स्नेहल शिवरकर हिला दिली गेली. या व्यतिरिक्त हिंगणे स्त्री शिक्षण संस्थेमध्ये शिकणाऱ्या कु. नीता काळे हिला ही शिक्षणासाठी आर्थिक मदत करण्यात आली. गुजर-निंबाळकरवाडी येथील दोन विद्यार्थ्यांना शालेय साहित्यासाठी मदत करण्यात आली.



सालाबाद प्रमाणे यंदाही संस्कार वर्गातील मांगडेवाडी येथील जिल्हा परिषद शाळेमधील मुला-मुलींसाठी चित्रकला आणि निबंध स्पर्धा घेण्यात आल्या. हिंगणे स्त्री शिक्षण संस्थेतील संस्कारवर्गातील २१० मुलींसाठी ही निबंध स्पर्धा घेण्यात आल्या. सर्व स्पर्धांमधील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाना पारितोषिके देण्यात आली.

डिसेंबर २०१० मध्ये १७ व १८ तारखांना कु. प्रतिमा गद्रे यांची नारदभक्ती सूत्रावर प्रवचने झाली. साध्या सोप्या भाषेत भक्ती सूत्रावरील त्याचे विवेचन फारच श्रवणीय झाले.

यंदाच्या विशेष बाबी म्हणजे- जून २०१० मध्ये कु. सानिया सदाशिव शितोळे हिला गुजरवाडी-निंबाळकरवाडी येथील मुलांमध्ये नव्याने समाविष्ट केले आहे. त्यामुळे यंदा ट्रस्टने दत्तक घेतलेल्या मुलांची संख्या आता नऊ झाली आहे.

ट्रस्टने दत्तक घेतलेल्या मुलांपैकी कु. निकीता १० वी परीक्षा उत्तम गुणांनी उत्तीर्ण झाली. कनिष्ठ महाविद्यालयांत प्रवेश घेतल्यानंतर तिला पाककृतीत



**डावीकडून : सौ. मृणालिनी भाटवडेकर, स्वामी गोविंद देवगिरी महाराज, स्वामी भौमानंदजी, स्वामी सुवेज्ञेयानंदजी महाराज, श्री. मधुसूदन सरदेशपांडे, अध्यक्ष ओंकार ट्रस्ट**

उत्तेजनार्थ तर रांगोळी स्पर्धेत तृतीय क्रमांक मिळाला.

कुमार विशाल इ. २री याने कथाकथन स्पर्धेमध्ये प्रथम क्रमांकाचे बक्षीस मिळविले.

चि. कोमल इ. ५ वी हिचा प्रसंगनाट्यात पहिला नंबर तर समूह नृत्यात तिसरा नंबर आला. चि. प्रणाली इ. ५वी हिचा ही समूहनृत्यात तृतीय क्रमांक आला. कु. वैष्णवी इ. ६वी हिला प्रसंग नाट्यात दुसरे पारितोषिकतर ग्रिटींग कार्ड बनविण्यात तिचा तिसरा नंबर आला. कु. रसिका पाककृती स्पर्धेत तिसरी आली. आणि महत्त्वाचे म्हणजे कु. दीक्षाची १० वी इयत्तेत आदर्श विद्यार्थीनी म्हणून निवड झाली. मुलांची ही प्रगती निश्चितच उल्लेखनीय आणि आम्हाला अभिमान वाटावा अशी आहे.

गेल्यावर्षी प्रमाणेच यंदाही काही कुटुंबानी आपल्या आप्तेष्टांचे वाढदिवस ट्रस्टच्या मुलांबरोबर साजरे केले.

एकूण प्रगतीचा आलेख चढता आहे. असे म्हणायला हरकत नाही आणि याचे श्रेय आपल्या सारख्या हितचिंतकांना द्यावेसे वाटते. लोभ आहेच वृद्धींगत व्हावा हीच इच्छा.

एकेमका सहाय्य करू अवघे धरू सुपंथ.



**सौ. मृणालिनी भाटवडेकर स्वामी गोविंद देवगिरी महाराज यांचेकडून वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार स्वीकारताना**

''ओंकार'' न्यासातर्फे दरवर्षी ''वसुंधरा-कृतज्ञता पुरस्कार प्रदान करण्यात येतो.
सन २००९-२०१० व्या वर्षासाठी **'सावली सेवा ट्रस्ट', पुणे** यांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला होता.
त्यावेळी प्रदान करण्यात आलेले मानपत्र सर्वांच्या माहितीसाठी या अंकामध्ये प्रसिद्ध करत आहोत.

## वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार २००९-२०१०
## 'सावली सेवा ट्रस्ट', पुणे
# गुणगौरव

दिनांक : १७/४/२०१०

स्वतःसाठी जगलास तर मेलास आणि दुसऱ्यासाठी मेलास तर खरा जगलास. श्री. अनंत काणेकरांच्या दोन मेणबत्त्या या ललित लेखातील कसे जगावे हे सांगणारा हा संदेश.

बहुत जन्माचा सेवट । तरी हा मनुष्य जन्म अवचट । असे श्रीसमर्थांनी सांगितले आहे. सर्वश्रेष्ठ मनुष्यजन्म प्राप्त झाल्यावर कसे जगावे हे ज्याच्या त्याच्या स्वभावानुसार ठरत असते. काणेकरांच्या म्हणण्यानुसार दुसऱ्यासाठी जगणारे 'वेडे' या भूतलावर फार थोडे असतात. 'सावली सेवा ट्रस्ट'चे विश्वस्त मंडळ म्हणजे अशाच समाज सेवेच्या वेडाने पछाडलेली मंडळी.

सौ. मृणालिनी मंदार भाटवडेकर, श्री. मंदार सुरेश भाटवडेकर, सौ. सुषमा सुरेश भाटवडेकर आणि श्री. सुरेश काशिनाथ भाटवडेकर हे चौघे 'सावली सेवा ट्रस्ट'चे विश्वस्त आहेत. कोणतेही पद न स्विकारता त्यांच्या या कार्यात सदैव सहभागी असणाऱ्या आहेत, सौ. उमा इनामदार. मृणालिनीताई, समाज सेवेची आवड आपल्याला पहिल्यापासूनच. समाजसेवेचे बाळकडू आपल्याला माहेरहूनच मिळालेले आहे. आधी केले मग सांगितले या उक्तीनुसार आपण स्वतः मुंबईच्या 'वात्सल्य ट्रस्ट' मधून पाच महिन्याच्या केतकीला २००० साली दत्तक घेतले. तिच्या आई बनलात. डहाणूकर कॉलनीतील लक्ष्मीनगर झोपडपट्टीतील मुलांसाठी संस्कार वर्गाचे काम आपण पाच वर्षे केलेत. त्यानंतर गेली पाच वर्षे आपण 'नूतन समर्थ विद्यालय' या पुण्याच्या बुधवार पेठेतील 'रेड लाईट एरियातील' शाळेतील मुलांसाठी काम करायला सुरुवात केलीत. त्यांना गाणी शिकवता शिकवता गोष्टी सांगता सांगता आपल्याला त्यांचे आयुष्य जवळून पाहण्याची संधी मिळाली. खायला अन्न नाही, प्यायला पाणी नाही, रात्री सुखाची झोप नाही, सतत शिव्यांचा भडिमार आणि मुलांना सर्वस्व असणाऱ्या मातेच्या मनातील भावनिक आंदोलने, काय कठोर जीवन या मुलांच्या वाट्याला येते नाही का? बिचाऱ्यांची काहीही चूक नसताना. आपण व आपल्या सहकाऱ्यांनी त्यांचे दुःख अचूक हेरुन त्या मुलांसाठी काम करायला सुरुवात केलीत. एकट्या दुकट्याचे हे काम नाही हे लक्षात आल्यावर फेब्रुवारी २००८ मध्ये आपण 'सावली सेवा ट्रस्टची' स्थापना केलीत. आपले पती मंदार आपल्या पाठीशी खंबीरपणे उभे राहीले तर आपल्या सासुबाई सौ. सुषमाताई आणि सासरे श्री. सुरेशजी खरोखरीच आपली 'सावली' बनले. सौ. उमा इनामदार, आपली सखी झोकून देऊन आपल्या कार्यात आपल्याला मदत करीत आहे. आपली दोन छोटी मुले चैतन्य व केतकी त्यांच्या परीने आपल्याला सहकार्य करीत असतात.

कोणीही उच्चभ्रू समाजातील व्यक्ती जिथे पाऊल ठेवायलाही धजवणार नाही अशी 'रेड लाईट एरिया' ही 'सावली सेवा ट्रस्ट'ची कर्मभूमी आहे. आपण जिथे जाता तिथल्या निराधार मुलांना आपल्या मुलांसारखा दर्जा मिळावा म्हणून त्यांच्या मातांचे मन वळविता. त्या मातांच्या मालकीणींशी संवाद साधता. शांतपणे काहीही ऐकून घ्यावे लागले तरी आपली जिद्द सोडत नाही. एकएक मूल त्या नरकातून सोडविण्यासाठी प्रयत्न करता. त्यांचे जीवन तुम्ही जवळून पाहिलेले असल्यामुळे त्यांच्या भीषण भवितव्याची तुम्हाला पूर्ण कल्पना आहे. वेळीच सुटका न झाल्यास मुलाला दलालाचे अथवा गुंडाचे काम करावे लागणार तर मुलीला त्याच म्हणजे देहविक्रयाच्या व्यवसायात पडावे लागणार. या मुलांना शिक्षण मिळावे, त्यांना शाळा कॉलेजमधे जाता यावे, त्यांना शैक्षणिक साहित्य उपलब्ध व्हावे, वैद्यकीय सेवा उपलब्ध व्हावी, व्यवसायाभिमुख शिक्षण मिळावे म्हणून आपण कार्यरत असता तसेच शोषित महिलांचे पुनर्वसन व्हावे, त्यांचे कुटुंब अबाधित राहावे म्हणूनही आपण कार्य करीत असता.

अमिता मिशी, सागर भोसले, नेहा भूतकर, सागर खिलारे इत्यादी मुलांना उच्च शिक्षणासाठी आपल्या ट्रस्टने मदत केली आहे. निकीता व अंकीता या सारख्या मुलींना रेड लाईट एरियात जाण्यापासून वाचविले आहे. रेड लाईट एरियातील मुलांचे भवितव्य घडविण्यासाठी त्यांना उत्तम नागरिक बनवून समाजातील मुख्य प्रवाहात स्थान मिळावे म्हणून आपण प्रयत्नशील आहात. समाज कंटकांच्या हाती ही बालके पडू नयेत म्हणून खबरदारीने काम करीत आहात. १० मुलांना घेऊन सुरु केलेले कार्य आता ८० मुलांना आपली सावली देत आहे.

नूतन समर्थ विद्यालय, पुणे यांनी 'समर्थ गौरव पुरस्कार' देऊन आपणांस सन्मानित केले आहे तर 'टाईम्स ऑफ इंडियाने' ६ सप्टेंबर २००९ च्या आपल्या अंकात 'सिटी ऑफ एंजल्स' या मथळ्याखाली आपल्या संस्थेविषयी खास काही लिहिले आहे.

आपल्या या असामान्य, अवघड आणि अतिशय अडचणीच्या ठिकाणच्या कार्याने ओंकार न्यासाचे विश्वस्त मंडळ प्रभावित झाले आहे. 'सावली सेवा ट्रस्ट' या संस्थेस 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' स्वामी गोविंददेवगिरी महाराज यांच्या शुभहस्ते समारंभपूर्वक प्रदान करताना न्यासास अत्यंत आनंद व समाधान होत आहे. आपल्या संस्थेस तसेच आपल्या मुलांना सुयश लाभो हीच ईश्वर चरणी प्रार्थना.

आपले

**म. वा. सरदेशपांडे**
अध्यक्ष, ओंकार न्यास

**भा.वा. सातवळेकर**
उपाध्यक्ष, ओंकार न्यास

दिनांक :- १७ एप्रिल २०१०

# वाचकांच्या प्रतिक्रिया

**प्रज्ञालोक, नागपूर**
**यांच्या पुस्तक परिचयमधून साभार...**

ओंकार ट्रस्ट, पुणे, यांच्या वतीने प्रतिवर्षी एका संत / सत्पुरुषाच्या व्यक्तिमत्त्वाचा, कार्याचा वार्षिकांक प्रसिद्ध करण्याचा उपक्रम काही वर्षांपासून राबविला जात आहे. या त्यांच्या उपक्रमांतर्गत अनेक अंक प्रसिद्ध झाले आहेत. त्यातील अधिकारी अभ्यासकांच्या लेखांमुळे ते संदर्भ-ग्रंथ म्हणून संग्राह्यही ठरले आहेत. आतापर्यंत प्रसिद्ध केलेल्या अंकांच्या कीर्तीला साजेसा हा देखील वार्षिकांक आहे.

रामकृष्ण परमहंसाचा अवतार कोणत्याही धर्माच्या किंवा संप्रदायाच्या स्थापनेसाठी नव्हता तर धर्मविचारांच्या समन्वयाची त्यांची भूमिका होती. सर्व धर्म सत्य असून जीवात्म्याला अतीन्द्रिय अनुभवापर्यंत पोहचविणारे आहेत. जितकी मते तेवढे सत्य दर्शनाचे पंथ आहेत. हिन्दु, बौद्ध, ख्रिश्चन, इस्लाम हे सारे धर्म आणि भविष्यात निर्माण होणारे पंथ-उपपंथ, साऱ्यांचे प्राप्तव्य एकच मानल्यास त्यांची सन्निधी साधली जाईल असा भावावस्थेत प्रकट झालेला त्यांचा विचार होता.

वैराग्यमूर्ती शिव, सर्वांना निर्भयतेचे वरदान देणारी कालिमाता, सत्यवचनी रामचंद्र, पूर्णावतार कृष्ण, सर्वांविषयी प्रेमाची शिकवण देणारा येशू, विश्व मातृत्व आणि बंधुभावाची शिकवण देणारा महंमद, कारुण्यमूर्ती बुद्ध या साऱ्या भावज्योती भगवान रामकृष्ण परमहंसाच्या अवतारात सम्मिलीत झालेल्या होत्या असे म्हटले गेले आहे. अभिनव साधना आणि अपूर्व सिद्धींची प्राप्ती त्यांच्या अवतारात एकवटली होती. कोणत्याही धर्मविचाराचा साधक त्यांच्या सान्निध्यात आला असता, त्याला आपल्या अंत:करणातील असलेल्या भावभावनांची पूर्णता भगवान रामकृष्णाच्या दर्शनात प्रतीत होत होती. त्यांच्या व्यक्तित्त्वात अनेक देवदेवतांची दर्शने साधक बंधूंना झालेली आहेत.

रामकृष्णांनी सगुणोपासनेचाही आदर्श निर्माण केला आहे. आपल्या आराध्याचे सगुणरुप अंत:करणातील आर्त भावाने मूर्तीत साकार होते. 'या ते रूद्र शिवा तनू शिवा विश्वस्य भेजजी' असा तनूरुप असलेल्या रूद्रदेवतेचा उल्लेख रूद्रसूक्तांत आहे. अंत:करणातील आर्तभाव, अर्चकाचे तपोबल, उपास्य देवतेच्या चैतन्य स्वरूपाला जडमूर्तीत प्रस्थापित करीत असते.

**न देवो विद्यते काष्टे न पाषाणे न मृण्मये**
**भावो हि विद्यते देवो तस्मात् भावो हि कारणम् ।।**

या विलक्षण आर्त भक्तिचा अविष्कार रामकृष्णांच्या चरित्रात पहायला मिळतो. अशा अवतारी महापुरुषांचे यथार्थ दर्शन घडविणे हे अवघड कार्य आहे. या विशेषांकाद्वारे ओंकार ट्रस्टने ते सफलतेने केले आहे.

प्रस्तुत अंकात एकूण ३५ लेख आहेत. चरित्रात्मक, सर्वसाधारण, तुलनात्मक. रामकृष्ण आणि भारतीय धर्मशास्त्र आणि साधनातत्व अशा पाच भागात लेखांचे वर्गीकरण केले आहे. त्यामुळे एकेक नेमका विषय ठळकपणे वाचकांना एकत्र उपलब्ध होतो. यातील सगळेच लेख अत्यंत अभ्यासपूर्ण आणि रामकृष्ण वचनांनी प्रमाणित आहेत. प्रत्यक्ष रामकृष्णमठाशी संबंधित असलेल्या आध्यात्मिक क्षेत्रातील अधिकारी व्यक्तींच्या लेखांनी प्रस्तुत विशेषांकाचे अंतरंग समृद्ध झाले आहे. रामकृष्णांच्या विविध वैशिष्ट्यांचा परिचय या समरसून लिहिलेल्या लेखातून घडविला आहे. स्वामी विपाप्मानंद, स्वामी सुविज्ञेया नंद, स्वामी ब्रह्मस्थानंद महाराज, स्वामी ब्रह्मेशानंदजी महाराज, स्वामी राघवेदानन्दजी महाराज, स्वामी विष्णु पादानंदजी ही त्यातील काही नावे आहेत. याशिवाय श्री गोविंदगिरीजी महाराज, श्री सुनिलजी चिंचोळकर, डॉ. शिरीष गोपाल लिमये, डॉ. श्री. द. देशमुख, डॉ. नरेंद्र पाटील, श्रीमती सविता ओगिराळ, सौ. जयश्री नातू, डॉ. अनंत अडावतकर, श्री. वासुदेव मोरेश्वर लोहित इत्यादी ज्येष्ठ अभ्यासकांचे लेख त्यांच्या तपश्चर्या व्यासंगाचा परिचय घडविणारे आहेत.

खरे म्हणजे यातील सर्वच लेख अप्रतिम आहेत. रामकृष्ण परमहंसाच्या वेगवेगळ्या वैशिष्ट्यांचा समर्थपणे परिचय घडविणारे आहेत. केवळ उदाहरण म्हणून काही नावाचा वर उल्लेख केला आहे.

श्री. रामकृष्णदेवांच्या वचनांचे सूत्ररूप सार नेमक्या शब्दात व्यक्त करणारा डॉ. श्रीमती कमलताई वैद्य यांच्या लेखाचा स्वंतत्र उल्लेख करायला पाहिजे. सर्वांना उपयुक्त ठरणारे हे सार कथन आहे.

सर्वांगसुंदर विशेषांक सिद्ध केल्याबद्दल ओंकार ट्रस्टचे हार्दिक अभिनंदन. ओंकार ट्रस्टच्या वतीने प्रसिद्ध होणाऱ्या वार्षिकांकात, ट्रस्टच्या वतीने प्रकाशनाचे औचित्य सांगणारा व ज्या महापुरुषाविषयी अंक प्रसिद्ध होतो त्यांच्या स्मृतींना अभिवादन करणारा लेख असण्याची आवश्यकता आहे.

सकाळ - दि. १९-४-२०१०

# जगातील मोठ्या समस्या धर्मांमुळे

## स्वामी गोविंद देवगिरी महाराज यांचे प्रतिपादन

पुणे, ता. १८ : "जगापुढील मोठ्या समस्या धर्मांनी निर्माण केल्या आहेत. अशा धर्मांना उत्तर देण्यासाठी प्रथम सर्व धर्मांचा अभ्यास करणे गरजेचे आहे," असे प्रतिपादन स्वामी गोविंद देवगिरी महाराज यांनी शनिवारी केले.

ओंकार ट्रस्टतर्फे दिला जाणारा 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' यंदा वंचित मुलांसाठी काम करणाऱ्या सावली ट्रस्ट या संस्थेला देवगिरी महाराजांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. पाच हजार रुपये, स्मृतिचिन्ह आणि सन्मानपत्र असे त्याचे स्वरूप आहे. रामकृष्ण मठाचे अध्यक्ष स्वामी भौमानंद, रामकृष्ण संघाचे स्वामी सुविज्ञानंद महाराज, ट्रस्टच्या अध्यक्षा मृणालिनी भाटवडेकर, ओंकार ट्रस्टचे अध्यक्ष मधुसूदन सरदेशपांडे, उपाध्यक्ष भालचंद्र सातवळेकर या प्रसंगी उपस्थित होते.



भरत नाट्य मंदिर : **ओंकार ट्रस्टतर्फे 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' शनिवारी सावली संस्थेला प्रदान करण्यात आला. या प्रसंगी (डावीकडून) संस्थेच्या अध्यक्षा मृणालिनी भाटवडेकर, देवगिरी महाराज आणि स्वामी भौमानंद.**

देवगिरी महाराज म्हणाले, "धर्माबाबत बोलणारे अनेक जण आहेत, पण आचरण करणारे थोडे आहेत. वास्तवात धर्म या शब्दाला अनेक पैलू आहेत. सर्व धर्मांमध्ये असणारा साक्षात्कारवाद व साक्षात्कारशास्त्र एकच आहे. मात्र, धर्मांनीच जगापुढे दहशतवादासारख्या समस्या निर्माण केल्या आहेत, ही बाब लक्षात घेता सर्वधर्मसमभाव या संकल्पनेकडे पुन्हा चिकित्सेच्या दृष्टिकोनातून पाहावे लागणार आहे."

सुविज्ञानंद महाराज म्हणाले, "पाश्चात्त्य संस्कृती व संस्कारांच्या आहारी गेलेल्या युवा वर्गाला दिशा देण्यासाठी स्वामी रामकृष्ण परमहंस यांच्या विचारांचा प्रसार होण्याची गरज आहे."

भाटवडेकर म्हणाल्या, "सावली ही समाजाने नाकारलेल्या उपेक्षित मुलांसाठी काम करणारी संस्था आहे. अशा मुलांना योग्य वयात योग्य संस्कार मिळाल्यास खऱ्या अर्थाने समाजातील विषमता दूर होईल. सध्या नूतन समर्थ विद्यालयात ८० विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. यासह महिला सक्षमीकरण, एचआयव्हीबाधित बालके यांच्यासाठी संस्थेचे काम सुरू आहे."

श्री रामकृष्ण परमहंस कल्याणी विशेषांकाचे प्रकाशनही या वेळी करण्यात आले. सरदेशपांडे यांनी संस्थेच्या कार्याची माहिती दिली. ज्योती शेटे यांनी सूत्रसंचालन केले.

केसरी, दि. १९/४/२०१०

# धर्माच्या अभ्यासाशिवाय समस्या सुटणार नाहीत

पुणे : जगापुढील सर्वांत मोठ्या समस्या धर्मांनी निर्माण केल्या आहेत आणि धर्माचा अभ्यास केल्याशिवाय त्या सुटणार नाहीत, असे विचार स्वामी गोविंददेवगिरी महाराज यांनी व्यक्त केले. ओंकार ट्रस्टतर्फे प्रकाशित करण्यात आलेल्या भगवान श्री रामकृष्ण परमहंस कल्याण विशेषांकाचे प्रकाशन त्यांच्या हस्ते झाले. त्यावेळी ते बोलत होते.

ओंकार ट्रस्टतर्फे दुर्बल महिलांच्या सक्षमीकरणासाठी आणि वेश्यावस्तीतील मुलांसाठी काम करणाऱ्या सावली सेवा ट्रस्टला यावेळी वसुंधरा कृतज्ञता पारितोषिक देण्यात आले. ५ हजार रुपये रोख, स्मृतीचिन्ह आणि सन्मानपत्र असे त्याचे स्वरूप होते. यावेळी रामकृष्ण मठाचे अध्यक्ष स्वामी भौमानंद, स्वामी सुविज्ञानंद महाराज, सावली सेवा ट्रस्टच्या अध्यक्षा मृणालिनी भाटवडेकर, ओंकार ट्रस्टचे अध्यक्ष मधुसूदन सरदेशपांडे उपस्थित होते.

गोविंददेवगिरी महाराज म्हणाले, धर्माबद्दल बोलणारे खूप लोक आहेत पण त्याचा अंगीकार करणारे कमी आहेत. धर्माचा खरा अर्थ म्हणजे त्यातून आत्मदर्शन झाले पाहिजे. धर्माचा देवाशी, जीवाशी आणि विधर्माशी कसा संबंध आहे हे पाहाणेच महत्त्वाचे असते.

स्वामी सुविज्ञानंद महाराज म्हणाले की, सर्व धर्म समभाव हा रामकृष्णांच्या जीवनाचा एक पैलू होता. धर्म म्हणजे कर्मकांड नसून ती श्रद्धा आणि निष्ठेने जगण्याची दिशा आहे, या विचारांनीच रामकृष्णांनी काम केले. तसेच त्यांनी दुसऱ्या धर्माचे मूल्यमापन केले नाही.

मात्र, स्वतःच्या धर्माचा अभिमान बाळगला. रामकृष्णांचे विचार म्हणजे आजच्या युगात तरुणांवर होत असलेल्या पाश्चात्य संस्कारांना उत्तर आहे. सत्काराला उत्तर देताना भाटवडेकर म्हणाल्या, मुलांना योग्य वयात चांगले मार्गदर्शन मिळाले तर मुले प्रगती करतात. सावली सेवा ट्रस्ट उपेक्षित मुलांना घडवण्यासाठी उभी केलेली चळवळ आहे. या वस्तीतील मुले शिक्षणामुळे मोठी होत असल्याचा आनंद आहे, अशी भावना त्यांनी व्यक्त केली. ज्योती शेटे यांनी सूत्रसंचालन केले.

### 'भाग्योदय' कवितासंग्रहाचे प्रकाशन

पुणे : मुकुंद प्रकाशन पुणे तर्फे चंद्रकांत सोनवणे लिखित 'भाग्योदय' या कविता संग्रहाचे प्रकाशन मंगेश तेंडुलकर यांच्या हस्ते अप्पासाहेब गरवारे महाविद्यालयाच्या सभागृहात झाले. ज्येष्ठ अभिनेते जयराम कुलकर्णी, प्राचार्य शुभांगी इथापे, प्राचार्य [illegible] सोनावले, प्रा. शालीनी [illegible], राजेंद्र विनोदे, अमृतगोड [illegible] उपस्थित होते.

# अनुक्रमाणिका



श्रीशंकर

मुखी राहो नाम ध्यानी मनी तुझी मूर्ती
घडो कीर्तन सेवा देवा सदैव या हाती
प्रती वर्षाची वारी रामा पंढरीची होवो
तुझिया समचरणांचा प्रेमा वाढत की जावो
साधू संतांची ती होवो सदैव मज भेटी ॥
दासगणु म्हणे वस्ती राहो गोदेच्या काठीं

दासगणु

श्रीदासगणु महाराजांचे हस्ताक्षर



प.पू. दासगणु महाराजांची पंढरपूर येथील बैठकीची जागा
जेथे पू. दादांनी देह ठेविला. सध्या तेथे देवघर आहे.



# संतकवीश्वर श्रीदासगणु महाराज–वंदना

सौ. शैला सुहास पटवर्धन
एम.ए.बी.एड्., निवृत्त शिक्षिका, पार्ले टिळक विद्यालय, कविता करण्याची आवड.

।। ॐ ।।

मंगलमूर्ते, श्री वागीश्वरी, विद्येच्या देवता,
विनम्र वंदन द्यावे आशिष भावसुमन अर्पिता ।।

'कल्याणी' मंडपी मांडला मंगल उत्सव आज,
'संत कवीश्वर दासगणुंचे वाङ्मयपूजन खास
विद्वज्जन वाचस्पतिवाङ्मय भक्ति समालोचन,
आजकाल हे क्वचित लाभती विशुद्ध पुण्य क्षण ।।

सप्तसिंधुचे पावनजल का ओंजळीत मावे ?
भक्तिमळ्यातील मधुर फळांचे गणित कुणि करावे ?
मलयगिरीतील गंध चंदनी वाऱ्याविण वाहे
साक्ष प्रत्यही तशी भक्तीची नतमस्तक व्हावे ।।

साईप्रसादच भक्तनृपति जणु 'दासगणु स्वामी'
भक्तिरसाचा सागर उसळे काव्यअमृतांनी
भवतापातुनी तरले भाविक अगणित स्तोत्रांनी
जनसामान्यां केले शहाणे भजनी संकीर्तनी ।।

किती आरत्या करूनि मुखोद्‌गत खुलले भाविक मनी
कटाव–फटके–पोवाड्यांतून 'समाज' मन जागरणी
वाणि लेखणी समर्थांपरी हलकल्लोळाची
ईशभक्तिसह राष्ट्रभक्तिही ध्वजा स्वधर्माची ।।

विष्णुसहस्रनामें नित्यचि केली पारायणे
निरूपण त्यावर करता करता वाचावैभव चढे
साईप्रसादे पूर्णपुरुषपण फलद्रूप झाले
हरिहर अद्वैतास्तव गुरुपदी गंगाजळ उसळे ।।

अमृतानुभव टीकेवेळी अडवणूक कुणि केली
विटेवरूनी विठुरायाने कौल–संमती दिली
मनसंयमनी अचल हिमालय कार्यपूर्ति झाली
'भावार्थ–मंजिरी' 'नित्यानंददीपिका'च सम तोली ।।

त्याग दया वैराग्यातही वत्सल परोपकारी विवेकी
बीजपोसले साईसंगती, महावृक्ष रूपान्ती!
समन्वयाची दिव्य धारणा उदात्त उज्ज्वल ती
भेदभाव वा उच्चनीचता धर्मातही नव्हती ।।

किती दाखले थोर मनाचे मानवता पूजका,
संसारातून अलिप्त तरिही तारक गुणि बालका!
विश्वगुरुपदी भूषण ठरले 'वरदानंद' शिष्य
व्यासादिक पूर्वसुरींपरी कार्य हे विशेष ।।

'सत्ययुगांतरि सत्व संपले' कसे म्हणे कोण?
आपणासम धर्मरक्षणा उठतिल तर सज्जन!
।। उद्धरेदात्मनात्मानम् ।।
।। ॐ शांति: शांति: शांति: ।।

शब्दांकन : **सौ. शैला सुहास पटवर्धन**



# संतकवी श्री दासगणुमहाराज चरित्र

**डॉ. कल्याणी माधव नामजोशी**

एम्.अेसी (इलेक्ट्रॉनिक्स), एम.अे. (संस्कृत), पीचडी (संस्कृत वेदांत), साक्षेप समर्थांचा 'एका जनार्दनी', 'तेजाचं चांदणं' या पुस्तकांचे सहलेखन, गरवारे महाविद्यालयांत दोन वर्षे प्राध्यापक. वैदिक वाङ्मय, उपनिषदे, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध व इतर संतवाङमयावर व्याख्याने व प्रवचने

संतांचे वैशिष्ट्यच असे असते की, त्यांच्या हयातीत त्यांचे मोठेपण समाजाला कळणे अवघड जाते. कारण श्री ज्ञानेश्वरमाऊली म्हणतात त्याप्रमाणे 'अलौकिक न हो आवे लौकिका प्रति।' या लक्षणांनी संतमंडळी युक्त असल्यामुळे त्यांचे मोठेपण विरळपणेच लक्षात येते. त्यांची प्रसिद्धि-पराङ्मुखता हे ही त्याला कारण आहे. माऊलींची ज्ञानेश्वरी लोकांना समजायला त्यांच्या पश्चात् अडीचशे वर्षे लागली. याच संतपरंपरेतील पू. दासगणुमहाराज व त्यांचे वाङ्मय त्यांच्या अमानित्वामुळे उभ्या महाराष्ट्राला तसे अज्ञातच राहिले.

संतकवी श्री दासगणुमहाराजांचे वैशिष्ट्य म्हणजे भक्तिरसपूर्ण कीर्तन करणारे कीर्तनकार. त्यांनी गायिलेली संतचरित्रे. 'महिपतिं'च्या काव्यरसासारखीच रसाळ असल्याने ते 'आधुनिक महिपति' या बिरुदाने ओळखले जाऊ शकले. पुण्यातील गुणग्राहक, अधिकारी श्री. भांडारकर यांनी श्री दासगणुमहाराजांचा 'आधुनिक महिपती'या पुरस्काराने सन्मान केला. पू. दासगणुंच्या विशाल वाङ्मय निर्मितीमुळे त्यांना 'आधुनिक दासोपंत' असेही म्हणतात.

कीर्तनाख्यान रचनाकार म्हणून त्यांचा लौकिक असला तरी संतचरित्रांची रसाळ निर्मिती ही मराठी वाङ्मयाला त्यांची अनमोल देणगीच म्हणावी लागेल इतकी ती श्रेष्ठ साहित्यगुणांनी युक्त व भावाने समृद्ध आहे. तिचे ऐतिहासिक मूल्यही थोर आहे.

श्रीअमृतानुभव भावार्थमंजिरी, ईशावास्य व मांडूक्य उपनिषदे, भक्तिरसायन यावरील टीका, शांडिल्य आणि नारद भक्तिसूत्राचे अर्थ-विवरणात्मक ग्रंथ, भक्तिलीलामृत, भक्तिसारामृत, संतकथामृत हे संतचरित्र ग्रंथ, श्री गजाननमहाराज, श्री शंकराचार्य, श्री मध्वाचार्य, श्रीज्ञानेश्वर आदी विस्तृत चरित्रग्रंथ, उद्धवागमन - एक भावोत्कट खंडकाव्य, समाज प्रबोधनार्थ कीर्तन-माध्यम, कीर्तनाची ८० च्या वर आख्याने याशिवाय हजारापेक्षाही जास्त स्तोत्रादि स्फुट रचना, गद्य कथा अशी दीड लाखांहून अधिक ओवीसंख्या असलेले वाङ्मय त्यांच्या प्रतिभासंपन्न प्रज्ञेतून निर्माण झाले आहे.

पू. दासगणुंना त्यांच्या शिष्य परिवारात 'दादा' नांवानेच संबोधित असत. येथेही महाराजांचा उल्लेख 'दादा' असाच करणे सोयीचे होईल.

पू. दादा मूळचे कोकणातले, रत्नागिरी प्रांतातील रत्नागिरी तालुक्यातील 'कोतवडे' नावाच्या लहानशा खेड्यातील रहिवासी. त्यांचे आडनाव 'सहस्त्रबुद्धे' होते. अधिकाराने खोतपण त्यांच्या घराण्याकडे होते. कुटुंब सुखवस्तू असून त्यांना गावात चांगला मान होता. सहस्त्रबुद्धे हे आश्वलायन सूत्राचे शांडिल्यगोत्री ऋग्वेदी चितपावन ब्राह्मण होते. सहस्त्रबुद्धे यांचे एक विठ्ठल-मंदिरही कोतवड्यात आहे. विठ्ठलभक्ती या घराण्यात दीर्घकाळापासून चालत आलेली आहे. हे लोक मूळचे करकंब्याचे. त्यांच्या कुळातील 'आप्पाजी' नारायण यांनी त्याचा मूळ प्रांत करकंबा सोडून नगरप्रांत जवळ केला. हे पू. दादांचे पणजोबा, तर श्री. एकनाथपंत व त्यांच्या पत्नि सौ. सरस्वतीबाई हे आजोबा-आजी होते. पू. दादांचे वडील श्री. दत्तात्रय व मातोश्री सौ. सावित्रीबाई होत. याच साध्वीच्या उदरी शके १७८९ पौष शुद्ध एकादशीच्या पुण्यदिवशी म्हणजे ६ जानेवारी १८६८ रोजी नगर प्रांतातील अकोळनेर गावी पू. दादांचा जन्म झाला. त्यांचे पाळण्यातले नाव 'नारायण' असे ठेवले होते. त्यांचे आजोबा श्री. एकनाथपंतांनी आपल्या गुटगुटीत नातवाला पाहून म्हटले, 'नारायण नाव काय ठेवतोस रे याचे? गुलामाचे पोट पहाना कसे गणपतीसारखे आहे! त्याचे कान सुद्धा पहा केवढे आहेत! याला आता गणपतीच म्हणा बरं का!' आणि त्यानंतर नारायण हे नाव मागे पडले आणि 'गणपती', 'गणेश' हे नाव रूढ झाले, प्रचारात लौकिक पावले. बालपणीची पाच-सहा वर्षेलाडा-कोडात गेली. वयाच्या नवव्या वर्षी शके १७९८ (इ.स. १८७६) मध्ये मौंज झाली. मौंजीबंधनानंतरही बालगणूला अभ्यासात गोडी वाटत नव्हती. त्याचे अभ्यासात लक्ष लागावे म्हणून सर्वजण प्रयत्नशील होते. परंतु बालगणु मात्र शाळेतील अभ्यास सोडून लावण्या, छक्कड यांची रचना करीत असे. सर्वांनी प्रयत्न करूनही मुलगा शिकेल असे चिन्ह दिसेना. सर्वांनी मुलापुढे हात टेकले आणि वयाच्या २१-२२व्या वर्षीच इंग्रजी चौथीतच त्यांच्या शिक्षणाला पूर्णविराम मिळाला. मुलगा अत्यंत बुद्धिमान असूनही शिक्षणाचा योग नाही या धारणेने वडीलधारी माणसे गप्प राहिली. पू. दादा अतिशय मानी होते. शिक्षणावरून घरात काकू बोलली; त्यांचा अपमान झाला, ते पाणी पिण्यासही तेथे उभे राहिले नाहीत. आणि म्हणाले, 'काही झाले

तरी मी तुमचे नाव सांगणार नाही. लौकिक मिळविला किंवा उपाशी मेलो तरी माझ्या एकट्याच्याच नावावर सर्व करीन,' असे तोडून बोलून ते जे घराबाहेर पडले ते कायमचेच!

पू. दादांनी पोलिसात नोकरी धरली. श्रीगोंदे या नगर जिल्ह्यातील तालुक्याच्या ठिकाणापासून नोकरीस आरंभ झाला. श्रीगोंदे येथे ९ रुपयांवर शिपाई नेमल्याचे आज्ञापत्र हातात पडताच घरी न कळविता श्री दासगणु नोकरीकरता निघून गेले. काही दिवसांनी ही वार्ता त्यांच्या चुलत्यांच्या कानावर गेली. श्री. जनार्दनपंतांना यामुळे फार वाईट वाटले आणि रागही आला. ज्या सहस्रबुद्धे घराण्यात तीन पिढ्या मामलेदारी चालत आलेली होती, त्या प्रतिष्ठित घराण्यातील एका तरुणाने ९ रु. वर सामान्य नोकरी करावी, हे श्री. जनार्दनपंतांना लाजिरवाणे वाटले. मानाची दुसरी नोकरी मिळवून देण्याचे आश्वासनही दिले. पण श्री दासगणुंच्या निग्रही मनावर त्याचा काही परिणाम झाला नाही. एकदा धरलेली नोकरी सोडून देण्यास ते सिद्ध होईनात. श्री. जानर्दनपंतांचा निरुपाय झाला. अशा रीतीने घराण्याचा संबंध जो एकदा सुटला तो नित्याचाच. श्री दासगणुंनी यानंतर नगरप्रांतातच विशेषतः श्रीगोंदे, जामखेड, खर्डा, नगर नेवासे या गावी एकूण ११ वर्षे नोकरी केली. श्रीगोंदे येथे मेळे, नाटके अशा ललित कलांना दासगणुंच्या उत्साहाने व कवित्व शक्तीने चांगलाच बहर आला.

नोकरीवर असतानाच श्री दासगणुंच्या काव्यगुणांचे विविध पैलू तेजाने चमकू लागले. घराण्याच्या प्रतिष्ठेचे कोणतेच बंधन आता उरले नव्हते. त्यामुळे त्यांच्या कवितेस तमाशाच्या रंगेल क्षेत्रात उघड उघड क्रिडा करण्यास कोणतीच अडचण नव्हती.

श्री दासगणुंची या वेळची कविता तमाशाकरिताच रचली गेली असली, तरी तिच्या विविधतेचे क्षेत्र विपुल व सर्वंकष आहे. त्यांची ही कविता कधी इतिहासाचा मागोवा घेत बाजीराव मस्तानीची भेट पोवाड्यात करून देई, तर कधी गावातल्या मामलेदारापासून हवालदारापर्यंतच्या अधिकाऱ्याची नावनिशी मजेदार पद्धतीने सादर करी. कधी निर्भेळ शृंगाराचे उत्तान वर्णन करण्यात रसिकतेने रममाण होई, तर कधी निसर्गाच्या सौंदर्याचा आस्वाद घेत जोंधळाबाजरीचे काव्यमय लग्न लावून सर्व पिकाची डौलदार वरात काढी. कधी प्रल्हादमहाराजासारख्या संताचे गुणानुवाद गाई, तर कधी गावातील लब्धप्रतिष्ठिताची कुलंगडी फटकळपणाने चव्हाट्यावर आणून झुळझुळीत पडद्यामागील अनाचाराचे दर्शन घडवी व श्रोत्यांना खदखदून हसावयास लावी.

श्री महाराजांचे वरवरचे वागणे कसेही असले तरी अंतर्यामीचा निर्मळतेचा झरा अखंड झुळझुळत वाहात असे. तमासगीर गोंधळी त्यांना आपले अन्नदाता मानीत.

माणसाच्या आयुष्यात अनेक वळणे येतात, जी आपले आयुष्य घडवितात. ही वळणं घेत असतानाच असा एखादा क्षण येतो जो माणसाला अंतर्मुख व्हायला लावतो. श्री महाराजांच्या आयुष्यातही अशा काही वळणदार घटना घडल्या की त्यांचा जीवनप्रवास शाहीर, कीर्तनकार आणि श्रेष्ठ संतकवी असा सुरू झाला.

श्रीगोंद्यास असताना श्री महाराजांची भेट श्रीसद्गुरू वामनशास्त्री इस्लामपूरकर यांचेशी झाली. श्री वामनशास्त्री संस्कृत ग्रंथांच्या संशोधनासाठी श्री गोंद्यास आले होते. म्हणजेच खरतर ही भेट कार्यालयीन कामाची होती. परंतु श्री वामनशास्त्रींच्या भक्तिरसाचा उद्रेक श्री दासगणुंनी पाहिला आणि त्यांच्या मनाने निश्चय केला की, गुरूपदेश घ्यायचा तो याच सत्पुरुषांकडून. या बाबतची सविस्तर कथा या अंकातील साईभक्त दादा या लेखात सविस्तरपणे आली आहे. त्यामुळे पुनरुक्ती नको म्हणून त्याचा सविस्तर उल्लेख येथे टाळला आहे.

रामदासी सांप्रदायिक श्री सद्गुरू वामनशास्त्रींकडून अनुग्रह घेतल्यावर ते दासगणु या नावाने प्रसिद्धीस आले. आपल्या सद्गुरूंवर असलेली अनन्य भावना आपल्या कवनातून व्यक्त करताना त्यांना सद्गुरू प्रेमाचे भरते येई. आपले काव्य हे त्यांच्या कृपेनेच होते असे त्यांचे म्हणणे असे ते म्हणत, 'गणुदास रची हे कवनकथा सुंदर। वामनशास्त्रींचा हस्त मस्तकावर।।'

या घटना घडत असताना त्यांची नोकरी चालूच होती. नगरपासून २५-२६ कोस दूर असलेल्या जामखेड गावी महाराजांची बदली झाली. गुरूउपदेशाने अंतरंगात रुजलेल्या भक्तीच्या सूक्ष्म बीजाला पहिला अंकुर याच ठिकाणी फुटला. त्याचे असे झाले - जामखेडास एका उत्सवप्रसंगी आमंत्रण दिलेले हरदास आले नाहीत. उत्सवप्रसंग कीर्तनावाचून पार पाडावा लागला. तेव्हा तेथील मामलेदार शेटफळकर श्री दासगणुंना म्हणाले, "अरे गणपतराव लावण्या पोवाड्यात आपल्या बुद्धीचा अपव्यय करतोस त्या ऐवजी जर काही आख्याने बसविली असतीत तर तुझ्या काव्यशक्तीचे खरे चीज झाले असते." यावर दासगणुंनी त्यांना आश्वासन दिले की, पुढच्या एकादशीला मी देवळांत कीर्तन करेन. त्याच्या या बोलण्यावर कोणीच विश्वास ठेवला नाही. श्री. दत्तोपंत खैर नावाच्या पोस्टमास्तरांचा मात्र आपल्या मित्रावर म्हणजेच दासगणुंवर पूर्ण विश्वास होता. गणपतराव जे म्हणेल ते करून दाखवील असा भरवसा असल्याने त्यांनी दासगणूंचे कीर्तन एकादशीस ठरविले. श्री दासगणुंनी सर्वांना चकीत करून सोडायचे असा निश्चय केला. कीर्तनासाठी त्यांनी संत दामाजींचे आख्यान स्वतंत्रपणे रचले. लावण्या म्हणणाऱ्या आपल्या साथीदारांकडून ते चांगले पाठ करून घेतले. कीर्तन ऐकण्यासाठी तोबा गर्दी झाली. तमाशातील श्रृंगारिक लावण्या रचणारा गणपतराव कीर्तनात काय सांगतो पाहू असे सर्वांना कुतूहल होते. टर उडविण्यासाठी आलेल्या मंडळींना आपला विचार कृतीत आणण्यास अवसर मिळाला नाही. जवळजवळ दोन तास कीर्तन चालले.

आख्यानास सुरुवात होताच त्यातील दुष्काळाचे वर्णन दामाजींची उदारता, जेवणाच्या पंक्तीचा थाट, यात मंडळी रंगून गेली. दामाजींना अटक होण्याचे फर्मान येताच संत दामाजींच्या साध्वी पत्नीने तुळशी-वृंदावनाजवळ उभे राहून 'हे अनंत पंढरिराया। का पातळ केलीस माया विठ्ठला। चुकले मी काय सेवेला। म्हणुनिया मोकळिसी मजला।।' अशी करुणा भाकली आणि श्रोत्यांना अश्रू अनावर झाले. भक्ताच्या संरक्षणार्थ महाराच्या रूपात बेदरास विठ्ठलाने धाव घेताच श्रोत्यांच्या मनातील किल्मिषे दूर झाली. भक्तिरसाच्या पवित्र गंगेत सर्वजण न्हाऊन निघाले.

कीर्तनाचा थाटही काही वेगळाच होता. बाष्कळ विनोद नाही, ओढून ताणून कोट्या नाहीत, कृत्रिम हावभाव नाहीत, पांडित्याचे उसने प्रदर्शन नाही. आबालवृद्धांना सहज समजेल असा सोपा विषय अकृत्रिम साधेपणा, हृदयाचा ठाव घेईल अशी जिव्हाळ्याची भाषा, उत्कट भक्तिप्रेम आणि या सर्वांना मधुरपणे उठाव देईल असे स्वकृत प्रेमळ काव्य हे सर्व ऐकून लोक आश्चर्यचकित झाले.

अशा रीतीने ज्या कीर्तनांनी पुढे अवघ्या महाराष्ट्राला वेड लाविले, सुदिनांच्या नास्तिक विचारांना धक्के दिले, बुवांचे ढोंग चव्हाट्यावर आणले, भक्तिरसाचे पावन प्रवाह वाहविले, चारपाच हजार श्रोत्यांना एकाच वेळी आपल्या वयाचा आणि योग्यतेचा विसर पाडून हरिप्रेमाच्या आनंदात देहभान विसरायला लावले त्या कीर्तनाचा पाया अशा रीतीने घातला गेला.

## कान्हा भिल्ल प्रकरण

दासगणुंच्या जीवनास वेगळी कलाटणी मिळण्यास कारणीभूत झालेले प्रकरण म्हणजे 'कान्हा भिल्ल' दरोडेखोर प्रकरण. परमार्थाची आवड असलेला त्याचा मूळ स्वभाव अधिक दृढमूळ झाला. सन १८९८ मध्ये कान्हा भिल्लाने ठिकठिकाणी दरोडे घालून धुमाकूळ घातला होता व दहशत निर्माण केली होती. त्याला पकडण्यासाठी सरकारने पू. दासगणुंची नेमणूक केली होती.

मोंगलाईतील लोणी या गावी दासगणु रामदासी वेषात येऊन राहिले. लोणीच्या गंगाराम पाटलाशी कान्ह्याचे संबंध आहेत अशी कुणकुण लागल्यामुळे त्यांनी हे गाव निवडले होते. सोंग घेऊन राहायचे तर सद्‌गुरू उपदेशानुसार आपण रामदासी आहोतच तेव्हा तोच वेष घ्यावा खोटा कशाला असा विचार त्यांनी केला. गावातील राममंदिरात राहून ते रामसेवा करू लागले. त्यांच्या भक्तियुक्त हृदयाला आनंद देणारा असाच हा विषय होता. त्यामुळे ते मनोभावे रामसेवा करू लागले. साहजिकच रामदासीबुवांची कीर्ती गावात हळूहळू वाढू लागली. देवापुढे प्रसाद, फळे जमू लागली. स्वत: दादा तर ते निरिच्छच होते. त्यामुळे जमा झालेला प्रसाद ते मुलांना वाटून देऊ लागले. शाळकरी मुले प्रसादाच्या मोहाने देवळामध्ये जमू लागली. पू. दादांना गावातील माहिती त्यांच्याकडून काढून घेणे सुलभ झाले. हळूहळू मुलांच्याकडून 'कान्हा भिल्लाचा राबता त्या गावातील पाटलाकडे आहे हे समजले. एक दिवस पाटलाच्या मुलाचा हात पहाण्याचे निमित्त करून ऐकीव माहितीच्या आधारे त्यांनी त्याला सांगितले की, तुला दोन आया आहेत. तुम्ही तीन भावंडे आहात. मोठ्या बहिणीचे लग्न झाले आहे. हे ऐकून त्याला नवल वाटले. त्यांनी आपल्या वडिलांना सांगितले की, रामदासीबुवांना भविष्य चांगले समजते. पाटीलबाबा पू. दादांच्याकडे आले. त्यांनी पाटलांना सांगितले की, तुम्हाला संसारसुख चांगले आहे. पण तुमच्या घरात येणारी संपत्ती चोरीच्या मार्गाने आलेली आहे. पुढील दारातून वाजत गाजत येणारी लक्ष्मी नाही. त्यांच्या या उद्‌गारांनी पाटील नरमले व त्यांची पू. दादांच्यावर श्रद्धा बसली. श्रद्धेने पाटील शिधा व दूध देऊ लागले. त्यामुळे पू. दादांचा खाण्यापिण्याचा प्रश्न सुटला. गावामध्ये मान सन्मान वाढला. हे सगळे सुरू असले तरी आपण हे खोटे वागत आहोत याची खंत त्यांना सतावत असे व त्याबद्दल ते मनापासून रामाची क्षमा मागत असत.

दरोडेखोर भिल्लाला पू. दादा हे रामदासी नसून सरकारचे गुप्तहेर आहेत याचा सुगावा लागला होता. त्याने पाटलांच्याकडे तक्रार केली. पण पाटील म्हणाले ते खरेच रामदासी आहेत त्यांना उत्तम भविष्य समजते. चला तुम्हाला पण मी त्यांच्याकडे घेऊन जातो. भिल्लाने त्यांच्याकडे गेल्यावर तुम्ही कोण? असा प्रश्न विचारला तेव्हा पू. दादांनी सांगितले की, मी वाई सातारकडचा समर्थ-भक्त आहे. जांब या गावी गेलो होतो तेथून परत फिरताना समजले की, गावाकडे प्लेगची साथ आहे. म्हणून या गावात राम मंदीरामध्ये राहिलो आहे. तुम्हाला शंका असेल तर मी रामाच्या पायावर डोके ठेवतो. माझ्या पाठीवर तुम्ही बंदूक झाडा. कान्हा ओशाळला. त्यांनी बंदूक मागे घेतली पण पाटलांना त्यांच्यावर लक्ष ठेवण्यास सांगितले. श्रद्धेने भगवंताला शरण गेले, की तो भक्ताला संकटातून तारून नेतो याचा त्यांना अनुभव आला. भिल्लाच्या तावडीतून सुटले तरी पू. दादांची नोकरीतील कर्तव्यनिष्ठा चालूच होती. वेळोवेळी ते कान्ह्याच्या हालचाली सरकारी कार्यालयात कळवत होते.

एकदा पाटलाच्या मळ्यात कान्हा येणार होता ते त्यांनी सरकारला कळविल्यामुळे त्याला पकडण्यासाठी पोलिसांनी मळ्याला वेढा घातला पण कान्हा चलाख त्यांनी सर्व पोलीसांच्या डोळ्यात धूळफेक करून गवताच्या गंजी पेटवून धूर केला. स्वत:ची सुटका करून घेतली. रामदासीबुवांच्या आशीर्वादानेच तुझी सुटका झाली असे पाटलांनी कान्हाला सांगितले व परत एकदा पू. दादांच्या दर्शनाला नेले. पाया पडत असताना कान्हाने त्यांच्या पायावरील पोलिसी वहाणांचे उठलेल्या वळांमुळे ओळखले की हे पोलीसच आहेत. याबद्दल खात्री करण्यासाठी कान्ह्याने विचारले असता पू. दादांनी आमच्या गावाकडे आम्ही अशीच वहाण वापरतो व त्याचे हे वळ आहेत. असे सांगून सुटका करून घेतली.

दादांचे हे उत्तर कान्हाला योग्य वाटले. त्याने दासगणुंना लवून नमस्कार केला आणि आपल्या गळ्यातील १६ तोळ्यांचा सातपदरी गोफ दादांच्या पायावर ठेवला. निरिच्छवृत्तीच्या दादांनी तो कान्हाला परत केला. कान्हा तो परत घेईना तेव्हा तो गोफ पाटलाच्या स्वाधीन करून दादांनी पाटलाला सांगितले यातले तीन पदर बाळंभटाला द्या व बाकीचे मोडून मोडकीस आलेल्या या मंदिराची डागडुजी करा.

कान्हा भिल्लाला पकडणे कठीण आहे हे लक्षात आल्यावर व कान्हा भिल्ल पू. दादाच्या समोर बऱ्याचवेळा येतो हे पाहून सरकारने दादांना सहाबारी पिस्तुल दिले व कान्हास जायबंदी करण्याची आज्ञा केली. पू. दादांना या सर्वांतून सुटका हवी होती. दादा सरकारी सामान घेऊन मिरजगावास आले. तेथे त्यांचे एक डॉक्टर मित्र होते. त्यांना सर्व हकिगत सांगून त्यांचेकडे सहाय्य मागितले. डॉ.नी दादांचे नाव रोगी म्हणून नोंदविले व सर्व जोखमीचे सरकारी साहित्य पोलीस ठाण्यावर पाठविले. पुढे महत्त्वाचा माणूस म्हणून त्यांना नगरच्या दवाखान्यात नेण्याचे सरकारने ठरविले. तिथे त्यांच्या नशिबाने त्यांना साथ दिली.

बोस नावाच्या डॉक्टरांनी (जे नानासाहेब चांदोरकरांचे मित्र होते) या माणसाचे हृदय अशक्त आहे त्याला कोणत्याही धोक्याच्या जागी पाठवू नये असा दाखला दिला त्यामुळे दासगणुंची नेमणूक पुन्हा जामखेडास झाली.

या सर्व घटनांचा परिणाम त्यांच्या संस्कारसुलभ मनावर झाला. अनन्यभावाने शरण गेल्यास ईश्वर उपेक्षा करीत नाही हे संतवाक्य त्यांनी स्वत: अनुभवले.

### श्री साईबाबांची भेट व तमाशापासून फारकत

श्री दासगणुंना आपल्या सद्‌गुरूचा सहवास अल्पकाळ झाला असल्याने हरिभक्तीचे रोप जरी त्यांच्या अंत:करणभूमीत सद्‌गुरूकृपेने रुजले गेले होते, तरी त्या बीजरूप रोपाला अनेक आर्त जीवांना सुखछाया देईल अशा महान वृक्षाचे स्वरूप जे पुढे प्राप्त झाले; त्याला शिरडीकर श्री साईबाबांची कृपाच विशेष रीतीने कारणीभूत झाली आहे. 'श्री साईबाबा हे माझेच स्वरूप आहेत,' असे श्रीसद्‌गुरू वामनशास्त्री यांनी सांगितले. त्याप्रमाणे श्री दासगणु पुढे साईबाबा यांना गुरुस्थानी मानू लागले. 'भक्तिसारामृत' या ग्रंथातील त्रेपन्नाव्या अध्यायाच्या शेवटी त्यांनी तसा स्पष्ट उल्लेखही केला आहे. असे असले तरी प्रथम प्रथम श्री साईबाबांचा आणि त्यांचा जो परिचय झाला तो काही ते सत्पुरुष आहेत, त्यांची कृपा संपादन झाली तर आपले कल्याण होईल, या भावनेने झाला नाही. श्री. नानासाहेब चांदोरकरांच्या आग्रहामुळे ते प्रथम शिरडीस गेले.

१८९६ साली प्रथम श्री दासगणु शिरडीस श्री साईबाबांच्या दर्शनाकरिता गेले. आरंभी तरी श्री साईबाबांविषयी श्री दासगणुंना फारसा आदर वाटला नाही. केवळ बाह्यांगावर भुलणे वा लोकांच्या सांगण्यावर विश्वास ठेवून गतानुगतिक होणे, हे श्री दासगणुंच्या स्वभावातच नव्हते. त्यांना स्वत:ला एखादी गोष्ट पटेल, अनुभवास येईल तरच ते मानीत. त्यांच्या आत्यंतिक निष्ठावंत श्रद्धेला असलेले हे बुद्धिवादाचे अधिष्ठान मोठे विचार करण्यासारखे आहे. श्री साईबाबांशी त्यांचा परिचय जसजसा वाढत गेला, त्यांच्या त्रिकालज्ञानाचा प्रत्यय आला, तसतसे श्री साईबाबा ही अलौकिक विभूति आहे, याची साक्ष पटून बाबांच्या चरणी दासगणुंची निष्ठा स्थिरावली. या निष्ठेला शेवटी तर -

**शिरडी माझे पंढरपूर। साईबाबा रमावर।**

**शुद्ध भक्ती चंद्रभागा। भाव पुंडलीक जागा।।**

असे मानण्याइतके उज्ज्वल स्वरूप प्राप्त झाले.

श्री साईबाबांच्या आज्ञेप्रमाणे 'भक्तिलीलामृत' घेऊन सत्चरित्रे नैसर्गिक रसाळ वाणीने गात असताना, श्री दासगणुंच्या काव्याचे मूळचे सोज्वळ स्वरूप प्रकट होऊ लागले. अंतरंगात ईशभक्तीची लालसा वाढत जाऊन ग्राम्य गीताचा उबग येऊ लागला. आताहि पद्यरचना होत होतीच, पण त्यातील चाल तेवढी लावणीची, अर्थ सगळा अध्यात्मपर असे. ''या विषयासाठी कसा मना तू वद होशी वेडा'' यासारखी पदे स्फुरू लागली. स्फुटपदाच्या पुस्तकात प्रसिद्ध झालेले ''नरतनु तुला लाभली पर्वणी भली'' हे पद नेवाशास असतानाच रचले गेले आहे. त्या पदाच्या शेवटी ''नेवासे प्रवरातटी कवन करी गणू हे'' असा उल्लेख स्वत: कवीनेच केला आहे. नेवाशास रामय्या नावाच्या एका सत्पुरुषाची भेट होऊन काही दिवस सहवासही लाभला होता. पिशाच्चवृत्तीने राहणारे हे एक सत्पुरुष सर्वसामान्य लोकांना अगदी वेडे वाटत. अंगावरील वस्त्राचीसुद्धा त्यांना क्वचित्‌च शुद्धि असे. मोहिनीराज मंदिराच्या कट्ट्यावर ही स्वारी स्वस्थ पडून असे. गांजा ओढण्याची सवय होती, पण त्यासाठी साधी चिलीमही त्यांनी कधी वापरली नाही. मुठीत गांजा घेऊन त्यावरच निखारा ठेवून ओढीत.

नेवाशास श्री. काशीकर नावाचे एक अग्निहोत्री सदाचारसंपन्न विद्वान ब्राह्मण होते. ते मात्र या रामय्याना प्रतिपरमेश्वर मानीत. मोहिनीराजाच्या दर्शनासाठी येत असताना मध्यंतरी वाटेत जर कुठे रामय्याची गाठ पडली तर त्यांना नमस्कार करून शास्त्रीबुवा तेथूनच परत फिरत. हे रामय्या श्री दासगणुंवर फार प्रेम करीत. जाता येता त्यांना धरून ठेवीत आणि त्याच्याशी घटकाघटका अस्ताव्यस्तपणे गप्पा मारीत बसत. काशीकरांनी म्हणावे, ''गणपतराव, देवाचे तुझ्यावर किती प्रेम आहे रे? तुझे भाग्य खरेच थोर की असा पुरुष आपणहून तुझ्याशी बोलत बसतो.''

एक दिवस कचेरीच्या पगाराची थैली घेऊन जात असता रामय्याने श्री दासगणूंना हटकले आणि म्हटले, ''ये थैली कहाँकी है? मुझे दो.'' सहज मागत असावे, अशा कल्पनेने श्री दासगणुंनी ही पगाराची थैली आहे. म्हणून दाखविण्यासाठी पुढे केली. ती हिसकावून घेऊन रामय्या कुठल्या कुठे पळत जाऊन बेपत्ता झाले. श्री दासगणुंना ही मोठी चिंता उत्पन्न झाली. थैली रामय्यांनी नेली, हे काही उघडपणे ते सांगू शकत नव्हते. शेवटी निरुपायाने पत्नीच्या हातातल्या पाटल्या व गळ्यातील एकसर त्यांनी श्री. केशवराव वाघ या गावातील एका मोठ्या दुकानदाराकडे गहाण टाकला आणि कचेरीतील पगाराच्या पैशाची भरपाई केली. रात्री रामय्या श्री दासगणुंच्या घरी आले आणि म्हणाले, ''त्या वाघाच्या घरी चल. त्याने आमचे सोने बळकाविले आहे.'' त्याप्रमाणे पगाराची थैली परत करून श्री दासगणुंच्या डोक्यावरील सावकाराचे ऋण उतरविले. रामय्याच्या अशा पुष्कळ गमती श्री दासगणुमहाराज मोठ्या आवडीने सांगत असत. या सत्पुरुषाचा सहवास बरेच दिवस झाल्यामुळे श्री दासगणुंचे अंत:करण ईश्वरभक्तीच्या सुखात अधिकच रमले.

श्री दासगणुंनी तमाशाचा नाद संपूर्णतया सोडून देण्याचे ठरविले. मात्र तो सोडताना असे ठरविले की, ज्याने अतिशय रमणीय अशा स्त्रीचा नटवेष धारण करून आपल्या मोहक हावभावानी राक्षस मंडळींना फसविले, त्या नटनर्तक मोहिनीराजापुढे एकदा तमाशा करून मग डफ फोडावयाचा. ही कल्पना विचित्र तर खरीच, पण सूक्ष्म दृष्टीने पाहता तिच्यातही एक प्रकारचे औचित्य आढळेल. विचार मनात आल्यावर कृतीत उतरविण्यास श्री दासगणुंना वेळ लागत नसे. त्यांनी एक दिवस मोहिनीराजापुढे तमाशा करून डफ फोडून टाकला.

### नोकरीचा त्याग

श्री साईबाबांच्या आज्ञेप्रमाणे संतचरित्रे लिहिण्यास प्रारंभ झाल्यानंतर श्री दासगणु श्री बाबांच्या दर्शनाकरिता बरेच वेळा जात

असत. श्री साईबाबांविषयी त्यांच्या मनात आता आदरभाव उत्पन्न झाला होता. श्री बाबांचेही श्री दासगणुंवर फार प्रेम होते. श्री दासगणु श्री बाबांचे जणू प्रल्हाद होते. 'नोकरी सोडून दे रे गणू असा आग्रह श्री साईबाबांनी श्री दासगणुकडे धरला होता. आपण कोणाचे चाकर होऊ नये असेही श्री बाबा त्यांना सांगत. श्री बाबांचा नोकरी सोडण्याबाबत एवढा आग्रह असूनही श्री दासगणु ही गोष्ट मनावर घेत नव्हते. आपल्याला कोणाचाच आधार नाही. नोकरी सोडली तर दोन वेळचे अन्नही आपल्याला मिळणार नाही असे भय त्यांच्या मनात होते.

संतचरित्रे लिहिण्याच्या निमित्ताने श्री दासगणु गावोगावी हिंडत. अधिकृत रजा न घेता फिरतीवर असताना ते परभारे लेखनाची माहिती मिळविण्यासाठी निघून गेले. त्यांच्या चौकीच्या हद्दीतच मोठी चोरी झाली. श्री दासगणु कामावर नसल्याची चुगली त्यांच्या हाताखालील 'अडली'ने वरिष्ठांकडे केली. श्री दासगणुंना हे वृत्त समजल्यावर श्री बाबांची अवज्ञा आपण केली त्यामुळेच आपल्यावर हे संकट आले अशी धारणा झाली. मध्यरात्री एकदीडचे सुमारास नदीत उभे राहून ओंजळीत पाणी घेऊन शिरडीच्या दिशेला तोंड करून श्री दासगणुंनी श्री साईबाबांना साकडे घातले. ''बाबा यातून सुखरूप सुटलो तर नोकरी सोडीन याला गंगामाईच साक्ष'' असे म्हणून पाणी सोडले. योगायोगाने मुद्देमालासह युक्तीने चोर पकडले गेले. श्री दासगणुंना बढती मिळाली. बढतीच्या मोहाने त्यांनी नोकरी सोडली नाही. श्री साईबाबांनी त्यांना गंगामाईच्या शपथेचीही आठवण करून दिली पण काही उपयोग झाला नाही. नोकरी चालूच राहिली. पुढे एका प्रसंगात कायद्याच्या कचाट्यात सापडण्याची वेळ आली. गुन्ह्याच्या तपासात आरोपींना वागविताना कायद्याच्या कक्षेबाहेर जाऊन वागविले गेले आहे असा काहूर हितशत्रूंनी उठविला. श्री दासगणुंना शिक्षा होणार नावाला बट्टा लागणार अशी वेळ आली. श्री दासगणु शिरडीस गेले. सहीसलामत या प्रकरणातून सुटल्यास लगेच नोकरी सोडेन असे बाबांना सांगितले. श्री बाबांच्या कृपेने खरोखरीच तसे घडले आणि श्रीदासगणुंनी नोकरी सोडली.

नोकरी सोडल्यानंतर काही दिवसांनी श्री दासगणुमहाराजांनी आपला भक्तीलीलामृत ग्रंथ पुरा केला. श्री. नानासाहेब चांदोरकरांनी तो छापण्यास सहाय्य केले. श्री. दादा या कामासाठी पुण्यात येऊन राहिले. श्री. राजवाड्यांच्या साहाय्याने संतचरित्राच्या प्रकाशनाचे काम झाले.

भक्तिलीलामृत ग्रंथाच्या प्रकाशनानंतर पू. दासगणुमहाराजांनी मागे वळून पाहिले नाही, आयुष्यभर रसाळ संतचरित्रे किर्तन, आख्यान ग्रंथांच्या रूपाने काव्यबद्ध करण्याचे कार्य चालूच राहिले. ते संतकवीच नाही तर श्रेष्ठ संतच होते. प्रसिद्धीपराङ्मुख, परखडपणे मत व्यक्त करणारे सडेतोड आणि नि:संदिग्ध भूमिका ठामपणे घेणारे एक समाजहितैषी निस्सीम देशभक्त होते. तमाशाचा फड उभा करून लावणी आणि श्रृंगारिक काव्यरचनेत रमलेली त्यांची लेखणी पुढे मात्र संतांचे पवाडे गाण्यात विनम्र झाली, ती सर्वभावाने. त्यांची मनोभूमिका पू. अनंतरावांनी काव्यात वर्णन केली आहे ती अशी,

**जरी अधम चाकरी कवन हीनशी लावणी।**
**निकृष्ट जन भोवती परि न लिप्त तद्‌दुर्गुणी।**
**पटासह असूनही जर खरा न की रंगतो।**
**समर्थ गणुदास ते सतत मी नमस्कारितो।।**

पुढे श्री साईबाबांच्या आज्ञेनुसार ते नांदेडास आले. त्यांचा 'संतकवि' असा जो लौकिक झाला तो याच प्रांतात. संतरत्नांची खाणच असलेल्या अशा ह्या मराठवाडा प्रांतातील वातावरण श्री दासगणुंच्या मन:प्रवृत्तीस चांगलेच मानवले.

मधुर फळे देणाऱ्या फळझाडाची रोपे एके ठिकाणी तयार करून मग दुसरीकडे रुजवितात. म्हणजे ती मग फळाफुलांनी बहरून जातात. ती अनेक श्रांतांना आपल्या छायेत सुखशीतल विश्रांती देऊन त्यांचा श्रमपरिहार करतात. मधुररसाने त्यांना तृप्तवितात. श्री दासगणुंच्या जीवनाचे तसेच झाले. नगरप्रांतात अंकुरित झालेले त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचे रोप मराठवाड्याच्या पवित्र सुपीक भूमीत चांगलेच रुजले, वाढले आणि त्याला अनेकांना विसावा देईल, अशा मुधर फळे देणाऱ्या आम्रवृक्षाची विशालता प्राप्त झाली.

श्री दासगणुंच्या जीवनकार्याचा विचार करता त्यांच्या मानी स्वभावाबरोबरच त्यांचे अन्य पैलूही विविध प्रसंगानुरूप उठून दिसतात.

त्यांना दंभाचा तिरस्कार होता. श्री दासगणुंनी आपल्या आयुष्यात कथा-कीर्तनातून वा संभाषणातून ढोंगी लोकांच्या भक्तीची थट्टा केली नाही अथवा तिरस्कारही केला नाही. परमार्थाच्या नावाखाली तत्त्वज्ञानाच्या आधारे उपयोजिला जाणारा दुराचार मात्र अत्यंत कडक शब्दात तिरस्कारिला. ते म्हणतात, ''वाईट व्यक्तीवर ठेवलेल्या श्रद्धेमध्ये निष्ठा कायम टिकत नाही. अंत:करणाचा विक्षेप होतो. श्रद्धेय व्यक्ती जितकी चांगली श्रेष्ठ तितकी निष्ठा अधिकच स्थिर राहाते.''

नि:स्पृहपणा आणि वैराग्य हीच परमार्थाची मुख्य लक्षणे आहेत. कीर्तनाची बिदागी न घेण्याचे व्रत ते निष्ठेने पाळत या बाबतीतील दोन प्रसंग अत्यंत महत्त्वाचे आहेत.

शके १८४७ मध्ये श्रावणमास कीर्तनासाठी श्रीमंत सरकार सवाई तुकोजीराव होळकर यांच्याकडून पू. दादांना इंदोरला बोलावले होते. महिनाभर 'यशवंत निवास' राजवाड्यात कीर्तन होत असे. कीर्तनाची वेळ दुपारी चार ते सहापर्यंत असे. श्रावणमहिना संपत आला. शेवटचा दिवस उगवला पू. दादांचा नि:स्पृहपणा व कीर्तनाबद्दल काही न घेण्याचा नियम सर्वश्रुत होताच. राजवाड्यात तर बिदागीची तयारी सुरू होती. सर्वांना धास्ती पडली की, आता पेचप्रसंग निर्माण होणार. त्यावर पू. दादांनी आश्वासन दिले की, तुमच्या राजाचा अपमान न होऊ देता माझा नियम पाळण्याची खबरदारी घेतली जाईल.' कीर्तनाला शेवटचा दिवस म्हणून विशेष गर्दी होती. बिदागी दाखल एका सोन्याच्या थाळीत सोन्याच्या मोहरा व चांदीचे ताटात रुपये भरून देवापुढे ठेवले होते.

पू. दादांच्या बोलण्यास सुरूवात झाली त्यांनी प्रथम म्हटले, 'श्रीमंत होळकर सरकारचा असा लौकिक प्रसिद्ध आहे कोणी विद्यार्थी नवीन विद्या शिकण्याच्या इच्छेने श्रीमंताकडे मदत मागण्यास गेला, तर श्रीमंतांची विद्याप्रियता त्यास शिष्यवृत्ती देण्यास भाग पाडते. मीही एक विद्यार्थी आहे आणि श्रीमंतांचे कडे शिष्यवृत्ती मागत आहे. माझी खात्री आहे की, श्रीमंत उदार अंत:करणाने मला ती देतील. मी परमार्थ

कॉलेजात प्रवेश चाहतो आहे या कॉलेजात निर्लोभतेची शिष्यवृत्ती लागते. ती श्रीमंतांनी मला देऊन आपला नावलौकिक राखावा. हीच माझी श्रीमंतांना नम्र मागणी आहे.' कीर्तन संपले. आरती झाली. बिदागीची ताटे जशी बाहेर आली, तशी आत गेली. श्रीमंतांसह सर्व श्रोते जणु मंत्रमुग्ध झाले होते.

आणखी एक असाच प्रसंग या वेळी घडला. देवास मोठ्या पातीचे राजे श्रीमंत तुकोजीराव पवार हे कृष्णभक्त होते. त्यांनी पू. दादांना कीर्तनाचे आमंत्रण दिले. कीर्तनाबद्दल काही न घेण्याचा नियम पू. दादांनी श्रीमंतांना सांगितला. त्यावर राजेसाहेब म्हणाले, 'हा गोपालकृष्णाचा प्रसाद आहे. आपण याचा अव्हेर करू नये.' ऐकताच पू. दादांनी ती रक्कम उचलली व तेथे जी ब्राह्मणमंडळी जमली होती, त्यास वाटण्यास आरंभ केला. कोणी घेईनात. तेव्हा पू. दादा म्हणाले, 'गोपालकृष्णाच्या प्रसादाला कोणी नाही म्हणू नये.' राजे साहेबांनाही काही बोलता येईना. कारण ते त्यांच्याच शब्दात पकडले गेले होते. पू. दादांच्या नि:स्पृहतेचे सर्वांनाच फार आश्चर्य वाटले.

नगर येथील सत्कार हे ही श्री दासगणुंच्या नि:स्पृहतेचे एक फार मोठे उदाहरण आहे. प्रसिद्धीपराङ्मुख असलेल्या श्री महाराजांना सत्कार समारंभाचे वावडे होते. नगर येथे सत्कार करण्याचा प्रयत्न दोन-चार वेळा झाला पण प्रत्येक वेळी महाराजांनी त्याला नकार दिला. शेवटी १९५८ साली सत्काराला होकार मिळविण्यास नगरकर मंडळी यशस्वी झाली. ३ ऑक्टोबर १९५८ या दिवशी नगरला सत्कार झाला. सत्काराचे पटांगण माणसांनी फुलून गेले होते. अनेक संस्थांच्या वतीने महाराजांना पुष्पहार अर्पण करण्यात आले. नगरच्या समस्त नागरिकांच्या वतीने नगराध्यक्षांनी त्यांना शाल, श्रीफळ व थैली भेट दिली. महाराजांनी तत्क्षणी ती थैली नगरवाचनालयास भेट म्हणून दिली. आणि उत्तरादाखल ते दोनच वाक्य बोलले. ते म्हणाले, ''मी नगरचा आहे. नगरचा मला फार अभिमान वाटतो. नगरच्या लोकांनी माझे कौतुक न करता मला जोडे मारले असते तरी मी ते स्वीकारले असते.'' सर्व सभा स्तिमित झाली. भारावली. वाक्ये दोनच पण त्याचा समाजावर फार मोठा प्रभाव पडला. या उद्गारात सरळपणा, निरागसता, ज्ञानाला साजेसा निरहंकार, विनय, जन्मभूमीविषयीचे निरातिशय प्रेम आणि सत्कार समारंभाविषयीची अप्रीति प्रगट झाली.

अडचणीत सापडलेल्या माणसाला मदत न करणे हे पातक आहे. असे श्री महाराज मानीत. अडीअडचणीत असलेल्या माणसांना आपल्याकडून होईल ती मदत करणे हा त्यांचा स्वभावविशेष होता. जातीने महार असलेला एक विद्यार्थी परीक्षेची फी भरण्याच्या अडचणीत होता. अनेक ठिकाणी प्रयत्न करूनही त्याला मदत मिळाली नाही. शेवटी कीर्तनास निघालेल्या श्री दासगणुंना त्याने दारात अडवून काही मदत करण्याची विनंती केली. महाराजांनी ती मान्य केली आणि कीर्तनामध्ये जमलेली आरतीची रक्कम त्याला देऊन टाकली. दहा-बारा वर्षानंतर हा मुलगा त्यांना मनमाड स्टेशनवर भेटला. त्याने महाराजांना ओळखून वाकून नम्रपणे नमस्कार केला आणि आपली ओळख सांगितली व आता तो मामलेदार झाल्याचे सांगून ही सर्व महाराजांचीच कृपा व त्यामुळेच हा योग आल्याचे सांगितले. महाराजांनी त्यास जवळ बसूवन घेतले आस्थेने त्याची व त्याच्या मुलाबाळांसंबंधी चौकशी केली.

मोंगलाईत प्रवास करताना महाराजाचा एका खेड्यात मुक्काम होता. त्यावेळी तेथे कॉलऱ्याची तुरळक साथ होती. एका झोपडीमध्ये एक मराठी शेतकऱ्याचे जोडपे साथीत मरून पडले होते. पाच-सहा वर्षांची एक लहान पोर प्रेताच्या अंगावर पडून, 'आई उठ, बोल गं' असा आक्रोश करीत होती. श्री दासगणु तिच्याजवळ गेले त्यांनी तिला विचारले, ''काय झाले बाळ?'' ती म्हणाली, ''माझी आई कवाची निजली हाय मामा, हलविली तरी बोलत नाय.'' श्री महाराजांना कीव आली त्यांनी तिला जवळ घेतले. कुरवाळले. ते दीन लेकरू मामा म्हणून त्यांना बिलगले. श्री दासगणुंनी आपल्या मंडळींकरवी त्या प्रेतांची व्यवस्था लावली. मुक्काम हलविताना त्या मुलीला बरोबर घेऊन जाणे श्री महाराजांना भाग पडले. पुढे पाच-सहा महिने ही ताई श्री महाराजांबरोबर होती. पुढे नांदेड जवळील एका खेड्यात पाटलाला महाराजांनी या मुलीचा सांभाळ करण्यास सांगितले. पाटलाला मुलबाळ नव्हते. पुढे योगायोगाने पाटलास मुलगा झाला. चांगल्या पायगुणाची मुलगी म्हणून त्याने तिचा प्रतिपाल करून लग्नकार्य केले.

### योग्याची भेट

श्री दासगणु महाराजांच्या पत्नी सौ. सरस्वतीबाई शके १८४१ च्या वैशाखात दिवंगत झाल्या. त्यांची उत्तरक्रिया श्री महाराज नांदेड येथे गोदातीरी करीत होते. दुपारची वेळ चटके बसत होते. महाराजांच्या डोक्यावर दोघा-तिघांनी छत्र्या धरल्या होत्या. क्रियाकर्म चालू होते. त्यावेळी भर उन्हात एक साधूसारखा दिसणारा पुरुष खडकावर बसला होता. अंगावर एका लंगोटीशिवाय काहीही नव्हते. अत्यंत कृश अशा त्या शरीराची त्वचा नितळ आणि तेजस्वी होती. आपले काम आटोपल्यावर श्री महाराज त्यांचे जवळ गेले. महाराज समोर येताच त्याने पाठ फिरविली. श्री महाराजांनी त्यांच्याशी बोलण्याचा प्रयत्न केला. पण काही उपयोग झाला नाही. शेवटी कंटाळून महाराज घरी आले व त्यांनी दिगंबरराव नांदेडकरांना त्या साधूस काही अन्न देण्यास सांगितले. अन्न समोर येताच त्या साधूने ते जसे हातात येईल तसे ते खाल्ले म्हणजे आमटीत आमटी, भाजीत भाजी असे. नांदेडकरांनी ही घटना महाराजांना सांगितली. दुसरे दिवशीही श्री महाराजांनी त्या साधूस भेटण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ असे तीन चार दिवस झाले. अशौचातून (सुतकातून ) मुक्त झाल्यावर श्री महाराज एके दिवशी रात्री त्या साधूस भेटायला गेले. यावेळी मात्र साधूनी पाठ फिरविली नाही. श्री महाराजांनी याबद्दल विचारले असता त्यांनी प्रथम श्री महाराजांना विष्णूसहस्रनामाचे पाठ करूनही तुला त्याचा अर्थ कळला नसल्याचे व अहंकार गळून गेला नसल्याचे सांगितले. साधूने श्री महाराजांना अशौच होते व अशा अवस्थेतील व्यक्तीशी दृष्टादृष्ट होणे योग्याला योग्य नाही असे सांगितले. न सांगता त्यांनी महाराजांची अवस्था ओळखली होती. याचे महाराजांना आश्चर्य वाटले. साधूने पुढे श्री महाराजांना विचारले, 'कीर्तन करतोस ना रे तू? आजच रोहिदासाचे चरित्र लिहिलेस ना?' स्वत: नुकतेच रचलले एकदाही म्हणून न दाखविलेले रोहिदासाच्या आख्यानातील पद साधूने

त्यांना म्हणून दाखवून त्यावरून श्री महाराजांठायी असणारा अहंकार दाखवून दिला. श्री महाराजांच्या मनावर याचा खोल परिणाम झाला. त्यांनी साधूला हे कसे शक्य झाले असे विचारले तेव्हा ते म्हणाले, ''तुझ्या शब्दांचा लय वायूमध्ये झाला आणि मी प्राणायाम केला. प्राणायाम उत्तम झाला तर वायुमंडळातील इच्छा करीन त्या शब्दांचे ज्ञान मला झाले पाहिजे.''

प्रभावित झालेले पू. दादा साधूच्या भेटीसाठी रोज रात्री जात. दहा वाजल्यापासून दीड-दोन वाजेपर्यंत त्यांची चर्चा चाले. योग्याचे अलौकिक सामर्थ्य पाहून पू. दादा थक्क झाले. त्यांनी आपणास योग शिकविण्याची विनंती साधूंना केली. त्यावर आता या वयात योगी होता येणे शक्य नाही असे सांगितले. योगी होण्यासाठी अगदी लहानपणापासून साधने करावी लागतात असे ही साधूंनी सांगितले. या पंधरा वीस दिवसांच्या योगी पुरुषाच्या भेटीचा परिणाम श्री महाराजांवर खूपच झाला. त्यांनी योगमार्गासंबंधी बरीच माहिती या काळात मिळवली असावी असे वाटते. कारण योगासंबंधीची जाणत्यांना उमगावी अशी बरीच माहिती त्यांनी पद्यांतून गुंफली आहे.

### साक्षात्कार

श्री दासगणुमहाराजांना ईश्वरचा साक्षात्कार झाला की नाही, असा प्रश्न काही लोकांच्या मनात आहे. त्यातील काही खरोखरीच भाविक आहेत आणि काहींना आपल्या नास्तिकतेला कोठला तरी पुरावा उपलब्ध व्हावा, या हेतूनेच हा प्रश्न विचारावासा वाटतो. वास्तविक या गोष्टी कोणी कोणाला विचारू नयेत अशाच आहेत. श्री महाराजांना जितक्या वेळी हा प्रश्न विचारला गेला त्यावेळी त्यांनी त्याचे उत्तर नकारात्मकच दिले आहे. १९१६-१७ साली श्री महाराजांची कीर्तने खांडव्यास चालू होती. हजारोंनी समाज येई व कथेच्या अपूर्व आनंदात तो समरस होई. महाराज मात्र रात्री अस्वस्थ झाल्यासारखे गच्चीवर फेऱ्या घालीत व सुस्कारे सोडत. या बद्दल श्री. रेगे यांनी पू. दादांना विचारल्यावर पू. दादा त्यांना म्हणाले, ''मी कीर्तनातून मारे ऐटीने लोकांना उपदेश करतो. परमेश्वराच्या प्राप्तीचे महत्त्व सांगतो. देवाच्या भेटीत किती अलौकिक आनंद भरला आहे, ते संतचरित्रांच्या आधारे रंगवितो; पण मला स्वत:ला यातील काय प्राप्त झाले आहे? लोकांनी हरिभक्तिपरायण म्हणावे आणि बोवांची परायणता हरिभक्तीवाचून इतरत्र गुंतलेली असावी, ही केवढी दु:खाची आणि विचित्र गोष्ट आहे. माझ्या बाबतीत प्रचीतीचे बोलणे कधी घडणार आहे की नाही कोणास ठाऊक! ही एकच तळमळ मला लागते कधी कधी.'' महाराजांच्या ठायी ही अस्वस्थता मात्र पुढे कधीही दिसली नाही.

दुसरी घटना आहे १९२० सालची. श्री महाराजांचे परिचित मास्तर श्री. वाळींबे यांनी सांगितलेली. श्री. वाळींबेमास्तर पंढरपुरास गेले होते. श्री महाराज त्यावेळी श्री. विश्वनाथ बडवे यांचे घरी राहात असत. दसऱ्याचे दिवशी श्री महाराजांची मास्तरांशी भेट झाली. पू. दादा श्री साईबाबांच्या पुण्यतिथीच्या उत्सवाच्या गडबडीत होते. मुंबईसारख्या शहरातून आलेली सुशिक्षित मंडळीही पू. महाराजांना नमस्कार करीत होती. एकंदरीत सभोवतालच्या लोकांच्या मनात पू. दादाबद्दल श्रद्धेचा भाव होता. मास्तरांच्या मनात आले तमाशाच्या लावण्या रचणारा गणपतराव हाच का? हा दंभ तर नाही ना? मास्तर मनाच्या अशा आंदोलित अवस्थेत पांडुरंगाच्या दर्शनाला गेले तर त्यांना पांडुरंगाची दृष्टी क्रुद्ध वाटली. दुसरे दिवशी सकाळीही त्यांना तोच अनुभव आला. मास्तर उदास होऊन परत आले. त्यांनी पाहिले श्री दासगणु झोपाळ्यावर बसले आहेत. त्यांच्या समोर फळांचे अनेक करंडे आहेत. आणि ते ही फळे कोणाला कशी द्यावयाची हे नावनिशी सांगत आहेत. श्री. गणपतरावांना ओळखण्यात आपली चूक झाली असा विचार मास्तरांच्या मनात आला. लोक इतकी फळे पाठवतात आणि ती स्वत:च्या उपयोगात न आणता पू. दादां ती सर्वांना वाटून टाकतात. पू. दादांचा सहवास मिळावा म्हणून लोक आसुसलेले असतात. तेव्हा चूक आपलीच आहे हे मास्तरांना जाणवले. मास्तरांच्या मनांत असे विचार येत असतानाच श्रीदासगणु मास्तरांना म्हणाले, ''मास्तर देवळात गेलात गेला होतात का? देवदर्शन झाले नां? आता पुन्हा एकदा जाऊन या म्हणजे बरे वाटेल.'' श्री दासगणुंच्या आग्रहाखातर ते परत पांडुरंगाच्या दर्शनाला गेले. तेव्हा त्यांना जाणवले ही विठ्ठलाची मूर्ती नेहमी प्रमाणे प्रसन्नतेने आपल्याकडे पहात आहे.

तिसरी गोष्ट आहे ती राहेर येथील देशपांडे यांनी सांगिलेली. राहेर हे नरहरीचे सुप्रसिद्ध ठिकाण आहे.

''पंचवीस एक वर्षांपूर्वी श्री दासगणु महाराज येथे काही दिवस येऊन राहिले होते. त्यांचेबरोबर श्री. दामूअण्णाही होते. दोन-तीन कीर्तनेही येथे मंदिरात झाली. श्री महाराजांच्या महापूजा करण्याच्या इच्छेप्रमाणे आम्ही सर्वजण देवाच्या गाभाऱ्यात उभे होतो. अभिषेक होऊन पूजा जवळ जवळ समाप्त झाली होती. इतक्यात आम्हास एकाएकी भीति वाटू लागली. कारण काहीच सांगता येत नाही; पण आम्ही चार-पाच जण भय वाटून गाभाऱ्याच्या बाहेर आलो हे खरे. श्री. दामूअण्णा हेही आमच्याबरोबर बाहेर आले होते. श्री दासगणुमहाराज मात्र गाभाऱ्यात विष्णूसहस्रनामाचा पाठ म्हणत बसले होते. अर्धी एक घटका ते आत असतील. नंतर मोठ्या प्रसन्न मुद्रेने ते बाहेर आले आणि श्री. दामूअण्णांस हाका मारून म्हणाले, ''दामू चल कागद घे. लिही सांगतो ते. 'राहेर क्षेत्र अति पवित्र गोदातिरी। नांदतो तेथ हा सदैव नरकेसरी' असे पद त्यांनी बसल्या बैठकीला एकटाकी पुरे केले.''

**''राहेर क्षेत्र अति पवित्र गोदातिरी ।**
**नांदतो तेथ हा सदैव नरकेसरी ।।**
**कडकडा स्तंभ मोडला प्रभू प्रगटला ।**
**प्रल्हादवरद हा दिवौकसी गाइला ।।**
**चमकतो पितांबर जरी कटी पीवळा ।**
**लागली रुळाया जीभ हृदयी लळलळा ।।**
**खटखटा वाजती दंत मुगुट तो शिरी ।**
**प्रभु पापमतीचे पोट विदारण करी ।।**

**चमकती कानी कुंडले वन्ही लोचनी ।**
**करि सहज लिलेने गुरगुर ऐसा ध्वनि ।।**
**भीतसे पुढे जावया कमललोचनी ।**
**इंदिरा म्हणे हे तेज न सौदामिनी ।।**
**यापरी कधी न पाहिला प्रभु आजवरी ।**
**उधळिली सुरांनी सुमने राहून दुरी ।।**
**प्रल्हाद पाय वंदिता शांत जाहला ।**
**तो नारसिंह म्या सिंहासनी देखिला ।।''**

**सत्‌शिष्य दामूअण्णा**

श्री दासगणुंच्या जीवन-चरित्रात श्री. दामूअण्णांचे स्थान फार महत्त्वाचे आहे. मारुतीशिवाय रामायण, अर्जुनाशिवाय श्रीकृष्ण, कल्याणाविना रामदासांचे कार्य, तानाजीला वगळून छत्रपतींच्या पराक्रमाचा इतिहास जसा अपूर्ण त्याचप्रमाणे श्री. दामूअण्णांशिवाय श्री दासगणुंचे चरित्र.

श्री. दादांचा मुक्काम पुण्यात असताना एक दिवस ते पोतदारांच्या माडीवर बसले होते. खाली रस्त्यावरून एक १३-१४ वर्षाचा नाकीडोळी नीटस असा ब्राह्मणाचा मुलगा माधुकरी मागत चालला होता. त्याला एका टांगेवाल्याचा धक्का लागला. मुलाने हातातील माधुकरी खाली ठेवली आणि तो रडू लागला. महाराजांना नवल वाटले. त्यांनी मुलाला वर बोलावले व रडण्याचे कारण विचारले, त्यावर तो मुलगा म्हणाला, ''टांगेवाला माधुकरीला शिवला मग आता मी ही माधुकरी कशी खाऊ? मला आता पुन्हा माधुकरी कोण घालणार? कारण माझी सर्व घरे मागून झाली आहेत.'' पू. दादांना मोठे कौतुक वाटले. पुण्यासारख्या शहरात, परिस्थितीने नडलेल्या मुलाला सोवळ्या-ओवळ्याची एवढी निष्ठा असावी हे विशेष. महाराजांनी मुलाला सांगितले, 'हे पहा आज इथे जेव आणि मी इथे आहे तोपर्यंत माझ्याबरोबरच जेवत जा.' दोघांत जिव्हाळा वाढला. परिचयही वाढला. चौकशीत महाराजांना कळले की, हा मुलगा निराधार आहे. त्याची आई कोकणात आहे, वडील भाऊ पुण्यात असून त्याचे लाकूडकामाचे दुकान आहे. पण भाऊ या मुलाची फारशी काळजी वहात नाही. या मुलाचे अक्षर मोत्यासारखे वळणदार, त्वरीत गतीचे होते. आवाज खूप मोठा, उंच पहाडी असूनही अत्यंत मधुर होता. लिखाणाचे कामात पू. दादांना याची मदत होईल. कीर्तनाची साथ करण्यासही त्याचा उपयोग होण्यासारखा होता. या सर्व गोष्टींचा विचार करून दादांनी मुलाला त्यांचे जवळ राहण्याविषयी विचारले. क्षणाचाही विचार न करता दादांच्या पायावर डोके ठेऊन तो म्हणाला, ''दादा तुम्हाला सोडून मी कुठे जाणार?'' हा मुलगा म्हणजेच दामोदर वामन आठवले. सर्वांचे दामूअण्णा.

श्री दासगणुंनी दामूअण्णांच्या मोठ्या भावाची संमति घेतली आणि आता दामूअण्णा श्री दादांबरोबर राहू लागले. पुण्याचे काम संपल्यावर दादांच्या मनात आले आपण एकटे सडेफटिंग. गावोगाव हिंडणार. या होतकरू मुलाला आपल्याबरोबर फिरवून त्याचे नुकसान कशाला करायचे. एखाद्या श्रीमंत माणसाकडे ठेवले तर त्याचे भले होईल. खाऊन-पिऊन, अभ्यास करून मोठा होईल. त्यांनी आपले मित्र नानासाहेब चांदोरकरांना विचारले. पुढे दीड-दोन वर्षे दामूअण्णा त्यांचेकडेच होते. पुढे एकदा सर्वांना घेऊन चांदोरकर शिर्डीस गेले असता श्री बाबांनी त्यांना विचारले, 'अरे नाना हे गणूचे पोरगे तुझ्या बरोबर का? ज्याची पोरे त्यांनी सांभाळावीत.' श्री साईबाबांची आज्ञा प्रमाण मानून श्री दासगणुंनी दामूअण्णांना नेहमी आपल्या जवळ ठेवले. पू. दादांचे काव्य सुंदर अक्षरांत लिहिणे. त्यांच्या कीर्तनात पाठीमागे उभे राहून खड्या व गोड आवाजात त्यांना साथ करणे हे त्यांचे आवडीचे व्यवसाय असत. श्री. दामूअण्णांच्या मनात श्री दासगणु महाराजांविषयी अत्यंत कृतज्ञता बुद्धी हाती. आपण जे काही आहोत ते केवळ महाराजांमुळेच अशी त्यांची भावना होती. श्री दासगणुंवर रचलेल्या एका अष्टकामध्ये ते म्हणतात, 'समर्थ गणूदास तो गुरूपिताच मी वंदिला' श्री दासगणु महाराज दामूअण्णाविषयी लिहितात -

**ज्या ज्या वेळी तुला पोरा। रागे भरितो साजिरा।**
**परि तिळतिळ तुटतो खरा। जीव माझा ते काळी।।**
**तूच मजला आतासूत। तूच अवघे गण गोत।**
**आता माझी अवघी भिस्त। आहे तान्हुल्या तुजवरी।।**

श्री दामूअण्णांचे सुंदर रूप व गोड पहाडी आवाज पाहून नाटक कंपनीतील व्यवस्थापकाने त्यांना नाटक कंपनीत येण्याची गळ घातली. मोठ्या पगाराचे अमिष दाखविले. पण निष्ठावंत दामूअण्णा कोणत्याही अमिषाला बळी पडले नाहीत. दादांचे पाय सोडून मी कुठेही जाणार नाही असे त्यांनी नाटककंपनीवाल्यांना सांगितले.

श्री दामूअण्णांचा पहाडी पण मधुरकंठाचा कीर्तनाच्या दृष्टीने महाराजांना फार उपयोग झाला. त्याच्या कीर्तनाची ख्याती सर्वदूर दुमदुमली. त्याचे अर्धेश्रेय दामूअण्णांनाच होते. दादा गहिवरून म्हणत ''दामूमुळे मी पुढे आलो.'' दामूअण्णा साथीला उभे राहिले आणि 'रामदास माय माझी' हे नमनाचे पद झांजेच्या गोड झंकाराबरोबर खड्या, उंच पण मधुर स्वराने आळवू लागले की, चार-चार, पाच-पाच हजाराचा विराट समुदाय ध्वनिक्षेपक नसलेल्या काळांतही मंत्रमुग्ध नागासारखा तटस्थ होऊन डोलू लागे.

श्री दामूअण्णांची स्मरणशक्ती मोठी तीव्र होती. श्री दासगणु हे शीघ्रकवी ७०-८० कवितांची आख्याने ते एक-दोन दिवसांत पुरी करत तर त्यांचे पट्टशिष्य दामूअण्णा आख्याने पुरी होताच ती मुखोद्गत करीत.

पू. दादांचे सद्‌गुणसंपन्न शिष्य दामुअण्णा आता गृहस्थाश्रमी झाले. पू. दादांच्या घरातील एक जबाबदार व्यक्ती म्हणून त्याचा जीवनक्रम सुरू झाला. देखणे रूप, आनंदी खेळकरवृत्ती यामुळे घरातील वातावरण आनंदी असे. उत्सव महोत्सव यांचे शिस्तबद्ध पद्धतीने ते संयोजन करीत. अशापक्रारे आनंदात कालक्रमणा चालू होती.

श्री. दामूअण्णांच्या पत्नी सौ. राधाबाई यांना इ.स.१९१६ आणि १९१७ साली दोन अपत्ये झाली पण ती कालवश झाली. राधा दामोदरांच्या जीवनात दुःखाचे सावट निर्माण झाले. पुढे इ.स. १९२०

साली २७ सप्टेंबरला या दांपत्याचे पोटी अनंताचा म्हणजेच अप्पांचा (स्वामी वरदानंद भारती) जन्म झाला. गोदा माऊलीचा प्रसाद म्हणून हे लेकरू वाढू लागले.

श्री दासगणुमहाराजांचा हा संपादित प्रंपच लेक, सून व नातवंडे यांच्या सह सुखाने चालला असताना त्यावर काळाची कुऱ्हाड कोसळली. श्री. दामूअण्णांना क्षयाची भावना झाली. दादांनी आपल्या परमप्रिय शिष्यासाठी लेकासाठी हजारो रुपये खर्च केले. वाई, महाबळेश्वर अशा ठिकाणी ठेवले. पुण्या-मुंबईच्या प्रसिद्ध डॉक्टरांचे उपचार केले पण काहीही उपयोग झाला नाही. शेवटी पंढरपूर येथील घरांतील अंगणात एक झोपडी बांधून त्यात श्री. दामूअण्णांना ठेवण्यात आले. तब्येत हळू हळू बिघडतच होती.

शके १८४५च्या शुद्ध दशमीच्या दिवशी पू. दादांनी पाहिले श्री. दामूअण्णा अत्यंत अस्वस्थ झाले होते. त्यांच्या तोंडावाटे रक्ताची गुळणी येत होती. मोठ्या प्रयासाने ती आवरून धरून ते सारखे क्षीण आवाजात दादा दादा अशा हाका मारत होते. महाराज पुढे येताच दामुअण्णा होते नव्हते तेवढे सर्व बळ एकवटून पलंगावरून ताडदिशी उठून बसले. त्यांनी अत्यंत गंभीर झालेल्या दादांच्या मुद्रेकडे एकदा आर्त दृष्टीने पाहिले. पू. दादा आपला हात त्यांच्या मस्तकावरून फिरवत होते. श्री. दामूअण्णा दादांच्या पायावर डोके ठेवण्यासाठी खाली वाकले ते पुन्हा वर झाले नाहीत. श्री. दामूअण्णांचा आत्मा शाश्वतात विलीन झाला. जड देह तेवढा खाली उरला.

ज्याला पुत्रापेक्षाही अधिक वत्सलतेने वागविले, वाढविले तो आपला अत्यंत लाडका शिष्य स्वत:च्या डोळ्यादेखत निर्घृण काळाच्या स्वाधीन झाला, याचा श्री दासगणुमहाराजांच्या अंत:करणावर केवढा दु:खद आघात झाला असेल, याची कल्पनाच करावी. शब्द तेथे अपुरे आहेत. श्री महाराजांच्या अत्यंत कोवळ्या अंत:करणाखाली अलौकिक अशा स्थितप्रज्ञतेचे अधिष्ठान होते, म्हणूनच हा दु:सह शोक ते सहन करू शकले. आपले दु:ख त्यांनी आवरिले. स्वत:चा सर्व प्रंपच स्वत:च्याच हाताने दूर सारिला असूनही आपल्या दिवंगत शिष्याच्या अनाथ पत्नीचा व पोरक्या पोरांचा भार त्यांनी अतीव वात्सल्याने आपल्या शिरावर घेतला. सर्व ओझे श्री. दामूअण्णांच्या खांद्यावर सोपवून आपण संन्यास घ्यावा, अशी श्री महाराजांची तीव्र इच्छा होती. पण आपली ही इच्छा गुंडाळून ठेवून त्यांना सर्वसामान्य माणसाप्रमाणे वरवर दिसण्याततरी प्रापंचिक बनावे लागले. 'अंतस्त्यागी बहि:संगी लोके विहर राघव' हा योगवासिष्ठाचा उपदेश त्यांना प्रत्यक्षात अनुभविणे प्राप्त झाले.

### महानिर्वाण

पांडुरगाच्या चरणी माझी गोदावरी!

शके १९८४ म्हणजे इ.स. १९६२ च्या श्रावण महिन्यात पू. दादांचा निवास गोरटे येथे असताना त्यांना असलेल्या जुन्या आंत्रव्रणातून रक्तस्राव होऊन फार अशक्तपणा आला व पक्षाघातासारखी थोडी लक्षणेही दिसू लागली. त्यावेळी पू. दादांचे वय पंचाण्णव वर्षाचे होते. प्रकृति अशक्त झाली होती. उपचार चालू होते. पण लक्षणे ठीक दिसत नव्हती. अशाही स्थितीत पंढरपूरला जाण्याचा त्यांचा आग्रह होताच. पू. अप्पा म्हणाले, 'तुमच्या प्रकृतीचा आता भरवसा देता येत नाही. कोणत्याही क्षणी काय वाटेल ते होण्याची शक्यता आहे. पक्षाघाताचा एक लहानसा वेग नुकताच येऊन गेलेला आहे. तेव्हा तुम्ही कोणत्याही प्रकारचा प्रवास पूर्णपणे टाळणेच श्रेयस्कर. त्यातून तुम्ही आतापर्यंत आपला देह गोदाकाठी राहावा अशी इच्छा अनेक प्रकारे, अनेक वेळा व्यक्त केली आहे. तरी पंढरपुरला जाण्याचा आग्रह का करता?'

तेव्हा ते उसळून म्हणाले, 'मोठा आलास शहाणा सांगणारा पांडुरंगाचे पायापाशी माझी गोदावरी नाही काय?' पू. अप्पा चकित झाले आणि निरुत्तरही झाले. प्रतिवर्षाप्रमाणे अश्विनाच्या पहिल्या आठवड्यात ते पंढरपुरला यायचे त्याप्रमाणे आलेच. पहिल्यावर्गातून रेल्वेचा प्रवास करूनही व्हायचा तो त्रास झालाच. अशक्तपणा वाढला. चढणे, उतरणे खुर्चीतून करावे लागले. थोडासा ज्वरही आला. वाटेत ठिकठिकाणी दर्शनासाठी पुष्कळ मंडळी येत होती. त्यामुळे प्रकृतीला होणाऱ्या त्रासात भरच पडली. पंढरपूरला आल्यानंतर क्षीणता तशीच राहिली. तरीही प्रकृतीत सुधारणा होत होती. त्यांचे रोजचे आन्हिकाचे कार्यक्रम, स्नान, संध्या, जपजाप्य, विष्णुसहस्रनामाचे पाठ, आल्यागेल्याशी गप्पा मारणे, परिचितांशी नेहमीप्रमाणे पत्रव्यवहार करणे इत्यादी गोष्टी अगदी यथापूर्व चालू होत्या. घरातल्या घरात फिरणे, मधूनमधून झोपाळ्यावर बसणे या गोष्टी ते प्रकृतीच्या क्षीणतेवर मात करूनही करू लागले. एक दीड पोळी, दुधी भोपळ्याची किंवा तांदुळजाची भाजी व दिवसाकाठी मिळून घेतले जाणारे शेर-सव्वाशेर गाईचे दूध असा त्यांचा मागील दोन-चार वर्षांपासूनचा असलेला आहार ते पुन्हा घेऊ लागले.

दिवाळीपर्यंत त्यांची प्रकृति पुष्कळच सुधारली. सर्व कुटुंबीयांनी पू. दादांच्याबरोबर काढलेले एक छायाचित्र असावे अशी कल्पना पू. अप्पांच्या मनात आली आणि आश्चर्य म्हणजे कोणत्याही प्रकारचा विरोध न करता पू. दादांकडून प्रथमक्षणीच संतोषाने परवानगी मिळाली. दिवस दिवाळीच्या पाडव्याचा होता. पण हे शेवटचे छायाचित्र असेल असे मात्र पू. अप्पांच्या मनातही आले नाही.

श्री ज्ञानेश्वरांचा उत्सव प्रतिवर्षी एक कुळधर्म कुलाचार म्हणून पंढरपूरास अनेक वर्षे चालू होता. या उत्सवासाठी कोणालाही आमंत्रण देण्याची पद्धत नव्हती. विशेष आपुलकी निर्माण झालेली जिव्हाळ्याची मंडळी तेवढी या उत्सवास आमंत्रण नसले तरी उपस्थित रहात असत. पण श्री. दादांनी श्री. छगनकाका यांना सांगितले की, आपल्या सर्व मंडळींना या श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या उत्सवाला येण्यासंबंधी आग्रहाने लिहावे. त्याप्रमाणे उत्सवाची निमंत्रणे सर्वदूर पाठवली गेली.

उत्सवास प्रतिवर्षाप्रमाणे कार्तिकवद्य दशमीस आरंभ झाला. एकादशीचे दिवशी पू. दादांची स्नान-संध्या प्रतिदिनी होते त्याप्रमाणे झाली. पुण्याचे श्री. हरिभाऊ भागवत व श्री. चंपुताई बोईगिरी यांना

अनुग्रह घ्यावयाचा होता. तो पू. दादांनी दिला. संध्याकाळचे कीर्तनही व्यवस्थित पार पडले. द्वादशीचे दिवशी सकाळी तोंड धुण्यास म्हणून बसले पण थोड्या वेळातच तोंड धुण्याचा कार्यक्रम पार पडण्यापूर्वीच मला झोप येत आहे असे सांगून अंथरूणावर लवंडले. अवेळी का झोपले या विचारामुळे उत्सवास आलेल्या सर्वांनाच दु:ख मिश्रित आश्चर्य वाटले. पू. दादांनी स्नान केलेच, संध्या केली व विष्णुसहस्रनामाचे पाठ म्हणत अंथरूणावर पडून राहिले. ग्लानी हळुहळू वाढतच होती. तरीपण दुपारी कीर्तनाचे वेळी आग्रहाने कीर्तनास येऊन बसलेच. पू. दादांना बसण्याचा शीण होऊ नये म्हणून द्वादशीचे कीर्तन पू. अप्पांनी अक्षरश: अर्ध्या तासातच उरकले. त्यावर पू. दादा पू. अप्पांना म्हणाले, 'इतक्या लवकर कीर्तन का आवरलेस!' 'तुम्हास थकवा आला आहे. अधिक वेळ बसणे इष्ट नाही, पडून राहिले पाहिजे. कीर्तन चालू असे पर्यंत तुम्ही आडवे होणार नाही म्हणून कीर्तन लवकर उरकले.' पू. अप्पांच्या या उत्तरावर 'अरे, असे करू नये!' एवढेच पू. दादा. म्हणाले.

त्रयोदशीच्या दिवशी स्नानास उठण्याइतकी शक्ती राहिली नव्हती. तरी स्नान घालावे असा त्यांचा आग्रह होता. अंग केवळ पुसून घेतले. त्यादिवशी त्यांनी जेवण मुळीच घेतले नाही. मधून मधून दूध मात्र थोडे घेत असत. पण तेही निजून घेतले नाही. अतिशय कष्टाने पण उठून बसून घेतले. श्री ज्ञानेश्वरमहाराजांची पूजा झाली का? अभिषेक झाला का? याची चौकशी करीत होते. तीर्थ मागून घेतले व ते आठवणीने पूर्वेकडे तोंड करून गद्‌गद् स्वराने 'ज्ञानोबाराय' असा नामोच्चार करून प्रेमपूर्वक प्राशन केले. इतर सर्व बोलणे बंदच होते. ग्लानी झपाट्याने वाढतच होती. दुपारी कीर्तनाच्या वेळी पू. अप्पा त्यांना नमस्कार करण्यासाठी गेले तेव्हा पू. अप्पा म्हणाले, ''तुम्ही येथून पडून ऐकणार असाल तर कीर्तन नेहमीसारखे करीन. ओसरीवर येऊन बसलात तर कालच्यापेक्षाही थोड्या वेळात उरकेन! पू. दादा हसले आणि म्हणाले, ''बरं येथूनच ऐकतो जा कीर्तन कर!'' त्या दिवशी कीर्तन अडीच-पावणेतीन तास झाले.

श्री. छगनकाकांना बोलावून 'व्यक्तिवाङ्मय' या ग्रंथातील कान्हा भिल्ल प्रकरण पू. दादांनी वाचावयास सांगितले. बसत, आडवे होत ते प्रकरण ऐकले. ग्लानी व क्षीणता वाढतच होती. शनिवारची रात्र अशीच संपली.

रविवारी उत्सवाची सांगता होती. पू. दादांनी सकाळी आठ वाजता 'आज काल्याचे कीर्तन ना रे!' असे विचारले. तो पर्यंत सर्व ठीक होते. साडेआठ वाजता श्वास बदलला होता. नुकतेच पू. अप्पांच्या पत्नींना सौ. इंदिराबाईंना बोलावून दूध घेतले होते. मुलेही बरोबर होती. त्यांनाही जवळ घेऊन त्यांच्या डोक्यावरून हात फिरवला. नाडीचे ठोके मंद व अनियमित झाले होते. ते कुशी मोडून उताणे झोपले. द्वारका आत्याबाईही जवळच होत्या. त्यांनी गंगाजल आणण्यास सांगितले. पू. अप्पांच्या मांडीवर त्यांचे डोके होते. वेळ कठीण आहे हे लक्षात आले. पू. अप्पांनी त्यांचा हात उचलून आपल्या कपाळावर लावला. गंगाजल व तुळशीची पाने किंचित् उघड्या असलेल्या तोंडात घातली. गंगाजल घेतले. एक श्वास घेतला व सोडला आणि मांडीवरचे डोके किंचित उजवीकडे कलले. पू. अप्पांनी विष्णूसहस्रनामाचा पाठ जोरात म्हणावयास सुरुवात केली. माऊलींनी ज्ञानेश्वरीत म्हटल्याप्रमाणे 'ठेविलिया घटीचा दिवा। मालविला नेणो केव्हा।' असे घडले.

पंडित भगवानशास्त्री धारूरकर सान्तवनासाठी आले होते. धारूरकरशास्त्रींनी पू. अप्पांना विचारले, 'या प्रसंगाची कल्पना तुम्हाला केव्हा आली?' 'शुक्रवारी रात्रीच मला परिस्थितीच्या गांभीर्याची कल्पना आली होती,' पू. अप्पा म्हणाले. ''मग आतुर संन्यास का दिला नाही? संन्यास घेण्याची महाराजांची फार इच्छा होती. हे तुम्हाला माहीत होते. ठीक आहे. देहावसान कधी झाले?'' ''सकाळी आठ छत्तीसला एखादे मिनिट मागेपुढे असण्याची शक्यता आहे.'' पू. अप्पा म्हणाले. ''आठ छत्तीसला? होय! महाराजांच्याकरिता तिथीलाही आज पूर आला,'' शास्त्रीजी म्हणाले. ''म्हणजे काय? मी नाही समजलो.' असे पू. अप्पांनी म्हटल्यावर श्री. धारूरकरशास्त्री म्हणाले, ''काल त्रयोदशी पूर्ण तिथी असूनही आज थोड्या अधिक घटका घेऊन पावणेनऊपेक्षा थोड्या अधिकवेळ त्रयोदशीच होती.'' पू. अप्पा आश्चर्यचकित होऊन म्हणाले, ''खरंच की काय! कालच दादांनी विचारलं होतं, ज्ञानेश्वर पुण्यतिथी आज झाली. उद्या काला ना रे!''

पायरीस पाय लावू नये या विनयभक्तीनेच पू. दादांनी रविवार सकाळ योजली असावी. नाही! वृद्ध तिथीच्या रूपाने जणू श्री ज्ञानेश्वर महाराजांनीच आपले वत्सल बाहू उभारले आणि आपल्या या निष्ठावंत भक्ताला स्वत: भीमातट विहारी श्री पांडुरंगाच्या चरणीकमलाशी नेऊन पोचविले.

सायंकाळी सात-सव्वासातला वाळवंटामध्ये दत्तघाटाच्या उजव्या बाजूस चिता रचण्यास आली व अंत्यविधी यथोक्त रीतीने हजारोंच्या उपस्थितीत पार पडला. रक्षा विसर्जन पुंडलिकाच्या समोरील डोहात करण्यात आले. अस्थिविसर्जन नांदेड येथे गोदावरीत करण्याचे ठरले. नांदेडला या काळात गोदावरीत पाणी खूप कमी असते. पण तेथेही विलक्षण गोष्ट घडली होती. कोठेतरी वळीव पाऊस भरपूर झाला. गोदावरीला आषाढ-श्रावणात येतो तसा पूर आला होता. महायात्रेसमयी सारे नांदेड लोटले होते.

करूणेचे बांध फुटून गोदामाय उचंबळून आली होती. तिने आपल्या लेकराचे ते पवित्र अवशेष स्वीकारले आणि एक संतत्वाने भरलेले मानवी जीवन भौतिकदृष्ट्या समाप्त झाले. स्वत:ला गोदातीरवासी म्हणवून घेणारा संत गोदामाईने आपलासा केला.

संतकवि श्रीदासगणु महाराज चरित्र आणि काव्य विवेचन
लेखक, संपादक - श्री अनंत दामोदर आठवले या ग्रंथावरून


**संपादन : डॉ. कल्याणी माधव नामजोशी**
१०१२/४ शिवाजीनगर,
'पुष्कराज' मित्रनगर कॉलनी, पुणे - ४११०१६,
फोन : २५६५४८६६


***



# अघटित घडले हो

**सौ. शैला पटवर्धन**
एम.ए.बी.एड्., निवृत्त शिक्षिका, पार्ले टिळक विद्यालय, कविता करण्याची आवड.

(श्री साईप्रसाद दासगणु महाराज यांच्यावर नांदेडकरांचा गोरटेवासीयांचा विशेष लोभ! सख्ख्या भावंडांइतका! श्री दासगणु म्हणत – ''वस्ती राहो गोदेच्या काठी।।'' आणि ही इच्छापूर्ती अशी झाली....)

अघटित घडले हो 'गोरट्या'त 'पुंडलिकवाडी'ला
नाही देखियला, पाहियला, अैसा स्वागतमेळा।
डोळा दु:खाचे शोकाचे आसू डबडबलेले,
तरी लहानथोर हात होते सेवेत गुंग जहाले।।

जे तारणहार पालनहार श्रद्धामंदिरी देव
श्री दासगणु 'गोरटे'ग्रामी 'साई प्रभूं'ची ठेव
ओढ त्यांचीही लागली स्वर्गपुरीच्या देवा
दाह विरहाचा आकस्मिक-सोसेना कळ जीवा।।

गुरुवाणी ती आठवुनी पोक्त थोर सावरले,
''काया गोविंदमयी झाली जरी दैवत तेचि अपुले''
''देऊ निरोप सोहाळा करू अस्थिस्वागताचा''
''ते विसर्जन बहुमान मंगलक्षण मोलाचा'' ।।

झणि पालखी पाठविली नागेश्वरमंदिराने
दिली वाजंत्री 'श्री गोदावरी ब्रास बँड' पथकाने
उमरी, नांदेड, मराठवाड्यात आणिक कुठून कुठून
आले वारकरी जणू पंढरपूरी रात्रीत दिंड्या करून।।

बेल तुळशीच्या फुलांच्या माळा गुंफल्या लहानग्यांनी
भगव्या रंगाच्या ध्वजा पताका बांधियल्या तरुणांनी
तांब्या शुचिर्भूत गंगाजल पालखीमधि ठेवियला
''हवी गोदामाई लेकराचे वेशीत स्वागत करायला'' ।।

आली मोटार-अस्थिकलश होता आप्पांच्या हाती
होती भवताली नि:शब्द सानथोरांची दाटी
दिव्य तेजस्वी अप्पांच्या मुखावरील म्लानता
गाव व्याकुळले – हेलावले – हुंदके आवरू जाता।।

होते मार्गावरी दो बाजूंनी भाविकजन दर्शना
गंध फुलांचा सांगत होता– भक्तीभाव स्मृतींना
टाळ मृदंग भजनकरी रामनाम घोषांत
जनसागर तो अनवाणी चालत ऐन उन्हात।।

विश्रांतिस्थळ महाराजांचे पुंडलीकवाडी
आज आगळी ही विश्रांति, पालखी थांबली
आजवरी जो गोरटेग्रामासी आधारवड होता
तोच आजला अस्थिरूपे निरोप मागत होता।।

सुवासिनींनी सात्त्विकतेने भरली निरांजने
सालंकृत त्या क्षणी भक्तीने केली त्यां औक्षणे
लहान बाळे अस्थिकलशांमस्तक टेकवुनी
आशीर्वादासाठी जननी धावा करते मनी।।

मृत्यूची अशुभताच नव्हती तेथे ध्यानीमनी
'ब्रह्मवित् ब्रह्मैव भवति' उदात्तता चिंतनी
बघता बघता निरोपवेळा नजिक अशी आली
सत्कारांना घेत पालखी नावघाटी पोहोचली।।

गोदावरीच्या तीरावरचा विशाल जनसमुदाय
चंद्रभागेच्या वाळवंटामधि-जैसा विठुराय
असुन हिवाळा गोदावरीचे पात्र दिसे भरलेले
थक्क जाहले भक्त ''जल असे कसे कुठून आले?'' ।।

तीर्थजननी गोदा अपुले हात पसरूनी बोले
''येई लाडक्या, माझ्या बाळा, हृदय अधिर झाले''
लहरी मागून उसळत लहरी, एक लाट मोठी
अस्थिकलश तो मिठीत घेऊन गेली जलतळवटी।।

संपला सोहाळा तरीही गाव आज सांगे
''गोदावरी तिरी श्रीदासगणु गुरू अमर जागे''

तस्मै श्री गुरवे नम:।
गद्यलेख : तीर्थ जननीच्या कुशीत – सरस्वती कवी
संदर्भ : श्री दासगणु महाराज दर्शन
शब्दवाही : मधुकर दत्तात्रय जोशी

सदर पद्यरूप शब्दांकन : **सौ. शैला पटवर्धन,**
डी-३ प्राजक्ता कर्वेनगर, पुणे



# संत, संतत्व आणि श्रीदासगणु महाराज

**सौ. सुनंदा शाळिग्राम**
एम.ए. (मराठी), स्वामी सत्यदेवानंद यांच्या शिष्या. श्रीगीता, श्रीज्ञानेश्वरी व भागवत यांची निरुपणसेवा, प्रवचनकार

''सदाचार, सन्नीती । तशीच ती तिसरी सहवासना
जागृत असल्या रक्षण होते । जगताचे सज्जनां ।।''

जगताचे खरे रक्षण- 'सदाचार, सन्नीती व सहवासना' ही त्रिसूत्री समाजात जागृत असेल म्हणजे आचरणात असेल, तरच होते आणि ती जागृत ठेवण्याचे कार्य संत-सज्जन करतात. श्रीदासगणु महाराजांनी आपल्या वाणी व लेखणीद्वारे ही त्रिसूत्री समाजात जागृत ठेवण्यासाठी अवघा हलकल्लोळ केला.

संतांचे महात्म्य त्यांनी परोपरीने वर्णिले आहे-

''संत भवार्णवीची नौका । अथवा स्वर्गीचे सोपान देखा
प्रिय जे कां वैकुंठनायका । प्राणाहुनी अत्यंत ।।
... संतांपाशी रमापती । आवडीने राहतसे ।
... झाल्या संतांचे दर्शन । साक्षात् भेटे नारायण ।
संतसहवास केल्या जाण । मती पालटे मानवाची ।।
निर्विकल्प ब्रह्मास । तेच देती मुमुक्षूते ।
संतकृपा ज्याचेवर । त्याचा काळासहि दर ।।
संत भक्तीचे माहेरघर । कामुकाचे कल्पतरु ।
... वासना मोठी अगोचर । मानव कष्टवी निरंतर ।
परी ती मरते साचार । संतांचिया दर्शने ।।
चित्ताप्रती समाधान । संतदर्शन करून ।
बुद्धीलाही स्थिरपर । येते संतकृपेने ।।''

श्रीदासगणु महाराज 'संतस्तोत्रे' मध्ये म्हणतात,

''अवघे संत माझे गुरू । अवघे संत कल्पतरू ।
क्षमा शांतीचे प्रत्यक्ष मेरू । कैवारी दीनजनांचे ।
संत मोक्षाचे वाटाडे । संत ज्ञानाचे प्रत्यक्ष गाडे
संतकृपेने कवाडे । लागतील अविद्येची ।।''

पण असे संत ओळखायचे कसे? संत कोणाला म्हणायचे?

''केवळ बाह्यांगाला भुलुनी । संत कुणा तू कधी न मानी ।
तोच खरे संतत्व पावतो । बाह्याभ्यंतर जो शुचि असतो ।।
माया ममता लोभ अहंता ज्याची सुटली नाही ।
विषयासक्ती मुळी न गेली संत कुठुन तो होई ।
वरुनी बघता सात्विक सज्जन । आतुन परि दंभिक दुर्वर्तन ।
खरा संत मानिता अशास । परमार्थाचा होतो नाश ।।''

अशा स्पष्ट शब्दांत श्रीदासगणु महाराजांनी दांभिकांचा निषेध केला आहे. संत बाह्य लक्षणांवरून ओळखू नये, तर त्यांची खरी लक्षणे त्यांनी सांगितली आहेत,

''त्यासीच म्हणावे संत । ज्याचे षड्रिपु आज्ञांकित ।
उदार गंभीर । अतिशांत । वासना ज्याची निमाली ।।
अष्टसिद्धी राबती दारी । परि न जो पर्वा करी ।
जगदुद्धारा भूमीवरी । अवतार ज्याने घेतला ।।
क्षमा शांतीचे माहेर । साधुपुरुष साचार ।
जेवी जलाने सागर । ओतप्रोत भरियेला ।।
त्यालाच म्हणावे जगी संत । की जो समान लेखी अवघ्याप्रत ।।
उच्चनीच ही भावना नित्य । शिरे न ज्यांच्या मानसी ।
सच्चिदानंद पदासी । संत सेविती अहर्निशी ।।
तादात्म्य पावती ईश्वरासी । फडशा पाडून मायेचा ।
शाब्दे परे च निष्णात । या लोकी एक संत ।।
संत असून जीवन्मुक्त । लोक स्थितीने वर्तती ।।
संत वैराग्य न सोडिती । संत लोक व्यवहारे वर्तती ।।
कर्मभक्तीला चालविती । विमल ज्ञाना सेवून ।।''

श्रीदासगणुंच्या मते ''संत आणि भगवंत । एकरूप साक्षात'' असतात. त्यांनी सांगितलेली संतांची पुढील लक्षणे त्यांनाच तंतोतंत लागू पडतात, पाहा-

''तोचि म्हणावा जगि संत । वस्तित राहुन लोकाचारा ।
त्यजि न धरी परि हेत ।।
हेवा-देवा नच कवणाचा । जो अवघ्याही मित्र जगाचा ।
लाग न जवळी ज्या षड्रिपूंचा । अतुल अंगि सामर्थ्य ।।

न्याय-नीतीला नच दे फाटा ।
निजमहतीचा अतिशय काटा
सहधर्माच्या चालवि वाटा ।
उभा पुढे भगवंत ।।
जवळ उपाधी नाही कशाची ।
आयु परहित करण्यां वेची ।
सत्यामाजि न भीड कुणाची ।
हाच जयाचा पंथ ।।
दासगणु म्हणे ऐशा संता ।
शरण गेलिया मोक्ष ये हाता ।
त्रिताप पळतिल हां हां म्हणता ।
उगे न पडा फंदात ।।''

श्रीदासगणु महाराज आधी संत आहेत, मग संतकवी आहेत.

'संतांचा महिमा संतचि जाणती ।
दुर्लभ या गती आणिकांसी ।।'

संतांना ओळखायला 'अंगे व्हावे ते आपणच संत व्हावे लागते. श्रीदासगणु महाराज थोर संत होते म्हणूनच ते संतत्व ओळखू शकले आणि त्यामुळेच संतचरित्रे गाऊ शकले.

संतत्वाच्या खुणा ते सहजी सांगून जातात-

''संत म्हणा त्याला । जो का ऐहिक सुखा विटला ।।
काम क्रोध मद मत्सर । भिती स्पर्श करायाला ।।
दासगणु म्हणे तोचि संत हो । हरिपदी नत झाला ।।

हे संतत्व त्यांच्या अंगी बाणलं होतं, म्हणूनच संतचरित्रे त्यांनी सहजी आळविली. केवळ मनोरंजनासाठी नव्हे, तर

''ही साक्षात शिदोरी । कल्याणपेठेस जावया ।
जेणे जीवन यात्रेचा पंथ सुगम होईल की ।।''

या हेतूने संतचरित्रे गाइली.

''संतचरित्रे भवसिंधूतील दीपस्तंभचि असती ।
अपघातापासून सदा जी अज्ञजना वाचविती।।

त्यांना वाटते -

''संत हेच देवा! भूवरती । तुझ्या बोलत्या फिरत्या मूर्ती ।।
संतांच्या हृदयी तव वास । प्राण तूहि मानिसि संतास ।।
जरी सच्चरित न लोकापुढती ।
तरि मग कोठुन सत्प्रवृत्ती ?
सत्प्रवृत्तिविना न भक्ती ।
भक्तीवाचुन कैशी मुक्ती ?''
''संतांचा आदर्श माधवा । लोकांपुढती सदा असावा ।
त्यावाचुन कल्याण जगाचे । कधीही होणे शक्य न साचे ।।
संत जनांचे उन्नत जीवन । लोकापुढती हवेच निशिदिन ।
तोच असे जन-सामान्यांचा । सुलभ मार्ग निज उद्धाराचा ।।''

श्रीदासगणु महाराजांनी आत्महिताबरोबरच जनहिताचा विचार प्रकर्षाने केला म्हणून ते 'संत' आहेत. जो संतांच्या उपदेशाप्रमाणे वागतो, तो संत. या कसोटी प्रमाणेही ते 'संत' ठरतात. त्यांच्याच म्हणण्याप्रमाणे,

'उपदेशाला आचरती जे । चित्ती असे समता।।'

संतांच्या अंत:करणात समभाव भरवतो.

'चित्ते वाचि क्रियायां च
साधूनां एकरूपता।'

संतांच्या विचाराचा, उच्चार आणि आचार यात एकरूपता असते. श्रीदासगणु महाराजांच्या चरित्राचे अवलोकन केल्यास आपणास अशी एकरूपता आढळते. अत्यंत ज्ञानी, पंडित असूनही भक्तिभावाने सगुणोपासनेत तल्लीन होणे हे संतलक्षण असते. श्रीदासगणु महाराजांच्या ठिकाणी हे दिसून येते.

'हरिकीर्तने, प्रवचने, भजने, निरुपणे, ही व्यापक लोकशिक्षणाची अंगे आहेत' असे आचार्य विनोबांनी म्हटले आहे. श्रीदासगणुंनी हरिकीर्तन व लेखन ही दोन अंगे प्रभावीपणे हाताळली, पण ती भगवंताची, संतांची आपण सेवाच करतो आहोत, या भावनेनेच हाताळली, यातच त्यांचे संतत्व आहे!

'साधी राहणी आणि उच्च विचारसरणी' चा ते आदर्श नमुना होते. त्यांच्या राहणीत कृत्रिमपणा वा डामडौल नव्हता. एऱ्हवी पोशाख इतका साधा असे की, त्यांचे 'संतकथामृत' वाचून त्यांना भेटण्यास आलेल्या बेळगावच्या शास्त्रीबुवांना स्वत: दासगणुंनी 'मी तोच आहे' असे सांगूनही खरे वाटेना. सुरुवातीला कीर्तन करताना ते झिरमिळ्याची पगडी, डेरेदार पांढरा शुभ्र अंगरखा, करवतीकाठी धोतर असा वेष करीत. पण एकदा असा वेष करून श्रीसाईबाबांना नमस्कार करायला गेल्यावर श्रीसाईबाबा म्हणाले,

''बा रे कीर्तन करावयाला ।
ऐसा नखरा हवा कशाला ।
स्वयेच नटुनी, वैराग्यास-
बोधणार का, काय जनास ।।
परा बोधणे स्वाचरणाविण ।
अर्थावाचुन शब्दोच्चारण ।।
लोका सांगे ब्रह्मज्ञान ।
स्वत: कोरडा जणु पाषाण ।।
जे काही लोकांस कथावे ।
ते ते स्वाचरणात असावे।।''

असे म्हणताच श्रीदासगणुंनी ते सर्व कपडे उतरविले आणि बाबांनी दिलेले एक उपरणे घेतले.

''आजपासुनि असेच कीर्तन ।

करीत जा उत्तरीय घेऊन'
साईंची ती आज्ञा यापरि
गणू पाळिती निज जीवनभरि।।''
भपक्याचा मोह त्यांना कधीच नव्हता.
'अशापरीची वृत्ति विरागी ।
दासगणुंच्या होती अंगी ।
नव्हती पूर्वीही यत्किंचिती ।
सौख्य-लालसा वा आसक्ती ।।'

म्हणनूच कान्ह्या भिल्लाने सप्तपदरी रत्नजडित सोळा तोळ्यांचा सुवर्णगोफ श्रीदासगणुंच्या चरणी अर्पण केल्यावर त्यांनी त्याला,

'नको तुझा हा गोफहि माते ।
परत घेउनी जाई याते ।।''
असे सांगितले. पण तो ऐकेना. तेव्हा,
'या गोफांतिल तीन पदर ते ।
द्यावे आपण पूजाऱ्याते ।
बाकी जे का उरतिल, त्यांनी,
हे मंदिर घ्या नीट करोनी ।।'

असे सांगून पुजाऱ्याचे दारिद्र्य मिटविले, तसेच देवळाचा जीर्णोद्धारही करविला.

'ही जी ऐशी निरिच्छ वृत्ती ।
उसनी वा वरपांगी नव्हती ।
दासगणुंच्या हृदयीची ती
सहज स्वाभाविकता होती ।।'
पोलिसी नोकरीत असूनही त्यांची शुचिता मळली नाही.
''परवित्ताची धरी न मनिषा ।
करी न परस्त्रीची अभिलाषा ।
शिवे न ज्याच्या हृदया स्वार्थ ।
संत म्हणावा तोच यथार्थ ।।''

हे त्यांचे विचार त्यांनाच लागू पडतात. कीर्तनावर पोट भरणे, हे श्रीदासगणुंना कधीच मान्य नव्हते. त्यामुळे कीर्तनाची बिदागी त्यांनी कधीच घेतली नाही. इ.स. १९२५च्या श्रावणात त्यांची कीर्तने इंदूरला तुकोजीराव होळकरांच्या राजवाड्यात झाली. बिदागी नाकारली तर राजेसाहेबांना राग येईल असे त्यांना कुणी सांगितले. तेव्हा श्रीदासगणु म्हणाले, ''परमार्थ महाविद्यालयातील मी एक विद्यार्थी आहे, तेथे निर्लोभतेची शिष्यवृत्ती लागते. ती श्रीमंतांनी मला द्यावी.''

हे ऐकल्यावर मोहोरा भरलेली सोन्या-चांदीची ताटे परत गेली. ही नि:स्पृहता पाहून सगळे भारावून गेले.

असाच प्रसंग देवासला घडला. तेथील राजेसाहेबांना श्रीदासगणुंचे कीर्तन फार आवडते. त्यांनी रुपयांनी भरलेले तबक महाराजांपुढे केले. महाराजांनी ते नाकारले, तेव्हा हा गोपालकृष्णाचा प्रसाद आहे, स्वीकारावा,' असे राजेसाहेब बोलले. त्याबरोबर महाराजांनी तो प्रसाद जमलेल्या ब्राह्मणांना वाटून टाकला. अशी निर्लोभता संताठायीच वसते. असे संत होते दासगणु! ते म्हणत,

''कीर्तनाच्या धंद्यावरी । पोट आपले कधी न भरी ।
ती संस्था ठेवणे खरी । सोवळीच सर्वदा ।।''

एकदा आजेगावी श्रीकेशवराजाच्या मंदिरात श्रीदासगणुंचे कीर्तन चालू होते. गावात पटकीची साथ होती. तिथल्या ब्राह्मण स्त्रीने काळाने ओढून नेलेल्या आपल्या बाळास ऐन कीर्तनात आणले आणि श्रीदासगणुंच्या पायांवर ठेवून म्हटले,

''महाराज, वाचवा शिशूते ।
तुम्ही संतजन असा दयार्द्र ।
सांभाळावे अपुले ब्रीद ।।''
त्याप्रसंगी संत दासगणु काय म्हणतात पाहा-
''भाट असे मी संतजनांचा ।
श्वान समज वा तद्द्वारीचा ।
मी त्यांच्या दासाचा दास ।
चढेन केवी संत-पदास ?''

स्वत:कडे मोठेपण घ्यायला तयार नाहीत. संतच थोर, आपण त्यांचे दास, हीच भूमिका! पण भगवंतावर अढळ श्रद्धा. तोच दीनबंधू आहे. तोच कर्ता-करविता आहे; असा भाव! पुढे ते म्हणतात,

''करुणा वत्सल हा गिरिधारी ।
उभा असे की तवसामोरी ।
तोच असे भयकृत्, भय-नाशन ।
तोच हरिल हे संकट भीषण ।।''

'श्रीविष्णुसहस्त्रनाम' अनेकजण नित्य पठण करतात. पण दासगणुंनी ते नुसते म्हटले नाही; ते अनुभवले. त्यातील प्रत्येक नामाशी त्याच्या अर्थाशी ते समरस झाले. म्हणूनच त्यांना 'भयकृत्- भयनाशन:' याचा अर्थ काढला आणि भगवंतावर आणखीनच गाढ निष्ठा झाली.

'इकडे कीर्तन समाप्त झाले ।
आणि बाळ ते उघडी डोळे ।।'

'तुमच्यामुळेच माझा बाळ वाचला' असे तिने म्हणताच श्रीदासगणु म्हणतात, 'ही त्या भगवंताची करणी।'

'निजमहती होते प्रस्थापित ।
ऐसा येता वासहि त्याप्रत ।
श्रद्धा अपुल्याविषयीची ती ।
दासगणु मुळी टिकू न देती ।।'
'संतलक्षणे यापरिची जी ।
रुजली होत श्रीगणुमाजी ।
म्हणुनी निज-संतत्व कधीही ।
जेतो चि कटू दिलेचि नाही ।'

संतत्वाच्या भोवती सामान्य ऐहिक सुखे पुरविल्याच्या चमत्कारांचे तण उगवणे, हे अत्यंत स्वाभाविक असते. पण आपल्याविषयी कोणी काही अलौकिकत्व प्रस्थापित करील, असा नुसता वास येताच श्रीदासगणुंनी त्यास झिडकारले आहे. त्यांची धारणा काय होती पाहा-

''कारण या विश्वावर साची ।
सत्ता चाले परमेशाची ।
तोच असे निर्माता, त्राता ।
चराचराचा होय नियंता ।।
... असे निसर्गाचा क्रम जैसा ।
चालू देती तो नित तैसा ।
करणे ढवळाढवळ तयात ।
संतांना हे नसे पसंत ।
... सिद्धीचा या वापर म्हणुनि ।
संत न करिती, समर्थ असुनी ।
सिद्धी म्हणजे एक उपाधी ।
ऐसे मानी त्यांची बुद्धी ।।
प्रयोग करता सिद्धा ईचा ।
होत जातसे नाश तपाचा ।
वाढतसे चित्तात अहंता ।
घातक ठरते जी परमार्था ।
पसरे मग ती जगती ख्याती ।
त्यातुनि जन्मा येत महंती ।
भवती जमती स्वार्थी भोंदू ।
टाळी परि हे सच्चा साधू ।।''

आपल्या ऐहिकपूर्तीचे साधन म्हणून लोक संतांचा वापर करतात. यामध्ये संतांचे अवमूल्यन होते. श्रीदासगणुंना वाटे,

''केले गारुडीच खरोखर लोकांनी संतांस ।
स्वार्थापायी केला अवघ्या परमार्थाचा नाश ।।''

''ऐहिकतेचे हे जे अस्तर ।
दूर कराया, नित्य निरंतर ।
संत जन्मती या भूवरती ।
लोकोद्धारास्तव शुद्ध मती ।।''

असे शुद्धमती संत श्रीदासगणु होते आणि ते लोकोद्धारास्तवच अवतरले होते. बुवाबाजी, दांभिकता व बेबंद वागणे यावर त्यांनी आपल्या कीर्तनातून शब्दांचे फटके मारले आहेत. आधुनिकतेच्या नादी लागून सुसंस्कृतता लयाला जाऊ लागली, याचीही खंत त्यांनी व्यक्त केली-

''स्नानसंध्या ध्यानधारणा ईशभक्तिला वेळ नसे ।
घंटा घंटा सावरी नेकटाय, केस डोकीचे विंचरीतसे ।।
सत्य न उरले लवही कोठे, खोट्या लागी पूर आला ।
याच योगे समाज तुमचा गेला गेला रसातला ।।''

''मर्दुमकी ती मागे सरली समाज झाला बहु दुबळा ।
द्वेष घुशीने पोखरला की एकीचा सौखद किल्ला।।''

असे समाजविश्लेषणही त्यांनी केले आहे. श्रीदासगणु सनातन मताचे पुरस्कर्ते असले तरी कर्मठ नव्हते. त्यांचा दृष्टिकोण समंजस व समन्वयवादी होता. कोणत्याही पंथातील चांगल्या गोष्टींचे ते चाहते होते. त्यांच्यात अभिनिवेश नव्हता.

''शैवा जो शिव, वैष्णवा हरी गमे, वेदांतिया ब्रह्म जो ।
बौद्ध बुद्धहि, जो खुदाहि यवना, अर्हत जैनास जो ।
कर्ता जो हि गमे प्रमाणपटुना, जे कर्ममीमांसका ।
ख्रिस्त्या येशुहि तोच हा गणु म्हणे घ्या रुक्मिणीनायका ।।''

या श्लोकातून त्यांची वैचारिक संपन्नताच दिसून येते. त्यांनी चारही वर्णांच्या अवनतीची केलेली मीमांसा मार्मिक आहे.

''ब्राह्मणाचे मोठेपण । अनाचाराने गेले पूर्ण ।
अवघ्या क्षत्रियांचे मन । द्वेषी बनले देवदेवा ।
वैश्य परक्यांचा अडत्या बनला । आणि पोट भरू लागला ।
आणि चौथ्या शूद्राला । राजकर्त्यांनी फसविले ।।''

त्यामुळे आमच्या दैन्याला आम्हीच कारणीभूत आहोत, असे समाजपरीक्षण त्यांनी केले आहे. इंग्रजांनी अवलंबिलेल्या भेदनीतीवर त्यांनी कोरडे ओढले आहेत. त्यांनी केलेला 'उसाचा पोवाडा' त्याकाळी सरकारने जप्त केला होता. त्यात त्यांनी ऊस शेतकऱ्यांची दारूण दैना मांडली होती. स्पृश्यापृश्य भेदाविषयीही त्यांचा दृष्टिकोण उदार होता.

'महार मांग ख्रिस्ती झाले केवळ उपासमारीमुळे ।'

याची त्यांना खंत वाटल्यामुळे त्यांना परत धर्मात घ्यावं, असं ते म्हणतात. तसेच

'अखंड भारत करण्याकरिता ।
भीड हरीला घालावी ।।'

अशी कळकळीची प्रार्थना देशभक्तीने भारावून करतात. त्यांनी केलेले समाजचिंतन मौलिक आहे.

'बुडता हे जन, न देखवे डोळा
येतो कळवळा म्हणोनिया ।'

या जिव्हाळ्याने केलेले आहे. महिलांकडे पाहाण्याचा त्यांचा दृष्टिकोण सहृदय होता. मुंबईच्या श्रद्धानंद महिलाश्रमासारख्या संस्थांची आवश्यकता आहे व ते कार्यही ईश्वरीसेवाच आहे असे त्यांचे मत होते. परंतु, तशी परिस्थिती निर्माण होणे हे ते निंद्य समजत.

संत क्षमाशील असतात. अशी अनाक्रोश क्षमा श्रीदासगणुंच्या ठायी होती. त्यांच्या कीर्तनात मेलेले साप टाकणे, बेडकुल्या सोडणे असे अनुदार प्रकार सुरुवातीस बरेच चालत. एकदा तर त्यांच्या कीर्तनात चार डुकरे सोडली. ती थेट महाराजांजवळ आली. श्रीदासगणु महाराज

शांतपणे म्हणाले, ''या डुकरांनी ईश्वराकडे कीर्तनाला हजर राहण्याची परवानगी मागितली. ईश्वराने त्यांना सांगितले, तुमचे काम करण्यास बदली द्याल, तर माझी हरकत नाही. पंढरपूरचे वारकरी मोठे दयाळू ते डुकरांना म्हणाले, ''बाबांनो, आम्ही तुमचे काम करतो. तुम्ही जा कीर्तनाला' विनोदाची झालर असलेल्या पण मर्मी आघात करणाऱ्या या शब्दांनी श्रोतृवर्ग हसला, पण वारकऱ्यांना उमजली, श्रीदासगणुंची संयम-शांती!

संतांना ओळखू न शकल्यामुळे काही वेळा त्यांचा अपमानही होतो. श्रीदासगणुंच्या बाबतीत एकदा भुसावळात एक प्रसंग घडला. तिथल्या राममंदिरात थांबण्यासाठी तिथल्या व्यवस्थापिका बाईंनी आधी झिडकारलेच. नंतर भातपिठले करायला, साधी भांडीही दिली नाहीत. चणेफुटाणे खाऊन त्यांनी रात्र काढली. मात्र दुसरे दिवशी बाजारात जाऊन त्यांनी भांडी आणली व बाईंसमोर ठेवून म्हणाले,

''अडला नडला येथे आला जर का कुणि वाटसरू ।
ही भांडी देत जा तयाला नका कधी झिडकारू ।
रामराय तो प्रभु सीतापति ।
सदैव देवो तुम्हास सन्मति ।।''

कुणाही बद्दल रागद्वेषाचा स्पर्श त्यांच्या चित्ताला झाला नाही. कुणी कितीही वाकडे वागला तरी आपण सरळ वागण्याची सज्जनरीत त्यांनी सोडली नाही.

संत दयाळू असतात, दीनवत्सल असतात.

'दुःखी, कष्टी, अडला, नडला ।
संकटात जर कुणि सापडला ।
श्रीगणु करिती साह्य तयाप्रति ।
ही तत्स्वाभाविकी प्रवृत्ती ।।
नोकरीत ते जामखेडला ।
असताना हा प्रसंग घडला ।
त्यावरुनी ते येईल समजून ।
करुणापूर्ण कसे यज्जीवन ।।

बैलगाडीने श्रीदासगणु गाडीवानाबरोबर चालले होते. त्यांना एक स्त्री कष्टाने चालत असल्याचे दिसले.

'जातीने ती होती यवनी ।
अति आसन्न-प्रसवा गर्भिणी ।
... दासगणुंनी तिज ते वेळे ।
निज गाडीमध्ये घेतले ।।'

पण तिला तर प्रसूतिवेदना असह्य येत होत्या.

'तिथेच एक्या झुडुपाजवळी ।
त्यांनी ती गाडी थांबविली ।
तिच्याच आडोशाला देखा
केली त्या बाईची सुटका ।।
तिचे व्यवस्थित सारे करुनी ।
शिशुसह पोचविले तत्सदनी ।
परोपकारी ही जी वृत्ती ।
नैसर्गिक निरपेक्षा होती ।।''

श्रीदासगणु महाराजांचे जीवनचरित्र अलौकीक वाटते- 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टवीती उपकारे ।।'

त्यांच्या जीवनातील आणखी एक हृदयद्रावक घटना मराठवाड्यात घडली. पहाटे ते बहिर्दिशेहून येत असता त्यांच्या कानी रडण्याचा आवाज आला. जवळच्या झोपडीत जाऊन पाहताच एक पाच-सहा वर्षांची पोर रडत होती. 'का रडतेस' असे विचारताच तिने अजाणपणे सांगितले की,

'कवापासुनी माजा माय, बोलत न्हाई निजुनी हाय ।
बा बी माजा कालपासुनी निजुनी हाये तसाच अजुनी ।।'

त्या भागात कॉलऱ्याची साथ होती. त्या पोरीचे आई-बाप दोघेही कॉलऱ्याचे बळी ठरले होते.

'दासगणुंना आली कळुनी परिस्थिती ती, बघताक्षणी ।
सारे संपुन गेले होते बघता क्षणी । केवळ आता उरली प्रेते ।।
जवळ घेउनी पोरीला त्या हृदयी धरले त्यांनी ।।
अगतिकता, दीनता बघुनि ती,
दासगणु द्रवले निज-चित्ती।।'

श्रीदासगणुमधील संतत्व इथे प्रकर्षाने उठून दिसते. त्या पोरीला त्यांनी आपल्या बरोबर घेतले इतकेच नव्हे, पुढे तिची व्यवस्थित प्रतिपाळाची व्यवस्था केली.

अडल्या नडल्याला साह्य करणं आणि दुसऱ्यांची जीवनं सुखमय करणं हे संतांचं कार्य श्रीदासगणुंच्या चरित्रातही दिसून येतं. असाच एक कुणी विद्यार्थी फीसाठी अडला होता. श्रीदासगणुंनी त्याला कीर्तनात आरतीत जमलेले सर्व रुपये दिले. पुढे तेरा वर्षांनी तो भेटला. कृतज्ञतेने वंदन करून त्याने सांगितले, 'महाराज, आपण साह्य केले म्हणून मी आज मामलेदार झालो. आपले उपकार कसे फेडू?' तो जातीने महार होता, तरी श्रीदासगणुंनी त्याला आपल्या जवळ बसवून घेतले व त्याची आस्थेने चौकशी केली. त्यांनी त्याच्या हृदयालाच स्पर्श केला होता, त्यांना त्याच्या चर्मस्पर्शाचा कसला विटाळ? पवित्र तेच की जे स्वयमेव पवित्र असते, दुसऱ्यालाही पवित्र करते आणि कशानेही अपवित्र होत नाही. श्रीदासगणुंचे जीवन असे पवित्र होते. त्यांचे संतत्व असे पावन होते.

त्यांचे अमानित्व असे की, कधीही त्यांनी आपले सत्कारसमारंभ, गौरव करून घेतले नाहीत. त्यांचा पहिला नी शेवटचा सत्कार नगरला झाला. तेव्हा सभाध्यक्ष भारदे म्हणाले,

''रसाळ कीर्तनकार, महाकवी ।
यात न दासगणुंची थोरवी ।

महानता ती त्यांची खचित
आहे त्यांच्या संतत्वात ।।''

संत किती विनम्र असतात, याचे उदाहरण पू. अण्णाबुवा कालगावकरांनी सांगितले आहे. शांडिल्यभक्तिसूत्रांवर श्रीदासगणुंना रचना करायची होती. पण ती सूत्रे समजून सांगण्यासाठी अण्णाबुवां त्यांच्याकडे येत. श्रीदासगणु त्यांना वंदन करत. अण्णाबुवांसाठी पाट मांडून ठेवत. त्यांचे स्पष्टीकरण असे-

'गुरुच्या चरणी शिर झुकवणं हाच खरा धर्म आहे.'

'श्रीगजानन विजय' ग्रंथ रचनेच्या वेळी त्यांचे अमानित्व असे की लोकांनी पालखी आणली तरी ते बसले नाहीत. पायउतार झाले. अलौकिक ग्रंथनिर्मिती करूनीही नि:स्पृहपणे काहीही घेतले नाही. कारण ते नुसते कवी नव्हते, तर संत होते धन्य ते संतकवी!

पांडुरंगाच्या अखंड नामस्मरणामुळे त्यांच्यातील 'मी' संपूर्ण मावळला होता.

ते पांडुरंगमय झाले होते. 'हे सर्व जग पांडुरंगांने भरले आहे. प्रत्येकजण पांडुरंग आहे. पांडुरंगाने अनेक माणसांचा 'ड्रेस' घातला आहे' हे लहानग्या अनंताला त्यांनी दिलेले स्पष्टीकरण मार्मिक आहे.

''दासगणु संत महान
महीपतीचे हे अवतार
ग्रंथसंपदा केली अपार
साईनाथ कृपाप्रसादे
अंगी विरक्ती
साईपदी अपार भक्ती
साक्षात सरस्वतीची वसती
वरदहस्ते साईच्या
देशभ्रमण ते केले
कष्ट अपार सोशिले
संत-चरित्रे रचिली
लोकांवरी उपकार अगणित.
कीर्तनी रंगले अपार
त्यात नसे अहंभाव
लोका सांगती सद्विचार
महिमा भगवद् भक्तीचा

- **सौ. सुनंदा शाळिग्राम**, पुणे
'विश्वनाथ स्मृति', फ्लॅट नं. ३,
दत्तवाडी पोलिस चौकी समोरील लेन, पुणे ४११०३०.
फोन : २४३२४७५०

***



# ।। श्रीसाईभक्त दादा ।।

**डॉ. परिमल मधुकर जोशी**
श्रीवरदानंद भारती यांचे अनुग्रहीत शिष्य, श्रीदासगणु महाराज व वरदानंद भारती परिवारातील सदस्य, वैद्यकीय सेवा, प्राध्यापक व विभागप्रमुख- धोंडूमामा साठे होमिओपॅथिक वैद्यकीय महाविद्यालय, पुणे.

मोक्षप्राप्ती हेच अंतिम ध्येय असलेल्या मनुष्यजीवनात सद्गुरूची कृपा संपादन करणे याला अतिशय महत्त्व आहे. सद्गुरूभक्तीचा आदर्श पहायचा असेल, अनन्यता, उत्कट भक्ती कशी असावी, गुरूला कसे भजावे हे बघायचे असेल तर श्रीदासगणु महाराजांचे संपूर्ण जीवन, त्यांची आचारपद्धती, त्यांचे सागरासारखे खोली असलेले काव्य हा आदर्श वस्तुपाठच आहे असे म्हणावे लागेल. श्रीदासगणु महाराज म्हणजे सद्गुरू भक्तीचे साकार रूपच होय! श्रीसाईनाथांच्या सहवासात संसारातील अनित्यता व त्यातून सुटण्यासाठी गुरूलाच सर्वस्वी शरण जाण्याची आवश्यकता श्रीदासगणु महाराजांना (येथून पुढे 'दादा' असा त्यांचा उल्लेख असेल) मनोमन पटली. एकदा एखादी गोष्ट पटली की त्याची अथक प्रयत्नाने व निष्ठेने अंमलबजावणी करणे हा त्यांचा स्थायीभाव होता. दादांना अनेक वर्षे श्रीसाईनाथांचा अत्यंत जवळच सहवास लाभला. या अद्वितीय गुरुशिष्यांना एकमेकांच्या सहवासात जो आनंद झाला असेल, त्यांचे सुखसंवाद कसे असतील याची आपण फक्त कल्पनाच करू शकतो! श्रीसाईनाथ हे 'भवरोग वैद्य' होते. मुळात सात्त्विक भक्त असलेल्या दादांना ईश्वरप्राप्तीमार्गात यश मिळावे म्हणून जे जे करणे आवश्यक ते ते बाबांनी केले, करवून घेतले. जी जी उच्च अवस्था दादांना प्राप्त झाली ती साईभक्तीमुळे, साईकृपेमुळेच! दादा हे श्रीसाईनाथांचे खरे अंतरंग भक्त होते, जणू बाबांचे प्रल्हादच होते! गुरुशिष्यात प्रेमाचा ओलावा असल्यावाचून गुरूचा उपदेश परिणामकारक होत नाही. तसेच शिष्याची पात्रता नसेल तरीही त्याचा उपयोग होत नाही. सद्गुरूची कृपा संपादन करण्यामध्ये कठीण गोष्ट एवढीच की खरा शिष्य असणे व खरा सद्गुरू मिळणे! श्रीसाईनाथांसारख्या सत्पुरुषाची कृपा होण्यासाठी शिष्यही तितकाच तयारीचा असणे आवश्यक आहे. दादा श्रीसाईनाथांच्या सहवासात येण्यापूर्वीचे त्यांचे जीवन पहाता, आदर्श शिष्याच्या भूमिकेत त्यांची तयारी झालीच होती, असे म्हणावे लागते. श्रीसाईनाथांना अभिप्रेत गुण सर्वार्थाने दादांच्यामध्ये कसे होते ते आता पाहू.

### श्री दासगणु महाराज (दादा)

दादा पोलिसात शिपाई होते. एकटेच रहात असत. अत्यंत कर्तव्यदक्ष म्हणून त्यांची ख्याती होती. दादा कट्टर शिवभक्त होते. सोमवार, प्रदोष, शिवरात्र ही व्रते निष्ठेने पाळीत. महाशिवरात्रीला सर्व दिवसरात्र तोंडात काहीही न घालता शिवलिंगावर रुद्राचा अभिषेक करत जागून काढीत. अत्यंत सरळ स्वभाव हे त्यांचे वैशिष्ट्य होते. कीर्ती, लोकमान्यता यांची त्यांना पर्वा नसे. लपवाछपवीला त्यांच्याकडे कधीच जाग नसे. आपल्यात असलेल्या गुणांचे त्यांनी कधीही प्रदर्शन केले नाही, तर नसलेले गुण आहेत असे कधीही भासवलेही नाही. जे पटले तेच करावे व एकदा पटले की मनापासून करावे हा त्यांचा खाक्या होता. ते अतिशय स्पष्टवक्ते होते. सरळ स्वभाव, उत्तम शील व चारित्र्य, निष्पाप हृदय व उपजतच असलेली विलक्षण काव्यप्रतिभा यामुळे समाजात त्यांना आदराचे स्थान होते. पोलीत खात्यात राहून इतका निर्मळ, पवित्र व निर्लोभी माणूस राहू शकतो याचे लोकांना आश्चर्य वाटत असे. दादांची त्यावेळची कविता जरी तमाशाकरिताच रचली गेली असली तरी तिच्या विविधतेचे क्षेत्र विपुल व सर्वकष होते. इतिहासाचा मागोवा घेणारा पोवाडा असो, गावातील लब्धप्रतिष्ठित माणसांची कुलंगडी फटकळपणे चव्हाट्यावर आणून त्यांच्या अनाचाराचे दर्शन घडविणे असो, निर्भेळ शृंगाराचे उत्तान वर्णन असो, निसर्ग सौंदर्याचे वर्णन असो वा प्रल्हाद महाराजांसारख्या संतांचे गुणानुवाद असो, त्यांची कविता सर्व क्षेत्रातून सहजपणे वाटचाल करीत असे. तमासगीर, गोंधळी त्यांना आपला अन्नदाता मानीत, त्यांच्याविषयी गुरुसारखा पूज्यभाव ठेवीत. पोलिसांच्या नोकरीत व तमासगीर वातावरणातही, कमळाच्या पानासारख्या, त्या वातावरणाचा लेप त्यांच्या सात्त्विक अंतःकरणाला कधीही लागला नाही. श्रीवामनशास्त्री व दादा यांचा संबंध कळल्याशिवाय श्रीबाबा-दादा संबंध कळणार नाही.

### श्रीसद्गुरू वामनशास्त्री व दादा

नोकरीनिमित्त श्रीगोंदा येथे असताना त्यांची भेट श्रीसद्गुरू वामनशास्त्री इस्लामपूरकर यांच्याशी झाली. हे मद्रासकडील मोठे

सरकारी अधिकारी होते. संस्कृत विद्येचा दांडगा व्यासंग असल्यामुळे प्राचीन संस्कृत ग्रंथ पहाण्याचे प्रसंग असल्यास ते काम श्रीवामनशास्त्री यांचेकडे सोपविले जाई. श्रीगोंदा येथील आलाशास्त्री भणगे या वृद्ध विद्वानाकडे काही पुरातन संस्कृत ग्रंथ आहेत असे समजल्यावरून या ग्रंथांच्या संशोधनासाठी सरकारतर्फे श्रीवामनशास्त्री येणार होते. श्रीदासगणुंना त्यांची नीट व्यवस्था करून, मदत करण्यासाठी सरकारतर्फे सूचना आली होती. ठरलेल्या दिवशी श्रीवामनशास्त्री येऊ शकले नाहीत. त्यांना दोन दिवस उशीर झाला. समागमे असलेला आचारी मागे राहिल्यामुळे श्रीवामनशास्त्री हे एका ब्राह्मण बाईने चालविलेल्या खाणावळीत जेवणास आले होते. दादाही त्याच खाणावळीत जेवत असत. त्यांनी शास्त्रीबुवांना अजून पाहिले नव्हते. नेहमीच्या थट्टेखोर स्वभावाला अनुसरून दादा तेथील एकास म्हणाले, ''सरकारने कोण पंडित पाठविला आहे कुणास ठाऊक! दोन दिवस झाले स्वारीचा पत्ता नाही. इतक्या लांब स्टेशनवर फुकट हेलपाटे झाले. विद्वत्ता कोण विचारावी? पण सरकारी शास्त्री म्हणून डौल मात्र पाहून घ्यावा लागेल. जुन्या ग्रंथाच्या रद्दीतून हे विद्वान काय रत्ने काढणार आहेत, ते ईश्वर जाणे!'' हे सर्व भाषण श्रीवामनशास्त्री ऐकत होते. पुढे कचेरीत ज्यावेळी ओळख करून घेण्याचा जेव्हा प्रसंग आला तेव्हा हेच वामनशास्त्री असे समजल्यावर दासगणुंना फार कानकोंडे वाटले. पण शास्त्रीबुवांनी त्याची थोडीही जाणीव दिली नसल्यामुळे तर दादांना अधिक लाजल्यासारखे झाले. एक दिवस रात्री श्रीवामनशास्त्रींच्या खोलीत दादांनी सहज डोकाविले. शास्त्रीबुवा शुचिर्भूत होऊन नित्यनियमाप्रमाणे पूजेस बसले होते. पूजा फार तल्लीनतेने चालली होती. नंतर श्रीमद्भागवताचे पारायण करीत असताना भक्तिरसाच्या उद्रेकामुळे त्यांच्या दोन्ही नेत्रातून प्रेमाश्रू ओघळत होते, मुद्रेवर अलौकिक तेज दिसत होते. या दृश्याचा दादांच्या मनावर फार परिणाम झाला. शास्त्रींच्या सहवासात असताना त्यांचे सदाचरण, शांत वृत्ती, सरळ स्वभाव यामुळे त्यांच्याविषयी आदराची भावना आधीच निर्माण झाली होती. भावसमाधीत रंगून गेलेली शास्त्रीबुवांची ती दिव्यमूर्ती पाहिल्यावर त्या आदराला भक्तीचे स्वरूप प्राप्त झाले. स्वत: साधक असणाऱ्या दादांनी त्यांना उपदेश देऊन अनुग्रह देण्याची कळकळीची विनंती केली. त्यांचा सच्चा भाव पाहून शास्त्रींनी ते मान्य केले. गुरुपदेश घेताना एका महिन्याच्या पगाराची गुरुदक्षिणा देण्याचा दादांचा विचार होता. पण, ''अरे एका पगाराने काय होते? गुरूला सर्वस्व अर्पण करावे लागते, तशी तयारी आहे का? जाऊ दे. तुझ्या सर्व नोकरीची मी गुरुदक्षिणा घेणार आहे, पण त्याला अवकाश आहे.'', असे श्रीवामनशास्त्री म्हणाले. दादा शिवभक्त, त्यांनी उपदेशांचे वेळी गुरुमंत्र घेतला तो सुद्धा बेलाच्या पानावर! शास्त्रींनी शिष्यांचा हट्ट पुरविला व उपदेशही शिवमंत्राचाच केला, परंतु आज्ञा म्हणून पंढरीची वारी करावयास सांगितली. श्रीवामनशास्त्रींचा उपदेश झाल्यावरच दादा हे 'दासगणु' या नावाने प्रसिद्धीस आले. सद्गुरूंचा 'दास' असा 'गणू' या भावनेने स्वत:चा उल्लेख 'दासगणु' अथवा 'गणुदास' अशा दोन्ही रीतीने करू लागले. पंढरपूरच्या वारीची आज्ञा त्यांना फारशी रुचली नाही, परंतु गुरूंची आज्ञा म्हणून ती आजन्म नियमाने पाळली. पुढे पुढे त्यांना पांडुरंगाच्या दर्शनाची ओढ वाटू लागली. श्रीवामनशास्त्री व दादा यांची नंतर दोन तीन वेळाच भेट झाली. त्यातील एका भेटीत, पंढरपूर येथे शास्त्रीबुवांनी ''मी काशी येथे जाऊन देह ठेवणार आहे'' असे दादांना सांगितले. गुरुमाऊलींची शेवटची भेट या कल्पनेने दादांचे हृदय भरून आले. नेत्रावाटे अश्रूंचा पूर लोटला, तेव्हा त्यांचे सांत्वन करीत श्रीवामनशास्त्री म्हणाले ''वेड्यासारखे दु:ख करू नकोस. हा मुळी मृत्यूलोकच आहे. त्यातूनही मी नित्याचाच दुरावलो आहे, अशी समजूत करून घेण्याचे कारण नाही. दोनतीनदा शिर्डीला गेला होतास ना? श्रीसाईबाबा थोर विभूती आहेत. त्यांना माझेच स्वरूप मान. आम्ही दोघे एकरूप आहोत. तेच येथून पुढे तुला वेळोवेळी मार्गदर्शन करतील!'' या आदेशामुळेच श्रीदासगणुंनी श्रीसाईबाबांना पुढीलप्रमाणे विनंती केली आहे –

**''हे श्रीसाई समर्था । तुझ्या पदी ठेवून माथा ।**
**करीतो विनंती हीच आता । ती उदारपणे मान्य करा ।।**
**मी सकल संतांचा चरणरज । माझी राखा आपण लाज ।**
**तुम्ही भवाब्धीचे जहाज । हे म्या पक्के जाणले ।।**
**हीच विनंती साईनाथा । या वामनशास्त्रांच्या छात्रा ।**
**नको लोटू कदा परता । बाबा दासगणुसी ।**
**माझे गुरू मरून गेले । पोरकेपण मजला आले ।**
**म्हणून पाहीजे सांभाळिले । या पोरक्या गणूसी ।।**
**तुम्ही एकरूप अवघे संत । तुम्हामाजी नसे द्वैत ।**
**तुम्ही वामनशास्त्री साक्षात । आहात बापा मजलागी ।।**

**भक्तिसारामृत ५३–२९२**

पुढे शके १८१८ च्या ज्येष्ठ वद्य एकादशीस श्रीवामनशास्त्रींनी विश्वेश्वरचरणी देह अर्पण केला. शास्त्रीबुवांनी आपली संपूर्ण आध्यात्मिक संपत्ती श्रीदासगणुंना आधीच बहाल केली होतीच पण आता ऐहिक संपत्तीही एका लिखित मृत्यूपत्राद्वारे दादांच्या नावावर केली होती. गुरुपत्नीला हे मुळीच आवडले नाही. दादांनी कोणताही व्यावहारिक विचार मनात न आणता ते मृत्युपत्र जसेच्या तसे गुरूपत्नीच्या स्वाधीन केले. धनिकालाही मोह पडावा, अशा मोठ्या संपत्तीवरचा सर्व अधिकार दादांनी स्वसंतोषाने सोडला. गुरुपत्नीच्या चरणी मस्तक ठेवून ते म्हणाले, ''माय, मला या संपत्तीची थोडीही अपेक्षा नाही. हे सर्व खुशाल परत घ्या. गुरुमाऊलीच्या पूजेतील त्यांच्या आवडीची ही विठ्ठलमूर्ती तेवढी मला द्या!'' बाईंनी तत्काळ संमती दिली. आपल्या सद्गुरूंची उपास्य देवता घेऊन दादा परत आले. आता अशा सत्‌शिष्याला श्रीसाईनाथ कडेवर घेतील नाही तर काय? श्रीवामनशास्त्रींनी लावलेल्या या हरिभक्तीच्या रोपाचे रूपांतर श्रीसाईनाथांनी, असंख्य जीवांना शीतल छाया देणाऱ्या कल्पवृक्षात केले. श्रीसाईनाथांवर दादांची निष्ठा पूर्णपणे स्थिरावली या निष्ठेला,

**''शिर्डी माझे पंढरपूर । साईबाबा रमावर ।**
**शुद्धीभक्ती चंद्रभागा । भाव पुंडलिक जागा ।।**

**या हो या अवघे जन । करा बाबांसी वंदन ।**
**गणू म्हणे बाबा साई । धाव पाव माझे आई ।।''**

असे अत्यंत उज्वल स्वरूप प्राप्त झाले!

### श्रीसाईनाथांच्या सहवासात

प्रथम भेटीपासूनच बाबांनी दादांच्या मागे नोकरी सोडण्याचा तगादा लावला. जणू श्रीवामनशास्त्रींनी मागितलेली गुरुदक्षिणा बाबा घेत होते. बाबा म्हणत, ''गणू नोकरी सोड, आपण बूट पुसाया जन्मलो काय? देवाला तुझी लई काळजी आहे! गणू, तू संतांना जेवायला बोलीव! एवढे कर बरं का गणू! तुझे लई कल्याण होईल!''

याचा अभिप्रेत गूढार्थ असा की, संतकवि महिपतीने आपल्या भक्तलीलामृतादि ओवीबद्ध ग्रंथातून संतांची चरित्रे काव्यमय भाषेत गाईली आहेत, तशी यांनी वर्णावी. ही आज्ञा शिरसावंद्य मानून दादांनी संतचरित्रे लिहिण्यास प्रारंभ केला. पुढे लवकरच विशेष अनुभव देऊन बाबांनी त्यांना नोकरीही सोडावयाला लावली.

श्रीसाईनाथांच्या आज्ञेने संतचरित्रे रसाळ वाणीने गात असताना, त्यांच्या काव्याचे मूळ सोज्वळ स्वरूप प्रकट होऊ लागले. त्यांची काव्यगंगा भक्तिपेठेतून वाहू लागली. दादांनी नटनर्तक मोहिनी राजासमोर शेवटचा तमाशा करून डफ फोडला तो कायमचाच! साधनामार्गावर श्रीदासगणुंचे वेगाने मार्गक्रमण सुरू झाले. दादा श्रीबाबांचे एकनिष्ठ भक्त झाले. बाबांचे नुसते स्मरण जरी झाले तरी ते अगदी गहिवरून जात असत, त्यांचे प्रेमाश्रू केव्हाच ओघळू लागत! दादा नेहमी म्हणत की, भक्तीचे स्वरूप सामान्य व्यावहारिक केव्हाही असता कामा नये. निष्काम भक्ती असावी. परमार्थाचा उपयोग ऐहिक स्वार्थ साधण्याकरिता करणे दादांना त्याज्य वाटत असे. पूजेचा संकल्प नेहमी केला जातो तसा, म्हणजे ''अस्माकं सहकुटुंबानाम् क्षेमस्थैर्यायुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थम्--------'' ऐवजी, ''श्रीपांडुरंगदेवताप्रीत्यर्थम् पांडुरंगपूजनंच करिष्ये'' असाच दादांनी कायम केला.

### द्वय अंगुष्ठी गंगा यमुना

एकदा काही विशेष पर्वाच्या निमित्ताने गोदास्नानास जावे असा दादांचा विचार होता. दादांचे गोदावरीवर अतिशय प्रेम! बाबा परवानगी देईनात. हा प्रकार शिर्डीत नेहमीचाच होता. दादांनी परवानगी मागितली व ती बाबांनी लगेच दिली असे कधीच होत नसे. दोन- दोन, तीन-तीन महिने शिर्डीतून हलू देऊ नये. दादांनी गोदास्नानासाठी पुन्हा एकदा बाबांना कळकळीची विनंती केली तेव्हा बाबा म्हणाले, ''इतकी तळमळ कशासाठी रे गणू? विशेष दिवशी गोदास्नानातच काही अधिक आहे का? आतून स्वच्छ व्हावे, पवित्र व्हावे, कातडी भिजवून काय होणार? याही गोष्टी कराव्यात, पण येथेच थांबावे का? पर्व दिवशी गोदा हवी आणि एरवी नको? गोदा आपल्याजवळ आहे. उगीच दु:खी का होतोस?'' दादांनी श्रद्धेने बाबांच्या चरणावर मस्तक ठेवले तोच बाबांच्या दोन्ही अंगठ्यातून निर्मल जलधारा स्रवू लागली. दादांनी अत्यंत श्रद्धेने ते जल स्वत:च्या डोक्यावर शिंपडून घेतले आणि गोदास्नानापेक्षाही निरूपम आनंद उपभोगिला. बाबा म्हणाले, ''झाले का समाधान गणू?'' या अनुभवावर दादांनी अप्रतिम पद रचिले -

**''अगाध शक्ति अघटित लीला तव सद्गुरूराया ।**
**जड जीवाते भवी तराया तू नौका सदया ।**
**वेणीमाधव आपण होऊन प्रयाग पद केले ।**
**द्वय अंगुष्ठी गंगायमुना प्रवाह दाखविले ।**
**कमलोद्भव कमलाकर शिवहर त्रिगुणात्मक मूर्ति ।**
**तूच होऊन साईसमर्था विचरसी भूवरती ।**
**ऐसे असता उगीच मन्मन भटकत हे फिरते ।**
**आता विनंती हीच तुला गा स्थिर करणे त्याते ।**
**अधमाधम मी महापातकी शरण तुझ्या पाया ।**
**आलो निवटा दासगणुचे त्रिताप गुरुराया ।।''**

सर्वसंतांमधील एकरूपतेचा अनुभव बाबांच्या सहवासात दादांना अनेकवेळा आला होता. श्रीसाईसत्चरित्रात यासंबंधातील श्रीवासुदेवानंद-सरस्वती व नांदेड येथील श्रीरतनजींच्या प्रसंगाचे वर्णन विस्ताराने आले आहेच. श्रीसाई निर्भरता दादांच्या रोमारोमात भिनली होती. लहान बालकाला आई हवी असते. ती श्रीमंत आहे, गरीब आहे याच्याशी त्याला काहीच कर्तव्य नसते. मालकाच्या मुलाशी त्याचे भांडण झाले तर ते त्याला म्हणते, ''थांब बर का, आता मी माझ्या आईला तुझे नाव सांगतो!'' त्या मुलाला सगळा आधार आईचाच! दादांची सुद्धा अशीच भावना असे. ''आपली काळजी बाबांना आपण आपले कर्तव्य प्रामाणिकपणे करीत रहावे, त्यांची इच्छा असेल तसे ते करतील!'' यामुळेच आपल्याला ज्ञान प्राप्त व्हावे यासाठी वेगळा, निराळा प्रयत्न दादांनी कधीही केला नाही.

### नारदीय कीर्तन पद्धती

संतांची आख्याने रचून कीर्तन करताना दादा रंगून जात असत. शिर्डीस एकदा कीर्तनास जाताना दादा श्रीसाईनाथांना नमस्कार करण्यास मशिदीत आले. कीर्तनकाराच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे झिरमिळ्याची पगडी, करवतकाठी उपरणे आणि डेरेदार पांढरा शुभ्र अंगरखा असा दादांचा पोशाख होता. बाबांनी विचारले,

''कुठे निघालास रे गणू?''

''कीर्तन करण्यास जातो बाबा.''

''असा नवऱ्या मुलासारखा नटून? अरे परमार्थाकरता कीर्तन ना? संसारात अलिप्त रहावे हे सांगणार ना तुम्ही? मग हा थाटमाट आणि हा नखरा कशासाठी? काढ, काढ ते सगळे!''

श्रीबाबांनी दादांच्या अंगावरील अंगरखा, पगडी काढून घेतली. उपरणे तेवढे अंगावर घ्यावयास दिले आणि म्हणाले,

''जा, आजपासून असेच करीत जा कीर्तन!''

तेव्हापासून श्रीदासगणु महाराज उघड्या अंगाने, अंगावर एक उपरणे तेवढे घेऊन कीर्तन करू लागले. मोठमोठ्या संस्थानिकांच्या दरबारातून केलेली कीर्तनेही त्यांनी अशीच उघड्या अंगाने केली.

''निस्पृहस्य तृणं जगत्'' या नियमाशी दादा अपरिचित नव्हते. दादांच्या रूपाने श्रीसाईनाथांनी पुरातन नारदीय कीर्तन पद्धतीचे कलियुगासाठी पुनरावतरण केले असे वाटते. श्रीनारदांच्या गादीला शोभण्यासारखीच ही विरागी वेषभूषा आहे. कीर्तनाला उभे रहाण्याची दादांची स्थिर पद्धती निष्ठावंत भावाची द्योतक आहे. ईश्वर हा भावाचा विषय! भाव स्थिर हवा! स्थिरपणा, निस्पृहता, भक्तीची उत्कटता आणि वैराग्य हीच संताची, संतत्वाची प्रमुख खूण! या दृष्टीने बाबांनी आपल्या लाडक्या गणूला अत्यंत योग्य संकेत दिला. श्रीसाईकृपाप्रसादाने भगवंताचे गुणवर्णन करताना कीर्तनामध्ये दादा इतके तन्मय होत असत की त्यांचे अष्टसात्त्विक भाव दाटून येत असत. दादांच्या नेत्रातून शिडकावा करणारे भक्ती, प्रेम व वैराग्याचे तेज व त्यामुळे होणारा भावाविष्कार श्रोत्यांच्या अंत:करणात एक अपूर्व विश्वास निर्माण करीत असे. शोक, मोह, संसार इत्यादींच्या जंजाळातून बाहेर काढून अपूर्व आनंदाच्या, प्रसन्नतेच्या स्थितीत नेत असे. श्रीसाई-आज्ञेने शिर्डीतील रामनवमी उत्सवातील कीर्तनांची जबाबदारी दादांनी प्रेमाने स्वीकारली व सर्व कष्ट सोसून श्रद्धेने पारही पडली. दादांच्या नंतर त्यांचे सत्‌शिष्य स्वामी वरदानंदभारती (पूर्वाश्रमीचे श्री.अ.दा.आठवले) यांनीही पंचेचाळीस वर्षापेक्षाही जास्त वर्षे कीर्तनसेवा केली. आजही शिर्डीतील रामनवमी उत्सवातील कीर्तनसेवा श्रीदासगणु महाराज परिवारातर्फेच केली जाते.

दादांची बाबांच्या प्रतीची भावना एवढी एकात्म पावलेली होती की, बाबांच्या देहत्यागानंतरही दादा त्यांना पत्र लिहित आणि उत्सवाचा जमाखर्च व घटनांचा तपशिल त्यात नमूद करून ते पत्र बाबांच्या समाधी जवळ ठेवत असत. हे पत्र म्हणजे समर्पित होऊन दादा त्यांच्यावर सोपविलेले कार्य कसे करीत असत याचा उत्कृष्ट नमुना आहे.

अशा पत्रांपैकी एक पत्र व शिर्डी येथील रामनवमी उत्सवाचा इतिहास या लेखाच्या शेवटी तेजाचं चांदणं या पुस्तकातून उद्‌धृत केला आहे.

'करिष्ये वचनं तव।' म्हणणाऱ्या श्रीदासगणु महाराजांच्या काव्य प्रतिभेचा, प्रखर हरिभक्तीचा रथ श्रीसाईनाथांनी स्वत: सारथी होऊन परमार्थमार्गावरील सर्वोच्च ध्येयापर्यंत पोचविला!

श्रीदासगणु महाराजांची साईभक्ती श्रीज्ञानेश्वरमहाराज व श्रीएकनाथ महाराज यांच्या सद्‌गुरुभक्ती इतकीच उत्कट व व्यक्त आहे.

आत्यंतिक विश्वास व उत्कट भक्ती यांच्या प्रेरणेने दादा श्रीसाईंना साक्षात परमेश्वर समजत असत. हा आपला अनुभवजन्य विश्वास त्यांनी वेळोवेळी त्यांच्या काव्यात मांडला आहे. जवळजवळ दीड लाखाच्या आसपास ओवीसंख्या असलेल्या दादांच्या काव्यसागरातील बहुतेक प्रत्येक संतचरित्रात आख्यानात, प्रकरणात, पोवाड्यात श्रीसाईंचा उल्लेख आढळतोच. श्रीसाईनाथ- स्तवन-मंजिरी, गुरुपाठाचे अभंग तर साईभक्तीने ओथंबलेले आहेत. सद्‌गुरुंची प्रार्थना कशी करावी, भाव कसा असावा हे जागोजागी प्रत्ययाला येते.

सुमारे शंभर वर्षांपूर्वी रचलेल्या 'श्रीपांडुरंग स्तोत्रात' ते म्हणतात,

**''आता वंदू सिद्ध महंत ।**
**जे क्षमा शांतिचे कोष सत्य ।**
**जे कबीर अवतार साक्षात ।**
**साईबाबा शिर्डीचे ।**
**ज्यांचे घेता दर्शन ।**
**पाप ताप पळे दैन्य ।**
**जे नरदेहधारी भगवान ।**
**पावोत मशी सर्वदा ।।''**

गुरुपाठाच्या अभंगात ते म्हणतात,

**''क्षमा शांतियुक्त भवाब्धिचे जहाज**
**ऐसा सद्‌गुरुराज शिर्डी माझी''**
**'माझा गुरुराज जान्हवीचे जल**
**गणू अर्पी भाळ तयापायी'**
**'भक्तीरूप गंगा वाह जयाठायी**
**तेथे माझा साई राहे उभा'**

भक्तिलीलामृत या ग्रंथातील ३१, ३२ व ३३ हे तीन अध्याय श्रीसाईप्रेमाने भरले आहेत. दादा तेथे लिहितात,

**'ही साईची अध्यायत्रयी । सरस्वति गंगा यमुना पाही ।**
**हेच प्रयोग सांगू काई । भावार्थात बुडी घ्या ।।'**

दादांची,

**'रहम नजर करो अब मोरे साई**
**तुमबिन नही मुझे मा बाप भाई'**

व 'साई रहम नजर करना । बच्चोंका पालन करना ।'

हे पदे कीर्तनात म्हटली जातात. त्या काळात श्रीसाईबाबांचा प्रचार दादांच्या कीर्तनातून फार मोठ्या प्रमाणावर झाला. वरील दोन्ही पदे शिर्डीत नित्याच्या आरतीत म्हटली जातात, जगभरातील कोट्यावधी भक्त अत्यंत भावाने म्हणतात.

सद्‌गुरु श्रीसाई व परमेश्वर वेगळे नाहीत. ती ईश्वरी शक्तीच गुरूच्या शरीराच्या आश्रयाने प्रकट होत असते ही दृढ भावना असल्यामुळे श्रीदासगणु महाराज एका अशा अवस्थेत पोहोचले की, ती शक्ती त्यांच्यातच आविर्भूत झाली! त्यांच्या वाणी, मन, बुद्धीला व्यापून राहिली. दादांनी स्वत:च म्हटल्याप्रमाणे,

**'परब्रह्ममूर्ती सद्‌गुरू हाच एक जगती**
**हरूनि जिवाचे जिवपण सारे शिवपण हे निज हाती ।**
**कृपाकटाक्षे त्रिताप वारूनि बटिक करवितो मुक्ती ।।**
**आत्मस्वरूपा पहाणे असल्या दर्पण घ्या गुरू हाती ।**
**हे नच केल्या पाहू गेल्या होईल अवघी फजिती ।।**

व शेवटी,

**गुरू गुरुपणा दे शिष्याला अनन्य झाल्यावरति ।**
**दासगणु म्हणे भेद नुरे ज्योतिस मिळाल्या ज्योती ।।**

असा अनुभव त्यांना स्वत:लाच आला!

## रामनवमी उत्सवाचा इतिहास

शिर्डीमध्ये रामजन्मोत्सव शके १८३३ मध्ये पू. बाबांनी सुरू केला. वार्षिक उत्सवाच्या निमित्ताने या दिवसात लोक शिर्डीला जमत असत. योगायोगाने शके १८३३ मध्ये वार्षिक उरुस व श्रीरामनवमी एकदम आल्याने जन्मोत्सव करावा, अशी प्रेरणा पू. बाबांनी त्यांच्या भीष्म नावाच्या परमभक्ताला दिली. त्या वर्षीचे जन्माचे कीर्तन भीष्म काकांनी केले. पुढच्या वर्षी श्री बाळाबुवा सातारकर यांचे शिर्डीत पू. बाबांच्या दर्शनानिमित्त आगमन झाले आणि जन्माचे कीर्तन योगायोगाने बुवांनी केले. पुढच्या वर्षी पू. दादांचे आगमन शिर्डीस झाले असता पू. बाबांनी रामजन्मोत्सव करण्यासाठी पू. दादांना सांगितले आणि शिर्डीस पू. बाबा होते तेव्हापासून म्हणजे शके १८३६ (इ.स. १९१४) पासून रामनवमीच्या उत्सवाची माळ पू. दादांच्या गळ्यात पडली.

पू. दादांनी उत्सवाची शिस्तबद्ध आखणी करून शके १८३६ पासून उत्सवाची जबाबदारी घेतली. शिर्डी येथील रामजन्मोत्सव सुरुवातीस चैत्र शु. अष्टमी ते चैत्र शु. द्वादशी असा पाच दिवसांचा असे. रामनवमीस रात्री मुसलमान भाविकांचा संदल येत असे. ते समाधीस चंदनाचे लेपन करीत आणि गारफही अर्पण करीत असत. रात्री १२ नंतर शोभेचे दारूकाम असे. दशमीच्या दुपारी कुस्त्यांचा हंगामा होत असे. द्वादशीच्या दिवशी गोपाळकाला होऊन उत्सवाची सांगता होत असे.

शके १८७६ पासून प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे पू. दादा. शिर्डीस रामनवमीकरीता गेले नाहीत. पण तोपर्यंत शिर्डीची वारी त्यांनी कधी चुकवली नाही. शके १८७२ (इ.स. १९५०)च्या आसपास शिर्डी संस्थानच्या काही मंडळींशी त्यांचे तीव्र स्वरूपाचे मतभेद झाले होते. त्यातील काहींनी 'तुम्ही शिर्डीसही येऊ नका' अशी पत्रे लिहिण्यापर्यंत मजल मारली होती. त्यावर्षी पू. दादा शिर्डीपासून एक मैलावर असलेल्या श्री. बोरावके यांच्या वस्तीवर जाऊन उतरले. तेथे त्यांनी रामजन्म केला. परंतु हे मतभेद पुढे टिकले नाहीत. पू. दादाही झालेला त्रास विसरून गेले. पुढे ज्यावेळी श्री. नागेश आत्माराम सावंत व श्री. श्रीपाद बाळकृष्ण देव हे कार्यकारी मंडळावर आले. त्यावेळी त्यांनी सौजन्याने वागवून सर्व मतभेद मिटवून टाकले. आता श्रमविभागणीच्या तत्त्वावर रामनवमीच्या उत्सवाचा कार्यक्रम पू. दादांच्या पद्धतीप्रमाणे व्यवस्थित पार पडत आहे. शके १८६०चे म्हणजे इ.स. १९३८ चे आगेमागे रामनवमीचे उत्सवाचे वेळी गंगेच्या कावडी आणण्याची प्रथा पू. दादांनी चालू केली. सर्व जातीचे शे-दिडशे लोक कोपरगावाहून गोदावरीचे जल कावडीत घेऊन येत असत. त्यांची वाजत गाजत मिरवणूक निघे नंतर ते गोदाजल पू. बाबांच्या पादुकांवर घालण्यात येत असे. गोदाजल आणणाऱ्यास प्रसाद म्हणून श्रीफल देण्यात येई.

आज शिर्डी संस्थान भारतातील अत्यंत श्रीमंत संस्थानातील एक अग्रगण्य संस्थान आहे. याच्या उत्पन्नाची तुलना गिरिबालाजी तिरुपति संस्थानाशी केली जाते. पू. साईबाबांच्या काळात रामनवमी उत्सवाला सुरुवात झाली. त्या काळात त्याचे स्वरूप नगण्यच होते. परंतु नंतर पुढे वीस-पंचवीस वर्षांनी कसे झाले होते याचे बोलके चित्र पू.दादांच्या शिर्डी संस्थानच्या शके १८६९ म्हणजे इ.स. १९३९ सालातील उत्सवाच्या अहवालावरून लक्षात येते. आजमितीस शिर्डीला रामनवमी उत्सवासाठी लाखो भाविकांची गर्दी उसळते. प्रसादासाठी पंधरा लाख बुंदीचा लाडू बनतो. त्या पार्श्वभूमीवर हा अहवाल अचंबित करणारा आहे!

### श्रीदासगणु महाराजांनी श्रीसाईबाबांना लिहिलेले पत्र

श्रीशंकर

श्रीरामनवमी उत्सव, शके १८६१

श्री सच्चिदानंद सद्गुरू आधुनिक संतचुडामणी श्री साईबाबा महाराज यांच्या शके १८६१च्या श्रीरामनवमी उत्सवाचा अहवाल जमाखर्च तपशील खाली लिहिल्याप्रमाणे आहे.

चालू साली उत्सवास आरंभ तारीख २०-३-१९३९ चैत्र शु. ८ शके १८६१ मंगळवारपासून झाला. व ता. १-४-१९३९ चैत्र शु. १२ शके १८६१ रोजी शनिवारी गोपाळकाला होऊन उत्सवाची समाप्ती झाली. या उत्सवास मुखेड, नांदेड, मांजरम, हिपर्ग, नारनाळी, उमरी, मुदखेड, पायती, आजेगाव, खामगांव, मुंबई, नाशिक, ठाणे, अंधेरी, नगर, बेलापूर, संगमनेर, बार्शी, सोलापूर, सातारा, कोल्हापूर, चिपळूण, वसई, जबलपूर, नागपूर, अमरावती वगैरे ठिकाणांहून लोक आले होते. पण मागील सालापेक्षा चालू साली लोक पुष्कळ कमी आले. याचे कारण कमिटीच्या लोकांत विनाकारण वाढत चाललेली दुही हेच असावे असे वाटते. रामनवमीच्या दिवशी गंगेच्या कावडी नेहमीप्रमाणे अडीचशे पावणे तीनशेपर्यंत आल्या. त्यात शिर्डीच्या लोकांचा भरणा विशेष होता. बाहेरगावच्या लोकांच्या पाच पन्नास कावडी आल्या असतील. त्या कनकोरी, निधोन, लिंबगांव, सर्दू, साबळ विहीर, नांदुरकी वगैरे ठिकाणच्या लोकांच्या होत्या. कावडी आणायच्या कामात सर्व जातीचे व पंथाचे लोक होते. दुपारी रामजन्म होऊन जिलेबीचे प्रेजन झाले. जेवणास सुमारे हजार बाराशे लोक जमले असतील, असा अंदाज आहे. दुसरे दिवशी गुळाशिऱ्याचे भोजन झाले. या दिवशीही सात-आठशे पान झाले असावे. रामनवमीस रात्री मुसलमान लोकांचा संदल आला होता. त्यांनी आपल्या धर्माप्रमाणे श्री साईबाबांचे समाधीस चंदन चढवला, दोन-तीन गलफही अर्पण झाले. रामनवमीच्या दिवशी संध्याकाळी निशाणांची मिरवणूक निघून ते समाधीवर व मशिदीत लावले गेले. रात्री १२ च्या पुढे शोभेचे दारूकाम झाले. दारू ७५ रुपयांची सुटली. या साली दारू पूर्वीप्रमाणेच पन्नासची सांगितली होती. काही लोकांच्या आग्रहावरून चालू सालापुरती पंचाहत्तरची सोडली गेली. दशमीचे दिवशी कुस्त्यांचे हंगामास दुपारहून सुरुवात झाली. चालू साली हंगाम मागच्या हंगामाप्रमाणे भरला नाही व गावची वर्गणी जमावी तशी जमली नाही. श्रीसाईबाबांचे पेटीत ६० रु. निघाले. हंगामा रोडावत जाणे चांगले नाही. याचा विचार कमिटीने व गाववाल्यांनी अवश्य करावा, अशी नम्र विनंती आहे. हंगाम्यास प्रोत्साहन देणे हे सर्व बाजूंना श्रेयस्कर आहे. शिर्डी गावात दुफळी असल्यामुळे वर्गणी मागे जशी जमत होती तशी आता जमत नाही.

श्रीसाईबाबांच्या पेटीतही पैसे यावे तसे येत नाहीत. केवळ खर्चाच्या सबबीवर शिर्डीच्या कुस्त्यांच्या हंगाम्याला कमीपणा येऊ देऊ नये. गावकरी लोक रीतसर हंगामा करण्यास तयार असतील तर ती व्यवस्था कमिटीच्या लोकांनी हातात घेऊन करावी.

आता कमिटीचे म्हणणे असे असेल की हा हंगामा रामनवमीच्या उत्सवाला असतो तेव्हा तो हंगाम्याचा खर्च त्या रामनवमीच्या उत्सववाल्याने करावा. कमिटीवर त्याचा भार असू नये. पण हे म्हणणे बरोबर होणार नाही. कारण दोन्ही उत्सवात पेटीत आलेली रक्कम उत्सववाल्याकडे खर्चासाठी जाते. तशी रामनवमीची स्थिती नाही. रामनवमीच्या उत्सवात श्रीसाईबाबांची पाच दिवसांची पेटी हंगाम्याच्या खर्चाकरीता दिली गेली आहे. त्याबद्दल उत्सव करणाराची तक्रार नाही. पूर्वीप्रमाणेच हंगाम्याकरिता हल्लीही दिली जात आहे. असो. कसेही करून कमिटीने हंगामा भरभराटीत आणण्याचा विचार करावा.

एकादशीच्या दिवशी फराळाच्या व जेवणाच्या दोन पंक्ती झाल्या. त्या दिवशी माणूस चार-पाचशे झाले असेल. द्वादशीच्या दिवशी गोपाळकाला होऊन बुंदीच्या लाडवांचे प्रेजन झाले. हजार-बाराशे पान झाले. हनुमान जयंतीच्या दिवशी मारुतीस अभिषेक झाला व भिल्ल, वडारी, चांभार, म्हार, मांग यांना गुळशिऱ्याचे जेवण दिले. ते सगळे लोक मिळून तीनचारशे पान झाले असेल. मुसलमान लोकात दुफळी झाल्यामुळे त्यांनी चालू सालचा शिधा अजून नेला नाही. परमेश्वर त्यांना लवकरच सद्‌बुद्धी देऊन ते साईबाबाचा प्रसाद घेण्यास येवोत अशी साईबाबांच्या चरणी विनंती आहे.

उत्सवाच्या आधी पाणी चांगले राहावे म्हणून सरकारकडून परमॅगनेट ऑफ पोटॅश् नावाचे औषध पिण्याच्या पाण्याच्या विहिरीत टाकले गेले होते. त्यामुळे रोगराई वगैरे काही झाले नाही. यात्रेत पोलीस बंदोबस्त योग्य होता त्यामुळे चोऱ्या-मारामाऱ्या झाल्या नाहीत. एक दिवस तालुक्याचे मामलेदारसाहेब उत्सवास भेट देऊन गेले. पुण्याच्या आचाऱ्याने सैंपाक वगैरे चांगला केला होता. त्यांच्यात आपणास मजुरी गोविंदराव करंबेळकराकडून कमी मिळते अशी तक्रार आहे. याचा विचार पुढील साली करण्याचे ठरविले आहे. आचाऱ्यांनी सामानाची नासधूस होऊ दिली नाही. कोठीचा बंदोबस्त गोविंद पानशिवडीकर, व्यंका घाळेकर, रामचंद्र फतेवार वगैरे मंडळींनी चांगला ठेवला होता. उत्सवाचा भाजीपाला व चहाचे दूध वगैरे खरेदी करण्याचे काम पापालाल, नागोबा व बाबा यांनी चांगले केले. पंक्ती वाढण्याचे काम दिगंबरराव नांदेडकर, अप्पासाहेब नारनाळीकर, बस्मतकर, तुकाराम आजेगावकर, धोंडोपंत नांदेडकर, जगन्नाथराव बीडकर, गणपतराव बीडकर, राहतेकर, गांधी, पुरंदरे, विठ्ठलराव गवई वगैरे मंडळींकडून बंदोबस्त चांगला ठेवला होता. असो. कोणत्याही उत्सवात उत्सवाच्या निमंत्रण पत्रिका व प्रसाद पाठविण्याचे लेबल व पिशव्या पाठविण्यास जो खर्च होतो तो संस्थान कमिटीने करावा. त्याचा बोजा उत्सव करणाऱ्या पुढाऱ्यावर असू नये. निमंत्रण पत्रिका पाठविणे व मागाहून प्रसाद पाठविणे ही दोन्ही कामे संस्थान कमिटीची आहेत. यात उत्सवाच्या पुढाऱ्यांचा काहीच संबंध नाही. उत्सवाकरिताच ज्या लोकांची वर्गणी येईल त्या लोकांना प्रसाद पाठविणे योग्य आहे. पण ज्याचा एक पैसाही या उत्सवाला आला नाही अशा लोकांना उत्सवाच्या खर्चातून त्यांना प्रसाद पाठविणे हे व्यवहार दृष्टीने बरोबर होणार नाही. ज्या लोकांची वर्गणी आली त्यांना प्रसाद पाठविणे भाग आहे व तो पाठविणे उत्सवाचे पुढाऱ्यांचे काम आहे. जे लोक येथे येतात त्यांना प्रत्येकांना नारळाचा प्रसाद दिला जातो. त्यांनाच पुन्हा टपालाने प्रसाद पाठविण्याचे काम नाही. जे येथे उत्सवाचे वेळी हजर नाहीत व त्यांची वर्गणी आली आहे, अशाच लोकांना फक्त प्रसाद पाठवावा. मी हे संस्थान कमिटीला दोनवेळा कळविले असून त्यांचा विचार कमिटीने काहीच केला नाही. तो विचार येत्या गुरूपौर्णिमेच्या कमिटीच्या वेळी व्हावा. संस्थानाच्या इभ्रतीकरता निमंत्रण पत्रिका, प्रसाद पाठविणे असेल तर तो खर्च संस्थानने सोसला पाहिजे. जसे साईलीलेचा खर्च संस्थान सोसते तसा हाही सोसावा. तरी कमिटीस नम्र विनंती आहे की हा माझा रामनवमीचा अहवालाचा रिपोर्ट गुरूपौर्णिमेच्या वेळी कमिटीपुढे मांडवा. याचा योग्य विचार करून मग काय ठरविणे असेल ते ठरवावे.

असो. या उत्सवात जे लोक वर्गणी देऊन जातीने हजर राहिले व ज्यांनी वर्गणी पाठवून उत्सवास मदत केली व ज्यांनी अंगमेहनतीने उत्सवास सहाय्य केले त्या सर्वांचे रक्षण श्रीसद्‌गुरू साईमहाराज करतीलच. जमाखर्चाचा तपशीलवार खर्डा मोठा आहे. त्यात जाणून न जाणून ज्या काही चुका झाल्या असतील त्याची माफी समर्थांनी करून अशीच सालोसाल या दासाच्या हातून सेवा होत जावी. तसेच या उत्सवास ज्यांनी द्रव्यद्वारा किंवा अंगमेहनतीने मदत केली असेल त्या त्या लोकांच्या लेकराबाळांचे व त्यांच्या आरोग्याचे मानमरातबाचे रक्षण करून त्यांच्या संकटाचा व दु:खाचा परिहार करून सर्वस्वी कल्याण समर्थांनी करावे.

सकल संतांचा चरणरज

**दासगणु**

पू. दादा साईबाबा संस्थान कमिटीचे अध्यक्ष म्हणून ३६ वर्षेकाम पहात होते. वयोमान परत्वे प्रकृतिच्या कारणाने त्यांना नांदेडहून शिर्डीला जाणे अशक्य झाले. त्यावेळी त्यांनी आपल्या पदाचा स्वेच्छात्याग केला.

श्रीसाईनाथांच्या 'श्रद्धा, सबुरी व निष्काम भक्ती' या तत्त्वांचे आचरणयुक्त पालन करून परमार्थातील अंतिम ध्येय प्राप्त करुन घेतलेले श्रीदासगणु महाराजांचे उदाहरण एकमेवाद्वितीयच म्हटले पाहिजे.

श्रीसाईनाथ, श्रीदासगणु व श्रीवरदानंदभारती या थोर थोर संतांना माझे प्रणाम!

**आधार :**


१) संतकवि श्रीदासगणु महाराज : चरित्र आणि काव्यविवेचन
लेखक-संपादक : श्री. अनंत दामोदर आठवले.

२) संतकवि श्रीदासगणु महाराज दर्शन
शब्दवाही : श्री. मधुकर दत्तात्रेय जोशी

३) श्रीसाई-सच्चरित्र

लेखक : श्री. दाभोळकर

४) श्रीसाईनाथ- स्तवन मंजिरी

रचयिता : श्रीदासगणु महाराज

५) श्रीगुरुपाठाचे अभंग

रचयिता : श्रीदासगणुमहाराज

६) भक्तिलीलामृत

रचयिता : श्रीदासगणु महाराज

७) तेजाचं चांदणं

रचयिता : श्री. वा. ना. उत्पात, श्री. विनायकराव नांदेडकर, कु. गार्गी देशपांडे, श्री. ग. प्र. परांजपे, सौ. कल्याणी नामजोशी.


**- परिमल मधुकर जोशी**

१२७६, शलाका अपार्टमेंटस्,

नीलकमल सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११०५२.

दूरभाष : निवास : २५४१२५९९,

दवाखाना : २६११९६९५

मधुरभाष : ९८२२०५४०५८


***



# श्रीसंत दासगणु महाराज विरचित श्रीभक्तिसारामृत

**प्रा. डॉ. मुकुंद दातार**
एम्.अे. (मराठी संस्कृत), पीएच्.डी. वारणानगर महाविद्यालय येथे ३४ वर्षे प्राध्यापक, ३ वर्षे प्राचार्य साहित्यसेवा, समीक्षा ग्रंथ, संपादित ग्रंथ व कवितासंग्रह कार्यकारिणी सदस्य- गीताधर्म मंडळ- पुणे. प्रभावशाली वक्ता, संतसाहित्य अभ्यासक, पाच पुरस्कारांनी सन्मानित.

### काव्य-मंदिराचा कळस

आपल्या महाराष्ट्रातील अर्वाचीन संतांच्या मालिकेत अत्यंत मानाचे स्थान, श्रीसंत दासगणु महाराजांना प्राप्त झालेले आहे. श्री महाराजांनी आपल्या प्रासादिक कीर्तनांनी, उभ्या महाराष्ट्राला वेड लावले होते. तसेच त्यांच्या प्रेमळ आणि प्रसन्न, आख्यानकाव्यांनी मराठी रसिकतेला मंत्रमुग्ध केले होते. तर त्यांच्या संतचरित्रपर काव्यग्रंथांनी त्यांना, 'आधुनिक महिपती' ही यथार्थ पदवी प्राप्त करून दिली होती. श्रीसंत दासगणु महाराजांनी निर्मिलेले साहित्य-विश्व, खरोखरच अफाट आहे. त्याला विचारशीलतेची उंची आहे आणि तशीच आत्मीयतेची खोली आहे. आणि त्यामुळेच त्यांना 'अर्वाचिन दासोपंत' असेही म्हटले आहे.

श्रीमहाराजांची साहित्य-सृष्टी कशी आहे? तर ईशावास्यभावार्थ-बोधिनी, विष्णुसहस्रनामबोधिनी, पासष्टीभावार्थ-दीपिका हे सुबोध भाष्यग्रंथ, तसेच मनाचे श्लोक आणि शिष्यबोध हे प्रकरण-ग्रंथ आणि सुभाषितशतक, गोदामाहात्म्य, भावार्थ मंजिरी - यासारख्या अप्रतिम काव्यरचना - ही श्रीमहाराजांची साहित्यसंपदा महत्त्वाची आहे. तसेच त्यांनी लिहिलेले तीन 'भक्तिधारामृत' असे काव्यग्रंथ किंवा खरोखरच 'भक्तितत्त्वार्थ' असे त्रिदल, सर्वतोपरि महत्त्वाचे आहेत. ते तीन काव्यग्रंथ म्हणजे 'संतकथामृत', 'भक्तिलीलामृत' आणि 'भक्तिसारामृत' हे होत. हे तीन भक्तिभावमय असे काव्यग्रंथ म्हणजे, सकल-साहित्य-मौलिभूत असे - भावसंजीवक प्रसादपूर्ण आणि प्रेरणादायी असे काव्यग्रंथ आहेत. यांतही भक्तिसारामृत हा काव्यग्रंथ म्हणजे तर खरोखर काव्य-कलश आहे.

या ग्रंथाचे मर्म कोणते? गाभा कोणता? तर सारे संत हे भगवंताचे दूत आहेत आणि ते जनसामान्यांना, भगवद्भक्तीचा संजीवनी-मंत्र प्रदान करतात - असे चरित्रचित्रण, 'भक्तिसारामृत' या ग्रंथातही श्रीसंत दासगणु महाराजांनी केले आहे. मात्र त्यासाठी ते, त्या त्या अर्वाचीन संताचा समग्र जीवनपट चित्रित न करता, त्या संत-चरित्रातील, भक्तिभाववर्धक असे दोन-तीन लक्षणीय प्रसंग निवडतात आणि त्यांचे विलक्षण प्रत्ययकारी शब्दकळेत, चित्रण करतात. ही श्रीमहाराजांची चरित्र-चित्रणपद्धती, कथा-कथन पद्धती, अत्यंत मार्मिक आहे. कारण एवढ्या या चरित्र-कथनातूनही ते, त्या-त्या संतांचा पारमार्थिक अधिकार आणि त्यांनी दिलेला भगवद्भक्तीचा संदेश, जनमानसावर बिंबवतात.

### संतचरित्रे आणि भक्ति-रस

श्रीसंत दासगणु महाराजांची शब्दकळा - साधी, सोपी आणि सर्वांच्या हृदयाचा ठाव घेणारी असते. तिच्यामध्ये भक्तीचा जिव्हाळा ओतप्रोत भरलेला असतो. त्यांच्या काव्यशैलीबाबत म्हटले गेले आहे की 'गणूदास - वाणी दुग्धधारा। प्रसाद साईंचा, त्यात शर्करा।' श्रीमहाराजांचे मानवी व्यवहाराचे निरीक्षणही, विलक्षण सूक्ष्म आहे. त्याचे ही प्रतिबिंब या संतचरित्रगंगेत पडलेले आहे. मुळात श्रीमहाराजांची भाषाशैलीही, प्राचीन संतकाव्याने पूर्ण संस्कारित झालेली आणि भाव-सुगंधितही झालेली आहे. त्यांच्या या प्रासादिक संतचरित्रग्रंथांना मुळात, मोठे ऐतिहासिक महत्त्व आहे. ऐतिहासिक मूल्य आहे. कारण श्रीमहाराजांनी त्या काळात, उपलब्ध झालेले सर्व पुरावे एकत्र करून, तसेच तत्कालीन वयोवृद्ध व्यक्तींशी चर्चा करून - मग ही संतचरित्रे, शब्दबद्ध केलेली आहेत. ही गोष्ट सर्वथा महत्त्वाची आहे.

श्री महाराज-विरचित, संतचरित्रग्रंथमयी म्हणजे 'संतांचे विशाल महाकाव्य' आहे, असे सांगून सौ. वसुधा परांजपे म्हणतात - ('ज्ञानेश्वर' - त्रैमासिक, श्रीसंत दासगणु महाराज विशेषांक, नोव्हेंबर, २००८ मधील लेख) - भक्तिलीलामृत, संतकथामृत आणि भक्तिसारामृत - या तिन्ही ग्रंथात महाराजांनी महिपतीनंतरच्या काळात झालेल्या १४७ संत-सत्पुरुषांची चरित्रे, गुंफलेली आहेत. ओवीबद्ध केलेली आहेत. ज्या संतांचे चरित्र-लेखन करायचे - त्याचे गाव, तेथील त्याचे कार्य आणि ग्रंथसंपदा, स्थल-कालादि माहिती, लोकानुभूती इत्यादी माहिती, महाराज गोळा करीत. स्वत: तेथे जात. त्या त्या संतांच्या संतत्वाचा पडताळाही ते पारखून घेत आणि मग चरित्र-लेखन करीत. त्यामुळे त्यांच्या लेखनाला ऐतिहासिक मूल्य प्राप्त झाले आहे.

संतचरित्रांचे गाढे अभ्यासक कै. ज. र. आजगावकरही दासगणुंच्या संशोधनपूर्ण संदर्भांचा उपयोग, आपल्या ग्रंथांत करतात. श्रीदासगणुंच्या या ग्रंथांमध्ये संतांचे चमत्कारही वर्णिलेले आहेत. पण त्यातील नेमकेपणा लक्षणीय आहे. म्हणून हैद्राबादचे प्रसिद्ध अभ्यासक, प्रा. चिं. नी. जोशी म्हणतात – 'ही चरित्रे केवळ चमत्कार – पुराणे नसून त्यांना ऐतिहासिक मूल्य प्राप्त झालेले आहे.'

'श्रवण केलिया संतचरित्रे। निसरन होतील अवघी दुरिते।' असा हेतू सांगून, श्रीमहाराज पुढे म्हणतात – 'संतचरित्रेजगतासि। मार्ग नीतीचा दावितात।।' महाराजांनी ही सारी चरित्रे, श्री साईनाथांच्या आज्ञेने लिहिली.

ही सारी संतचरित्रे म्हणजे भगवद्भक्ति – भावगंगा आहेत. अखेर भगवद्भक्तीची व्याख्या कोणती? प्रख्यात संस्कृत काव्यमर्मज्ञ आणि भक्तश्रेष्ठ श्रीमधुसूदन-सरस्वती, त्यांच्या 'श्रीभगवद् भक्तिरसायन' या ग्रंथात म्हणतात,

**''नवरसमीलितं वा केवळं वा पुमर्थं।**
**परममिह मुकुन्दे भक्तियोगं वदन्ति।**
**निरूपमसुखसंविद् रूपमस्पृष्टदु:खं।**
**तमहमखिलंतुष्ट्यै शास्त्रदृष्ट्या व्यनाज्मि।।''** (उल्लास १-१)

(सकलसत्ताधीश परमेश्वराविषयीच्या भक्तियोगाला, नवरसमिश्रित किंवा स्वतंत्र 'रस' रूप असा, परमपुरुषार्थ म्हणतात. तो अनुपम सुखाची प्राप्ती करून देतो आणि दु:ख त्याला स्पर्शही करू शकत नाही. त्या भक्तियोगाचे मी सर्वांना संतुष्ट करण्यासाठी, शास्त्रीय दृष्टीने विवेचन करीत आहे.)

श्रीदासगणु महाराजही म्हणत – भगवद्भक्ताने पूर्णपणे आत्मानुसंधान राखून, ईश्वरसेवा करावी. नवविधा भक्ती करावी. भक्ताने आपले हृदय सहस्रदलकमलाप्रमाणे विकसित करून, श्रीभगवंताच्या चरणकमलावर समर्पित करावे. तेच आपले परमध्येय असले पाहिजे. अहो, खरी भक्ती प्राप्त झाली तर, भक्ताचे हृदय हे, ईश्वरी ज्ञानाने संजीवक बनते. ईश्वरी प्रेमाने सुकोमल बनते. कारण भक्ती म्हणजे शेवटी 'सा परानुसक्तिरीश्वरे'च असते. भक्तीही 'परमप्रेमरूपा' आणि 'अमृतस्वरूपा' असते – असे श्रीमहाराज सांगत असत.

### 'भक्तिसारामृताचे' प्रयोजन आणि स्वरूप

'श्री भक्तिसारामृत' हा काव्यग्रंथ म्हणजे संतकवी दासगणु महाराज : समग्र वाङ्मयाचा सातवा खंड आहे. याचे संपादक प्राचार्य अ. दा. आठवले (पूजनीय स्वामी वरदानंद भारती) हे आहेत. हा ग्रंथ श्रीदासगणु प्रतिष्ठान, गोरटे, उमरी मार्गे, जिल्हा नांदेड (मराठवाडा) यांनी प्रकाशित केला असून, तो श्री तुकाराम बीज, शके १९२५ ला (इ.स. २००३ ला) प्रसिद्ध झाला आहे. याची पोथी आकाराची पृष्ठसंख्या ६५२ असून, या प्रकाशित ग्रंथ-प्रतीचे मूल्य रु. १५० आहे.

अशा या 'भक्तिसारामृत' ग्रंथाचा गौरव, पू. स्वामी वरदानंदानी केला आहे. ते म्हणतात – आपल्या वाङ्मयपरंपरेचे जे प्रयोजन संतांनी डोळ्यांसमोर ठेवले होते, तोच हेतू श्री महाराजांच्या समोर होता. त्यातही हा ग्रंथ म्हणजे खरोखर 'काव्यमालेतील कौस्तुभ' आहे. भक्तिसारामृत हा ग्रंथ, श्रीदासगणु महाराजांच्या काव्यग्रंथामध्ये, गौरीशंकराप्रमाणे शोभून दिसणारा, अलौकिक ग्रंथ आहे. श्रीदासगणु महाराजांच्या वाङ्मयाचे सर्व वैशिष्ट्य या ग्रंथामध्ये, आपल्या पूर्ण गुणांनी तळपत आहे. हा एकच ग्रंथ जरी श्रीदासगणु महाराज लिहिते, तरी त्यांची श्रेष्ठ संतकवी अशी कीर्ती झाली असती. या ग्रंथाची भाषा अत्यंत सरळ, सोपी व प्रसादपूर्ण आहे. श्री दासगणु महाराज हे परिणतप्रज्ञ झाले आहेत, असे या ग्रंथवाचनाच्या प्रसंगी, पदोपदी प्रत्ययास येते.

पू. स्वामीजी पुढे लिहितात – श्रीदासगणु महाराजांच्या चार चरणी ओव्यांमुळे, एक वेगळीच तालबद्धता, त्यांच्या काव्याला आली आहे. त्यातही या भक्तिसारामृतातील ओव्यांची रचना विशेष डौलदार असल्यामुळे त्यातील लय, अधिकच मोहक झाली आहे. महाराजांच्या समन्वयवादी तत्त्वज्ञानाचाही प्रकर्ष, या ग्रंथात आढळून येतो. सामाजिक नीतिबोधातील वैशिष्ट्य आणि राष्ट्रीय विचारातील समतोलपणा, या ग्रंथात फारच चांगल्या रीतीने व्यक्त झाला आहे. श्रीदासगणु महाराजांच्या उपमारूपकांनी सुद्धा, 'आगळीच रसनव्हाळी' या ग्रंथात प्रकट केली आहे. मनोहर निसर्गवर्णने, चटकदार शब्दचित्रे, मार्मिक सुभाषिते, मनोरंजक म्हणी, अर्थबोधक वाक्प्रचार इत्यादी काव्याला पोषक होणाऱ्या गोष्टींची यात अगदी रेलचेल आहे. त्यामुळे श्रीदासगणु महाराजांच्या काव्यमालेतील हा ग्रंथ म्हणजे जणु कौस्तुभ आहे.

अशा या 'भक्तिसारामृत' ग्रंथाच्या प्रस्तावनेत डॉ. ग. प्र. परांजपे म्हणतात – श्रीदासगणुंची संतांच्या जीवन-प्रसंगांवर आधारलेली, रसाळ कीर्तनाख्याने जशी लोकप्रिय झाली, तशीच त्यांची, संत-सत्पुरुषांची विविध चरित्रेही, लोकप्रिय झाली आहेत. ही चरित्रे लिहिताना, अनेकविध विषयांना स्पर्श करीत, श्रीदासगणुंची लेखणी प्रवाहित झालेली दिसते. समाजाचा उद्धार व्हावा ही त्यांची आंतरिक तळमळ, सुस्पष्टपणे त्यांच्या वाङ्मयातून दिसते. त्यांच्या सर्वच ग्रंथांना प्रसादगुण व्यापून राहिलेला आहे. अनेक ठिकाणचे त्यांचे ऐतिहासिक संदर्भ पाहून त्यांची बहुश्रुतता जाणवते. कारण आजच्या सारख्या संदर्भग्रंथांची सोय त्याकाळी उपलब्ध नव्हती. श्रीदासगणुंची व्यक्तिचित्रणे, निरीक्षणे देखील वरच्या दर्जाची आहेत. आपल्या सर्वच लेखनामध्ये ते कर्म-भक्ती-ज्ञानाचा, उचित समन्वय ठिकठिकाणी मांडतात. परमेश्वराच्या प्राप्तीसाठी, ज्या अनेक मार्गांचा उल्लेख केला जातो, त्यात ते भक्तीचाच पुरस्कार करतात आणि त्याच माध्यमातून ते उत्तम प्रकारे समन्वय करतात. म्हणून समन्वयात्मकता हाच त्यांच्या वाङ्मयाचा प्राण आहे.

### संत सत्पुरुषांची मांदियाळी

अशा या 'भक्तिसारामृत' ग्रंथाचे नेमके मर्म कळण्यासाठी म. म. दत्तो वामन पोतदार यांनी प्रकट केलेला अभिप्राय, अत्यंत उपयुक्त ठरणार आहे. या ग्रंथाच्या संबंधी ते लिहितात – श्रीदासगणुमहाराज हे संतकवी आहेतच, पण महिपतीनंतर एकमेव संतचरित्रकार आहेत. महिपतींच्या नंतरच्या काळी, जे संतमहंत होऊन गेले किंवा दासगणुंच्या

काळी हयात होते, त्यांची चरित्रे लिहावी, हा दासगणुंचा मुख्य छंद होता. त्यासाठी त्यांनी खूप परिभ्रमण केले, सर्व स्थळे पाहिली, त्यांच्या भक्तांकडून विश्वसनीय वाटणारी माहिती गोळा केली आणि नंतर आपल्या काव्यप्रतिभेने ती खुलवून त्यांच्या चरित्रांतील मर्म, स्वतःच्या अपूर्व कौशल्याने आविष्कृत केले.

प्रा. पोतदार असेही सांगतात – श्री दासगणुंची संतचरित्र-लेखनाची ही कामगिरी इतकी अपूर्व आहे की, गेल्या शतकातील संतांची चरित्रे समजण्यास एवढे विस्तृत आणि एकच असे दुसरे साधन नाही. महाराष्ट्राच्या इतिहासकारालाही श्रीदासगणुंचे हे चरित्र-ग्रंथ साहाय्यभूत झाल्याविना राहणार नाहीत. श्रीदासगणु महाराजांनी आपली मन आणि वाणी, सर्व संतसेवेला आणि परमार्थाला वाहिली. ही संतसेवा किती भरदार झाली आहे, त्याचा पुरावा, या संतकवीचा काव्यसागरच प्रत्यक्ष देतो आहे.

इथे एक महत्त्वाचा ऐतिहासिक प्रसंग आठवतो. श्री दासगणु महाराजांनी ही त्रिकांडात्मक संत-चरित्रे, कधी लिहिली? कशी लिहिली? तर एक दिवस श्री साईबाबा महाराजांना म्हणाले, ''गणू! सगळ्या संतांना बोलव. एवढे कर बरं का गणू! तुझे लई कल्याण होईल.'' ही आज्ञा महाराजांना शिरसावंद्य झाली. श्रीगुरुंच्या आज्ञेने त्यांनी संतचरित्रे लिहिण्यास प्रारंभ केला. आपल्या महाराष्ट्रात पूर्वीच्या संतसाधूंनी जे समन्वयाचे रोपटे लावले, त्यालाच श्री दासगणुंनी आपल्या प्रतिभेचे जल अर्पण करून त्याचा मोठा, फुलाफळांनी नटलेला, भरदार, डौलदार वृक्ष बनविला. या सन्मवयशील वृत्तीमुळेच महाराजांनी सर्व – म्हणजे शैव, वैष्णव, वारकरी समर्थसंप्रदायी, देवीभक्त, गाणपत्य – अशा सर्व सर्व संतांची चरित्रे गायिलेली आहेत. महाराजांची ही समन्वयवादी वृत्ती त्यांनी गायिलेल्या एक श्लोकानुवादात अप्रतिमरीत्या प्रकट झाली आहे.

**''शैवा जो शिव, वैष्णवां हरि गमे, वेदान्तियां ब्रह्म जो।**
**बौद्धां बुद्धहि जो, खुदाहि यवनां, अर्हत् जैनांस जो।**
**कर्ता जो हि गमे प्रमाणपटुंना जे कर्म मीमांसकां।**
**ख्रिस्त्यां येशूहि तोच हा गणू म्हणे घ्या रुक्मिणी नायका।।''**

अशा या समन्वयशील महाराजांनी रचिलेल्या 'भक्तिसारामृत' या ग्रंथात कोणकोणत्या अर्वाचीन संतांची चरित्रे आली आहेत? तर श्री गोपाळनाथ (परुळ), श्री हरिबुवा (पारनेर), श्री चिदानंद स्वामी (अजागांव-कोकण), श्री दादा आवणेकर (औरंगाबाद), श्री देवनाथ तसेच श्री सोहिरोबा (सावंतवाडी), श्री बापू किणी (शिरोळे), श्री गुंडा महाराज (देगलूर), श्री रमावल्लभदास (राष्टे-रास) श्रीनंद पऱ्या (अडनूर), श्रीकृष्णा महाराज (बोरी), श्री शुभराय महाराज (सोलापूर), श्री सदानंद, सद्रोद्दीन (पिंपरी), श्री विमलानंद (कोकण), श्री भैरव अवधूत (विटे), श्री गोपाळ महाराज (शेलू), श्री नगाजीबुवा (पारडी) या संत-सत्पुरुषांची चरित्रे, अध्याय दोन ते अध्याय सत्तावीसमध्ये आली आहेत.

त्यापुढच्या संतांच्या मांदियाळीत – श्री एकाराम साधू (खानदेश), श्री हंसराज स्वामी (परांडा), श्री घाडगे बुवा (कोळे-सातारा), श्री बाबा उपसकर (केरी-कोकण), श्री संतनाथ (वैराग), श्री साखरभट (तेलंगण), श्री भास्करानंद स्वामी (मैथिलापूर), श्री गोविंद (पोटोदे), श्री तैलंगधर (विजयनगर), श्री दत्त महाराज (रावेर), याचप्रमाणे श्रीनाग महाराज तसेच श्री यशवंत महाराज (जालनापूर), श्री संतराम महाराज (सांगोले), श्री बाबा भारती (बंगाल) यांची चरित्रे श्री दासगणु महाराजांनी, अध्याय अठ्ठावीस ते अध्याय सेहेचाळीस मध्ये गायिली आहेत. श्री स्वामी विवेकानंदांचे चरित्र, अध्याय सत्तेचाळीसमध्ये तर श्री साईनाथ महाराज (शिर्डी) यांचे चरित्र, अध्याय बाबन्न-त्रैपन्नमध्ये श्री महाराजांनी गायिले आहे. श्री. गोंदवलेकर महाराजांचे चरित्र अध्याय एकसष्टमध्ये आले आहे. त्याच अध्यायात गुलाबराव महाराजांचे चरित्र अवतरले आहे.

याशिवाय श्रीशीलनाथ (धारवाड), श्रीमाधवपंत (आजेगाव), श्री यदुबाबा गोखले (सातारा), श्री स्वामी रामतीर्थ (पंजाब), श्री रघुनाथ महाराज (नाशिक), श्री नारायण महाराज (जालवण), श्री विश्वनाथ केशव (रत्नागिरी), श्री तपकिरी महाराज (पंढरपूर), श्री राम मारूती महाराज (कल्याण), श्रीरंगदास (मच्छली पट्टण), श्री बलभीम (साडे), श्री सुंदरा सती (वेंगुर्ले), श्री सिद्धारूढ (हुबळी), श्रीताजुद्दीन (नागपूर), श्री पादबाबा (मावळ) याच प्रमाणे श्री काका पुराणिक, श्री बळीराम महाराज – अशा संत-सत्पुरुषांची चरित्रकथा, श्रीमहाराजांनी अध्याय सत्तेचाळीस ते अध्याय बासष्ट पर्यंतच्या अध्यायातून मोठ्या रसाळपणे गायिलेल्या आहेत.

### आत्मोद्धार आणि लोकोद्धार

'श्री भक्तिसारामृत' ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात, 'नमन' अध्यायात श्री संत दासगणु महाराज म्हणतात – 'हे पांडुरंगा मनमोहना, हे भीमातटनिवासी नारायणा, हे पुंडलिकवरदा दयाघना, तू माझ्यावर कृपा कर. तू महा उदार आहेस, अशी तुझी कीर्ती मी ऐकली आहे. मग या दासगणुलाही कृपाप्रसाद दे. त्याच्याबाबतीत पाठमोरा होऊ नकोस.' श्रीमहाराज पुढे म्हणतात – ''मागे तव कृपें ग्रंथ दोन। देवा, म्या केलें लेखन। ज्या ग्रंथांत व्याख्यान। अवघें भक्तचरित्रांचे।। (अ. १ – ओवी क्र. ५०) तैसाच हा ग्रंथ तिसरा। मी आरंभिला रुक्मिणीवरा। यासी अवघेच आपण करा। साह्य देऊन दयाळा ।। (ओ.क्र. ५१) ... ग्रंथाचे ग्रंथकर्तृत्व। मजकडे नाही किंचित्। लिहिता लिहविता पंढरीनाथा। स्फूर्तिदाता तूंच कीं। (मो. क्र. ५३) याच अध्यायात महाराजांनी, श्रीसाईनाथांना वंदन केले आहे. ते म्हणतात – ''हे शिर्डिग्राम – निवासिया। साईनाथा महासदया। मी अनन्य तुझ्या पायां। साह्य माते करावें।। (ओ. क्र. ८२) मी दुर्बल अजाण अज्ञान। केवीं करूं ग्रंथलेखन। दर्दुरानें पंचानन। व्हावें तरी कवण्या रीतीं।। (ओ. कृ. ८३) यासाठी आपणाला। मी हा पदर पसरिला। साई समर्था दासगणुला। कृपाकटाक्षे अवलोका।। (ओ. ८६)

याचप्रमाणे या 'नमन' अध्यायात, श्री महाराजांनी संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांना, विनम्रभावे वंदन केले आहे. श्री तुकारामांनी संत-चरित्र-

लेखनासाठी जशी महिपतींना प्रेरणा दिली आणि सामर्थ्यही दिले. तसे ते त्यांनी मज पामरालाही द्यावे, अशी श्रीदासगणुंची विनंती आहे. ते भक्तिभावमंडित शब्दकलेत म्हणतात - ''नमो गुरुराज देहूकर। संतमालेचा कोहिनूर। श्रीतुकाराम पाखर। करो मजवरी कृपेची ।। (ओ.क्र. ७८) मागे कविराज महिपतीसी। लाविलें संतचरित्र लिहिण्याची। तैसेंच महाराजा करा मर्शी। येऊनियां हो तुकोबा।। (क्र. ७९) मी तुम्हां उभयतांचा थाट। मार्ग दावा मला नीट। मी बुडतों कपाट। लावूं नका बैसूनी।। (क्र. ८०) तसेच 'वक्ता तो वक्ता नोहें। श्रोतेनिविण।' आणि 'श्रोते म्हणजे श्री महेशाची मूर्ती।' याच श्री ज्ञानदेवकथित विनम्र भूमिकेतून, 'नमन' अध्यायाच्या अखेरी श्री महाराजही विनंती करतात - ''आता वंदीन श्रोते वक्ते। तैसे या ग्रंथा अवलोकिते। बाप हो माझ्या दुर्गुणांते। पाहू नका एतुलेंही। (ओ. क्र. १११) हंसक्षीर न्यायाने। या ग्रंथासी पाहणें। दासगणु मी तुमचें तान्हें। माला परतें लोटूं नका।।'' (ओ. क्र. ११४)

खरोखरच संतचरित्रगंगा ही, आत्मोद्धाराइतकीच लोकोद्धार करणारी आहे, ही दासगणु महाराजांची दृढ श्रद्धा आहे. याच भूमिकेतून 'श्रीभक्तिसारामृता'तील अनेक अध्यायांच्या अखेरी, नेमक्या शब्दांत महाराज म्हणतात - 'स्वस्ति श्री भक्तिसारामृत। तारक होवो भवाब्धींत। दासगणुचा धरून हात। नेवो पैलतटासी।।' (अ. २, ओ. २१२) 'स्वस्ति श्री भक्तिसारामृत। पठण करा हो भाविक भक्त। हेंचि विनवी जोडूनि हात। तुम्हांलागी दासगणु।।'' (अ. ४, ओ. १४३) ''हीच भिक्षा घाला मला। भावें परिसा संत-लीला। तेणें आनंद विठ्ठलाला। होईल म्हणे दासगणु।।'' (अ. ७, ओ. १९६)।। मनींची चिंता करा हरण। आनंदी ठेवा माझें मन । सत्कृपेनें अवलोकन। करा सर्वदा गणूसी।।'' (अ. १०, ओ. २६९) दासगणु महाराज असेही सांगतात - ''स्वस्ति श्रीभक्तिसारामृत। हा ग्रंथ नव्हे, पात्र सत्य। त्यांत संतचरित्रे पंचामृत। वाढितो सेवा दासगणु।।'' (अ. ११ ओ. १९९) तसेच महाराज म्हणतात - ''स्वस्ति श्री भक्तिसारामृत। केवळ वृक्ष पारिजात। तयाचें हें हंसराजचरित। कुसुम म्हणे दासगणु।।'' (अ. २९, ओ. १५९) ''स्वस्ति श्री भक्तिसारामृत। महाराष्ट्र भाषेचा असे ग्रंथ। तो लिहविता झाला पंढरीनाथ। धरूनि गणूचे करासी।।'' (अ. ३९, ओ. ३३९) किंवा महाराज सांगतात - ''आले परतून निजदेशी। विवेकानंद पुण्यराशि। त्या ज्ञानसिंहासी। किती वानूं एक्या मुखे।।'' (अ. ४७, ओ. १२६)'' त्यांना माझा नमस्कार (असो हा की वारंवार। संत साक्षात् परमेश्वर। मनुजवेष-धारिते।।'' (ओ. १२८) याचप्रमाणे ''स्वस्ति श्रीभक्तिसारामृत। ऐका तुम्ही श्रोते समस्त। संतचरित्र साक्षात्। धडा नीतीचा म्हणे गणू।। (अ. ५२, ओ. २०७) किंवा ''स्वस्ति श्रीभक्तिसारामृत। नीतिदर्शक होवो खचित। अवघ्या मम देशबंधूप्रत। हेंच विनवी दासगणु।।'' (अ. ५९, ओ. २२९)

**भक्ति-सार हेच अमृत :**

श्रीसंत दासगणु महाराजांनी, भक्तिसारामृताच्या अखेरी, समारोपाच्या अध्यायात, म्हणजे अध्याय त्रेसष्ट या कळसाध्यायात, मूळ ग्रंथातील सर्व संतचरित्रांचे मर्म, नेमके मर्म, फारच सुंदर शब्दांत सांगितले आहे. प्रारंभी ते म्हणतात - जेथे संतचरित्रे आहेत तेथे भगवंत आहेच, असे आम्हाला महिपती - नाभाजी यांनी सांगितले आहे. कारण संतचरित्रे हीच पंढरी आहे. तेथे संतांच्या स्वानुभवाची, साजिरी चंद्रभागा खळखळा वाहत असते. तिथले भक्ति-भाव-प्रेम म्हणजेच पुंडलिक आणि पुरुषोत्तम होत. संतांची निष्ठा हीच पंढरीरायासाठी वीट आहे. अशी ही अभिनव पंढरी आणि तिथला कनवाळू पंढरीश आहे - असा सुंदर प्रस्ताव करून पुढे दासगणु महाराजांनी, भक्तिसारामृत ग्रंथातील सर्व संतांच्या चरित्रांचे मर्म, एक-दोन ओव्यांत किंवा चरणांत 'शिंपल्यात समुद्र' या न्यायाने सांगितले आहे.

उदाहरणार्थ महाराज म्हणतात - 'द्वितीय तृतीयाध्याची। गोपाळनाथ कथा पाही। ज्यांनी बोधत्याच्या पायीं। तनमन आपुले अर्पिले।।' अध्याय तोचि चतुर्थ व्हावा। हरिबुवाचा असे बरवा। ज्यांनी आळविले केशवा। नवीन कवित्व रचून।।' 'चरित्र दशमाध्यायांत। वर्णिले संत देवनाथ। जयांना आळंदी क्षेत्रात। साक्षात् ज्ञानोबा भेटले।।' 'एकादश अध्यायाशीं। वर्णिले सोहिरोबा पुण्यराशी। ज्यांना उज्जैन क्षेत्राशीं। महादजी शिंदे शरण आले।।' 'सतरा अठरात बहु सुंदर। कथा वर्णिली नंद अमर। ज्यांनी पिनाकी शंकर। निजभक्तीने वश केला।।' 'बाविसामांजी आहे कथन। सुब्राव महाराज चरित्र गहन। ज्याने टिपू सुलतानाकार। निर्भिड जबाब दिधला।।' 'सदानंद सद्रोदीनाची। कथा तेविसामध्ये साची। ज्यांच्या कृपेनें जव्हाराची। गादी मिळाली कोळ्याला।।'

याचप्रमाणे 'चरित्र उदात्त विचाराचे। टीकाराम साधूचे। अठ्ठाविसी एकोणतिसी साचें। वर्णन केले विबुधहो।।' 'बाबा उपस्कर तेहतिसात। चौतिसामध्यें संत नाथ। जे राहिले वैरागांत। विठ्ठलाच्या आज्ञेने।।'

अशाच सूत्रमयी, मार्मिक, शब्दकलेत श्री महाराज सांगतात - 'अध्याय एक्केचाळीस बेचाळीस। नागमहाशय पुण्यपुरुष। ज्यांकारणे सदनास। जान्हवी गंगा प्रकटली।।' याचप्रमाणे 'पन्नाशीं संभाजी वर्णिले। एकावन्नीं बाबा गोखले। बावन्न त्रैपन्नांत गाइलें। श्रीसाईनाथ बाबांना।' किंवा 'तपकिरी महाराज राममारुती। गुलाबराव, गोंदवलेकर सन्मति। रंगदास बलभीम सुंदरा सती। एकसष्टांत सांगितले।।' याच समारोपाच्या अध्यायात, श्री महाराज सुस्पष्टपणे इशारा देतात की, 'श्रोते या विरहित। या अखिल महाराष्ट्रात। कोणी न राहिला संत। साक्षात्कारी सिद्ध योगी।' म्हणून आपण सर्वांनी तथाकथित नामधारी साधूंपासून परमार्थाचा बाजार भरविणाऱ्या संधीसाधूंपासून सावधच राहिले पाहिजे. महाराज म्हणतात - 'काही धूर्त पोटभरू। होऊन बनले गुरू। परि ते प्रत्यक्ष अनीतितरू। मी स्वानुभवें सांगतो।।' हे फार महत्त्वाचे आहे.

पुढे महाराज खऱ्या संतांची आणि खऱ्या संतत्वाची अचूक व्याख्याच सांगतात - जी सर्वथा उद्‌बोधक आणि निरंतर मार्गदर्शक आहे. ते म्हणतात - ''सिद्ध तोचि महंत। सिद्ध तोचि संत। सिद्धाप्रतीच शोभत। साधू नाव विबुध हो।। (ओवी क्र. ८६) सच्चिदानंद पदांशीं। संत सेविती अहर्निशीं। तादात्म्य पावती ईशासीं। फडशा पाडून

मायेचा।। शाब्दे परे च निष्णात। या लोकीं एक संत। संत असून जीवन्मुक्त। लोकस्थितीने वर्तती।। संत वैराग्य न सोडिती। संत लोकव्यवहारें वर्तती। कर्मभक्तीला चालविती। विमल ज्ञाना सेवून।। असो त्या अखिल संतांसी। नमन माझें साष्टांगेसी। वा कालावधीने होणारांसी। नमन माझें हे असो।।'' (ओवी क्र. ८७ ते ९०) अशी महाराजांची विनम्र भूमिका आहे.

**उज्ज्वल उद्यासाठी :**

श्री दासगणु महाराजांच्या या 'भक्तिसारामृत' ग्रंथात, भगवद्भक्तीच्या सहजसुंदर दर्शनाबरोबरच, सामाजिक स्थितीगतीचेही उत्तम दर्शन घडते. आणि त्याचबरोबर सद्य:स्थितीत आपण कसे वागावे? जातीपातीविरहित एकजूट कशी टिकवावी? भारतवर्षाच्या प्रगतीसाठी कोणते उपाय योजावेत? प्रत्येकाने स्वकर्तव्यकर्म आणि स्वकर्तव्यधर्म, कशा प्रकारे, कोणत्या मार्गाने – सफल – संपूर्ण करावेत? या साऱ्या गोष्टींचेही अचूक मार्गदर्शन इथे मिळते. 'श्रीभक्तिसारामृत' ग्रंथाचे हे 'समाजशक्तिवर्धना'चेही बलस्थान, फार महत्त्वाचे आहे. यातूनच आपणा सर्वांना 'उज्ज्वल उद्यासाठी' नेमके, अचूक आणि सर्वतोपरि प्रेरणादायी उद्बोधन प्रभावी प्रबोधन लाभते.

उदाहरणार्थ श्री महाराज म्हणतात – माझी सर्व श्रोतृवंदाला विनंती आहे की संतचरित्रे म्हणजे अमृतमधुर इक्षुदंड आहे. ऊस आहे. याचे सेवन करून, इहपरलोकी सुख मिळवा. ज्याप्रमाणे ऊसापासून गूळ ही मिळतो, आणि साखरही मिळते – तसाच हा प्रकार आहे. मात्र लक्षात ठेवा की – संतचरित्रे म्हणजे कादंबरी नव्हे करमणुकीच्या गोष्टी नव्हेत. तर कल्याणपेठेकडे जाताना, प्रवासात उपयोगी पडणारी ही शिदोरी आहे. यासाठी या संतचरित्रांचा नित्य आणि नीट उपयोग करा आणि आपल्या जीवनयात्रेचा पंथ सुगम करा. संतचरित्रांनुसार आपले वर्णन करा. कधीही अहंकाराला वश होऊ नका. तसेच आपल्या देशाची सद्य:स्थिती समजून घ्या. आपल्या देशाच्या उद्धारासाठी प्रयत्न करा. असे महाराज सांगतात.

श्री महाराजांनी 'भक्तिसारामृत' हा ग्रंथ शके अठराशे सत्तेचाळीस म्हणजे इ.स. १९२५ मध्ये लिहिलेला आहे. त्यामुळे तत्कालीन स्थितीगती वर्णिताना ते म्हणतात – ''ऐशा सर्वांगसुंदर देशाचें। आज मातेरें झाले याचें। जो देश गुलामांचे। भांडार बनला विवुध हो।। (ओवी क्र. १५४) राष्ट्राशीं जातिमत्सर। हाच क्षयरोग साचार। तो एकदां झाल्यावर। एकी शक्ती कोठून राही।।'' म्हणून वेळ करू नका। द्वेषी मनें बनवू नका। स्वधर्मातें टाकू नका। विवेक जागृत ठेवूनिया।।'' ''देहाच्या अवयवांपरि। वर्ण समजा अंतरी। प्रेम ठेवा परस्परीं। म्हणजे कल्याण होईल।।'' या सर्व गोष्टींचे शिक्षण। एका संतचरित्रापासून। मिळणार आहे तुम्हांलागून। म्हणून तें परियेसा।।'' (ओवी १६० क्र. १६२, १६४, १६५) असा हा महाराजांचा, सर्वांसाठी आणि सर्वकाळासाठी अमोलिक उपदेश आहे.

यासाठीच 'भक्तिसारामृत' ग्रंथासंबंधी पू. स्वामी वरदानंद भारती म्हणतात – मराठी संतवाङ्मय परंपरेचे दासगणु महाराज, खरे उत्तराधिकारी आहेत. संतांनी जे प्रयोजन डोळ्यांसमोर ठेवले, तेच महाराजांच्याही समोर आहे. म्हणूनच या ग्रंथात त्यांनी समाजातील चालीरीतींचे आणि विचारप्रवाहांचे सूक्ष्म निरीक्षण करून, त्यांवर योग्य ती टीकाही केली आहे. परवशता ही तर त्यांना एखाद्या शल्याप्रमाणे बोचते आहे. निष्ठावंत देशभक्ताइतकीच स्वातंत्र्याची ओढ, त्यांच्याही जीवाला लागली आहे. आपसांतील भांडण त्यांच्या जिव्हारी लागले आहे. दलितवर्गाविषयी त्यांना कळवळा आहे. समाजाच्या उद्धारासाठी दासगणु महाराजांनी, द्रष्टेपणाने अनेक उपायही सांगितले आहेत. ते सारे अत्यंत लक्षात घेतले पाहिजेत.

अशा या भक्तिसारामृत ग्रंथाच्या अखेरी श्री महाराजांनी भगवंताकडे पसायदान मागितले आहे की – ''कोणा याचना करण्याचा। प्रसंग मशीं न आणी साचा। अभिमान दासगणुचा। तूंच वाही पांडुरंगे।। परावरी उपकार। मम करें होवो निरंतर। प्रीति नामस्मरणावर। राहो अखंड तुझिया।। मी ज्या ज्या संताचे। वर्णन कवनीं केले साचें त्यांनी त्यांनी सत्कृपेचे। दान करावे मजलागी।।'' श्री महाराजांनी मागितलेले हे पसायदान म्हणजे 'भक्तिसारामृत' ग्रंथाचे अमृतमधुर सार आहे आणि तोच आपणाला लाभलेला, पुण्यपावन वारसा आहे.

**– प्रा. डॉ. मुकुंद दातार**

ग्रॅनाडा, अे-३०४, फोर्टालिझा कॉम्प्लेक्स,

गोल्ड ॲडलॅब्ज चौक, कल्याणीनगर, पुणे – ४११००६.

फोन : २६६०८८२३, ९८२२८७६०३८

***



# भक्तिलीलामृत 'भवसिंधूचे तारू...'

**सौ. मीरा श्रीकृष्ण शेंडगे**
शिक्षण - एम्.ए. इंग्लिश- बी.एड., नांदेड येथे यशवंत महाविद्यालयात इंग्लिशचे अध्यपन. वैचारिक प्रदूषणाचा प्रतिकार करण्यासाठी कीर्तने, प्रवचने, व्याख्याने, लेखनाचा नित्य स्वाध्याय. स्वामी वरदानंद भारती आणि दासगणु प्रतिष्ठान यांची सेवाकार्यासाठी प्रेरणा.

मनुष्याच्या अंतरंगात असलेल्या, ईश्वरीय अंशाच्या अस्तित्वाने, ईश्वरीकृपेची, स्वानंदाची त्याची ओढ आजही कायम आहे. ईश्वरीकृपेचे माध्यम व स्वानंदाचे दाते, केवळ संतच आहेत. ही खूणही त्याच्या अंतरी पटलेली आहे. म्हणूनच तो आजही विज्ञानयुगातही साधुसंतांच्या मागे धावतो. त्यांच्याकडे आसुसलेल्या नजरेने पाहतो. भक्तिमार्गाने जाणाऱ्या साधकाला संत 'दीपस्तंभच' आहेत. शिवाय 'संतचरणी ज्यांचा हेतू । त्यांचा ऋणी रुक्मिणीकांत ।' अशी ग्वाही संतांनीच दिल्याने, संत-चरित्रात्मक ग्रंथांचे मानवी-जीवनातील महत्त्व, आजही असाधारण आहे.

''संतांचिये गावी प्रेमाचा सुकाळ'' याचे 'तंतोतंत-प्रत्यंतर' आणून देणारा 'भक्तिलीलामृत' हा श्री दासगणु महाराजांचा पहिला ओवीबद्ध ग्रंथ. यांचे ४५ अध्याय असून, ओवी संख्या ५६९८ आहे. तुळशीदास दळवी हा लेखक झाला असून, सीता-बेदरी या स्त्रीला, हा सांगितला आहे. यात वेगवेगळ्या ३६ सत्पुरुषांची वर्णने आली असून, शेवटच्या अध्यायात काही सत्पुरुषांची नावे-गावे उल्लेखिलेली आहेत.

ग्रंथाच्या कळसाध्यायात या ग्रंथाची पूर्वपीठिका सांगताना, प्रत्यक्ष श्री साईनाथांनीच सूचकतेने हा आदेश आपणास दिल्याचे श्री दासगणु महाराज सांगतात. ग्रंथाची वर्णनपद्धती सामान्यत: पुढीलप्रमाणे आहे. ज्या संताचे वर्णन करावयाचे त्याचे स्थल, काल, आईवडील, बालपण, त्याची परमार्थाकडची ओढ, गुरूसेवा व प्रसाद, त्याची सिद्धावस्था, त्याच्या जीवनात घडून आलेले चमत्कार सांगितले आहेत. ते सांगत असताना, ज्या ज्या व्यक्तींचा त्या सत्पुरुषाशी संबंध आला असेल, त्या त्या व्यक्तीस, त्या संताचे मुखातून 'समयानुरोधाने' अध्यात्मविचार, सगुणभक्ती, धर्म, नीति, सामाजिक नीतिनियम, भूतदया, संयम, समन्वयाची बुद्धी इत्यादींचे ज्ञान देऊन त्यांची मने, मते, वर्तन घडवून त्यांना सन्मार्गी लावल्याचे वर्णिले आहे.

या गोष्टींचे प्रतिपादन करीत असताना, त्यात 'रसाळपणा आणण्यासाठी पर्वत, नद्या, ऋतू, दिनरजनी, वने इत्यादी निसर्गदृश्यांची वर्णने केली आहेत. भक्ती, करुण, शांत यांपैकी प्रकरणाला अनुकूल अशा रसांचा आविष्कार करून त्यात रसमयता आणली आहे. शेवटी त्या सत्पुरुषाच्या समाधीचे वर्णन करुन, त्याच्या शिष्य परंपरेची व संप्रदायाची माहिती देऊन चरित्र पूर्ण केले आहे.

### ऐतिहासिक वास्तव...

श्री दासगणु महाराजांनी स्वत: ठिकठिकाणी जाऊन विश्वसनीय व्यक्तींशी चर्चा करून उपलब्ध कागदपत्रे वा ग्रंथ अवलोकून ही माहिती गोळा केली असल्याने या चरित्रांना ऐतिहासिक प्रतिष्ठा लाभली आहे. हैद्राबाद येथील विद्वान् प्राध्यापक कै. चिंतामणी नीळकंठ जोशी यांनी ''ही चरित्रे, केवळ चमत्कार- पुराणे झाली नसून, त्यास 'ऐतिहासिक मूल्यही' आहे. म्हणूनच संतवाङ्मय असूनही ती वाचनीय झाली आहेत.'' असे या काव्याचे केलेले समालोचन, त्यामुळेच यथार्थ वाटते.

### संतांचे माहात्म्य संतच जाणती...

या ग्रंथाचे प्रमुख वैशिष्ट्य म्हणजे यातील कथा एका 'थोर संतानेच वर्णिल्या' आहेत.

**''संतांचा महिमा संतच जाणती ।**
**दुर्लभ या गती आणिकांसी ।।''**

असे श्री तुकाराम महाराज म्हणतात. अशा 'संताने' वर्णिलेल्या 'संतकथा' मनावर 'परिणामकारक' ठसा उमटवितात पण त्याबरोबरच, मानवी जीवन घडविण्यासही, त्या अत्यंत उपयुक्त ठरतात.

### महाकाव्यस्वरूप रचना...

प्राचीन साहित्यशास्त्रकारांनी महाकाव्यासंबंधी सांगितलेले निकष या महाकाव्याला निश्चितच लागू पडतात. काव्याची प्रकरणसंख्या महाकाव्याला साजेल, अशी विशाल आहे. त्यातील सर्व व्यक्ती, प्रत्यक्ष होऊन गेल्या आहेत. त्यांची जात, स्थळ, काळ याबाबतीत विविधता असली तरी, त्या एकाच 'संत-कुळातील' आहेत.

**''असो ईश्वराचे भक्त निर्वाण । कोणत्याही जातीत पावोत जन्म ।**
**ते साक्षात होती नारायण । तेथे शंका घेणे नको ।।''**

असे स्वत: श्री दासगणु महाराज म्हणतात. महाकाव्यातील नियमाप्रमाणे निरनिराळी वर्णनेही त्यात आली आहेत. ग्रंथाचा आरंभ, 'विस्तृत नमनाने झाला आहे. प्रत्येक अध्यायाच्या आरंभीही 'मोठी-

भावपूर्ण नमनें' आहेत. दीर्घ महाकाव्याला शोभेल असा एकटा एक ओवी-छंदच, व्यास-वाल्मिकींच्या अनुष्टुभाप्रमाणे, सुटसुटीत म्हणून वापरला आहे.

ग्रंथाची भाषा अत्यंत सरळ, सोपी व रसाळ असल्याने हे काव्य अंत:करणाचा थेट ठाव घेते. इतर काव्यगुणांबरोबर भक्तिरसाला मिळालेल्या प्राधान्याने तो या ग्रंथाचा 'प्राण' ठरतो. प्रथमपासून शेवटपर्यंत या रसाचा एवढा वेगवान व अस्खलित प्रवाह जाणवतो की त्याच्या सेवनाने पाखांडीही धर्मपारायण होतील यात मुळीच शंका वाटत नाही. संतांचा आध्यात्मिक मोठेपणा पटवून देण्यावर कवीचा विशेष भर आहे.

**अध्यात्म चिंतन...**

वेदान्तातील तत्त्वचिंतनाचा विचार सुरू झाला की, श्री दासगणुंच्या प्रतिभेला 'अलौकिक स्फुरण चढते'. आकर्षक रसाळ भाषा व उपमादृष्टांतादि अलंकारांमुळे अध्यात्माचा गहन विचार वाचकांच्या लीलया पचनी पडतो.

३ऱ्या अध्यायात ईश्वराच्या सर्वव्यापकत्वाचा उपदेश करताना हरिनारायण आपल्या पत्नीस म्हणतात,

**जे दिसे ते नारायण । ऐसा भाव ठेवी समान ।**
**तरीच कांते सार्थक जाण । होईल या देहाचे ।। अ. ३/४६**

१३व्या अध्यायात श्री माणिकप्रभू पित्याच्या स्वर्गवासानंतर मातेला उपदेश करतात. त्यात श्री दासगणु महाराज आत्म्याचे अविनाशित्व -

**तुला वाटते गेला पती । परी न तो नष्ट झाला निश्चिती ।।**
**जगात अवघ्या एक ज्योती । ओतप्रोत भरली असे ।।**
**जैसे का घट रांजण । बोळकी चूल भेंडे जाण ।**
**पदार्थ जरी भिन्न भिन्न । परी मृत्तिका एकचि असे ।।**
**प्राण मुळीच नाशरहित । आहे पंचभूतातीत ।**
**तो ईश्वराचा अंश सत्य । नाही नाश तयाते ।।**

अ. १३/११२, १३,१५.

असे सहजतेने सांगतात.

१७व्या अध्यायातील झेंडूला गुजराला त्याचा पुत्र-

**मृत्युलोक हा साचार । अशाश्वत बाजार ।**
**शाश्वत एक परमेश्वर । सच्चिदानंद सावळा ।। अ. १७/६७**

या शब्दात ईश्वराचे अविनाशित्व सांगतो.

भक्तिमार्गाचे माहात्म्य १९व्या अध्यायात श्री दासगणु,

**तो ईश व्यापक उदार । सद्भक्तांचे माहेरघर ।**
**भक्तिमार्गेपरमेश्वर । वश होतो क्षणार्धे।। अ. १९/११६**

अशा शब्दात व्यक्त करतात तर गीतेतील 'वासांसि जीर्णानि यथा विहाय... या श्लोकातील गहन विचार -

**जैशी बंडी झालिया जीर्ण । लोक देतात फेकून ।**
**किंवा नावडे म्हणून । त्याग करिती तियेचा ।।**
**तैसे हे शरीर वसन । पांघरलासे बाळे प्राण ।**
**तो प्राण नारायण । अक्षय अभंग निर्विकल्प ।।**

अ. ३१/१५९, ६०

अशा रसाळ शब्दांनी मनोवेधक बनवितात.

या ग्रंथातील साईनाथ चरित्राचे ३१,३२,३३ हे तीन अध्याय म्हणजे या ग्रंथाचा मुकुटमणीच होय. श्री दासगणुंची गुरुभक्ती येथे 'अक्षरश: उचंबळून' येते. मानवी जीवन घडविण्यास उपयुक्त ठरतील अशा मौलिक विचारांचे भांडारच येथे उपलब्ध आहे. वाचकांनी त्याचा मुळातूनच आस्वाद घ्यावा. ३३व्या अध्यायाचे माहात्म्य वर्णन करताना श्री दासगणु महाराज म्हणतात,

**आज बाबांचे जमले भक्त । चांदोरकरादि हरिपंत ।**
**बाबांनी आपुल्या भक्ताप्रत । केली आहे मेजवानी ।**
**ज्ञान वैराग्य आणि भक्ती । हीच पक्वान्ने निश्चिती ।**
**करून आपल्या भक्तांप्रती । जेवा म्हणती यथेच्छ ।।**
**आपण उभयता कुत्र्यापरी । त्या समर्थाच्या राहू द्वारी ।**
**एखादा तो तुकडा तरी । फेकील आपणाकडे गे ।।**

अ. ३१/१२७,२८,३०

**प्रापंचिकांना बोध...**

विस्कटलेल्या धर्माची घडी, 'काळानुरूप' बसविण्यासाठी जे जे आवश्यक आहेत ते ते मार्ग वा उपाय संत प्रसंगानुरूप सांगतात. याच भूमिकेतून सामान्य प्रापंचिकासाठीसुद्धा या ग्रंथात उपदेश येतो. धर्माचे नेमके रूप, दया, उपकार, बंधुता, व्यवहारकौशल्य, प्रपंचाचे स्वरूप, संसारबंधन कसे अटळ आहे, प्रारब्धानुसार उत्तम, मध्यम, व नीच योनी कशी प्राप्त होते, व्यावहारिक सुखदु:खे का प्राप्त होतात, इत्यादींचे मार्गदर्शन संत करतात.

सर्वच संत निरपेक्ष आत्मीयतेने व जिव्हाळ्याने प्रापंचिकांना बोध करतात. नारायण, सर्वांच्या ठिकाणी आहे, पण हे अज्ञानामुळे आपणास कळत नाही. त्यासाठी उपाधींचा निरास करून, मन आत्म्यात लावावे हा संतांच्या बोधाचा 'मध्यवर्ती-गाभा' आहे. मानवी जीवनाचे मर्म-

**मुक्ति हेच खरे सुख । जन्ममरणफेरा हेचि दु:ख ।।**

अ. ३२/६४

असे कळकळीने सांगतात. तर प्रपंचात वागताना

**''जैसे आपण धर्मशाळेत । जातो क्षणैक रहाण्याप्रत ।''**

अशी भूमिका ठेवण्यास सांगतात.

**ऐसे प्रत्येकाने वागावे । कर्तव्य आपुले करावे ।**
**ते करीत असता ओळखावे । सच्चिदानंद ईश्वरा ।।**
**उत्तम-कार्य हाती घ्यावे । ते नाना प्रयत्ने शेवटास न्यावे ।**
**कीर्ति-रूप उरावे । मागे मरून गेल्यावर ।।**

अ. ३२/१०३, १०९.

असा कीर्तिरूपे अमर होण्याचा मंत्र सांगतात.

गीतेतील कर्मयोग

**कर्तव्य आपण करावे । कर्तृत्व ईश्वरा द्यावे ।**
**फलही त्यासीच समर्पावे । अलिप्त आपण राहावया ।।**

अ. ३२/१०७

असा सोपा करतात, तर सामान्य प्रापंचिकांना

**हरिनामाचा लोभ धरी । अनीतीविषयी क्रोध वरी ।**
**आशा मोक्षाची अंतरी । मोह वहावा परमार्थाचा ।।**

अ. ३३/४०

अशा शब्दांत अंतरंगातील षड्रिपूंना योग्य वळण लावण्यास सांगतात.

### सारे काही समाजासाठी, राष्ट्रासाठी...

भक्तिमार्गात व्यक्तीपेक्षा समाजाचे महत्त्व अधिक आहे. संतांनी द्वेष, मत्सर घालविला व सर्वांचे ऐक्य निर्माण केले. जातीजातीतील वैमनस्य घालवून परस्पर सलोख विश्वास परस्परांच्या धर्माबद्दल आदर, विश्वबंधुता या गोष्टी दृढमूल करण्याचा आटोकाट प्रयत्न, सर्व संतांनी केला असे त्यांच्या चरित्रांवरून दिसून येते. ४थ्या अध्यायात श्री देवनाथ सवाई माधवरावांना राजनीति सांगतात त्याचे कवि वर्णन करतात-

**एकी स्वराज्याची जीवनकळा । एकी स्वधर्माचा पुतळा ।**
**एकी व्यापाराचा मळा । आहे धनत्तर बागाईत ।।**
**स्वराज्याचा वृक्ष जाण । निर्माण एकीपासून ।**
**तो तू करावा फार जतन । हे सवाई माधवा ।।** अ.४/११३,११५

भक्ताच्या 'लीला' वर्णन करतानाही राष्ट्राभिमान, स्वराज्यप्रेम, स्वभाषाप्रेम या गोष्टी कवि विसरलेला नाही. इतकेच नव्हे तर-

**ग्रंथरचनेची महती । केवळ नसे शब्दापुरती ।**
**ज्या ग्रंथमनने राष्ट्रशक्ति । जागृत होते, तेच ग्रंथ ।।** अ.२/४६

असे म्हणून त्याचे समर्थन ते करतात.

### चमत्कारांच्या अनुभूती

चमत्कार हा संतचरित्राचा स्थायीभाव असल्याने, जवळपास सर्वच संतांच्या जीवनातील चमत्कारांच्या घटनांचे वर्णन ग्रंथात येते. काही निवडक घटना बघावयाच्या झाल्यास- देवनाथ यांनी, कीर्तनाचे वेळी एका स्त्रीचे मेलेले मूल उठविल्याचे वर्णन ५व्या अध्यायात येते. ६व्या अध्यायात राजारामांचा देह, इंधनाविना जळाल्याचे वर्णन येते. ७व्या अध्यायात चंडिरामांच्या प्रार्थनेने वादळ शमल्याचे वर्णन येते. सखाराम महाराज अंमळनेरकरांच्या कीर्तनात लालजींची मूर्ति नृत्य करते (अ.११), गोविंदनामक मृत-शिष्याला बाळानंदांनी उठविल्याचे वर्णन (अ.१२), मुसलमानांनी कपटाने माणिकप्रभूंसमोर गोमांसाचे ताट ठेवले. त्यावरील रूमाल त्यांनी काढताच त्याची सुगंधी गुलाबाची फुले झाल्याचे वर्णन (अ.१४), पांडुरंगाने स्वत: माणिकप्रभूंच्या गळ्यात हार घालणे व माराचे वळ स्वत:च्या अंगावर घेणे या चमत्काराचे वर्णन (अ.१५), गोविंद महाराजांनी विठ्ठलाच्या भंगलेल्या पायाला पट्टी बांधल्यावर तो पूर्ववत् झाल्याचे वर्णन (अ.१८), जयरामनाना देशमुख, दत्तजयंतीच्या पारण्याला कूपात पोहरा सोडून तूप काढतात (अ.३८), महासती बहिणाबाई पंढरपूरच्या वारीला जाताना अंगात भरलेले हिव, परत येईपर्यंत, गोधडीत गुंडाळून वृक्षावर ठेवल्याचे वर्णन (अ.४३) इत्यादी सांगता येतील.

या चमत्कारांकडे बुद्धिवादाचा अहंकार पांघरून दुर्लक्ष करता येणार नाही. जादुगाराच्या प्रयोगातील चमत्कारांसारखा हा प्रकार नाही. संतांनी हे चमत्कार केले म्हणण्यापेक्षा त्यांच्या जीवनात ते घडले, असे म्हणणे जास्त सयुक्तिक ठरेल. कारण चमत्कारांमुळे त्यांना संतत्व प्राप्त झाले असे नसून, त्यांच्या संतत्वाचा तो स्वाभाविक परिणाम आहे. सामान्य मनुष्याने आपल्या बुद्धीच्या व कुवतीच्या फुटपट्टीने संतांचे कार्य मोजून चालत नाही. संतांचा श्रेष्ठ अध्यात्मिक अधिकार, चमत्कारांमध्ये सहजरीत्या परिणत होतो. म्हणनूच त्याला 'लीला' म्हणावयाचे.

### देवभक्तांचा प्रेमसोहळा

भक्त व त्याला प्रसन्न झालेला देव यांच्यामधील 'प्रेमाचा सोहळा' भक्तिलीलामृताच्या पानापानावर रंगतो. ४ दिवस उपवासी असलेल्या आपल्या सखाराम भक्तासाठी -

**त्या राजहंसासाठी । जाणे मज उठाउठी ।**
**भुकेमुळे झाले कष्टी । बाळ माझे सखाराम ।।** अ.१०/११८

असे म्हणत ''वैकुंठीचा सुकुमार'' स्वत: दहीपीठ घेऊन येतो. माणिकप्रभूंनी आपले सामानाचे गाठोडे मारुतीच्या मस्तकावर ठेवताच पुजारी संतापाने त्यांना मारतात. पण,

**भक्ताचे पाहून हाल । द्रवला मारुती दयाळ ।**
**आपुल्या अंगीचा झगा सोज्वळ । घातला प्रभूचे अंगामध्ये ।।**
**यासी फोकोन मारिले । परी न कोठे वळ उठळे ।**
**ते सर्व असती उमटले । मारुतीच्या अंगावर ।।** अ.१४/३०,३२

'निष्ठावंत-भक्ताचे' प्रभू कसे संरक्षण करतो, हे दाखविणारे हे वर्णन हृदयाचा ठाव घेते.

गोविंद महाराजांनी आषाढीच्या वारीला जाताना, एका व्यथिताची व्याधी, स्वत:कडे घेऊन त्याला आपले आरोग्य दिले. ते पाहून,

**तै ईश्वरे केली भाव । व्यापारी झाला पंढरीराव ।**
**घोडे करून अभिनव । गरुडाचे तेथे पातला ।।** अ.१७/१०१

भक्तसहाय्यास तत्पर असलेल्या ईश्वराचे हे वात्सल्य डोळ्यात आनंदाश्रु उभे करते. सद्भक्तांची भक्ती पाहून प्रभू कसा बद्ध होतो याचे रोमांचकारी वर्णन ३९व्या अध्यायात येते. 'माझे भक्त माझे प्राण' असे म्हणत स्वत: पांडुरंग वारीला गेलेल्या विठ्ठलपंतांच्या पत्नीसाठी बाळंतपणाचे सर्व साहित्य घेऊन येतात. अशा भक्ताचे महात्म्य कवी,

**धन्य धन्य ते संतसदन । जेथ पातला नारायण ।**
**क्षेत्रे अवघी ओवाळून । तयावरून टाकावी ।।**

अ.३९/१००

या शब्दात सांगत असले तरी अशा प्रसंगी त्या भक्ताची,

**जळो पत्नीचे बाळंतपण । शिणला माझा नारायण ।**
**केवढा मी आभागी पूर्ण । व्यर्थ गेलो पंढरपुरा ।।**

अ.३९/१२७

ही उदात्त-भूमिका, वाचकांच्या अंगावर शहारे आणते.

### काव्यात्म अभिव्यक्ति

महाकाव्याला साजेशी निसर्गवर्णने या काव्याचा हेतू वाचकांच्या हृदयापर्यंत पोचवितात. १४व्या अध्यायातील ४ ते १२ ओव्यांमध्ये आलेले वनाचे वर्णन किंवा १६ व्या अध्यायातील ४६ ते ५३ ओव्यांमध्ये केलेले माहूरगडाचे वर्णन वाचल्यावर कवीच्या सूक्ष्म दृष्टीने निसर्गातील किती विविध गोष्टी टिपून घेतल्या आहेत, हे लक्षात येते. ही वर्णने काव्याला आकर्षक बनवितात. शिवाय हे सर्व भक्तिरस, भाविकता, तत्त्वचिंतन व चमत्कार यांनी भारावलेल्या संतचरित्रांमध्येही आढळून येऊ शकते. याचे आश्चर्य वाटते व अंत:करणात सुखानंदाची लहर तरंगते. चार चरणांच्या तालबद्ध व डौलदार ओव्यांमुळे ही निसर्गदृश्ये वाचकांच्या डोळ्यासमोर सजीव होतात.

उपमा, रूपक, दृष्टांतादि अलंकारांची सुरेख पखरण संपूर्ण ग्रंथात आढळते. श्री दासगणु महाराजांच्या काव्याचा स्वाभाविक प्रसादगुण येथे पूर्णत्वाने प्रकट होतो. ३१व्या अध्यायात सखा कसा असावा हे सांगताना-

**म्हणौनि ऐसा करावा साथी । जो न सोडी कल्पांती ।**
**जैसा सुवास सुमनाप्रती । कधीही न विसंबे ।। अ.३१/८४**

कामक्रोधादि षड्‌रिपूंना कसे जिंकावे हे -

**मग या सहा गुलामांवर । ज्ञानास करी जमादार ।**
**त्याच्याही वरी अधिकार । सद्‌विचार शक्तीचा ।। अ.३२/६१**

या शब्दांत सांगतात

प्रपंचात धनाची आवश्यकता किती तर -

**शरीरी जैसी आवश्यकता । आहे पित्ताची तत्त्वता ।**
**तैसी प्रपंची ज्ञानवंता । आहे या धनाची ।। अ. ३२/७४**

असे असले तरी 'श्रीमंती दुपारची छाया' हेही समर्पकतेने पटवून देतात.

मनुष्याच्या उच्छ्रृंखल मनाचा स्वभाव -

**चित्त जाण मानवाचे । आहे उच्छ्रृंखल साचे ।**
**ते स्थिर करण्याचे । प्रयत्न केले पाहिजेत ।।**
**जैसी मक्षिका अवघ्यावर । बैसे पै वैश्वानर ।**
**पाहता फिरे सत्वर । तेथूनिया माघारी ।।**
**तैसेच हे रंगेल मन । सर्वांठायी रमे पूर्ण ।**
**परि एक ब्रह्म पाहून । तोंड आपले फिरवितसे ।।**

अ.३३/१०२,१०३,१०४

असा वर्णन करतात.

तर संसारात सुख मिळणे अशक्य आहे, हे पुढील शब्दात पटवून देतात-

**पहा नरकाचे पासून । सुवास न ये कदा जाण ।**
**तैसे संसारी गुंतविल्या मन । सौख्य मिळणे अशक्यचि ।**
**बैसून बाभळीचे तळा । मनी इच्छावे आम्रफळा ।**
**खडकावरी लावणे मळा । अशक्य जैसे तैसे हे ।।**

अ.३४/१०१,१०२

शेवटी कवि हे शब्दसृष्टीचे ईश्वर आहेत. ज्ञानवादळाने ते अज्ञानाचा धुराळा नाहीसा करतात. त्यांच्या सूचनेप्रमाणे वागणाऱ्यांचे अकल्याण होण्याची शक्यताच नाही.

भक्तिलीलामृतासारख्या अत्यंत श्रेष्ठ, सारभूत व सर्वांगपूर्ण ग्रंथाचे एक छोट्या लेखात, यथार्थ समालोचन करणे हे केवळ अशक्य आहे. तरीही ग्रंथाच्या स्वरूपाची, अल्पशी कल्पना वाचकांना या लेखाद्वारे येईल, अशी आशा करते. ग्रंथाचे माहात्म्य सांगतांना श्री दासगणु-महाराज म्हणतात,

**सीते हे भक्तिलीलामृत । भवसिंधूचे तारू सत्य ।**
**ते लोटून भवाब्धीत । जाऊ पैलतटाला ।।**

ज्यांना ही अनुभूति हवी आहे, ते ग्रंथाचे शोधन अवश्य करतील.


**- सौ. मीरा श्रीकृष्ण शेंडगे**
यशवंतनगर, नांदेड.
फोन : ९९६०८७७८३३



# संत दासगणु महाराजांचे पंढरीतील वास्तव्य

**श्री. वा. ना. उत्पात (भागवताचार्य)**

श्रीज्ञानेश्वरी लेखक, श्री सच्चितानंदबाबा यांचे १६ वे वंशज, ५६ वर्षे ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथावर प्रवचने व कीर्तने. ३३ वर्षे सहकार खात्यात नोकरी करून निवृत्ती. सोलापूर येथे श्रीज्ञानेश्वर, तुकाराम महाराज मंदिर श्री संत साहित्यसेवा संघ, सोलापूर.

संतकवी दासगणु महाराज यांचे आयुष्यातील बराच काळ पंढरीतच वास्तव्य होते. त्यांचे राहते घर 'दामोदर आश्रम' पंढरपुरात चंद्रभागेच्या काठावर गोविंदपुऱ्यात खिस्ते घाटाजवळ आहे. तिथेच दासगणु महाराजांनी दीर्घकाळ वास्तव्य केले.

मुळात ते नगर जिल्ह्यातील होते. ते शिवभक्त होते. सोमवार, प्रदोष, शिवरात्र ही व्रते निष्ठेने करीत. पण त्यांचे सद्‌गुरू वामनशास्त्री हे वैष्णव होते. त्यांनी त्यांना पंढरीची वारी करण्याची आज्ञा केली. त्यांना ते आवडले नाही. पण गुरू आज्ञा म्हणून ते पंढरीला आले. त्यानंतर मात्र प्रति शुक्ल एकादशीस ते वारी करू लागले. एकदा त्यांना त्यांच्या ख्रिश्चन अधिकाऱ्याने पंढरपूरला जाण्यासाठी रजा नाकारली. तेव्हा ते तसेच पंढरपूरला आले. दर्शन झाल्यावर झिकी पाडळी गावचा पाटील भेटला. त्याने त्याचे बैल चोरीला गेल्याची तक्रार सांगितली व ते इथे विक्रीसाठी चोराने आणले असावेत अशी शंका व्यक्त केली. त्यांनी येथील ओळखीच्या फौजदाराच्या मदतीने बैल पकडले. चोरीचा मुद्देमाल, फिर्यादी व पंढरपूरच्या फौजदाराचे पत्र घेवून जामखेडला परतले. सर्व वृत्त वरिष्ठाला कळविले. त्यांनी त्यांना शाबासकी दिली व त्यांच्या विरुद्ध तक्रार करणाऱ्या ख्रिश्चन अधिकाऱ्याला समज दिली. तेव्हापासून पांडुरंगाचा त्यांना ध्यास लागला. आता ते आवडीने पंढरीला येऊ लागले. शिव-विष्णु यातील त्यांच्या मनात असलेला भेद मावळला.

गुरू वामनशास्त्री यांनी त्यांना मृत्युपत्राने सर्व संपत्ती दिली. पण त्यांनी ती गुरुपत्नीला परत दिली. फक्त गुरूच्या पूजेतील विठ्ठलमूर्ती घेतली.

पंढरपुरी दासगणु महाराज आले म्हणजे ते विश्वनाथ गोपाळ बडवे यांच्या घरी राहात. पुढे त्यांनी गोविंदपुरा भागात जागा घेतली व तिथे घर केले. त्यांचे प्रिय शिष्य दामुअण्णा म्हणजे (प्राचार्य श्री अनंतरावजी आठवले यांचे वडील) त्यांचे स्मरणार्थ त्या घराचे नाव दामोदर आश्रम असे ठेवले. त्यामुळे ते पंढरपूर निवासी झाले. बडवे, उत्पात, सेवाधारी व पंढरपुरातील नामवंत लोक त्यांच्याकडे येऊ जाऊ लागले. श्रीरुक्मिणी मातेच्या मंदिरात नवरात्र महोत्सवात दासगणु महाराजांची कीर्तने सुरू झाली. रात्री ११ वाजता कीर्तन सुरू व्हायचे. दामुअण्णांच्या पहाडी आवाजात 'रामदास माय माझे' हे पद सुरू झाले की ध्वनिवर्धक नसताना लांबवर आवाज जायचा. मंदिरातील मंडप व बाहेरचे पटांगण गर्दीने भरले जायचे. दादांच्या मुळे श्रीरुक्मिणी मंदिरातील नवरात्राला मोठे स्वरूप प्राप्त झाले व गर्दी वाढली. पहिल्या काही वर्षात टवाळ लोक म्हणायचे, 'तमशाचा फड उभा राहिला पाहा.' कारण कीर्तनातील त्यांच्या पदांना लावण्यांच्या चाली आहेत. पण पुढे त्यातील प्रसाद, ओज, माधुर्य व भक्तिरस यामुळे लोक भारावून तन्मय होऊ लागले व टवाळांची तोंडे हळूहळू बंद झाली. श्रीरुक्मिणीमातेच्या नवरात्र महोत्सवात दादांनी चाळीस वर्षे कीर्तनसेवा केली.

त्याच वेळी नव्या पेठेतील मारुती मंदिरात हनुमान जयंतीनिमित्त दादांची कीर्तने होत असत. तिथेही प्रचंड श्रोतृवर्ग ऐकण्यासाठी येत असे. पंढरपूरातील काही महाराज, कट्टर वारकरी यांना हे पाहवत नव्हते. कारण दासगणु हे रामदासी होते. म्हणून एकदा काही लोकांनी कीर्तनाच्या गर्दीत डुकरे सोडली. ती पाहून गोंधळ सुरू झाला. लोक उठू लागले. दासगणु महाराज म्हणाले, ''मायबापांनो, घाबरू नका. बिचाऱ्या डुकरांना हरिकथा ऐकण्याची इच्छा झाली. म्हणून त्यांनी देवाकडे अर्ज केला. 'पंढरपूरात उत्तम कीर्तने चालली आहेत. आम्हाला रजा द्या. ती कीर्तने ऐकायला आम्हाला जायचे आहे.' ईश्वराने उत्तर पाठविले, ''डुकरांनो, आपापले काम करीत राहणे हीच माझी भक्ती आहे. पण तुमचे काम करण्यासाठी तुम्ही कोणाला बदली देत असाल तर तुम्ही कीर्तनाला जा. पंढरपूरचे काही वारकरी फार दयाळू आहेत. ते डुकरांना म्हणाले, ''बाबांनो, आज तुम्ही कीर्तनाला जा. आम्ही तुमचे काम करतो.'' यावर प्रचंड हंशा पिकला. डुकरे सोडणारे जे होते, फारच ओशाळले. पुढे पुढे वारकरी लोक दासगणुंना मानू लागले व हा रामदासी त्यांनी स्वीकारला. सगळ्या मठातून त्यांची कीर्तने होऊ लागली. ह.भ.प. महिपती महाराज, ह.भ.प. अंमळनेर महाराज, ह.भ.प. गुंडा महाराज असे अनेक जण त्यांचे जिवाभावाचे मित्र झाले.

दासगणु महाराजांना एका वेदान्ती माणसाने आव्हान दिले, ''वेदान्त सांगा.'' त्यावर दासगणुंनी अमृतानुभवावर टीका लिहितो म्हणून आव्हान स्वीकारले. बाजारातून पोथी विकत आणली व त्यांचे बडवे विश्वनाथ गोपाळ यांना सांगितले, ''आज रात्री हा ग्रंथ पांडुरंगाच्या उजव्या कुशीत ठेवा. सकाळी तो तेथे तसाच राहिला तर पांडुरंगाची संमती आहे असे समजून मी त्यावर टीका लिहीन. ग्रंथ खाली पडला तर टीका लिहिणार नाही.'' कार्तिक शुद्ध एकादशीला तो ग्रंथ पांडुरंगाच्या उजव्या कुशीत ठेवला. वारी असल्याने हजारो लोक दर्शनाला येत होते. शेकडो हार पांडुरंगाच्या गळ्यात पडत होते. पण त्या धांदलीत तो ग्रंथ जशाचा तसा राहिला. मग दासगणुंनी आता अमृतानुभवावर भाष्य लिहिण्याला विठ्ठलाची अनुमती आहे असे मानले व त्यावरचे 'भावार्थ मंजिरी' भाष्य लिहिले. ते वाचून ज्ञानेश्वरीचे गाढे अभ्यासक श्री केशवराव देशमुख पंढरपुरी आले. तुळशीचा हार दादांच्या गळ्यात घालून, अलिंगन देऊन त्यांचा गौरव केला.

बडवे व उत्पात यांच्याविषयी दासगणु महाराजांना प्रेम होते. एकदा भारताचार्य चिं.वि. वैद्य पंढरपुरी आले. त्यांना देवळातील वातावरणाचा उबग आला. ते महाराजांना म्हणाले, ''तुम्हाला हे कसे सहन होते? काय वागणे या लोकांचे?'' त्यावर दादा म्हणाले, ''हे पहा, चिंतमणराव, पांडुरंग ही सगळ्या जगाची आई आहे. त्यांनी तुमच्यासारखी चांगली मुले स्वतंत्रपणे वागण्यास मोकळी ठेवली आहेत. बडव्यासारखी नाठाळ मुले आपल्या जवळ ठेवली आहेत ही कसोटी लक्षात ठेवली पाहिजे. पिंडाला कावळा शिवल्याशिवाय सद्गती नाही. हे कावळे आपल्या पिंडाला (देहाला) शिवत आहेत. बरे झाले ना? त्यांचा राग कशाला धरता?'' चिंतामणराव हसून म्हणाले, महाराज खरे आहे.

बडवे, उत्पात, सेवाधारी यांच्याविषयी महाराजांच्या मनात प्रेम होते. त्या प्रेमापोटी त्यांनी विनोदाने का होईना त्यांची बाजू घेतली. महाराज पूर्वी विश्वनाथ गोपाळ बडवे यांच्या घरीच उतरत असत. पार्वतीबाई बडवे तर त्यांच्या अनुग्रहीत होत्या. उत्पात समाजात सुद्धा पिलोबा उत्पात, यशवंत उत्पात यांचे महाराजांकडे जाणे येणे होते. श्रीरुक्मिणी मंदिरात दादांनी नवरात्र महोत्सवात चाळीस वर्षेकीर्तनसेवा केली. बडव्यांच्या आग्रहामुळे दादांनी प्रल्हादमहाराज बडवे यांच्या चरित्रावर आख्यान लिहिले. यशवंत उत्पात यांच्या आग्रहाखातर श्रीरुक्मिणी स्वयंवर आख्यान लिहायला घेतले होते ते अपूर्ण राहिले पण पुढे अप्पांनी ते पूर्ण लिहिले.

महाराज पंढरपुरात असताना रोज नगर प्रदक्षिणा करीत असत. परगावी असले तरी ते पंढरीची मानस प्रदक्षिणा करीत असत. आश्चर्य म्हणजे ते परगावी असताना एकदा अशीच मानस प्रदक्षिणा करीत होते. व त्यांना प्रदक्षिणेच्या वाटेवर त्यांचे बडवे विश्वनाथ गोपाळ यांची अंत्ययात्रा दिसली. ते पंढरपूरला आले व कळले की ती वेळ व ठिकाण जिथे अंत्ययात्रा दिसली ते बरोबर होते.

पंढरपूरात ग्रंथालय संमेलन झाले. त्या कार्याचा शुभारंभ नगरवाचन मंदिर पंढरपूर या ग्रंथालयात १९६१ साली महाराजांच्या हस्ते झाला.

काळे मास्तर म्हणून पंढरपुरात महाराजांचे शिष्य होते. ते वारकरी होते. सत्यशोधक होते. पण दासगणु महाराज हे त्यांचे दैवत होते. ते वारकरी व हरिदासी दोन्हीही कीर्तने करीत. एकदा त्यांना दत्तजयंतीचे कीर्तन करायचे होते. गावातील सगळ्या कीर्तनकाराकडे जाऊन आले पण त्यांना आख्यान मिळाले नाही. शेवटी ते महाराजांकडे आले व कळवळून म्हणाले, ''महाराज, मला तेवढे दत्तजन्माचे आख्यान लिहून द्या ना.'' त्यावर दासगणु महाराज म्हणाले, ''घे, लिहून.'' व तिथल्या तिथे दत्तजन्म आख्यान लिहून दिले. असे त्यांचे शीघ्रकवित्व होते.

श्रावण शके १८८४ मध्ये महाराजांची प्रकृती बिघडली. अप्पा नामवंत वैद्य होते. त्यांना चाहूल लागली. पण महाराजांनी आग्रह धरला. 'मला पंढरपूरला न्या'. पण प्रकृती क्षीण झाली होती. त्यांना हलविणे योग्य नव्हते. अप्पांनी सांगितले, ''गोरटे ते पंढरपूर हा प्रवास तुम्हाला झेपणार नाही. आपण दासगणु म्हणे वसती राहो गोदेच्या काठी' असे म्हणता. मग पंढरपूरला जाण्याचा आग्रह का?'' त्यावर महाराज उसळून ताडकन् म्हणाले, ''मोठा आला आहेस शहाणा, सांगणारा. पांडुरंगाच्या पायाशी माझी गोदावरी नाही का?'' त्यावर अप्पांना दुसरा पर्याय उरला नाही. त्यांनी रेल्वेच्या प्रथम वर्गाने प्रवास करीत त्यांना पंढरपूरला आणले आणि आश्चर्य पंढरपूरला आल्यावर त्यांची प्रकृती सुधारली. रोजचे कार्यक्रम स्नान, संध्या, जपजाप्य, विष्णुसहस्रनाम हे सुरू झाले. महिन्याभरात प्रकृती पूर्ववत् झाली. केवळ पंढरपूरला आल्यामुळे हा बदल घडला.

कार्तिक वद्यात ज्ञानेश्वर पुण्यतिथी उत्सवासाठी ते कुणाला निमंत्रण पाठवीत नसत. पण त्यावेळी त्यांनी सर्वांना आग्रहाची निमंत्रणे पाठविण्यास सांगितली. उत्सवाच्या काळात ते पुन्हा क्षीण झाले. उत्सव कसातरी संपत आला व चतुर्दशीला सकाळी आठ वाजून छत्तीस मिनिटांनी त्यांचे देहावसान झाले. पण पंडितप्राण भगवानशास्त्री धारुरकरांनी सांगितले की, नऊपर्यंत त्रयोदशीच होती. ज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यतिथीलाच दासगणु महाराजांना पांडुरंगाने आपल्या चरणा जवळ नेले.

गावामध्ये त्यांच्या निधनाची वार्ता कळली व अत्यंदर्शनासाठी माणसांची रीघ लागली. गावातील महाराज शास्त्री, पंडित अंत्यदर्शनाला आले. पंढरपुरातील नागरिकांनी सहस्त्र हातांनी त्यांच्या पार्थिव देहावर फुले बुक्का उधळून आपला भक्तिभाव प्रगट केला. अंत्ययात्रा निघाली. भाविकांची दिंडी मृदंग टाळांच्या तालात हरिनामाचा गजर करीत होती. काळे महाराज देहभान विसरून गात होते, बाबुराव आजेगावकर मृदंग वाजवीत होते. संतांचे अभंग गायिले जात होते. प्रदक्षिणा रस्त्याने शेकडो लोक अंत्ययात्रेत चालत होते. ठिकठिकाणी हार समर्पिले जात होते. फुले उधळली जात होती. सायंकाळी सात– साडेसात वाजता चंद्रभागेच्या वाळवंटात त्यांच्या पार्थिव देहाला अग्नी दिला. पांडुरंगाच्या चरणाशी चिरविश्रांती मिळावी अशी दादांची इच्छा होती. ती त्यांनी संतसांवता माळ्याच्या आख्यानात

व्यक्त केली आहे.

**भक्तीत अंतर तुझ्या कधिही नसावे ।**
**मागे पुढे आमुचिया विठु तूं असावे ।**
**या भक्तवत्सल अशा धरिलेस नांवा ।**
**या दीन दासगणुला पदीं दे विसावा ।**

या त्यांच्या प्रार्थनेला पांडुरंगाने 'तथास्तु' म्हटले व दासगणु महाराजांना आपल्या चरणाजवळ पंढरीत चिरविश्रांती दिली.

दासगणु महाराजांच्या जीवनातील सर्वात मोठा काळ पंढरपुरात व्यतीत झाला. पंढरपुरातील त्यांच्या वास्तव्यात त्यांचे रुक्मिणी पांडुरंगाचे दर्शन कधी चुकले नाही. हरिजन मंदिर प्रवेश झाल्यावर गावातील सनातनी लोकांनी व काही महाराजांनी पांडुरंगाच्या दर्शनाला न जाण्याचा निर्धार केला. त्याला काही सन्माननीय अपवाद होते. त्यांत दासगणु महाराज प्रमुख होते. ते मंदिरात निघाले पण त्यांच्या जवळचे एक शास्त्री वाटेत आडवे पडले व म्हणाले, ''महाराज तुम्ही मला तुडवून जा.'' महाराज म्हणाले, ''शास्त्रीबुवा तुमच्या प्रेमाखातर आज मी थांबतो, पण मी पांडुरंगाच्या दर्शनाशिवाय राहू शकत नाही. मी दर्शनाला जाणारच'' ही त्यांची निष्ठा.

दासगणु महाराजांनी एका पदात भक्त पुंडलीकापासून पांडुरंगापर्यंत पंढरीचे सुरम्य वर्णन केले आहे.

वैकुंठपुरी वैकुंठपुरी । क्षेत्रराज पंढरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
मध्यभागी मंदीर मनोहर । आंत उभा श्रीहरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
भक्तशिरोमणी पुंडलिकमुनि । चंद्रभागेच्या तिरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
महाद्वारी हनुमंत पुढे मलिकार्जुन विष जो धरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
भक्तशिरोमणी वेसकर चोखा प्रभुला जोहार करी ।। खरी वैकुंठपुरी ।।
निजानुभव सांगण्यास बसला नामदेव पायरीवरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
उभा पुढारा गरुड प्रभूला जो घे स्कंधावरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
आल्यागेल्याची खबर द्यावया जनाबाई येरझार करी ।। खरी वैकुंठपुरी ।।
प्रल्हाद बडवे देती प्रसादा सोळखांबीभीतरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
गानपटु कळवंतीण कान्हो गातसे पंचम स्वरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
हरिची माया जी उमगाया कठिण रुक्मिणी दुरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
सव्यभागी पेठेत बैसला सोनार श्रीनरहरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
जिकडे तिकडे नामघोष गर्जति टाळ झल्लरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
प्रेमानंदे भक्त नाचती पताका खांद्यावरी ।। खरी वैकुंठपुरी ।।
दासगणु म्हणे एकवार तरि जाउनि या तिथवरी ।। खरी वैकुंठपुरी ।।

या भजनात दादांनी पंढरी क्षेत्राचा उल्लेख वैकुंठपुरी म्हणून केला आहे. चंद्रभागेपासून विठ्ठल मंदिरापर्यंत सर्व देवतांचे वर्णन यात आहे. त्याचप्रमाणे अनेक पदात त्यांनी पंढरीचे वर्णन केले आहे.

अशा आवडत्या पंढरी क्षेत्रात महाराजांनी आपले जीवन पांडुरंगाच्या चरणी समर्पित केले. त्यांचे सत्शिष्य प्राचार्य श्री. अनंतरावजी आठवले आपल्या संत दासगणुंच्या 'श्रीसद्गुरु वंदनम्' स्तोत्रात म्हणतात,

**श्री विठ्ठल–पदाम्भोजे रसास्वादनलोलुपम् ।**
**गुंजन्तं नामसाहस्रं वन्दे दासगणुं गुरुम् ।।**
**पुंडलिकपुरे शश्वत् भीमरथ्यास्तटे शुभे ।**
**पांडुरंगपदे लीनं वन्दे दासगणुं गुरुम् ।।**

श्री विठ्ठलाच्या चरणकमलाचा रसास्वाद घेण्याची इच्छा असलेल्या, विठ्ठलाचे म्हणजेच विष्णुसहस्रनाम सतत गुणगुणाऱ्या सद्गुरू दासगणुंना मी नमस्कार करतो.

शाश्वत अशा पुंडलिकाच्या नगरीत, पवित्र अशा चंद्रभागेच्या तीरावर, पांडुरंगाच्या पदी लीन झालेल्या सद्गुरू दासगणुंना मी नमस्कार करतो.

असे होते दासगणु महाराजांचे पंढरपुराविषयीचे प्रेम! अशा महाकवीचा, संताचा सहवास, आम्हा पंढरपूरवासियांना घडला. त्यांच्या प्रेमाला आम्ही पात्र झालो हे आमचे जन्मोजन्मीचे भाग्य आहे. या परते अधिक ते काय लिहावे ?


**– श्री. वा. ना. उत्पात (भागवताचार्य)**
राधानारायण मंदिराचे पश्चिम द्वार, पंढरपूर, जि. सोलापूर,
फोन : (०२१८६) २२३६७७, मो. ९४२२६४७५०७


***



# 'संतकवि दासगणुमहाराजांचे मराठवाड्यातील कार्य'

**ह.भ.प. माधवराव आजेगांवकर**

कृषि पदवीधर, प्रवचनकार व कीर्तनकार, ३ वर्षे शिक्षण क्षेत्रात व ३० वर्षे बँकिंग क्षेत्रात कार्यरत. चरित्रपर ग्रंथांतून व नियतकालिकातून स्फुट लेखन आकाशवाणी वरून व्याख्याने, ६ पुरस्कारांनी सन्मानित.

श्री सच्चिदानंद सद्गुरू साईबाबा यांच्या बोलण्यात मराठवाड्याचा नेहमी उल्लेख येत असे. विशेषत: सेलू, मानवत, पाथ्री, परभणी या गावांशी बाबांचा घनिष्ठ संबंध असल्याचे जाणवते. अलिकडे तर पाथ्री हे साईबाबांचे जन्मस्थान असल्याची दृढ श्रद्धा अनेकांच्या मनात स्थिर झाली आहे. साईबाबांचे बालपण सेलुला गोपाळराव देशमुख, ज्यांना लौकिकात बाबासाहेब महाराज म्हणत, त्याच सत्पुरुषाजवळ गेले. गोपाळराव बाबासाहेबांचा स्थानिक लोकांनी पुष्कळ छळ केला. एकदा तर त्यांना कुणीतरी वीटही फेकून मारली. परंतु साईबाबांनी आपल्या योगसामर्थ्यांनी ती वीट हवेतच स्थिर केली. यावरून बालपणीच साईबाबांच्या अंगी केवढे योगसामर्थ्य होते हे प्रत्ययाला येते. आपल्या निकटच्या भक्तांना साईबाबांच्या या सामर्थ्याचा अनेक वेळा प्रत्यय आलेला आहे. संतकवि दासगणु महाराजांसारख्या श्रेष्ठ साधकाला संतत्वाच्या कोटीत बसवण्याचे सामर्थ्य बाबांच्या मार्गदर्शनातच होते. त्यामुळे बाबांनी दासगणुंच्या मागे नोकरी सोडण्याचा सारखा लकडा लावला. नोकरीतील अनेक कठीण प्रसंगांतून बाबांनी दासगणु महाराजांना वाचविले व प्रत्येकवेळी नोकरी सोडण्याचा आग्रह धरला. २-४ वेळा आढेवेढे घेतल्यानंतर शेवटी दासगणुंनी नोकरी सोडली व शिर्डीस बाबाकडे येऊन राहिले व त्यांनी बाबांना विचारले, ''आता माझी व्यवस्था काय?'' साईबाबांनी दासगणु महाराजांना सांगितले, ''गणु, आपली चिंता देवाला! काळजीचे काही कारण नाही! तुझी व्यवस्था मी नांदेडकडे केली आहे.'' कारण साईबाबांना पक्के ठाऊक होते की, मराठवाडा ही संतांची खाण आहे. अनेक संतमंडळींचा या भूमीत जन्म तरी झालेला आहे, किंवा ती त्यांची कर्मभूमी तरी आहे. महाराष्ट्रातील व आर्यावर्तातील अनेक संत या भागात गोदावरीच्या आसमंतात तप:साधनेसाठी आल्याचे उल्लेख पुराणात व संतसाहित्यात आढळून येतात. दासगणुमहाराजांच्या उपजत असलेल्या भक्तिप्रेरणेला याठिकाणी योग्य ते खतपाणी मिळेल व त्यांच्या संतवाङ्मयाच्या प्रतिभेला भक्तीचा बहर येईल. अशी खात्री बाबांना होती.

ज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, गोरोबा काका, संत एकनाथ इत्यादींच्या जन्माने आधीच ही भूमी पवित्र असल्याचे सिद्ध झाले होते. दत्तावतारी अक्कलकोट स्वामी वासुदेवानंद सरस्वती टेंबे स्वामी महाराज, गुरू गोविंद सिंग, सखाराम महाराज लोणीकर, चिन्मयानंद महाराज, उमरखेड या सर्व संतांचे भक्तिमार्गातील अलौकिक कार्य दासगणु महाराजांच्या प्रतिभेला पूरकच ठरले. सुमारे १८९३ ते १८९६ या २-३ वर्षांच्या कालावधीत दासगणु महाराज केव्हातरी साईबाबांच्या सहवासात आल्याचा उल्लेख उपलब्ध माहितीत सापडतो. आपण जगाच्या कल्याणासाठी करत असलेला उपदेश दासगणुंच्या संतचरित्राद्वारेच जगभर पोहोचेल व त्यामुळे ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, एकनाथ महाराज यांचा भक्तिसंप्रदाय बळकट होईल हे बाबांनी ताडले होते व झालेही तसेच.

दासगणु महाराज १९०५-०६च्या दरम्यान साईबाबांच्या उपदेशाप्रमाणे मराठवाड्यात पहिल्यांदा नांदेडला आले, तेव्हा राजेसाहेब सरदेशपांडे या भाविक गृहस्थाकडे त्यांचा मुक्काम काही दिवस राहिला. महाराजांची प्रासादिक वाणी व मराठवाड्यातील संतांचे अलौकिक कार्य यांच्या अवीट गोडी असलेल्या कथा महाराजांनी लिहिल्या. कीर्तनातून व ओवीबद्ध वाङ्मयातून आपल्या रसाळ वाणीने महाराजांनी संतांची चरित्रे गायिली. नांदेडला त्याकाळी बरीच रसिक व भाविक मंडळी होती. राजेसाहेब सरदेशपांडे, कवि दे. ल. महाजन, वकील देविदासराव लव्हेकर, मौलीसाहेब या भक्तांच्या बरोबरच साईबाबांचे निष्ठावान भक्त असलेले दोन बंधू पुंडलिकराव नांदेडकर वकील व धोंडोपंत नांदेडकर वकील हेही दासगणु महाराजांच्या प्रेमी मंडळीत सामील झाले. पुढे पुढे तर पुंडलिकरावांनी दासगणुमहाराजांचा अनुग्रह घेऊन आपल्या गुरूला नांदेडला जेव्हा वास्तव्यास याल तेव्हा पुंडलिकवाडी या त्यांच्या नांदेडातील निवासस्थानातच रहावयास विनविले. पुंडलिकरावांच्या आग्रहामुळे महाराज नांदेडला आले म्हणजे कायम निवासाला पुंडलिकवाडीतच येत असत. येथे आले म्हणजे नांदेड हे त्यांचे मुख्य केंद्र राहून मुखेड, देगलूर, उदगीर, हिंगोली, कळमनुरी, उमरी, धर्माबाद इ. ठिकाणी कायम उत्सवाला जात असत. पुढच्या काळात दासगणु महाराजांनी पंढरीच्या पांडुरंगाच्या प्रेमाने पंढरपुरात राहण्यासाठी गोविंदपुऱ्यामध्ये २००० रुपयास एक मोठा वाडा विकत घेतला तरीही

महाराजांच्या अंगात शक्ती असेपर्यंत बराच काळ भ्रमंतीत जात असे. त्याकाळी अनेक संस्थाने भारतभर पसरलेली असल्याने महाराज त्यांचेकडेही इंदौर, माळवा, देवास, बडोदा, जत, सांगली, मिरज इ. संस्थानातून कार्यक्रमाला जात असत. परंतु महाराजांचे मराठवाड्यावर व त्यातल्या त्यात नांदेड जिल्हा, हिंगोली, परभणी या भागावर विशेष प्रेम होते. या भागात अर्वाचीन कालात झालेल्या अनेक संतांची चरित्रे लिहिण्यासाठी महाराजांनी खूप भ्रमंती केली. साईबाबांचे गुरू गोपाळमहाराज सेलूकर, उस्मानाबाद जिल्ह्यातील परंडा येथील हंसराज स्वामी, नांदेडचे गुरूगोविंद सिंह, उमरखेडचे आईनाथ साधू व कानडखेड (पूर्णा)चे साधुमहाराज, हिंगोली भागातील आजेगावचे भगवद्भक्त माधवपंत आजेगांवकर देशमुख महाराजांच्या काळात 'वेदोनारायण संत' म्हणून ज्यांना मान्यता मिळाली असे व्यंकटेश दाजीमहाराज टाकळीकर, उमरखेडचे चिन्मयानंद महाराज, शेवाळ्याचे रामचंद्रमहाराज, ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचे गुरू तुकाराममहाराज येळेगावकर, बनवसकर महाराज, बोरीचे कृष्णामहाराज खिस्ते, पेडगावचे बालात्मज ऊर्फ भाऊसाहेब महाराज, गुंडभट्ट नाना कहाळेकर, दैठण्यांचे ठाकुरबुवा कळमनुरीचे दीक्षित महाराज, मराठवाड्याच्या सीमेवर असलेले विदर्भातील श्रेष्ठ संत सखाराम महाराज लोणीकर इ. संतांची चरित्रे, महाराजांनी त्या प्रत्येक संतांच्या गावी जाऊन, त्यांच्या घराण्यातील ऐतिहासिक कागदपत्रे पाहून, परंपरा ऐकून माहिती साधार लिहिली आहे. केवळ कुणीतरी सांगितले म्हणून काल्पनिक कथा लिहिण्याला महाराजांचा विरोध होता. त्यासाठी महाराजांना त्यांच्या अनेक भक्तांचे, शिष्यांचे व स्नेही मंडळीचे सहाय्य झाले आहे. नांदेडचे धोंडोपंत वकील, उमरीचे गोरटेकर देशमुख, माझोडचे देशमुख घराणे, आजेगावचे देशमुख व धर्माधिकारी घराणे, हिंगोलीचे वरूडकर वकील, सुप्रसिद्ध नागोराव बोराळकर व अण्णासाहेब बोराळकर जहागीरदार, पिंप्रीकर देशमुख, साखरेकर देशपांडे, मुखेडचे गोविंद सावकार कवटिकवार, देगलूरचे नार्लावार व महिपतीमहाराज देगलुरकरांच्या वंशातील धुंडामहाराज देगलुरकर वगैरे मंडळींचे या प्रेमळ मंडळीचे सहाय्य झाले. याच भागात दासगणु महाराजांना ज्यांच्याबद्दल विशेष आदर वाटत असे ते वासुदेवानंद सरस्वती टेंबेस्वामीमहाराज, दाजीमहाराज टाकळीकर इ. संतांचा सहवास दासगणु महाराजांना होत असे. उस्मानाबाद, बीड, नांदेड, परभणीसह संपूर्ण मराठवाडाच महाराजांनी अक्षरश: पिंजून काढला. त्याकाळी मराठवाड्यात निजामाची मुसलमानी सत्ता होती. तरी स्थानिक सत्ता देशमुख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी इ. स्थानिक जमेदार मंडळींकडेच होती. प्रत्यक्ष राजसत्तेला विरोध न करता धर्म, संस्कृती व राष्ट्रप्रेम या मंडळींच्या मनात महाराजांनी आपल्या वाङ्मयाने आणि कीर्तनातून कायम तेवत ठेवले. गुलामगिरीत मरगळलेल्या मराठवाड्यातील जनतेच्या मनात कोणत्याही पंथाचा अगर धर्माचा द्वेष न करता पंढरीच्या पांडुरंगाचे प्रेम वृद्धिंगत झाले. असेच जागृतीचे कार्य पुढील काही काळात राष्ट्रसंत पाचलेगांवकर महाराजांनी मराठवाडाभर केले. पाचलेगांवकर महाराजांच्या मनात देखील दासगणु महाराजांबद्दल विलक्षण आदर होता. धर्मभास्कर पाचलेगांवकर महाराजांचे समवयस्क असलेले दासगणु महाराजांचे ज्येष्ठ शिष्य तुकारामबुवा आजेगावकर यांनीही आपल्या वाणीने दासगणु महाराजांच्या वाङ्मयाने संपूर्ण मराठवाडा दणाणून सोडला. दासगणु महाराजांनी आपल्या या शिष्याच्या प्रचारकार्याला पाहून खास मराठवाड्यातील स्वातंत्र्यसंग्रामला पोषक असे पोवाडे लिहून प्रोत्साहन दिले. २०-२२ चौकांचा तानाजी मालुसरे यांचा पोवाडा लिहिताना दासगणु महाराज 'दासगणु म्हणे रचुन पोवाडा तुकारामाच्या दिला हाता' असा खास उल्लेख करतात तर झाशीच्या राणीच्या १९ चौकांच्या पोवाड्यात महाराजांनी याच आपल्या शिष्याचा कौतुकमिश्रित गौरव करून शेवटच्या चौकात असे म्हटले आहे की,

**'केशवगुरूचा सुत ।**
**तुकाराम गात ।**
**कवन हे सभेत मर्दांच्या ।**
**देणग्या दिल्यात कीर्तीच्या ।।** जीऽ जीऽ

अशाप्रकारचे अविनाशी कार्य दासगणु महाराजांनी केले, ते पुढे त्यांचे शिष्योत्तम प्राचार्य अनंतराव आठवले (वरदानंद भारती स्वामी) यांनी अत्यंत जोमाने चालविले आणि वाढविले. अद्यापही दासगणु महाराजांची कीर्तनपद्धती मराठवाड्यातील लोकांना विशेष प्रिय आहे. त्याचे कारण महाराजांच्या भाषेचा बाज हा मराठवाड्यातील लोकांच्या भाषेच्या जवळचा आहे. तुकारामबुवा आजेगांवकर हे महाराजांचे ज्येष्ठ शिष्य, पहाडी व मधुर आवाज लाभलेले व प्रसिद्ध गवय्यांकडून संगीताचे उत्तम शिक्षण घेतलेले, काशीला पं. राजराजेश्वरशास्त्री द्रविड यांचेकडे त्यांचे वेदांताचे शिक्षण झाले होते व पुण्याच्या गीताधर्ममंडळात सदाशिवशास्त्री भिडे यांचेकडे गीतावेदांताचे शिक्षण झाले होते. परंतु मराठवाड्यातील भाषेची सहजता व प्रासादिकता जी दासगणु महाराजांच्या वाङ्मयात होती, ती त्यांनी कसोशीने जपली. संस्कृताचे एवढे शिक्षण होऊनही त्यांनी आपल्या वाणीला मुळीच क्लिष्टता येऊ दिली नाही. अर्धशतकाहूनही अधिक काळपर्यंत या, महाराजांच्या शिष्यद्वयांनी मराठवाडा, महाराष्ट्र व उर्वरित भारत येथील लोकांना प्रभावित केले. दासगणु महाराजांचे मराठवाड्यात अक्षरश: हजारो शिष्य होते. आजही काही वयोवृद्ध शिष्य जिवंत आहेत. पूज्य वरदानंद भारतीनीही संप्रदायाचा खूपच मोठा विस्तार केला.

विविध दहा-बारा उत्सवांच्या माध्यमातून कीर्तन, प्रवचन व संतचरित्राची पारायणे अभ्यास यातून महाराजांनी संत वाङ्मयाचा व्यासंग या भूमीत रुजविला. त्यायोगाने इतकी वर्षेपारतंत्र्यात राहूनही येथील जनतेच्या मनातील धर्म, राष्ट्र व संस्कृतीप्रेम किंचितही उणावले नाही.

जगद्गुरू तुकाराम महाराजांच्या शब्दात -

**काय वानू मी या संताचे उपकार ।**
**मज निरंतर जागवीती ।**

याचा प्रत्यय दासगणु महाराजांच्या कार्याकडे पाहून येतो. कोणत्याही संप्रदायाचा द्वेष न करता किंवा आपलीच पद्धती बरोबर आहे असा अभिनिवेश न बाळगता दासगणु महाराजांनी केलेले कार्य खरोखरच अलौकिक आहे. म्हणून त्यांना संप्रदाय समन्वय महर्षी म्हणाले तर ते वावगे ठरू नये. जवळ जवळ १९०५ ते १९६२ पर्यंत अर्ध शतकाहूनही अधिक काळ मराठवाड्याशी दासगणु महाराजांचा संपर्क होता. १९४२ पासून नांदेड जिल्ह्यातील उमरी जवळ असलेल्या 'गोरटे' या ग्रामाशी महाराजांचा खूपच जवळचा संबंध होता. गोरट्याच्या देशमुख घराण्याने महाराजांना आपले गुरू मानले. बाबासाहेब देशमुख या तरूण मुलाने व त्याच्या आईने महाराजांचा अनुग्रह घेऊन गोरट्यास वर्षातून काहीकाळ अवश्य वास्तव्य करण्याची विनंती केली. प्रापंचिकाच्या घरी फार दिवस राहणे बरे नाही असे महाराजांनी सांगितल्यावरून त्यांना वास्तव्यासाठी एक मोठी जागा व चार एकर जमीन महाराजांना दान दिली. हेतू हा की वर्षातील काही महिने महाराजांनी इथे निवांत विश्रांती घ्यावी. एकांतात लिखाण व चिंतन विश्रांती यांचा लाभ घ्यावा. महाराजांचे वय त्यावेळी ७५च्या पुढे गेले होते.

इथून जवळच २/३ कोसावर गोदावरी दक्षिणगंगा होती. या गंगेच्या काठावर असलेल्या राहेर या क्षेत्री महाराजांना नरसिंहाने दर्शन दिल्याचा उल्लेख महाराजांनी एका पदात केला आहे. नांदेडलाही नित्य गोदावरीचे दर्शन, स्नान होत असे. या गोदावरी गंगेच्या प्रेमापोटी महाराजांनी गोदा-प्रदक्षिणा केली. नाभिस्थान नांदेड पासून राजमहेंद्री (आंध्र) त्याकाळच्या मद्रास इलाख्यातील स्थानापर्यंत जवळजवळ २००० किलोमीटरचा जातायेता प्रवास महाराजांनी केला. अनेक अनुष्ठाने जपजाप्य महाराजांनी गोदाकाठी केले. इकडे नाभिस्थानापासून त्र्यंबकेश्वर पर्यंतचा गोदावरीच्या तीरावरील उत्तर व दक्षिणेचा प्रवास महाराजांनी आपल्या अनेक शिष्यांबरोबर पायी केला. या भागाचे बहुतेक क्षेत्र मराठवाड्यात येते. नांदेड, परभणी, बीड, जालना, औरंगाबाद नगर, नाशिक या क्षेत्रातून गोदावरी वाहते. तिच्या काठी प्रत्येक ५ मैलावरच्या अंतरावर कोणत्यातरी अज्ञात संताची समाधी, तपस्या वास्तव्य झाल्याचे महाराजांना जाणवले, रत्नेश्वर रामपुरी या पाथ्री तालुक्यातील परभणी जिल्ह्यात गोदावरी काठी महाराजांनी २४ लक्ष गायत्रीमंत्राचे पुरश्चरण केले. मंजीरथ राक्षसभुवन पैठण, नाशिक, त्रिंबकेश्वर, गंगाखेड येथे जप, दान, नामस्मरण कीर्तन, भजन व संत चरित्राचे लेखन केले. या काळात महाराजांनी ब्रह्मपुराणांतर्गत गौतमी महात्म्याच्या आधाराने 'गोदामहात्म्य' नावाचा २६३३ ओव्यांचा सुरस ओविबद्ध ग्रंथ लिहिला. गोदावरीच्या अभिमानाबद्दल महाराज म्हणतात, **(त्यांचे जन्मस्थान)**

**मी राहणार नगरचा भोळ्या भाविक सीना तीरचा ।**
**आता आश्रय मोगलाईचा करुनिया राहिलो ।**
**नगर तरी गोदातीर । नांदेडतरी गोदातीर ।**
**म्हणून माझे देशांतर । नाही मुळीच जाहले ।**

असे या गोदातीराचे व मराठवाड्याचे विलक्षण प्रेम दासगणु महाराजांच्या मनात वसत असे म्हणून महाराजांच्या पदात सर्वत्र गोदावरीच्या तीरी वास घडो असे मागणे मागितले आहे. एका पदात महाराज म्हणतात,

**''मुखी राहो नाम, ध्यान मनी तुझी मूर्ती ।**
**घडो कीर्तन सेवा देवा, सदैव या या हाती ।।**
**प्रति वर्षाची वारी राम पंढरीची होओ,**
**तुझिया समचरणाचा प्रेमा वाढत की जावो ।**
**साधुसंतांची ती होवो सदैव' मजभेटी ।**
**दासगणु म्हणे वसती राहो गोदेच्या काठी ।**

इत्यलम्

**- ह.भ.प. माधवराव आजेगांवकर**
'केशवकृपा' संत दासगणु महाराज नगर,
कारेगांव रोड, परभणी - ४३१४०१.
फोन : (०२४५२) २२२९८४, मो. : ९४२१९८३०५१

***





# श्रीदासगणुमहाराजांचे आख्यान काव्य

**कु. गार्गी (वसुमती) देशपांडे**
एम.ए. संस्कृत, दासगणु प्रतिष्ठान, गोरटे येथे सहसचिव.
प.पू. अप्पांच्या लेखनिका म्हणून काम केलेले आहे.

'काव्यप्रकाश'कार मम्मटांनी काव्याचे प्रयोजन सांगताना म्हटले आहे की -

**काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतरक्षतये ।**
**सद्यः परनिर्वृतये कांतासंमिततयोपदेयुजे ।।**

काव्य हे कीर्ती- द्रव्य प्राप्ती, व्यावहारिक ज्ञान अमंगलाचा नाश, परमानंदाचा लाभ आणि उपदेश यांची जोड करून देते. 'रमणीयार्थ प्रतिपादकः शब्दः काव्यम्' असे काव्याचे लक्षण सांगितले जाते. माधुर्य-ओज-प्रसाद हे काव्यगुण म्हणून काव्यशास्त्रात उल्लेखिले जातात. या सर्व शास्त्रीय-पारिभाषिक शब्दांच्या अंगाने विचार केला तरी श्री दासगणु महाराजांचे काव्य हे श्रेष्ठ काव्य ठरते. वाङ्मयाची लांबी-रुंदी या मापाने त्यांच्या ओव्यांची संख्या ७५००० चे वर आहे. श्लोक-पदे-आर्या-दिंडी-साकी यांचेसहित ती संख्या एक लाखाचे वर होते. विषयांची विविधता हे रुंदीचे माप समजले तर अनुभवाचे क्षेत्र व्यापक असल्याने व सूक्ष्मनिरीक्षण वृत्तीमुळे वास्तवतेने युक्त अशा अनेक गोष्टींचा उल्लेख त्यांच्या वाङ्मयात आढळतो. त्यांच्या काव्यामध्ये निरनिराळ्या देवतांची स्तोत्रे-अष्टके, भक्तिसारामृत-संतकथामृत-भक्तिलीलामृत इत्यादी संतचरित्रात्मक ग्रंथ, श्रीगजानन विजय-श्रीशंकराचार्य चरित्र-मध्वविजय, नागझरी महात्म्य इत्यादी ओवीबद्ध चरित्रग्रंथ, अमृतानुभव, शांडिल्यसूत्र-नारदभक्तिसूत्र-ईशावास्योपनिषद् पासष्टीभावदीपिका यासारख्या तात्त्विक ग्रंथावरील टीकात्मक काव्य, ऐतिहासिक कथांचे पोवाड्यांच्या माध्यमातून सादरीकरण, आध्यात्मिक साधकांना पावलोपावली उपयोगी पडणारी उपदेशपर पद्ये या समवेतच कीर्तनोपयोगी संतचरित्रे अशा आख्यानांच्या स्वरूपातील काव्यही आढळून येते.

श्री. अनंतराव आठवले यांनी 'सह्याद्रीच्या पठारावरील सजल-सुफल अरण्य असावे तसा श्री दासगणुमहाराजांचा काव्यसंभार असल्याचे म्हटले आहे. कल्पनाशक्ती, काव्यालंकार, रसपरिपोष भाषाशैलीची विविधता यादृष्टीनेही वाङ्मयाची उंची अफाट ठरते. विषयांच्या वैचित्र्याप्रमाणे रचना प्रकारातील विविधता हेही त्यांच्या काव्याचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

श्री दासगणुमहाराजांच्या वाङ्मयसागरात अनेक रत्ने-अनेक मोती निरनिराळ्या काव्याच्या स्वरूपात आहेत असे म्हटले तर आख्यानकाव्ये हे अमोल दैवी हिरे आहेत असे म्हटले तर अतिशयोक्ती होणार नाही.

त्यांनी रचलेल्या आख्यानकाव्याचा उपयोग स्वतःच्या कीर्तनातून केलाच. पण त्यांच्या काळापासून आजपर्यंत अनेक कीर्तनकारांनी या आख्यानांचे माध्यम वापरून लौकिकामध्ये आपली पद-प्रतिष्ठा निश्चित केली आहे. पुढील काळातील कीर्तनकारांनाही व्यासंग वाढविण्याच्या दृष्टीने या आख्यानकाव्याचे सहाय्य होईल यात शंका नाही.

**कृते यद् ध्यायतो पुंसां त्रेतायां यजतो मखैः ।**
**द्वापरे परिचर्यायां कलौ तद् हरिकीर्तनात् ।।**

भगवंताकडे जाण्याचे मार्ग सांगत असताना भागवतकार म्हणतात - कृतयुगामध्ये ध्यानादींच्या साहाय्याने, त्रेतायुगात यज्ञयागादि कर्माने, द्वापारयुगात पूजादि गोष्टींनी व कलियुगात भगवंताचे गुणानुवाद गाण्याने मनुष्य भगवंतापर्यंत पोचू शकतो.

**कलौदोषनिधे राजन् अस्ति ह्येको महान् गुणः ।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसंगः परं व्रजेत् ।।**

कलियुग हे दोषाचे भांडार जरी असले तरी याच युगात केवळ कृष्ण भक्तीनेच मनुष्य संगरहित होऊन परमपदाला प्राप्त होतो.

भगवंत स्वतःच गीतेत म्हणतात -

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ।।**

दृढनिश्चयी भक्तजन नेहमी माझ्या गुणांचे व नामांचे कीर्तन करून मला वारंवार नमस्कार करून माझ्या ध्यानात निमग्न होऊन अनन्य भक्तीने माझी उपासना करतात.

भक्तलक्षणांवर भाष्य करताना श्री ज्ञानेश्वर महाराज एके ठिकाणी म्हणतात - तेही प्राणापरौते। आवडती मज नियते। जे भक्तचरित्राते। प्रशंसिती।। भगवंताचे गुणानुवाद हे कीर्तनाचे मुख्य अंग असले तरी

तदनुरोधाने जगाला सन्मार्गाचा उपदेश करणे हाही कीर्तनाचा हेतू असतो. तो साधण्यासाठी कीर्तनात देवाच्या व भक्तांच्या कथा सांगून उच्च आदर्श समाजापुढे ठेवण्याची प्रथा कीर्तनामध्ये जोपासली जाते. कीर्तन हा महाराष्ट्रातला एक सांस्कृतिक प्रकार आहे. कीर्तनकाराला हरिदास अथवा कथेकरीबुवा म्हटले जाते. कीर्तनाचे मुख्यत: नारदीय व वारकरी असे दोन प्रकार आढळतात. वारकरी पद्धतीमध्ये संतांच्या अभंगावर निरुपण केले जाते. नारदीय पद्धतीत पूर्वरंग व उत्तररंग असे दोन भाग असतात. पूर्वरंगात एखाद्या आध्यात्मिक विषयाचे विवेचन केले जाते व उत्तररंगात उदाहरण म्हणून देवादिकांची वा संतांची कथा सांगितली जाते. प.पू. स्वामी वरदानंद भारती-पूर्वरंग म्हणजे थिअरी व उत्तररंग-आख्यान म्हणजे प्रॅक्टिकलच असते असे म्हणत असत.

कीर्तनकार डोक्याला पगडी, पायघोळ अंगरखा, धोतर-उपरणे अशा वेषभूषेत कीर्तन करीत असतो. श्रीदासगणुमहाराज मात्र केवळ धोतर-उपरणे अशा वेषात कीर्तनाला उभे राहात. श्री साईबाबांच्या विशेष आज्ञेवरून त्यांनी ही वेषभूषा स्वीकारली होती. कीर्तनातील पूर्वरंगासाठी आवश्यक असलेली उपदेशपर पदेही त्यांनी स्वत:च रचलेली आहेत व त्याचे प्रॅक्टिकल म्हणून सांगावयाचे आख्यानकाव्यहि त्यांचेच असे. या आख्यानातून श्लोक-आर्या-दिंडी-ओवी-साकी-पदे-अभंग अशी विविध प्रकारची छंदो-रचना त्यांनी ग्रथित केली आहे. त्यांच्या काव्यप्रकारातील लावणी हा काव्यप्रकार हे त्यांचेच वैशिष्ट्य म्हणता येईल.

श्री महाराजांची काही आख्याने लहानसर म्हणजे २५-३० कवितांची असली तरी काही आख्याने १००-१२५ कवितांचीही आहेत. वत्सलाहरण, गरुडगर्वहरण, हनुमानसेवा या पौराणिक आख्यानासवेच शिवाजीमहाराज, लोकमान्य टिळक, अहिल्याबाई अशी ऐतिहासिक आख्यानेही आहेत. केवळ संतत्वाचा आदर्श मानून त्यांनी रोहिदास चांभार, गोरा कुंभार, सेनान्हावी, चोखा महार, एकनाथ, दामाजी सावतामाळी इत्यादी संतांचीही आख्याने रचली आहेत. ही आख्याने ते स्वत: आवडीने, रंगून जाऊन सांगत असत. या आख्यानातील नाट्यमयता, संवादशैली संविधानक व उत्कृष्ट व्यक्तिचित्रण हे गुण आख्यान वाचल्याशिवाय वा ऐकल्याशिवाय निश्चितच प्रत्ययास येणार नाहीत.

कै. प्रा. श्री. नी. चापेकर महाराजांच्या आख्यान काव्याच्या प्रस्तावनेत लिहितात - ''श्रावण महिन्यात लाखोलीसाठी फुले गोळा करावीत म्हणून एखादा भाविक पारिजातकाच्या वृक्षाजवळ गेला आणि त्या वृक्षाखाली पसरलेला दाट असा मृदुमनोहर फुलांचा सडा पाहिला की कोणती फुले वेचू व किती वेचू असे वाटून भांबावून जातो त्याप्रमाणे माझी स्थिति झाली आहे. श्रीमहाराजांच्या उज्वल प्रतिभासिंचनाने विकसित झालेला आध्यात्मिक सौरभयुक्त व प्रसादपूर्ण गद्यपद्यात्मक रम्य पुष्पसंभार पाहिला की माझ्यासारखा भाविक निश्चितच भांबावून जातो.''

आख्यानातील प्रसंग श्रोत्यांच्या मनावर ठसण्यासाठी श्रीमहाराज त्या कथानकास करुणरसाची व भक्तीच्या उत्कटतेची जोड देतात. मोजक्या व नेमक्या शब्दात हुबेहूब शब्दचित्रे ते श्रोत्यांच्या समोर उभी करतात. प्रसंगानुसार स्थलकालादींची-व्यक्तींची वर्णने, यात्रा-मिरवणुका-भजन-कीर्तनांची वर्णने, दुष्काळ-उन्हाळा-पावसाळा-साथीचे भयंकर रोग यांची वर्णने, भावपूर्ण संवादाची-भक्त्युत्कट उदार व्यक्तिमत्त्वाची वर्णने, शूर वीर स्त्री-पुरुषांच्या त्यागाची व तेजस्वितेची वर्णने श्रीमहाराज आपल्या काव्यकौशल्याने इतक्या सुंदर रीतीने सादर करतात की ऐकणारा श्रोता वेळेचे भान विसरून त्या त्या चरित्राशी, त्या त्या कथेशी एकरूप होऊन जातो व श्रीमहाराजांच्या बुद्धिमत्तेने त्यांच्या काव्यकौशल्याने आश्चर्यचकित होऊन जातो. कारण त्यांचे शालेय शिक्षण केवळ चौथीपर्यंत झालेले होते. त्यामुळे उत्तुंग प्रतिभेच्या आविष्काराने थक्क होण्याशिवाय दुसरी गतीच त्याला उरत नाही.

काही आख्यानातील काही वर्णने आपण पाहू या. लाखा कोल्हाटी आख्यानात वैभवाच्या मोहाने राजपुत्राकडे गेलेली लाखाची मुलगी व लाखाची उपासमार होऊ नये म्हणून प्रयत्नासाठी गेलेल्या रुक्मिणीमाता यांचा संवाद श्रीमहाराजांनी ठसकेबाज रीतीने वर्णिला आहे.

आत्याच्या वेषातील आईसाहेब म्हणतात -

**उपवासी मरत म्हातारा। त्याचि ना खबर गे तुजसी।**
**नेसून भरजरी शालू। ऐटीत पलंगी बससी।।**

चाल)- धि:कार तुझ्या कृत्यास, असो हा खास, का न गेलीस
**लहान असताचि।**
**तूं पुतळी दुर्नितीची। अवदसे।।**

मुलगी उत्तर देते - ''**आत्याबाई!**
**आहे त्याचि मला जाणीव काय करू परी।**
**हट्टी तो मुळीच म्हातारा क्षण एक सोडि ना पुरी।।**
**काष्ठाचे एक बाहुले त्यासि मानितो।**
**जगदीश असा बघ वेडा तेथेच द्वारि बैसतो।।**

चाल) - तो आल्यास माझ्या घरी, घालिन भाकरी, सर्वतोपरी,
सुख होईल। माझेहि नाव होईल।।''

''आत्याबाई! मी आता राजाची राणी आहे ना! मग त्याच्याकडे जाणे बरे दिसेल का?'' मुलीची ही भावना व्यक्त करताना महाराजांनी दिलेल्या उपमा अत्यंत मार्मिक अशाच आहेत. ते म्हणतात -

**कोठे मी सुबक पुतळी ग कोठे बाई मी चाफ्याची कळी।**
**अंगास ह्याचिया वळी असे की ग पडली।।**
**लावून ढिगळ तरटाचे शाल नाही खुलली।**
**यासाठी आपण होऊन, जाऊ कशी, मी त्या बोलावण्या।**
**इभ्रतीचा होईल अपमान साजणी ग माझा।**
**कोठे तो भिकार हलकारा कोठे ग बाई राजा।।**

मुलीच्या या उत्तराने आईसाहेब संतापतात व म्हणतात -

**नको बोलू पुढं बोलू पुढं। तुझ्या मनीचा भाव मशी कळला**
**पाच हिरे मोती शौचकूपा प्रति।**

**म्हणून का तो योग्य बैठकीला ।।**
**लाखा भक्त कोठे पापिणी तू कुठे ।**
**मोरापुढे जणू डोमकावळा ।।**

या कवितेत महाराजांनी 'छक्कड' हा काव्यप्रकार योजून मातुश्रींचा संताप यथार्थरीतीने वर्णिल्याचे दिसून येते.

श्री तुकारामांच्या आख्यानात मजुरी करून आणलेले धान्य तुकाराम महाराज व त्यांची कन्या भागू यांनी ब्राह्मण वेषातील देवाला देऊन टाकले म्हणून जिजाबाई भागूला संतापाने मारते. तेव्हाचे श्रीदासगणु महाराजांनी केलेले वर्णन आपल्यासमोर ह्या प्रसंगाचे चित्र उभे करते.

ते म्हणतात –

**धपधपा मारि भागूस राग बहु आला ।**
**ओढि फरफर तिजला । धरून झिंज्याला ।**
**अवदसे । कसा धान्याचा उन्हाळा केला ।।**
**पटपटा पोर पडे पाया करी गयावाया ।**
**आई नाही का ग माया । किमपि तव ठाया ।**
**वाहतो कसा तव हात मजसि झोडाया ।।**
**अरे धाव धाव विठ्ठला सख्या जगपाला**
**हरि सोडवि मजला । अशा माराला ।**
**सोसु मी कोठवर त्रास जिवाला झाला ।।**

या कवितेतील अरे धाव धाव विठ्ठला । हे शब्द भागुबाईची उत्कट आर्तताच अतिशय हृद्यपणें व्यक्त करतात.

समर्थशिष्य दादाजींच्या आख्यानात शिवाजीमहाराज व एक ब्राह्मण स्त्री यांच्या संवादातून त्या सामान्य स्त्रीच्या ठिकाणीही असलेली प्रखर राष्ट्रभक्ती व्यक्त करण्यास महाराजांचे काव्य अत्यंत समर्थ ठरले आहे. भाऊबीजेच्यादिवशी ती स्त्री मारुतीला ओवाळल्यानंतर मंदिरात प्रथम भेटलेला पुरुष म्हणून शिवाजीमहाराजांना ओवाळण्यासाठी विचारते. त्या स्त्रीच्या वेषभूषेवरून ती स्त्री ब्राह्मण असावी म्हणून शिवाजी महाराज म्हणतात – की बाई! तुम्ही ब्राह्मण दिसता. मी मराठा आहे. तेव्हा ती स्त्री म्हणते –

**सैनिक श्रेष्ठ प्रतिचा असशील कोणी ।**
**हे जाणिले तव मि वेष पहा बघोनि ।।**
**सैनिक जे असति की कुलशीलवंत ।**
**त्यांच्या समस्त भरल्या बहिणी जगात ।।**
**हे क्षत्रियकुलभूषणा । नरवीरा काही कर ।**
**नाव आपुले देशामधे । तलवारीच्या जोरावर ।**
**आहे इतिहास ठाऊका । यवनांनी महाराष्ट्राला ।**
**पायाखाली का तुडविले । त्याचा विचार काही करी ।।**

अत्यंत साध्या-सोप्या शब्दात भाव व फार मोठा आशय व्यक्त करण्यामध्ये श्री दासगणुमहाराजांचा कसा हातखंडा होता तेच यावरून स्पष्ट होईल.

अहिल्याबाईंच्या आख्यानात राघोबादादा पेशव्यांनी एका सामान्य धनगराच्या मुलीला सून करून घेण्यास मल्हाररावास सांगितले. थोड्या अनिच्छेनेच मल्हाररावांनी ते मान्य केले व अहिल्याबाईंचे लग्न मल्हारराव होळकरांच्या मुलाशी खंडेरावाशी झाले. त्यावेळच्या वरातीचे श्री दासगणुमहाराजांनी केलेले वर्णन मुळातूनच पाहण्यात आनंद मिळेल. त्यात अनुप्रास व यमक अलंकार साधून आलेली सरदारांची नावे वरातीच्या थाटाचे इत्थंभूत वर्णन हे सर्व श्री दासगणुमहाराजांची सूक्ष्मनिरीक्षणशक्ती व बहुश्रुतताच प्रगट करते. कुंभेरीच्या युद्धात खंडेरावाला मृत्यू आलेला समजताच अहिल्याबाई सती जाण्यास सिद्ध झाल्या. त्यावेळी मल्हाररावांच्या अंत:करणातील शोकविह्वल भाव श्री दासगणुमहाराजांनी एका श्लोकात वर्णिला आहे.

**वृद्धावस्था मजप्रति आली आण बाई मनात ।**
**गेला खंडू तूहि धरिशि का सांग गे तोच पंथ ।।**
**मालू-मुक्ता लहान असती माय त्यांनी कुणाला ।**
**बोलावे गे, त्यजि न असु, ही भीक घाली आम्हाला ।।**

श्री एकनाथमहाराजांच्या आख्यानात नाथ आपल्या गुरूंना शोधीत शोधीत दौलताबादला येतात व गंगेच्या दृष्टांताप्रमाणे जनार्दनपंतांच्या दर्शनासाठी किल्ल्यावर जातात. त्यावेळी निरनिराळ्या याचकांच्या समूहाने जनार्दनपंतांकडून केलेली अपेक्षा व त्यांनी त्या याचकांना दिलेले उत्तर याचे श्री दासगणुमहाराजांनी केलेले वर्णन, त्यांचे संवादकौशल्य व सदाचरणाच्या दृष्टीने असलेली तत्त्वनिष्ठा अतिशय परखडपणे व्यक्त करते.

श्रीनाथमहाराज भागवतावर प्रवचन करीत असताना एकदा म्हणाले –

**सर्वच एक भरले जगतात तत्त्व ।**
**तत्त्वापुढे मुळि नये कवणा महत्त्व ।।**
**पाहून चूल घट रांजण बोळक्याला ।**
**का लेखितील बुध वेगळि मृत्तिकेला ।।**

त्यांच्या प्रवचनासाठी येणाऱ्या मुस्लीम समाजाने त्यांना प्रश्न केला की असे जर आहे –

**एक खाँकसे बने हुए है हिंदु मुसलमिन दुनियामे ।**
**फिर तुम खाना क्यों नही खाते आके हमारे मसजिद्मे ।**

तेव्हा नाथ म्हणाले –

**यापरिचे मन तुमचे झाले असल्या अवश्य येईन ।**
**भोजन करण्या, काजी माना हे ना असत्य तुम्ही वचन ।।**

त्यावेळी भगवंतांनी डुकराच्या पिलाचे रूप घेऊन एकनाथ महाराजांचे धर्मांतर होऊ दिले नाही. या आख्यानात नाथ मशिदीत जाणार म्हणून हिंदू समाजाची झालेली कासाविशी मुस्लिमांना झालेला आनंद, त्यातून भगवंतांनी शोधलेला उपाय हे श्री दासगणुमहाराजांनी इतक्या नाट्यमयरीतीने लिहिले आहे, की चलत्चित्राप्रमाणे सर्व प्रसंग आपल्या डोळ्यासमोरून सरकत जातात.

दामाजीच्या आख्यानात दुष्काळाचेवेळी दामाजी सरकारी धान्य वाटून टाकतात. त्यामुळे मुस्लीम बादशहा त्यांना अटक करून घेऊन येण्यासाठी शिपायांची फौज पाठवितो. त्यांच्या साध्वी पत्नीला जेव्हा हे कळते तेव्हा तुळशीच्या ओट्यावर उभे राहून त्या माउलीने केलेली पांडुरंगाची प्रार्थना हा साक्षात् करुण रसाचाच आविष्कार आहे.

श्री दासगणुमहाराजांचे काव्य असे –

**हे अनंत पंढरिराया । का निष्ठुर केलीस माया । ईश्वरा ।।**
**चुकले मी काय सेवेला । म्हणुनीच मोकलिसी मजला । ईश्वरा ।।**

चाल) – ईश्वरा! रमेच्या वरा । दयासागरा, शिणवि ना वाया ।
संकटी रक्षी पतिराया । ईश्वरा ।।

आख्यान काव्यामध्ये नाट्यमयता, व्यक्तिचित्रण, परिणामकारकता इत्यादी गोष्टी साधता साधता श्री दासगणुमहाराज अनेक सिद्धांतही सांगून जातात.

एकादशीच्या दिवशी एक गौळण म्हशी भादरण्यासाठी खुंटावर गेली तर तिथे सेना न्हाव्याशिवाय दुसरा न्हावी नव्हता. सेना राजाचा कारागिर त्याला म्हशी भादरण्याचे काम कसे सांगणार? म्हणून ती *गौळण रागाने म्हणते – आता माझे काम* आहे तर एकहि न्हावी जागेवर नाही.

**काम नसल्या येती मेले । ताक मागायला घरी ।।**

सेनाने ते ऐकले व त्या गौळणीला म्हणाला – बाई! मी आहे ना खुंटावर! तुझे काय काम आहे ते मला सांग. ती म्हणते – बाबारे! तू थोरामोठ्याचा! आम्हाला बलोतदार पाहिजे. तेव्हा श्री दासगणुमहाराजांनी सेना न्हाव्याच्या तोंडी घातलेल्या श्लोकाने अत्यंत महत्त्वाच्या सिद्धांतच उदाहरणासह स्पष्ट केला आहे.

**थोरांचे जितुके तयावरि असे सत्ता जगाची खरी ।**
**गंगेला बुध भूप विप्र खलहि येऊन पाणी भरी ।।**
**सूर्याची किरणे समान सकला मेघोदरीचे जल ।**
**केली का महिने कधी निवड ती हा सुष्ट वा हा खल ।।**

श्री महाराजांच्या आख्यान काव्यामध्ये करुण रौद्र हास्य बीभत्स शृंगार भयानक इत्यादी सर्व रसांचा परिपोष दिसून येतो. या सर्वांवर ताण म्हणजे भक्तिरस तर कोंदूकोंदून भरलेला आहे. किती सांगणार?

पुण्यातील एकनिष्ठ शिवभक्त श्री. शंकरराव दाते यांनी श्री दासगणुमहाराजांच्या कीर्तनाविषयी काढलेले उद्गार असे –

**भक्तिभावाविण कीर्तन । संमत करिती महाजन ।**
**तरी ते साक्षात् विडंबन । होईल नारदगादीचे ।।**
**परी श्री दासगणुंचे कीर्तन । असते भक्तिभाव प्रधान ।**
**श्रोता सहज होतो तल्लीन । ऐकता संतचरित्र ।।**
**आपण रंगे हरिकीर्तनी । श्रोत्यास रंगवी रंगुनी ।**
**निरुपणी वा आख्यानी । गात गात ।।**
**कीर्तनाचे साग्र आख्यान । तैसेचि रचिले कवन ।**
**चोरटे वा उसनवार न । घेता अणुमात्र ।।**
**टाळकरी वा साथकरी असला वा नसला जरी ।**
**शीघ्रकवी कीर्तन करी । दासगणु ।।**
**भक्तिरसयुक्त आख्यान । आकर्षित श्रोत्यांचे मन ।**
**सहज करी प्रसरण । भागवत धर्माचे ।।**
**श्री दासगणुमहाराजांचे कीर्तन प्रत्यक्ष ऐकलेल्या ।**

श्री. दाते यांचे हे उद्गार म्हणून विशेष महत्त्वाचे.

प.पू. स्वामी वरदानंद भारती यांचे अनुग्रहीत श्री. ग. प्र. परांजपे यांनी श्री दासगणुमहाराजांच्या वाङ्मयावर पुणे विद्यापीठात प्रबंध सादर केला आहे. त्यानिमित्ताने साहित्याच्या दृष्टीने सर्वगुणांनी अलंकृत असलेल्या श्री दासगणुमहाराजांच्या काव्याचा विद्यापीठाय स्तरावर विचार झाला ही विशेष आनंदाची गोष्ट.

सूर्याच्या तेजस्वितेला काडवातीने ओवाळावे तसाच हा लेखनप्रपंच पण त्यानिमित्ताने थोडातरी अभ्यास घडला याकरिता ॐकार प्रतिष्ठानला मन:पूर्वक धन्यवाद!

**– कु. गार्गी (वसुमती) देशपांडे**
श्रीदासगणु प्रतिष्ठान
गोरटे, जि. नांदडे ४३१८०७
फोन : (०२४६७) २०२५१४, मो. ९९७५८७०६७७

***



# संतकवी श्रीदासगणु महाराजांची कीर्तन-पद्धती

**श्री. विक्रम विनायक नांदेडकर**
विज्ञानशास्त्र पदवीधर, नांदेड येथे स्वतंत्र व्यवसाय. प.पू. अप्पांचे नातू.

'कलियुगी हरिकीर्तन । हे ईशप्राप्तीचे साधन' असे श्रीमद् भागवतात वर्णन आहे. भगवंतही कलियुगातला आपला पत्ता सांगताना 'मद्भक्ता: यत्र गायन्ति' असाच सांगतात. यावरून परमार्थमार्गात भगवत्प्राप्तीसाठी असलेले कीर्तनाचे महत्त्व सहजच लक्षात येते. कीर्तन हे श्रोता, वक्ता दोघांसाठीही सारखेच कल्याणाचे आहे. हरिकीर्तन हे एक साधनच आहे. आणि म्हणून श्रीदासगणु महाराजांचे सच्छिष्य श्री अनंत महाराज आठवले मोठ्या नम्रतेने म्हणतात, ''इतरास्तव लव स्वत:च साठी । उभा राहतो मी तर कीर्तनि'' खरोखर हरिकीर्तन हा भक्तिचाच प्रकार.

खूप मोठ्या प्रमाणात समाजात जागृती घडवून, समाजाला ऐहिक व पारमार्थिक उन्नतीकडे घेऊन जाण्यासाठी कीर्तन हे सर्वोत्तम साधन आहे. समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत पोहोचून प्रत्यक्ष संवादाच्या माध्यमातून सदाचार, सन्निती आणि सद्वासना यासारखी कल्याणकारी तत्त्वे पटवून देऊन समाजप्रबोधन करण्याचे कीर्तन सर्वोत्तम साधन आहे. म्हणनूच लोकमान्य टिळकांसारखा महापुरुषही म्हणतो, ''मी जर राजकारण- समाजकारणात नसतो तर कीर्तनकार झालो असतो!'' यावरून आपणास कीर्तनाचे महत्त्व आणि कीर्तनकाराच्या जबाबदारीची जाणीव होते. आता कोणी म्हणेल की आजच्या युगात प्रबोधनासाठी वृत्तपत्र आणि इलेक्ट्रॉनिक्स प्रसारमाध्यमे इतकी गतिमान आणि प्रभावी असताना कीर्तनासारख्या अतिशय मर्यादित साधनाची काय आवश्यकता? काही बुद्धीवादी म्हणतील की, 'आता कीर्तनकारांना रीटायर (निवृत्त) केले पाहिजे. पण या प्रसार माध्यमांमार्फत दिल्या जाणाऱ्या अतिरंजित व भडक बातम्या, सवंग लोकप्रियतेसाठी दाखवले जाणारे किळसवाणे कार्यक्रम यांचा सुकाळ आणि मूल्यशिक्षण, उच्च संस्कार देणाऱ्या बौद्धिक वाङ्मयाचा दुष्काळ पाहिला की, कीर्तनासारख्या माध्यमाची गरज जरा जास्तच प्रकर्षाने जाणवल्याशिवाय राहात नाही.

आपल्या भाग्याने आपण ज्या महाराष्ट्राच्या भूमीत जन्मलो, त्या महाराष्ट्राला, आपल्या मायबोली मराठीला अतिशय थोर कीर्तन-परंपरा लाभली आहे. संत शिरोमणी श्रीतुकोबाराय, भक्ताग्रणी श्रीनामदेव महाराज अशी या परंपरेतील अनेक कीर्तनकारांची नावे ऐकली की या परंपरेविषयीच्या आदराने आणि अभिमानाने ऊर भरून आल्याशिवाय राहात नाही. या हिंदुराष्ट्रात महाराष्ट्राने आदराचे आणि आघाडीचे स्थान मिळविले 'नाचू कीर्तनाचे रंगी। ज्ञानदीप लावू जगी।' यासाठी कीर्तन करणाऱ्या संत-कवि-कीर्तनकारांमुळेच!

कीर्तनाच्या मुख्यत: दोन पद्धती सर्वमान्य आहेत १) वारकरी कीर्तन, २) हरिदासी कीर्तन. कीर्तन पद्धती निराळ्या असल्या, त्याची रचना, नियमावली वेगवेगळी असली तरी उद्देश मात्र एकच लोककल्याणाचा! म्हणून इथे तर- तम, श्रेष्ठ-कनिष्ठतेचा विचार अगदीच अप्रस्तुत आणि बालिशतेचा आहे. 'सर्वदेवनमस्कार: केशवं:प्रति गच्छति' असे प्रतिपादन करणाऱ्या वारकरी आणि हरिदास यांच्यातील भांडणे म्हणजे विनोदच नाही का? असो.

श्रीदासगणु महाराजांची कीर्तन पद्धती ही हरिदासी कीर्तन पद्धती आहे. हरिदासी कीर्तन पद्धतीतही अनेक प्रकारच्या वैशिष्ट्यपूर्ण परंपरा आहेत. त्यातीलच एक अतिशय वैभवशाली, स्वयंपूर्ण, परिपूर्ण, उद्बोधक, प्रासादिक अत्यंत रसाळ, अतिशय सुरस, वैविध्यपूर्ण, भक्तिरसप्रधान, मार्मिक अशी श्रीदासगणु महाराजांची कीर्तन परंपरा आहे. श्री दासगणु महाराजांच्या ज्या कीर्तनांनी मराठी मनाला अक्षरश: वेड लावले, श्रोत्यांवरती भक्तिरसाचा अगणित वर्षाव केला. भावविभोर करून अत्यंतिक सुखाचा अनुभव दिला अशा या कीर्तन पद्धतीची वैशिष्ट्ये आवर्जून अभ्यासावीत अशीच आहेत.

उपजत प्रखर बुद्धीमत्ता आणि शीघ्रकवित्व शक्ती असलेले श्रीदासगणु महाराज मूळचे लावणीकार! अनंत फंदी, राम जोशी यांच्याप्रमाणे लावण्या रचण्याचा छंद. अगदी शृंगारिक लावण्या सुद्धा त्यांनी रचल्या. श्रीदासगणु महाराज पुढे श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर व श्रीसाईबाबांसारख्या विभूतींच्या संपर्कात आले आणि जीवनाबद्दलचा त्यांचा दृष्टिकोन बदलला. पुढे त्यांनी समाजातील वाईट रूढी, दंभाचार यांवरही परखड उपहासात्मक लावण्या रचल्या. एकदा नेवासे मुक्कामी

असताना अशीच रचलेली लावणी ऐकून तेथील तहसीलदार महाराजांना म्हणाले, ''गणेशराव! असल्या लावण्या रचून इतरांचा उपहास करणं सोपं आहे. एखादं कीर्तनही कधी रचून दाखवा!'' तत्काळ महाराज म्हणाले, ''उद्या या कीर्तन ऐकायला'' आणि लगेच श्रीमहाराजांनी श्रीमोहिनीराजाच्या साक्षीने तमाशाचा डफ फोडून टाकला तो कायमचाच! तत्काळ लेखणी सरसावली आणि श्रीमहाराजांनी जवळ-जवळ एक टाकी रचलेल्या सर्वप्रथम कीर्तनोपयोगी आख्यानाची संहिता तयार झाली. संत दामाजी! लगेच दुसरे दिवशी ही संतकथा श्रीमहाराजांनी तहसिलदारांसकट ग्रामस्थांना कीर्तनरूपात ऐकवली, आणि सर्वजण विस्मयचकित झाले. शाहीर गणेशराव कवि-कीर्तनकार दासगणु झाले. उभा महाराष्ट्र पुढे जी पृथ्वीमोलाची कीर्तनमाला अभिमानाने मिरवणार होता त्यातील पहिले अमूल्य रत्न ओवले गेले होते.

हरिदासी पद्धतीत कीर्तनाचे पूर्वरंग व उत्तररंग असे दोन भाग असतात. पूर्वरंगात एखाद्या तत्त्वाचे प्रतिपादन करणारे काव्य घेऊन ते तत्त्व उलगडून सोपे करून सांगण्यासाठी त्यावरील विवेचन, दृष्टांत देऊन करावयाचे आणि उत्तररंगात ते तत्त्व प्रतिपादित करणारी, त्या अनुषंगाने असलेली पद्यात्मक संतकथा सांगावयाची. श्रीमहाराजांनी पहिले वहिले 'संत दामाजी' हे स्वरचित कीर्तनाख्यान केले व पूर्वरंगासाठी असणारे उपदेशपर पदही स्वत:च रचून त्याचे विवेचन केले. पुढे महाराजांनी अनेक कीर्तने केली, पण पूर्वरंगासाठीचे उपदेशपर पद आणि उत्तररंगासाठी संतकथा वा आख्यान हे श्रीमहाराजांचे स्वत:च रचलले असे. संपूर्ण स्वरचित पूर्वरंग आणि आख्यान हे श्रीदासगणु महाराजांच्या कीर्तन पद्धतीचे एकमेवाद्वितीय असे वैशिष्ट्य आहे असे म्हणता येईल. अगदी नमनाच्या पहिल्या पदापासून कीर्तनाच्या शेवटी होणाऱ्या भगवंताच्या आरती पर्यंत सर्व काही स्वत: रचलेले! केवळ अद्वितीय! कीर्तनाच्या अगदी सुरूवातीच्या क्षणापासून शेवटच्या काही क्षणांपर्यंत कुठलाही थोडासा भाग ऐकता आला तर श्रोता सहज ओळखेल 'अरे! हे तर श्रीदासगणु महाराजांचे कीर्तन!' इतके अद्वितीय!

श्रीसाईबाबांच्या सांगण्यावरून श्रीमहाराज उघड्या अंगावर केवळ उपरणे घेऊन कीर्तन करू लागले. अगदी मोठ्या संस्थानिकांच्या दरबारातही महाराजांनी उघड्या अंगानेच कीर्तने केली. दरबाराच्या शिस्तीकरता त्यांनी आपली पद्धत सोडली नाही. राजे लोकांनीही महाराजांना याबाबत छेडले नाही. 'निस्पृहस्य तृणं जगत्' या नियमांशी राजेही परिचित होते. नारदाच्या गादीला आणि महाराजांच्या कीर्तनप्रसंगीच्या रंगाशी सुसंगत अशीच ही वेशभूषा आहे. जणू श्रीमहाराज सुचवत आहेत की, कीर्तनामध्ये जे मनात तेच बाहेर! मध्ये आडपडदा म्हणून नाही. बोलणे स्पष्ट. लपवा-छपवी म्हणून काहीच नाही. हिंडत फिरत कीर्तन न करता, पाऊलही न हालवता अत्यंत स्थिर उभे राहण्याची श्रीमहाराजांची पद्धत ही जणू निष्ठावंत भावाचीच द्योतक! स्थिर भाव, निस्पृहता आणि वैराग्य हीच तर परमार्थाची मुख्य लक्षणे. परमार्थ साधण्यासाठी किती उचित, समर्पक आणि समर्थ अशी कीर्तन पद्धती! श्रीदासगणु महाराजांची कीर्तन पद्धती. केवळ एकमेवाद्वितीय! श्रीमहाराजांच्या पश्चात प.पू. अनंत महाराजांनी व पुढे श्रीमहाराजांच्या परंपरेतील सर्व कीर्तनकारांची उघड्या अंगाने कीर्तने करण्याची परंपरा निष्ठेने सांभाळली. किंबहुना उघड्या अंगावर केवळ उपरणे घेऊन कीर्तन करणारा म्हणजे श्रीदासगणु महाराजांच्या परंपरेतीलच कीर्तनकार असला पाहिजे अशीच ओळख निर्माण झाली.

श्रीदासगणु महाराजांनी स्वत: जवळ जवळ ८०-८५ कीर्तनोपयोगी आख्याने आणि अनेक उपदेशपर पदांची रचना केली. आख्यानांत मुख्यत: संतचरित्रात्मक आख्याने आहेत. काही थोडी पौराणिक आणि ऐतिहासिकही आहेत. कथासूत्र इतरत्र वाङ्मयातून घेतले असले तरी संविधानक त्यांचे स्वत:चेच आहे. खरंच आहे. ज्याच्याकडे शब्दरत्नाचा भांडार आहे, तो दुसऱ्याकडे भिक्षां देहि करेल का? अतिशय वैशिष्ट्यपूर्ण रसाळ, वैविध्यपूर्ण तरीही अत्यंत सुगम अशी स्वत:ची रचना हे श्रीमहाराजांचे वैशिष्ट्य.

या आख्यानांतून अनेक वृत्तांतील श्लोक, आर्या, दिंड्या, ओव्या, साकी, कामदा, अभंग, फटके, छक्कड, पोवाडे, वैशिष्ट्यपूर्ण पदे अशा विविध रचना श्रीमहाराजांनी समयोचिततेने केलेल्या आहेत. लावणी प्रकाराशी पूर्वायुष्यात निकटचा संबंध असल्यामुळे आख्यानात लावण्यांचे अनेक प्रकार विपुल प्रमाणात पहावयास मिळतात. त्यामुळे कीर्तनातील काव्याला एक वेगळाच ठसकेबाजपणा प्राप्त झाला आहे. गायकी वळणाची आणि विविध रागदारीत सुस्वरपणे तालबद्ध म्हणता येतील अशी अनेक पदे प्रत्येक आख्यानात आहेत. जवळ जवळ प्रत्येक आख्यानात सरासरी ५० ते ६० कविता आहेतच.

सामान्यत: इतरत्र होणाऱ्या हरिदासी कीर्तनांत बहुतांश वेळ पूर्वरंगाच्या घटपटांच्या खटपटीतच जातो. नाही म्हणायला शेवटी ५-७ पदांचे १०-१५ मिनिटांचे आख्यान सांगितले जाते. पण श्रीदासगणु महाराजांच्या कीर्तन-पद्धतीत पूर्वरंग छोटा पण नेटका आणि समर्पक असतो. पुढील संतकथेची तात्त्विक भूमिका काय आहे हे स्पष्ट करण्याएवढाच त्याचा उपयोग. श्रीमहाराजांचा सर्व भर संतकथा मोठ्या प्रेमाने गाणे याच्यावरच. आणि त्याचसाठी त्यांनी अतिशय रसाळ तरीही चित्तवेधक आणि उद्बोधक अशा सुसूत्र आणि प्रशस्त आख्यानांची रचना केली की, गायकीत फार न आडकता, फार विस्तार न करता केवळ पदांचा संदर्भ गद्यात जोडत गेलं तरी २ ते २।। तास सहज लागतात. थोडा अभ्यासू, बहुश्रुत आणि थोडी गायनाची जोड देणारा वक्ता असेल तर ३।। ते ४ तासही कीर्तन श्रोत्यांना खिळवून ठेवते. अतिशय सरस आणि विस्तृत तरीही सुसूत्र असे उत्तररंगाचे कथानक हा श्रीमहाराजांच्या कीर्तनपद्धतीचा विशेष आहे. आख्यानांचा विस्तार आणि त्यातील विविधता पाहिली की बुद्धी थक्क होते.

गायन हे कीर्तनातील एक महत्त्वाचे अंग आहे. शब्दरूपी सोन्याला सुवास आणण्यासाठी गानकला निपुणता हा एक आवश्यक गुण आहे. शब्दार्थ, भावार्थाला उचित अशा स्वररचनेमुळे अवीट गोडी आणि भावमाधुर्य निर्माण होते. या गोष्टी श्रीदासगणु महाराजांनाही मान्य आहेत

पण म्हणून कीर्तनाचे संगीत नाटक किंवा शास्त्रीय, उपशास्त्रीय संगीताची मैफल होऊ देणे हे त्यांना कदापि मान्य नाही. म्हणून केवळ गायकीच्या प्रदर्शनासाठी भाव सोडून, विचित्र अविर्भाव करत, उगीच ताना मारणे श्रीमहाराजांना मान्य नाही. त्यांचा भर स्पष्ट शब्दोच्चारावर आणि शब्दांचा भावार्थ जपण्यावर अधिक आहे. कुठल्याही परिस्थितीत स्पष्ट शब्दफेक आणि शब्दातील भाव यांना गायकीमुळे दुय्यम स्थान येता कामा नये. म्हणून कीर्तनात – 'गायन नेमस्त करावे' असा महाराजांचा स्पष्ट आदेश आहे. गायनाचे कीर्तनातील स्थान कसे असावे हे नेमके स्पष्ट करताना श्रीमहाराज म्हणतात,

**'शब्दरूपी हिऱ्याप्रत । बैसवावे गायनाचे कोंदणात ।**
**कां की कोंदणावीण हिऱ्याप्रत । किंमत नाही सर्वथा ।।**
**शब्दरूपी शंकर । गायनरूपी नंदीवर ।**
**बसविल्या शोभा साचार । उत्युत्तम येईल की ।।**

इतपत गायनाची आवश्यकता जरूर आहे. महादेव नंदीवर विराजमान आहते तोवर शोभा आहे. पण नंदीच जर महादेवावर स्वार झाला तर? कल्पनाही करवत नाही ना? तद्वतच कीर्तन हे शब्दप्रधान काव्यच असलं पाहिजे. करूण रसात, भक्तिरसात, आनंदात बुडवणारं काव्य, परखड पण हितकर उपदेश करणारं काव्य, झणझणीत अंजन देणारं काव्य, थोडक्यात शब्दप्रधान काव्य हा श्रीदासगणु महाराजांच्या कीर्तन पद्धतीचा विशेष आहे. पहाडी तरीही मधुर, कसलेल्या सुरेल आवाजाची, उपजत, विलक्षण स्वरज्ञानाची देणगी भेटलेल्या, श्रीमहाराजांचे शिष्य आणि मानसपुत्र असलेल्या श्री- दामुअण्णांच्या नेमस्त गायनाच्या साथीमुळे श्रीमहाराजांची कीर्तने अल्पावधीत उभ्या महाराष्ट्रात नावाजली असे स्वत: महाराज सांगत. समर्थ रामदासांच्या वरील सुरुवातीच्या 'यमन' रागातील नमनाच्या पदापासून उत्तरोत्तर श्रोत्यांच्या मनाचा ठाव घेत जाणाऱ्या सुरेख चाली, ही श्री दामु अण्णांचीच देणगी आहे. या वैशिष्ट्यपूर्ण आणि तबला वादकाचा कस पाहणाऱ्या चाली या श्रीदासगणु महाराजांच्या कीर्तनाचा विशेष आहेत.

'गायन नेमस्त करावे' याचबरोबर श्रीमहाराज कीर्तनकारांसाठी दुसरे महत्त्वाचे पथ्य सांगतात ते म्हणजे, 'विनोद सभ्य असावे.'

कीर्तनकाराने नेहमी हे लक्षात ठेवले पाहिजे की आपण उभे आहोत ही नारदाची गादी आहे. सर्वात वंदनीय असे ते स्थान आहे. त्या स्थानाला म्हणून नमस्कार करणाऱ्यांचे नमस्कार घेणाऱ्याने किमान त्या स्थानाचे पावित्र्य सांभाळले पाहिजे. तिथे उभा राहणाऱ्याने काही मर्यादा पाळाव्यात किमान तिथे उभे असताना तरी. श्रीमहाराज सांगतात की कीर्तनात विनोद अत्यल्प असावेत. जेवणात चवीपुरते मीठ असते तेवढेच! आणि ते अत्यल्प असलेले विनोदही अतिशय सभ्य असावेत. सभ्य विनोद कुठले? तर जे स्वत:चे गुरू, आई किंवा मुलगी यांच्यासमोर सांगता येतील ते. कीर्तनात उभे राहून असभ्य, अगदी अश्लील विनोदही सर्रास केले जातात. हा कीर्तनाच्या औचित्याच्या आणि पावित्र्याचा भंग आहे. असा कसा हरिदास? वर पुन्हा, 'आजकाल लोकांना हेच पाहिजे असतं म्हणून नाइलाजाने करावं लागतं अशी मखलाशी केली जाते. अरे लोकांना आवडतं म्हणून आपण अफू, गांजाही विकावा का? स्वत:च्या वक्तृत्वाच्या, बहुश्रुततेच्या बळावरती श्रोत्यांना उच्च अभिरूचिकडे नेण्याचे सामर्थ्य हरिदास म्हणवणाऱ्याकडे असावे अशी श्रीमहाराजांची अपेक्षा आहे. श्रीमहाराजांचं स्वत:चं व्यक्तिमत्त्व, त्यांचं वक्तृत्व, त्यांचं काव्य हे असंच श्रोत्याला उच्च अभिरूचीकडे नेणारं आहे हे श्रीमहाराजांच्या कीर्तन पद्धतीचं एक महत्त्वाचं वैशिष्ट्य आहे. श्रीदासगणु महाराजांचं वर्णन करताना श्री अनंत महाराज म्हणतात,

**यदीय हरिकीर्तने नयन ढाळिती आसवे ।**
**सुधाकरकरें जसा विमल चंद्रकांत स्रवे ।**
**सदैव कर जोडुनि करूण ज्यापुढे ठाकतो ।**
**समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।**

खरोखर असे कीर्तन असेल तर अनावश्यक गायकीचे प्रदर्शन आणि असभ्य, पाचकळ, सवंग विनोद यांची आठवणही श्रोत्यांना कशास्तव होईल?

स्वत:ला 'सकलसंत-चरणरज' असे मोठ्या अभिमानाने म्हणवून घेणाऱ्या श्रीदासगणु महाराजांच्या प्रतिभेचा बहर त्यांनी रचलेल्या संतचरित्रात्मक कीर्तनोपयोगी आख्यानांत आपणास अनुभवता येतो. अशी उणी-अधिक, पाऊणशे आख्याने श्रीमहाराजांनी रचली. ही आख्याने केवळ भोळ्या भाविकांनाच आकर्षित करतील अशी नाहीत तर विचक्षण श्रोत्यांनाही डोलवतील असे सामर्थ्य त्यांच्यात आहे. यातील काव्यरचना अत्यंत प्रसंगानुकूल सरस, प्रासादिक तरीही अतिशय सुबोध आहे. चरित्रकथेत वर्णन केलेले प्रसंग, त्यात साकारलेल्या व्यक्तिरेखा अगदी तंतोतंत आणि हुबेहुब श्रोत्यांच्या समोर उभे करण्याचे सामर्थ्य श्री महाराजांचे भाषेत आहे. कथेतील पात्रांमधले संवाद इतके खरे आणि जिवंत वाटतात की, श्रोत्याला जणू वाटत की, ही पात्रे प्रत्यक्ष अवती-भोवती असून मीही या संवादाचा एक भाग आहे. अधूनमधून अतिशय मार्मिक उपमा-रूपक-अन्योक्ती आदींचा योग्य वापरही केला जातो. आख्यानकथांमध्ये सर्व नवरसांचा परिपोष असला तरी प्रामुख्याने आणि ठळकपणे जाणवणारा म्हणजे भक्तिरस । श्रीदासगणु महाराजांचं वर्णन प.पू. अनंतमहाराज करतात,

**भक्तिगोदातीरवासं । भक्तिगोदाविहारिणं ।**
**भक्तिगोदाजलेस्नातं । वन्दे दासगणुं गुरुम् ।।**

अशा विलक्षण सत्पुरुषाच्या कीर्तनात श्रोता भक्तिरसात न्हावून न निघला तरच नवल. येवढेच केवळ या आख्यानांचे वैशिष्ट्य नाही तर अनेक धार्मिक व सामाजिक प्रश्न या आख्यानांच्या संविधानकातून श्रीमहाराजांनी मोठ्या कौशल्याने हाताळले आहेत. हे श्रीमहाराजांच्या आख्यानाचे अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे.

आख्यानाचे संविधानक रचताना महाराजांनी मूळ ऐतिहासिक घटनांना धक्का न लावता काही प्रसंग स्वत:च्या प्रतिभेतून उभे केले ज्यामुळे संतांच्या व्यक्तित्वाला अजूनही जास्त आकर्षक असा उठाव

मिळाला. हे श्रीमहाराजांच्या आख्यानांचे आणखी एक वैशिष्ट्य सांगता येईल. उदाहरणार्थ- श्रीसंत माणकोजी बोधले गावचे पाटील प्रतिवर्षी मोठ्या थाटाने पंढरपूरच्या वारीला जात. पण पुढे त्यांना इतके दारिद्र्य आले की, रिकाम्या हाताने एकट्याने पायी जाण्याची वेळ आली. पण अचल पर्वतासारखे धैर्य आणि निश्चय असलेले संत माणकोजी आपल्या पत्नीला म्हणतात, ''तू का काळजी करतेस''

**कुऱ्हाडीसी दे आणून मला कांते ।**
**पथीं जाता तोडिन सर्पणाते ।**
**तीच मोळी नेऊन पंढरीला ।**
**विकून नेइन वारीही सांगतेला ।।**

अगं तुला का वाटत की मी दारिद्र्यासारखी, वारी करतोय म्हणून. अग माझा थाट अजूनही तोच आहे. फक्त तुझा दृष्टिकोन बदल. बघ तरी माझा थाट!

**सन्निश्चयाची मन जाण गाडी ।**
**सद्भाव नी प्रेम हि बैलजोडी ।**
**म्या जोडिली त्यां अनुहातमाला ।**
**वैराग्यरूपी मम जाण शेला ।।**

हा विलक्षण संवाद संतांच्या व्यक्तिमत्त्वाला झळाळी देणारा तर आहेच पण सर्वसामान्य श्रोत्याला खूप काही शिकवणारा आहे.

लाखा कोल्हाटी आख्यानात लाखाभक्ताची हालाखीची स्थिती उपासमार पाहून भगवंत स्वत: त्याला अयाचित तरी घेण्याचा सल्ला देतात पण सत्पथवासरमणी असलेला हा संत भगवंताला ऐकवतो. ''देवा, आंधळा, लुळा, पांगळा, खुळा, बावळा, विद्यार्थी अग्निहोत्री, संन्यासी यांच्यासाठी अयाचित घेणे योग्य आहे. पण मी यातला कुणीही नाही.''

**मी लुळा, खुळा, संन्यासीहि नसे ।**
**सेवु ते अयाचित देवा मग रे कसे ।**

करूनिया खेळ बाजारी, खास भाकरी, ती न मिळे तरी, मरेन उपवासी । गणु म्हणे 'पटेना अविधी कृत्य संतांशी।' संतांच्या अवताराची भूमिका श्रीतुकोबाराय सांगतात-

**आम्ही वैकुंठवासी । आलो याच कारणासी ।**
**बोलले जे ऋषी । साच भावें वर्ताया ।।**

हे साच भावे वर्तणे म्हणजे काय हेच जणुं श्रीदासगणु महाराज लाखाभक्ताच्या वरील संवादाच्या आधारे किती सोप्या आणि समर्पक भाषेत सांगतात!

संतचरित्रे ही सर्वांसाठी अनुकरणीय आणि आदर्शभूत आहेत. संतांचं जीवन आदर्शभूत मानण्यातच सर्व समाजाचं ऐहिक आणि पारलौकिक कल्याण आहे. ही संतचरित्रे श्रीदासगणु महाराज म्हणतात तशी 'संतकथा सेव्य, श्राव्य हो सरशी' अशी आहेत. संतकथा सेव्य आहेतच पण त्या सेवन करण्यासाठी आधी आवडीने त्यांचे श्रवण होणे अत्यावश्यक आहे. आणि त्या अत्यंत श्रवणीय आहेतच पण संतांच्या ठिकाणी अशी दिव्यत्वाची प्रचीती देणाऱ्या आहेत की मी मी म्हणणाऱ्या नाठाळाचे कर या प्रचितीमुळे संतांच्या पायाशी आपोआप जुळतील श्रीदासगणु महाराजांच्या कीर्तनाचे हे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

श्रीदासगणु महाराजांच्या सर्व कीर्तन आख्यानातील काही थोड्या निवडक पदांचे, काव्याचे ओझरते रसग्रहण करावयाचे म्हटले तरी या लेखाचा विस्तार दसपटीने तरी वाढेल आणि इतके करूनही शेवटी त्या आख्यानांची गोडी, त्यांची पकड, त्यातील आनंद यथार्थपणे अनुभवता येणारच नाही. त्यासाठी श्री दासगणु महाराजांनी रचलेले असे आख्यान प्रत्यक्ष कीर्तनरूपातच ऐकावे लागते ना!

असा सुयोग आपल्या आयुष्यात लवकरात लवकर आणि उत्तरोत्तर येवो ही प्रार्थना करून लेखणी थांबवतो. मर्यादेयं विराजते।

**- श्री. विक्रम विनायक नांदेडकर**
पुंडलिकवाडी, नांदेड ४३१६०१.
फोन : ९४२१८६९०२२

***





**प.पू. अप्पा (श्री. अ. दा. आठवले) व**
**प.पू. दादा (श्रीदासगणु महाराज)**



**प.पू. अप्पा**




**गोरटे प्रतिष्ठान**



# असे घडविले पू. अप्पा

**सौ. कल्याणी अशोक शिवले (उज्वला काळे)**
एम.ए.

रत्न श्रेष्ठ की रत्नपारखी हा प्रश्न नेहमीच उपस्थित होतो. अर्थातच उत्तर असते रत्नपारखी. 'रत्न' स्वत:च्या गुणांनी श्रेष्ठ असतेच पण अशा रत्नांना अचूक हेरून त्यांच्या गुणांचा विकास घडवून आणण्याचे काम करतात रत्नपारखी. समाजावर त्यांचे अनंत उपकार असतात. जनहित साधण्याच्या उदात्त हेतूने हे रत्नपारखी या रत्नांना योग्य त्या तासांनी आकारबद्ध करून सुरेख कोंदणात सुशोभित करतात आणि समाजाला हा अलंकार बहाल करून समाजोद्धाराचे हे कार्य तटस्थ वृत्तीने करीत राहातात. श्री दासगणुंनी घडविलेले 'रत्न' म्हणजे श्री. अनंत दामोदर आठवले. श्री. दामुअण्णांशिवाय जसे श्रीदासगणुंचे चरित्र अपूर्ण आहे तसेच पू. अप्पां (प.पू. स्वामी वरदानंद भारती)च्या स्मरणाशिवाय हा अंक अपूर्ण राहिल.

श्री दासगणुंचे मानसपुत्र श्री. दामुअण्णा यांचा प्रपंच सुरू झाला. सुखाने चाललेल्या संसाराला दृष्ट लागली. लागोपाठ दोन अपत्यांना काळाने हिरावून घेतले. राधा दामोदरांच्या जीवनावर दु:खाचे सावट पसरले. पुढे २७ सप्टेंबर १९२० हा दिवस या दाम्पत्यांच्या जीवनातील आनंददायी दिवस ठरला. यादिवशी चि. अनंताचा जन्म झाला. अनंत चतुर्दशीचा जन्म म्हणून नाव अनंत ठेवले गेले. बाळ अनंत दिसामाजी वाढत होता, पण पूर्वानुभवामुळे सर्वांच्याच मनात काळजी घर करून राहिली होती. राधाबाई गरोदर असताना, एकदा चंद्रभागेवर स्नानाला गेल्या असता, पू. दादांच्या मनात आले, ''राधेचे अपत्य आपले म्हणवून वाढविणारे आपण कोण?'' आपण व दामोदराने निर्लेप जीवन जगावे अशीच जर गोदामाईची इच्छा असेल, तर हा पुत्र गोदामाईला अर्पण करावा आणि तिची ठेव म्हणूनच त्याचे संगोपन करावे. पू. दादांनी बालकाला गंगेला अर्पण करण्यासाठी सुंदर पाळणा बनवून घेतला. गोदावरी तीरावरील उमरी गोळेगांव येथे रामेश्वर नावाचे तीर्थक्षेत्र आहे, तेथेच लेकरू गोदेला अर्पण करण्याचे ठरविले. पू. दादांनी प्रार्थना केली, ''गोदामाय तुझ्याच तीरावरचे हे रोपटे तुला अर्पण करीत आहे, त्याचा प्रतिपाळ तूच कर.'' सौ. राधाबाई आणि श्री. दामोदरांनी बालकाला ठेवलेला पाळणा गोदेत सोडला. काही क्षणांत पाळणा हेलकावे खात दुसऱ्या तीराला पोहोचला. हटयोगाचे अभ्यासू पर्वता गोसावी यांनी त्वरेने पाळणा काठावर घेतला आणि छोट्या अनंताला पू. दादांच्या हातात दिले. दादांनी त्वरेने ते सोनुले राधेमातेच्या ओटीत घातले आणि म्हणाले, ''हा घे गोदेचा प्रसाद.''

दिसामाजी गोदेचा प्रसाद वाढत होता. पू.दादा या दुधावरच्या सायीची निगराणी एखाद्या सुगरणीला लाजवील अशा पद्धतीने करीत होते. छोटा अनंता अशक्त होता, त्याची टाळू भरावी, मांडीवर घेऊन तेल लावावे आणि आंघोळ घालावी असा प्रयोग ५-६ वर्षांपर्यंत चालला होता. सहा वर्षांपासून सोळा वर्षांपर्यंत पू. अप्पांना चार वेळा विषमज्वर झाला. पू. दादा अशा वेळी चि. अनंताची डोळ्यात तेल घालून शुश्रूषा करत. सतत त्याचे जवळ बसून राहत. विष्णुसहस्त्रनामांचे पाठ करीत.

श्री. दामूअण्णांच्या अकाली निधानाचे वेळी पू. अप्पांचे वय अवघे ५ वर्षांचे होते. पुत्रशोकाला आवर घालून श्रीदासगणुंनी पू. अप्पांना वाढविले. पू. अप्पा अशक्त म्हणून त्यांनी त्यांच्या शिक्षणाला उशीरा सुरुवात केली. १९४० च्या जून मध्ये पू. अप्पा शालांत परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांना संस्कृत व तत्त्वज्ञान विषय घेऊन एम.ए. व्हावयाचे होते. पण पू.दासगणुंचा आग्रह होता की, त्यांनी आयुर्वेद शिकावा कारण आयुर्वेद हे भारतीय भौतिक विज्ञान आहे. पू. दादांची इच्छा म्हणून पू. अप्पांनी पुण्याला नानल आयुर्वेद महाविद्यालयात प्रवेश घेतला. महाविद्यालयीन शिक्षण सुरू करीत असतानाच १९ फेब्रुवारी १९४१ रोजी पू. दादांनी त्यांचे दोनाचे चार हात करून टाकले.

यापूर्वी एकदा एका एकादशीला श्रीदासगणुंनी पू. अप्पांना श्री केशवराव महाराजांच्या समोर किर्तन करण्याची आज्ञा केली. पू. अप्पा पाठांतर करून ही किर्तन करताना काही गोष्टी विसरले. पू. अप्पा खूप नाराज झाले. त्यावेळी श्री. केशवराव महाराजांनी त्यांना जवळ घेतले, कुरवाळले आणि उपदेश केला की, ''प्रवाहात पडले की, तयारी होते, तेव्हा नाराज होऊ नकोस'' अर्थात घडलेही तसेच आणि पू. अप्पांनी उत्तम कीर्तनसेवा करून पू. दादांची अपेक्षा पूर्ण केली.

पू. दादांनी, पू. अप्पांचे खूप लाड केले. पण त्यांना एका

गोष्टीपासून सतत लांब ठेवले. ते म्हणजे राजकारण. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या भाषणाला जाण्याची पू. अप्पांना खूप ओढ तर श्रीदासगणुंचा त्याला सक्त विरोध. एकदा पू. अप्पा हट्टाला पेटले, स्वा. सावरकरांच्या भाषणाला पू. दादा जाऊ देत नाहीत म्हणून रुसले, उपाशी राहिले. पण पू.दादांनी त्याकडे अजिबात लक्ष दिले नाही. या रागाच्या तिरमिरीतच त्यांनी 'पालक पाल्य' हा लेख लिहिला.

१९४४ साली पू. अप्पा आयुर्वेद विशारद झाले. त्यानंतर त्यांनी आयुर्वेदातील पदव्युत्तर पदवीही संपादन केली. 'पारंगत'पदवी संपादन केल्यावर ते महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून काम करू लागले. पुढे आयुर्वेद महाविद्यालयाचे प्राचार्यही झाले. अध्ययनकर्त्यांचे सोयीकरीता त्यांनी 'व्याधिविनिश्चय' हा ग्रंथ लिहिला. आयुर्वेद महाविद्ययाला लो. टिळकांचे नाव दिले.

वयाच्या २१-२२ व्या वर्षी पू. अप्पांचे मन अस्वस्थ होते, नास्तिकतेकडे, अश्रद्धेकडे झुकत होते. अशावेळी पू. दादांनी त्यांना समजाविले. दासबोध, गाथा, ज्ञानेश्वरी यापैकी कोणताही ग्रंथ वाचण्यास सांगितले. त्याचे मनन, चिंतन करण्यास सांगितले. पू. अप्पांनी ही गोष्ट कसोशीने पाळली. हळूहळू त्यांची नास्तिकता नष्ट झाली. भारतीय संस्कृती आणि आचार विचार याबद्दल असलेल्या तिरस्काराचे रूपांतर प्रेमादरात झाले. पू. अप्पांचे जीवनात आमूलाग्र बदल झाला. गुरूपदेशाचे वेळी केलेल्या छात्रबोधांत पू. दादा पू. अप्पांना म्हणतात,

**''तुझी पाहून हुषारी । आनंद वाटे अंतरी ।**
**श्रम माझे झाले दुरी । तुझा सांभाळ करण्याचे ।।१।।**
**सोळा आणे सुगी होता । हर्ष शेतकऱ्याचे चित्ता ।**
**चीज झाले म्हणे आता । शेतात नित्य राबल्याचे ।।२।।**
**कविता करतोस सुंदर । प्रतिभा संपन्न साचार ।**
**भाषा प्रसन्न गंभीर । पाहून कौतुक वाटते ।।३।।**
**जे मला न साधले । तेच तुवा संपादिले ।**
**ज्ञान संस्कृताचे भले । हेतू माझा पुरविलास ।।४।।**
**आवडी गीर्वाण भाषेची । तुझी अत्यंत पाहून साची ।**
**नवे शोध लावण्याची । आवड तशीच बलवत्तर ।।५।।**
**माझे पारमार्थिक धन । मी करितो तुझे स्वाधीन ।**
**ते प्रयत्ने सांभाळून । मम सांप्रदाय चालवी ।।६।।**
**ईश्वराने तुजलागी । पात्रता दिली असे अंगी ।**
**तीच वृत्ति सवेगी । ईशभजने वाढवावी ।।७।।''**

१९६६ साली पू. अप्पांनी महाविद्यालयीन सेवेचा राजीनामा दिला. नोकरीत असताना २५-११-१९६२ साली पू. दादांचे निधन झाले. नोकरीत असतानाही पू. अप्पा दादांची परंपरा चालवित होते. पण सेवेतून मुक्त झाल्यावर त्यांना नवीन जीवनक्रमाचे वेध लागले. पू. दादांच्या शिकवणीतील ईश्वरभक्ती सर्वांपर्यंत पोहचवण्यासाठी ते अधिक कार्यरत झाले.

श्री बाबासाहेब गोरटेकर आणि परिवारातील अन्य लोकांच्या आग्रहाखातर त्यांनी गोरट्यात श्रीदासगणु प्रतिष्ठानची स्थापना केली. प्रतिष्ठानाची शान पायापासून कळसापर्यंत पोहचवली. श्रीदासगणुंनी घडविलेल्या या शिष्याने मागे वळून पाहिलेच नाही. आत्मोन्नती बरोबरच जनहिताय कार्यातही त्यांची चढती कमानच राहिली. पू. दादांचा जन्मशताब्दी महोत्सव, श्री राधादामोदर प्रतिष्ठानची स्थापना, कैलास मानससरोवर यात्रा, श्री संतविद्या प्रबोधिनीची निर्मिती, दामोदराश्रमांचा जीर्णोद्धार, पुणे विद्यापीठात श्रीज्ञानेश्वर अध्यासनाची स्थापना, इत्यादि अनेक कार्येत्यांनी तडीस नेली.

अशा पू. अप्पांची ग्रंथसंपदा ही अलौकिक आहे. पू.दादांच्या एका कवनाचे शेवटचे चरण त्यांनी वयाच्या अवघ्या पाचव्या वर्षी पूर्ण केले. वयाच्या बावीसाव्या वर्षी कोणत्याही संदर्भ ग्रंथाशिवाय श्रीकृष्ण कथामृत या महाकाव्याची रचना केली. गुणवत्ता आणि दर्जा यांत हा ग्रंथ अग्रेसर आहे. संतकवी श्रीदासगणु महाराज यांचे समग्र वाङ्मय खंड १ ते १०, १९६० ते १९६७ या कालावधीत पूर्ण केले. १९६१ साली निदानपंचक हा ग्रंथ लिहिला. बारा उपनिषदांवर त्यांनी भाष्य केले. १९७९ साली सर्वश्रुत मनोबोधाची निर्मिती केली. अनुवाद ज्ञानेश्वरी ओवीला ओवी असा १०,००० ओव्यांचा ग्रंथ अवघ्या ३ महिन्यांत पूर्ण केला, तर ८००० ओव्यांचे ब्रह्मसूत्र केवळ ७० दिवसांत पूर्ण केले. प्रस्थानत्रयीवर भाष्य केल्यामुळे ते आचार्यपदाला पोहोचले. ११०० पानी मनुस्मृती ग्रंथ त्यांनी समाधीच्या आधीच्या काही कालखंडात पूर्ण केला. श्रीदासगणु म्हणायचे, ''अनंताने मला मागे टाकले'' हेच खरे.

पू. अप्पांना हिमालयाचे आकर्षण वयाच्या चाळीशीपासूनच होते. त्यांनी चारीधाम यात्रा केल्या होत्या. हिमालयाच्या सान्निध्यांत राहणे त्यांना फार आवडे. १९७१ मध्ये हिमालयातच गंगोत्री येथे त्यांना प्रत्यक्ष श्री वरदनारायणांचे दर्शन घडले. वयाची सत्तरी झाल्यानंतर १९९१ मध्ये त्यांनी संन्यास घेतला व ते 'स्वामी वरदानंद भारती' झाले.

श्रावण वद्य १३ शके १९२४, दि ५/९/२००२ रोजी उत्तरकाशी येथे पू. अप्पांनी स्वेच्छा समाधी घेतली.

पू. अप्पांनी त्यांच्यावर त्यांच्या सद्गुरूंनी (श्रीदासगणु महाराज) दाखविलेला विश्वास सार्थ केला.

**श्रम माझे झाले दुरी । तुझा संभाळ करण्याचे ।**
**जे मला न साधले । तेच तुवा संपादिले ।**

संदर्भ / सहकार्य
१) श्रीदासगणु स्मरण महोत्सव स्मरणिका
२) डॉ. सौ. कल्याणी नामजोशी

**सौ. कल्याणी अशोक शिवले**
(उज्वला काळे)
१३३ ड/२ पर्वती, सिंहगड रोड,
साने गुरुजी स्मारका शेजारी, पुणे - ४११०३०.
मो. ९९२२२६९४६५

***



# ।। गुरू गुरुपणा दे शिष्याला ।।

**श्री. विश्राम नांदेडकर**
M.Tech. Instrumentation, GE कंपनी बंगलोर येथे ग्रुप लिडर म्हणून नोकरी.
प.पू. अप्पांचे नातू.

प. पू. दासगणु महाराजांचे अत्यंत रसाळ, भक्तिरसाने पूर्ण आणि गुरू-शिष्य नाते त्यातील अनन्यता वर्णन करणारे कीर्तनपयोगी आख्यान म्हणजे संत एकनाथ भाग-१. यामध्ये त्यांनी संत एकनाथ आणि जनार्दनस्वामी यांची कथा सांगितली आहे. गुरूच्या शोधात निघालेला छोटा एकनाथ वेगवेगळ्या मठात, कथेकऱ्यांकडे, ब्राह्मणांकडे जातो पण त्याला खरा सद्गुरू मिळत नाही. सगळे जण फक्त आपल्या कर्मकांडात, अहंकारात किंवा स्वार्थात गुंतलेले. तरीही छोटा एकनाथ निराश होत नाही. त्याला प्रत्यक्ष गोदामायनी सांगितलेले आहे की, तुझे सद्गुरू जनार्दनस्वामी आहेत, जा त्यांना शोध. ती कशी खोटे बोलेल? तो परत गोदावरीकडे जातो आणि तिला विनवणी करतो, ''माय तुझ्या सांगण्यावरून मी माझे सद्गुरू जनार्दनस्वामी यांचा खूप शोध घेतला पण ते काही मला भेटले नाहीत. सद्गुरूंच्या शोधात मी घर सोडून आलो, माझ्या प्रेमळ आजीला सोडून आलो, मी आता परत जाणार नाही. मला तू खरेच त्यांचे नाव व पूर्ण पत्ता सांग.'' गोदावरी प्रगट झाली. तिने एकनाथाला जवळ घेतले व म्हणाली, ''बाळा, मी तुला खोटे नाही बोलले. जनार्दनस्वामीच तुझे सद्गुरू आहेत. पण तुला मी असे थोडीच म्हणाले की, ते मठाधिपती असतील किंवा कोणी संन्यासी, कथेकरी असतील? तुझे शोध घेण्याचे ठिकाणच चुकले. असो. तू असे कर, देवगिरीच्या किल्ल्यावर जा. तेथील किल्लेदार जे आहेत तेच तुझे सद्गुरू जनार्दनस्वामी.'' एकनाथास अत्यंत आनंद झाला. तो लगेच देवगिरीच्या किल्ल्यावर गेला आणि जनार्दनस्वामींना, नव्हे जनार्दन पंतांना, जे तेथील अंमलदार होते, शरण गेला. सद्गुरूंनी आपल्या शिष्यास प्रथम ओळखले नाही पण मुलगा होतकरू आहे असे सांगून ते म्हणाले, ''अरे बाळा, मी काही सद्गुरू वगैरे नाही. मी एक साधा नोकरी करणारा अंमलदार आहे. तुला माझ्याकडे राहायचे असेल तर अवश्य रहा. पण रोजचा भाजीपाल्याचा हिशोब ठेव. एकनाथाला खूप आनंद झाला. त्याला असे यत्कींचीतही वाटले नाही की सद्गुरूंनी मला ज्ञान, भक्ती शिकवायची सोडून हे काय काम सांगितले. एका खऱ्या अनन्य शिष्याप्रमाणे गुरुशब्द प्रमाण मानून तो आपले काम निष्ठेने करू लागला. आपल्या मृदू, प्रेमळ, लाघवी वर्तनाने त्याने सगळ्यांना आपलेसे करून घेतले. एके रात्री हिशेबाचा मेळ लागत नव्हता म्हणून एकनाथ काळजीने पुन्ह-पुन्हा जमा-खर्च मांडू लागला. एक पैसा कमी पडत होता. शेवटी मध्यरात्रीच्या पुढे त्याला चूक मिळाली आणि तो आनंदाने टाळ्या वाजवू लागला. जनार्दनस्वामी त्यावेळी साधना-ध्यान करीत होते. ते बाहेर आले आणि त्यांनी एकनाथास काय झाले म्हणून विचारले. नाथाने सर्व गोष्ट त्यांना सांगितली. जनार्दनस्वामींना छोट्या एकनाथाच्या कर्तव्य निष्ठेचे, चिकाटीचे कौतुक वाटले. त्यांनी एकनाथाला जवळ घेऊन त्याला कुरवाळले. ते म्हणाले, ''अरे बाळा एका पैशाची चूक सापडली म्हणून तू इतका आनंदी झालास, जर तुला जन्म-जन्मातरीची चूक लक्षात आली तर.'' एकनाथ म्हणाला, ''स्वामी, गोदामायनी मला ह्याचसाठी आपणाकडे पाठवले आहे.'' स्वामींना आश्चर्य वाटले. ''प्रत्यक्ष गोदावरीने तुला पाठविले?'' ''हो स्वामी'' अरे, मग मी तुझी उगाच परीक्षा पाहिली. चल उद्याच मी तुला दत्ताचे दर्शन घडवितो.''

आणि दुसरे दिवशी जनार्दन स्वामींनी आपल्या शिष्याला दत्ताचे प्रत्यक्ष दर्शन करविले. एकनाथांना धन्यता वाटली. ही गुरु-शिष्याची जोडी वर्णन करताना प.पू. दादांनी आपल्या रसाळ आणि प्रासादिक वाणीने एक महत्त्वाची शिकवण अतिशय सहजतेने सांगितली आहे. गुरू-शिष्याच्या नात्यामध्ये गुरू सद्वर्तनी, सदाचारी अन् अपरोक्ष अनुभूती घेतलेला अधिकारी असावा लागतो तर शिष्यामध्ये कर्तव्यदक्षता, चिकाटी आणि आपल्या गुरूविषयी अनन्य भाव असावा लागतो. ह्या आनुषंगिक आपल्या पूर्वरंगाच्या पदात प.पू. दादा म्हणतात...

**परब्रह्ममूर्ती, सद्गुरू हाच एक जगती ।।धृ ।।**
**हरून जिवाचे जीवपण सारे शिव पण दे निज हाती,**
**कृपा कटाक्षे त्रिताप वारुन बटिक करवितो मुक्ती।।१ ।।**
**आत्मस्वरूपा पाहणे असल्या दर्पण द्या गुरु हाती**
**हे नच केल्या जाऊ गेल्या होईल अवघी फजिती ।।२ ।।**
**गुरु-गुरुपणा दे शिष्याला अनन्य झाल्या वरती**
**दासगणु म्हणे भेद नुरे ज्योतीस मिळाल्या ज्योती ।।३ ।।**

या पदातील शेवटचे कडवे अतिशय महत्त्वाचे आहे. गुरू आपल्या शिष्याला गुरुपणा देतो पण केव्हा? जेव्हा शिष्य अनन्य भावाने गुरूला शरण जातो तेव्हा. दासगणु परिवारातील अनेकांना हे पद अधिक जवळचे समजण्यास अधिक सोपे वाटते कारण त्यांनी प्रत्यक्ष हे आपल्या डोळ्यांनी पाहिले आहे, अनुभविले आहे. प.पू. दादा आणि प.पू. अप्पा यांची गुरू-शिष्य जोडी ही 'गुरू गुरुपणा दे शिष्याला' ह्याचे प्रत्यक्ष प्रमाण आहे.

आपल्या इतिहासात, परंपरेत अनेक गुरु-शिष्य जोड्या प्रसिद्ध आहेत. निवृत्तीनाथ- ज्ञानेश्वर, विसोबा खेचर- नामदेव, रामदास- कल्याणस्वामी, रामकृष्ण परमहंस- विवेकानंद इ. प्रत्येक जोडीची एक विशेषता आहे. त्यातील गुरु-शिष्य नात्याला वेगवेगळी छटा, रूपे आहेत. काही सद्‌गुरू मार्गदर्शका प्रमाणे आहेत. ते शिष्याला ज्ञान साधना, भक्तिसाधना इ. चे स्वरूप सांगतात, उपदेश करतात आणि शिष्य सांगितलेल्या वाटेने मार्गक्रमण करीत आपली उन्नती करून घेतो. काही सद्‌गुरू पित्याप्रमाणे बोट धरून आपल्या शिष्याला, आपल्या लेकराला साधनेच्या वाटेवर घेऊन जातात. ते फक्त मार्गदर्शन न करता, शिष्याची गरज ओळखून त्याचा पितृवत् सांभाळ करतात. संरक्षण करतात आणि प्रगतिपथावर घेऊन जातात. काही सद्‌गुरू आईप्रमाणे आपल्या शिष्याचे प्रेमाने, लाडाने, कधी-कधीतर रागानेही उद्‌बोध करून, संस्कार करून, त्याच्या भल्याची चिंता वाहून त्याला साधना मार्ग सहज सोपा करून देतात. तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे 'अधिकार तैसा दावियला मार्ग' या नियमानुसार सद्‌गुरू आपल्या शिष्याची काळजी वाहत असतो. परिस्थिती प्रमाणे, कदाचित वेगवेगळ्या भूमिकेतून सद्‌गुरू सदैव आपल्या शिष्याला योग्य मार्गाने घेऊन जात असतो.

प.पू. दादा आणि अप्पांचा जीवनपट पाहिला तर हीच गोष्ट आपणास प्रकर्षाने जाणवते. पोटच्या मुलाप्रमाणे सांभाळ केलेल्या आपल्या दामुचा-दामोदर आठवलेचा सुखी संसार पाहून दादांना अतिशय समाधान वाटे. त्याच्या हाती सर्व काही सोपवून आपण संन्यास घ्यावा हा विचार दादा करीत असतानाच परिस्थितीने, काळाने आपले दुष्टरुप प्रगट केले. क्षयाच्या बाधेने दामुअण्णा अकाळीच निवर्तले. त्यांच्या पोरक्या झालेल्या परिवाराला आता फक्त दादांचाच आधार होता. आईच्या मायेनी त्यांनी राधा माय आणि तिची दोन लेकरे अनंत आणि गंगा यांचा सांभाळ केला. त्यांना कधीही अनाथ असल्याची जाणीव होऊ दिली नाही. प.पू. अप्पांनी आपल्या ''माझे आजोबा, माझे सद्‌गुरू'' या लेखात वर्णन केले आहे की, दादांनी त्यांना इतके प्रेम दिले, इतकी माया केली, इतके लाड केले की, त्यांचे बालपण एखाद्या राजकुमाराप्रमाणे गेले. लहानपणापासून दादांच्या सानिध्यामुळे अनंतावर भगवतभक्तिचे, कीर्तनाचे संस्कार होऊ लागले. दादांना आवडणारा अनंताचा सगळ्यात मोठा गुण म्हणजे त्याची संस्कृत भाषेप्रति आवड आणि त्यावरील प्रभुत्व. दादांच्या प्रेमळ छायेत बालपण गेले आणि हळुहळू अनंता जसा तरुण होऊ लागला तसा त्यावर तत्कालीन सामाजिक परिस्थिती, शिक्षण याचा प्रभाव पडू लागला. त्याची वृत्ती थोडी नास्तिक, तथाकथित सुधारणावादी होऊ लागली. तो दादांशी तासन् तास वाद घालू लागला. आपल्या हिंदू धर्मातील त्रुटी, चुकांवर बोट ठेवून तो संपूर्ण परंपरेलाच दोष देऊ लागला. तेव्हा दादांनी पुन्हा आपल्या शिष्याला बोट धरून योग्य मार्गावर आणले. ते म्हणाले, ''अरे बाबा, मी तुझ्या इतका शिकलेलो नाही. त्यामुळे मला बौद्धिक वाद घालता येत नाही पण मला एक सांग, हजारो वर्षांपासून जी परंपरा चालत आली आहे, ती त्यात काही चांगले आहे म्हणूनच ना? का तुला असे म्हणायचे आहे की, इतकी वर्षे या धर्मात कोणीच विद्वान झाला नाही. तूच काय तो पहिला शाहाणा आहेस? शेकडो वर्षांच्या परकीय सत्तेमुळे जर या परंपरेत काही अनिष्ट रूढी निर्माण झाल्या असतील तर त्या तू अवश्य सुधारण्याचा प्रयत्न कर. पण एक सडका आंबा निघाला म्हणून तू सगळ्या झाडालाच दोष देणार का?'' प.पू. अप्पांनी त्यांच्या लेखात म्हटले आहे की, ''तो दिवस माझ्या आयुष्याला कलाटणी देणारा ठरला. तो सोनेरी दिवस होता. माझे मन-बुद्धी जी इंग्रज प्रेरित शिक्षणामुळे कलुषित झाली होती ती माझ्या सद्‌गुरूंनी, माझ्या दादांनी पुन्हा निर्मळ केली. माझा विचार करण्याचा दृष्टिकोनच बदलला. इतके दिवस आपल्या परंपरेला आरोपीच्या पिंजऱ्यात पाहणारा मी आता जे लोक त्यावर आक्षेप घेतात त्या आक्षेपांचे नीट विश्लेषण करू लागलो. आणि मला उमगले की, ते सर्व आक्षेप फोल आहेत. पूर्वग्रह दूषित आहेत.''

इतके दिवस फक्त दादांच्या प्रेमाखातर, त्यांची आज्ञा म्हणून पूजा-अर्चना करणाऱ्या अनंताला आता सद्‌गुरूंच्या कृपेने गोडी वाटू लागली. त्याने हिंदू धर्मातील सर्व ग्रंथ अभ्यासण्यास प्रारंभ केला. स्वत:च्या प्रयत्नाने, चिकाटीने विविध विषयातील ज्ञान आत्मसात केले. हा प्रसंग आपल्याला एकनाथ-जनार्दनस्वामी यांच्या कथेची आठवण करून देतो. दोन्ही ठिकाणी सद्‌गुरू जसे प्रेमळ, सद्‌वर्तनी, सदाचारी, अधिकारी आहेत तसेच ते शिष्याला आपल्या सोबत बोट धरून घेऊन जाणारे आहेत. शिष्यपण अनन्य भावाने आपल्या गुरूवर श्रद्धा ठेवून, त्यांच्या आज्ञेचे पालन करून आपली प्रगती साधून घेणारे आहेत. या साधनेच्या मार्गावर जात असताना एक वळण असे होते की जेव्हा सद्‌गुरू शिष्याला सांगतो, अरे यापुढे तूच तुझा मार्ग शोधशील. माझे मार्गदर्शन, माझा आशीर्वाद तुझ्यासोबत आहेच. पण आता तुला माझ्या सतत सोबतीची गरज नाही. हे, जसे एकनाथांना जनार्दनस्वामींनी सांगितले. तसाच एक प्रसंग प.पू. दादा आणि अप्पांमधेही झाला.

पदवी शिक्षणासाठी तत्त्वज्ञान हा विषय घेऊन पुढे राजकारणात प्रवेश करावा असे अप्पांना वाटत होते. पण दादांचा त्याला संपूर्ण विरोध होता. त्यांनी परस्पर पुण्याच्या वैद्य नानलांना सांगून अप्पांसाठी आयुर्वेदीय अभ्यासक्रमात प्रवेशही घेतला. लहानपणापासून अप्पांचे सगळे हट्ट, सगळे लाड पूर्ण करणारे दादा या प्रसंगी मात्र कठोर झाले होते. त्यांनी या प्रसंगी अप्पांचे काहीही ऐकले नाही. सद्‌गुरूंची आज्ञा म्हणून अप्पांनी दादापासून दूर पुण्यास आयुर्वेदाचा अभ्यासक्रम पूर्ण केला आणि पुढे कौमार्यभृत्य तंत्र, शल्यशालाकय, निदान पंचक, व्याधी विनिश्चय,

द्रव्यगुण संग्रह अशा अमौलिक ग्रंथांची निर्मिती केली. सद्गुरूंना आपल्या शिष्यातील सुप्त गुणांची पारख असते आणि त्याच्या जीवनातील ध्येयाची, कर्तव्यांची आधीच माहिती असते हेच खरे!

टिळक आयुर्वेद महाविद्यालयातील अध्यापन काळातही अप्पांनी दादांच्या परंपरेतील कीर्तन-महोत्सवादी कार्येअत्यंत निष्ठेने, श्रद्धेने सांभाळली. त्यांच्या कीर्तनात दादांच्या काव्यातील भाव आणि स्वा. सावरकरांचे भाषा प्रभुत्व एकत्र प्रत्ययाला येई. कर्तव्यप्रधान, ज्ञानयुक्त भक्तियोग काय असतो ते प्रत्यक्ष अनुभवायला मिळे. अप्पांच्या कीर्तनात श्रोते तल्लीन होऊन जात. दादा सगळ्यांना अभिमानाने म्हणत की, दामुने मला सुंदर संगीताची साथ करून पुढे आणले आणि अनंताने मला सर्वच क्षेत्रात मागे टाकले. आपल्या सद्गुरूंकडून अशी शाबासकी मिळाल्यावर अप्पांचे भावविश्व नम्रता, कृतार्थता, भक्ती आणि समर्पणाने भरून जाई.

आपल्या शिष्याने समर्थपणे सांभाळलेली परंपरा अतिशय प्रेमाने, आस्थेने वाढविलेला दासगणु परिवार आणि त्याचे विविध क्षेत्रातील प्रभुत्व, यश पाहुन, अनुभवून प.पू. दादा अतिशय समाधानाने कार्तिक वद्य त्रयोदशी शके १८८४ (इ.स. १९६२) साली ज्ञानेश्वर माऊलींच्या समाधी दिनी, वैकुंठवासी झाले. त्यांच्या जाण्याने दासगणु परिवारातील प्रत्येक जण दुःखी झाला पण कोणासही आपण पोरके झालो, अनाथ झालो असे वाटले नाही. कारण प.पू. अप्पा समर्थपणे सर्वांना धीर देण्यास उभे होते. त्यांच्या रूपाने सर्वांना दादांचे अस्तित्व सदैव जाणवत राहिले. श्री क्षेत्र गोरटे येथील दादांच्या वस्त्रसमाधीची स्थापना, दासगणु प्रतिष्ठानची निर्मिती आणि दासगणु परिवाराचा विस्तार हा सगळा इतिहास अभ्यासला की, 'गुरु गुरुपणा दे शिष्याला अनन्य झाल्या वरती, दासगणु म्हणे भेद नुरे ज्योतीस मिळाल्या ज्योती' या पदाचा प्रत्यक्ष अनुभव येतो. आपले हात सहज जुळतात आणि आपले मस्तक, मन-बुद्धी-हृदयासह या गुरु-शिष्यांच्या चरणी शरण जाते.

– पौष कृ. एकादशी शके १९३३

**– श्री. विश्राम नांदेडकर**
GE-JFWTC-EPIP, Phase 2,
व्हाइट फिल्ड रोड, बंगलोर -५६००६६
मो. : ०९८४५४८५१७८

***





# सद्‌गुरुसारखा असता पाठीराखा


**डॉ. कल्याणी माधव नामजोशी**

एम्.असी (इलेक्ट्रॉनिक्स), एम.अे. (संस्कृत), पीच्‌डी (संस्कृत वेदांत), साक्षेप समर्थांचा 'एका जनार्दनी', 'तेजाचं चांदणं' या पुस्तकांचे सहलेखन, गरवारे महाविद्यालयांत दोन वर्षे प्राध्यापक. वैदिक वाङ्मय, उपनिषदे, भगवद्‌गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध व इतर संतवाङ्मयावर व्याख्याने व प्रवचने


शके १८५५ (इ.स. १९३३) मध्ये श्री. मारुती सीताराम बारटक्के पू. दादांच्या (श्रीदासगणु महाराज) वाड्यात बिऱ्हाडकरू म्हणून पंढरपुरास गोविंदपुऱ्यातील 'दामोदर आश्रमा'त राहण्यासाठी आले. श्री. मारुतीराव मेरुमणी नामदेव शिंपी होते. त्यांच्या पत्नी सौ. इंदिराबाई. यांना दोन मुलगे व एक मुलगी अशी तीन अपत्ये होती. यापैकी मधला चि. छगन ह्याचा जन्म इ.स. १९२४ म्हणजे गीताजयंती शके १८४६चा.

वाड्यात राहावयास आले त्यावेळी चि. छगन नऊ वर्षांचा होता व दुसऱ्या इयत्तेत शिकत होता. त्यास शिक्षणाची आवड नव्हती. समवयस्क मित्रांसवे चकाट्या पिटणे आणि दिवसभर खेळणे असा कार्यक्रम असे. चि. छगन शाळेची वेळ झाली की दप्तर घेऊन घरातून बाहेर पडत असे आणि दिवसभर उनाड मित्रांबरोबर खेळून, तर कधी चित्रपट पाहून शाळा बरोबर सुटण्याचे वेळी घरी येत असे. पुढे तर चित्रपट पाहण्याचा त्याला नादच लागला आणि काही वेळेस तर वडिलांच्या खिशातले पैसेही तो काढून घेत असे.

एक दिवस पू. दादा बैठकीत असताना, श्री. मारुतीरावांनी चि. छगनला चिंचेच्या फोकाने बेदम मारायला सुरुवात केल्याचे खिडकीतून दिसले. चि. छगनचे कळवळून रडणे पू. दादांना ऐकवेना. म्हणून ते म्हणाले, ''अरे मारुती, लेकराला असा गुरासारखा का मारतोस रे? काय केले त्याने? रागाच्या भरात असे बेदम मारणे बरे नाही. यातून बरेवाईट झाले तर काय करशील?'' श्री. मारुतीराव म्हणाले, ''गेले तीन महिने कार्ट्याने शाळा बुडवलीय. सिनेमाला जातो हा. दप्तर घेऊन बाहेर पडतो, शाळा सुटण्याच्या वेळी बरोबर घरी येतो. याचं शिकण्यात अजिबात लक्ष नाही. आम्ही गरीब माणसं! आमच्या सारख्यांनी जगायचं तरी कसं?'' श्री. मारुतीरावांनी शाळेचे मुख्याध्यापक श्री. डोके गुरुजींची भेट व चि. छगन जवळजवळ तीन महिने शाळेत येत नसल्याबद्दलचे सर्व खुलसेवार सांगितले. पू. दादा त्यांना म्हणाले, ''अरे त्याला मारु नको. मी सांभाळू का त्याला?'' श्री. मारुतीराव कृतज्ञतेने हात जोडून म्हणाले, ''असे झाले तर पोराचे सोनेच होईल.''

तेव्हापासून म्हणजे शके १८५५ (इ.स. १९३३) पासून चि. छगन दादांच्या घरचा झाला. त्यावेळी चि. छगनचे वय होते नऊ वर्षे आणि चि. अनंताचे (पू. अप्पा / श्री वरदानंद भारती) वय होते तेरा वर्षे. पू. दादांनी चि. छगनला शाळेत न जाता रोज कोठे जातोस असे विचारल्यावर त्याने उत्तर दिले 'मला सिनेमा पहायला खूप आवडते. मी रोज सिनेमाचे बोर्ड गावातून जाहिरातीसाठी फिरवतो, मग मला सिनेमा फुकट पहायला मिळतो.' यावर पू. दादा म्हणाले, ''उद्यापासून शाळेत जायचं नाही. मी तुला रोज एक रुपया देत जाईन. तू सकाळपासून रात्रीपर्यंत सिनेमाचे सगळे खेळ पाहात जा.'' चि. छगनला खूप आनंद झाला. विनाकष्ट दिवसभर सिनेमाच सिनेमा! रोज रुपया घ्यायचा, सकाळी नऊ-साडेनऊ वाजता घराबाहेर पडायचे. बाहेर काहीतरी पैशा दोन पैशाचे चुरमुरे, भत्ता खायचा, मस्त सिनेमा पहात फिरायचे. थेट रात्री बारा वाजताच घरी यायचे. चि. छगनला वाटले, बस मजा आहे! हा आनंद चारपाच दिवस टिकला. नंतर त्याला रोज सिनेमाला जाण्याचा कंटाळा येऊ लागला. त्याने पू. दादांना सांगितले, 'दादा, मला आता सिनेमा नको. मी नाही सिनेमा पाहणार!'

पू. दादांनी त्याला हळूहळू लिहायला-वाचायला शिकविले. पुढे थोडा सराव झाल्यावर चि. छगनला काव्य लिहून घेण्यास सांगत असत. ते तो सुवाच्य अक्षरात लिहून काढत असे व त्याची त्याला आवड उत्पन्न झाली. त्यात आनंद वाटायला लागला. घरी फारच गरीबी होती. परंतु पू. दादांच्या सवे राहायला मिळाले, त्यामुळे मनाची एक अशी धारणा झाली की, मजेत प्रवास करणे, चांगले खाणे-पिणे, कपडालत्ता, भरीला लोक कौतुक करतात; पू. दादांबरोबर राहिले म्हणजे सर्व चांगले असते. तेव्हा तेच महत्त्वाचे वाटत होते. पू. दादांनी त्याला कीर्तनातील पदे शिकवण्यास सुरुवात केली व तोही रोज त्याचा सराव करीत असे. पू. दादा चि. छगनला लावणीचा ठेका, तोड, काही अवघड तालांचे वजन, शब्दांची फेक, सर्व काही समजावून सांगत असत. चि. छगनचा गळा गोड होता, हस्ताक्षर उत्तम होते. पू. दादा त्याला लहानमोठे बाजारहाटाचे काम सांगत असत. हळूहळू चि. छगन लेखन, गायन, व्यवस्थापनात तयार होऊ लागला.

त्याला गाण्याचे जलसे ऐकण्याचा नाद होता. पंढरपुरात गाण्याचा कार्यक्रम असला की, तसेच गणपती उत्सवात पुण्यास श्रीमती वहिनीबाई

जोगळेकरांच्या घरी रहायचे आणि रात्रभर गाण्याचे जलसे ऐकत हिंडत रहायचे. या आवडीचा अतिरेक झाला की पू. दादा वेगळ्या वेगळ्या शिक्षा करीत असत. मात्र, नवीन पदांना चाली लावताना या श्रवणाचा उपयोग होत असे.

चि. छगन १५ व्या वर्षी पू. दादांच्या परिवारात समाविष्ट झाला. बाल अनंताबरोबर तो त्याच्या धाकट्या भावासारखा घरात रहात असे. ती. राधाबाईंनी (पू. अप्पांच्या मातोश्री) त्याला पोटच्या पोरासारखा जीव लावला. पू. दादा त्याची काळजी घेत. क्वचित कठोर होऊनही त्याला शिस्त लावत.

चि. अनंतासमोर कुणी चि. छगनला उणेदुणे बोलले/दुखावले तर बाल अनंता त्याची बाजू घेऊन भांडत असे. बाहेर कुणी 'छगन' असा एकेरी उल्लेख केला तर तो म्हणे 'तो माझा भाऊ आहे' वयाच्या विशीपासून तर चि. छगन - श्री. छगनराव किंवा 'छगनकाका' झाले.

पू. दादांबरोबर प्रवास त्यामुळे त्यांच्या भरपूर ओळखी झाल्या. लोकांना पू. दादांची पदे गाऊन दाखविण्याची त्यांला फार हौस असे. पू. दादा वर्णन करतात, तशी रायपुरी साखरेची मिठ्ठास त्यांच्या बोलण्यात असल्याने पू. दादांचा लोकसंग्रह होताच तो दृढ व्हायला आणि वाढायला वेळ लागला नाही. पू. सोनूमामा दांडेकरांपासून ते सन्माननीय श्री. सी. डी. देशमुखांपर्यंत वेगवेगळ्या क्षेत्रांतली मंडळी श्री. छगनकाकांची आठवण करीत पंढरपूरच्या घरी येत असत.

शके १८६४-६५ (इ.स. १९४२-४३) पासून उत्सवाची कामे, बाजारहाट, पू. दादांची सेवा, लेखन, पदांना चाली बसविणे ही सर्व कामे चि. छगन अत्यंत जबाबदारीने करू लागला.

पू. दादांचा 'श्री शंकराचार्य चरित्र' हा ग्रंथ चि. छगनने जवळजवळ एकट्यानेच लिहिला म्हणायला हरकत नाही. तसेच हा ग्रंथ आदरणीय ह.भ.प. श्री. केशवराव महाराज देशमुख यांच्याकडे वाचून दाखविण्यासाठी पू. दादांच्या बरोबर चि. छगन जात असे. पू. केशवराव महाराजांनी चि. छगनबद्दल पू. दादांच्याकडे चौकशी केली आणि चि. छगनला जवळ बसवून घेतले आणि म्हणाले, 'अरे वा! तुझे अक्षर फार सुंदर आहे; बाळा! आज महाराजांच्या बरोबर रहायचे म्हणजे तुला मजा वाटत असेल. सर्वच चंगळ आहे म्हणून तू दादांच्या सहवासात राहत असशील तर लक्षात ठेव, तुझ्या पूर्वपुण्याईने, भाग्याने लाभलेले पू. दादांचे चरण सोडू नकोस. अन्य कोणत्याही आकर्षणाला बळी पडू नकोस. यांची अत्यंत श्रद्धेने, अनन्यतेने, निष्कामतेने सेवा करून तुझ्या जीवनाचे सार्थक करून घे. यांच्या सेवेमुळे इतर सर्व गोष्टी तुला सहज प्राप्त होतील. तेव्हा तू हे लक्षात ठेव.' तेव्हापासून चि. छगनच्या मनाची धारणाच पालटली.

श्री. अनंतरावांचा विवाह शके १८६३ (इ.स. १९४१) मध्ये झाला. त्यानंतर तीन महिन्यांनी श्री. छगनकाकांचा विवाह नगरजवळील कर्जतच्या चांगल्या खानदानी आणि संतपरंपरा लाभलेल्या घराण्यातील सुस्वरूप, सुस्वभावी 'वत्सला' हिजबरोबर झाला. पू. दादांनी विवाहास जाताना श्री. छगनरावांच्या बरोबर पैसे, मुलीसाठी दागिने वगैरे दिले आणि सांगितले, 'हे पहा छगन, मुलीकडच्या लोकांकडून काही घ्यायचे नाही. आपण लग्न करून घ्यायचे.' श्री. छगनराव व सौ. वत्सलाबाई यांचा संसार पू. दादांच्या घरातच सुरु झाला. मोठ्या खटल्याचे घर, घरात कामही खूप असे. सौ. वत्सलाबाई पडेल ते काम हसतमुखाने करीत असत. तसेच त्या सर्वांबरोबर समरसून गेल्या. त्यांच्या मनात कधी पू. दादांना सोडून दूर कुठे जावे असे आलेच नाही.

शके १८६५-६६ (इ.स. १९४३-४४) श्रीरामनवमी उत्सवात दोन वर्षे सकाळी ८ ते ९ पू. साईबाबांसमोर पू. दादांनी श्री. छगनकाकांना भजने म्हणण्याची आज्ञा केली. पू. दादांची आज्ञा झाली आणि श्री. छगनकाकांनी भजने गायली इतकेच. पू. दादांनी श्री. छगनरावांना त्याची ५० रु. बिदागी देण्यास श्री. गोविंदसावकार कवटीकवार यांना सांगितले. श्री. छगनकाकांची अशी धारणा आहे, की या घटना प्रसंगाने पू. बाबा आणि पू. दादांच्या कृपाशीर्वादाने गानकलेत त्यांना प्रवेश मिळाला. पुढे पू.दादांनी आख्यानातील कवनांच्या आणि उपदेशपर पूर्वरंग पदांच्या चाली त्यांना शिकविल्या व त्या श्री. छगनरावांच्याकडून घोटून घेतल्या. रोज तास-दोन तास तर कधी तीन-तीन तास सुद्धा त्या चालींचा अभ्यास करून घेतला. लावणी, पोवाडे, छक्कड, कव्वाली इत्यादी चाली चुकल्या तर रागवतही असत व त्या पूर्ण बिनचूक येईपर्यंत पू. दादा घोटूनही घेत असत. शके १८६६ (इ.स. १९४४) च्या सुमारास काही दिवस पू. दादांनी श्री. छगनरावांना पू. अप्पांच्या कीर्तनात मागे झांज घेऊन साथ करण्याची आज्ञा केली.

पू. दादांना याच काळात पोटदुखीचा अतिशय त्रास होऊ लागल्यामुळे पू. दादांचा मुक्काम मुंबईला श्री. भवानी शंकर सशीतल यांचेकडे विलेपार्ल्याला होता. तेथे पू. अप्पांचे अत्यंत रसाळ कीर्तन लोकांनी प्रथमच ऐकले आणि मुंबईत त्यांना अनेक ठिकाणाहून कीर्तनासाठी आमंत्रणे येऊ लागली. त्यावेळी श्री. छगनकाकांना पेटी वाजवता येत नव्हती. ज्यांच्याकडे कीर्तन असे तेच पेटीवादकांना बोलवत, पण त्या पेटीवादकांस पू. दादांच्या ढंगाच्या चाली अजिबात वाजवता येत नसत. त्यामुळे पदे म्हणताना अडखळल्यासारखे होई. तेव्हा पू. अप्पा म्हणाले, 'अरे छगन! आता तूच पेटीवर बसून पदे म्हणत जा ना!' त्यावर श्री. छगनकाका म्हणाले, 'आप्पा! मला त्यातले काहीही येत नाही व सुरांची माहिती नाही, तेव्हा पेटी कशी वाजवू?' त्यावर अप्पा म्हणाले, 'अरे नुसता स्वर धर, पुढे जमेल तसे पाहू.' पू.अप्पांच्या कीर्तनात त्यानंतर पेटीवर स्वर धरून श्री. छगनकाका पदे म्हणू लागले. तसेच आरोह अवरोहाचे पहिले दहा धडे नियमाने वाजवण्यास सुरुवात केली व अल्पकाळात पंधरा ते वीस दिवसात पेटी वाजवता येऊ लागली. पुढे चांगला सराव झाल्याने नेमकेपणाने पदेही म्हणता येऊ लागली. स्वर समजून सुरात गाणे आपोआपच साधले. मुळात चाली व पदे दोन्ही उत्तम होतेच त्यात श्री. छगनकाकांचा गळाही गोड! आता उत्तम गाण्याची व पेटीची भर पडल्याने साथ बहारदार होऊ लागली. पू. दादांच्या कीर्तनोपयोगी पंचाऐंशी आख्यानातील जवळजवळ तीनशेच्यावर असलेल्या चालींचा रागदारी शास्त्रोक्त पदे, लावण्या, छक्कड, सवाल,

कव्वाली, पोवाडे, गजल नाट्यगीतांच्या चालीवर असलेल्या पदांचा श्री. छगनकाकांनी स्वतंत्र अभ्यास करून ते आत्मसात् करण्याचा प्रयत्न केला. श्री. छगनकाका रोज पहाटे उठून खर्जाचा अभ्यास करणे आणि रोज दोन तीन तास नियमाने रियाज हे सर्व न कंटाळता करीत. पेटी उत्तम प्रकारे हुकमी वाजवता येऊ लागली. यासाठी श्री. छगनकाका श्री. अप्पाची कृपाच मानत, तसेच परमेश्वर सद्गुरूंची कृपा यामुळेच साध्य झाले असे म्हणत.

पार्ल्याच्या वास्तव्यात पू. आप्पांची जी कीर्तने झाली ती भावुकता, निस्पृहता, वक्तृत्व, विद्वत्तेचा प्रभाव सर्व काही चढत्या वाढत्या क्रमाने यशाचे परमोच्च शिखर गाठत होते. त्यात पेटीच्या साथीचा भरणा आटीव दुधाला केशराच्या सुगंधासारखा झाला. लोक कीर्तन श्रवणात अक्षरशः वेडे होत. गाणे आणि वक्तृत्व या दोहोंच्या मिलापाने पू. आप्पांच्या कीर्तनाची कीर्ती फार दूरवर पसरत होती आणि पू. दादांना अधिकाधिक संतुष्ट करत होती. पू. दादा नेहमी श्री. छगनकाकांना म्हणत, 'छगन, तू माझी सेवा फार करतोस त्याबद्दल तुला काय द्यावे?' त्यावर छगनराव म्हणे, 'तुम्ही माझे बालपणापासून सर्वच केले आहे. तुम्ही माझ्यासाठी काय केले नाही सांगा! तुम्ही माझ्यासाठी काही करावे असे काही शिल्लकच राहिले नाही!' त्यावर पू. दादांनी म्हणावे, 'छगन, तसे नाही रे! तुला एखादे घर घेऊन द्यावेसे वाटते. आता यापुढे माझ्या अनंताला सांभाळ. त्याचा तुझ्यावर जसा जीव आहे तसा तुझाही त्याच्यावर राहू दे. एकमेकांशी अगदी सख्ख्या भावाच्या नात्याने वागा.' त्यावर श्री. छगनकाका पू. दादांना म्हणाले, 'दादा! मी तुम्हाला आणि आप्पांना सोडून कोठे जाऊ? मला कुठेच जाणे रुचणार नाही. तुम्ही दोघे माझ्या पाठीशी असताना मला इतरांची गरज काय?'

पू. दामू अण्णांची आठवण व्हावी असे सर्व कार्य पू. दादांच्या वृद्धापकाळात व पू. अप्पांच्या ऐन उमेदीच्या काळात श्री. छगनकाकांनी केले. पू. दादांची सेवा अत्यंत कष्ट घेऊन केली. पू. अप्पांच्या कीर्तनात गायनाने पू. दादांच्या अवघड पदांची साथ करून संगीताची बाजू तर भक्कम केलीच आणि त्याचबरोबर पू. अप्पांचा पत्रव्यवहार, उत्सव, महोत्सवाचे नियोजन, कार्यवाही, परिवार जनांचे संपर्क सांभाळणे, पू. अप्पांची विश्वासाची कामे करणे अशी एक ना अनेक कामे श्री. छगनकाकांनी पार पाडली. पू. दादा अतिवृद्ध झाल्यानंतर त्यांचे आजारपण, औषधपाणी, घरातील सामानाची ने-आण, भाजीपाला आणण्यापासून कीर्तनात साथ करण्यापर्यंत सर्व कामांचे दायित्व श्री. छगनकाकांनी अंगावर घेतले. पू. दादांच्या अंतःकरणात श्री. छगनकाकांच्या सेवेची नोंद अत्यंत आत्मीय भावनेने होती.

स्वतःला मूलबाळ नव्हते पण श्री. छगनकाकांनी पू. अप्पांच्या मुलांवर पोटच्या मुलांसारखे प्रेम केले. मुलांचे हस्ताक्षर घडविणे, त्यांना गायन शिकविणे ही कामे सख्ख्या काकाच्या नात्याने केली. पू. दादांपासून चि. विश्रामपर्यंत चार पिढ्यांना कीर्तनात साथ श्री. छगनकाकांनी केली आहे.

पू. दादांनी त्यांच्या मृत्युपत्रान्वये पू. अप्पांना सर्व स्थावराचा वारस केले होते. परंतु पू. अप्पांनी दादांच्या पश्चात स्वतःस प्राप्त झालेल्या स्थावर जंगमापैकी श्री. छगनकाकांची सर्व वागणूक लक्षात घेऊन इच्छापत्रकरून गोरट्याचे घर व गोरट्याचे शेत हे चि. छगन यांना देण्यात यावे असे ठरविले. पू. अप्पांनी श्री. छगनकाकांना दोन तीन वेळा गोरट्याची स्थावर स्वीकारण्याविषयी पुन्हा पुन्हा आग्रहपूर्वक सांगितले, तेव्हा श्री. छगनकाकांनी 'मला ते घर नको. दादा गोरट्याला राहत होते, ते आपल्या परिवारातील भाविकांचे श्रद्धास्थान आहे; तेव्हा भाविकांच्या दर्शनासाठी तसेच ठेवावे, तेच योग्य होईल असे मला वाटते.' असे सांगितले. याप्रमाणे पुढे योगायोगाने तसे घडलेही. पुढे गोरट्यास श्रीमद् सद्गुरू श्री दासगणुमहाराज प्रतिष्ठानची निर्मिती झाली. तेथे व्यवस्थापक म्हणून श्री. छगनकाका आणि सौ. वत्सलाकाकूंनी रहावे असे सर्वानुमते ठरले. त्याप्रमाणे श्री. छगनकाकांनी गोरट्यास निवास केला. प्रतिष्ठान सुरू झाल्यापासून शेवटपर्यंत त्यांनी तिथे सेवा रुजू केली. श्री. छगनकाकांनी त्यांचे पू. दादांच्या चरणी समर्पित केलेले जीवन पू. अप्पांच्या सहवासात स्थिर झाले आणि श्री दासगणु प्रतिष्ठानच्या सेवेत, विश्वस्त म्हणून व्यवस्थापक म्हणून निःस्वार्थपणे, निरलसपणे अखेरपर्यंत कार्यरत राहिले. श्री एकनाथांचे जसे उद्धव तसे पू. अप्पांचे श्री. छगनकाका!

– तेजाचं चांदण या ग्रंथावरून संकलित.

**संपादन : डॉ. कल्याणी माधव नामजोशी**
१०१२/४ शिवाजीनगर, 'पुष्करराज' मित्रनगर कॉलनी,
पुणे – ४११०१६, फोन : २५६५४८६६



# संत दासगणुंच्या भक्तिकाव्याचा मेरुमणी – 'उद्धवागमन'

**डॉ. श्री. ग. प्र. परांपजे**

एम्. ए.बी.एड., पी.एच्.डी. (संत दासगणु वाङ्मयीन अभ्यास) पुणे, न्यू इंग्लिश स्कूल येथे उपप्रमुख म्हणून ३२ वर्षे सेवा. ५०० च्या वर लेख प्रकाशित. २० वर्षे शिक्षक संघटनेचे कार्य. विपुल लेखन. मुख्यत: संत व त्यांचे वाङ्मय आणि धार्मिक विषय, श्रीकृष्ण कथामृतातील संस्कृत वंदनांचे मराठी रूपांतर, रेडिओवर मुलांसाठी आकाशदर्शन कार्यक्रम

भक्तिरसप्रधान कीर्तनाख्यानांनी ज्यांनी एकेकाळी अवघ्या महाराष्ट्राला वेडे केले होते, नाट्यमंदिरे ओस पडत आणि उघड्या माळरानावरही ज्यांची भक्तिरसपरिप्लुत कीर्तने गर्दी खेचीत त्या श्री दासगणुंचे भावोत्कट खंडकाव्य 'उद्धवागमना'चा परिचय येथे पहावयाचा आहे. या खंडकाव्यात भक्तिरसाचा उत्कर्ष झालेला दिसतो, भगवत्प्रेमाचा परमोत्कर्ष शास्त्रकारांनी गोपींच्या प्रेमात प्रत्ययाला येतो असे सांगून 'प्रमाणं तत्र गोपिका:' असा सिद्धान्तच केला. नारदांनीही 'यथा व्रजगोपिकानाम्' असे सूत्र आवर्जून ग्रंथनिबद्ध केले.

विदग्ध महाकाव्यातून मानवी जीवनाचे विविधांगी दर्शन घडते, तर खंडकाव्य मानवी जीवनाच्या एखाद्या अंगाचे रसोत्कट दर्शन घडविते. कथाही त्यात अत्यल्पच असते. तो भावोत्कर्ष मनाला ओढ लावतो. संत श्री दासगणुंचा शास्त्रीय अभ्यास नसूनही त्यांची प्रतिभा उद्धवागमन * या खंडकाव्याच्या विषयाशी अशी झोंबली की तिने ते शास्त्रीय विषय सहजपणे या रचनेतून प्रत्ययाला आणिले. हे काव्य मार्मिक दृष्टान्तांनी खुललेले आहे, सूक्ष्म निरीक्षणांनी आकर्षक झाले आहे. प्रासादिकता तर पूर्णपणे उतरली आहे. उपमा, उत्प्रेक्षा, व्याजोक्ती, वक्रोक्ती सारे काही यात आहे. मात्र या भक्तिरसपरिप्लुत काव्याचा समारोप करताना ते म्हणतात, ''ना काव्यवैभव जया कविता प्रबंधा। साधे सुधे ..... काव्य असे मुकुंदा।'' (पृ. ५६) येथे त्यांचे काव्यवैभव नाही म्हणणे म्हणजे त्यांचा केवळ विनय! 'विद्या विनयेन शोभते' असा. 'मला कवित्व समजत नाही ही साऱ्याच संतकवींची शालीनता आत्ममंडनार्थ होती' हे डॉ. श्री. व्यं. केतकरांचे विधान येथे पूर्णांशाने लागू पडते. शांडिल्य-नारद भक्तिसूत्रे आणि मधुसूदन सरस्वतींचे 'भक्ति-रसायन' यावरील भावलेखन करूनही जणू त्यांचे चित्त समाधान पावले नव्हते ते आता त्यांना या कृष्ण-गोपींचा प्रेमविषय असलेल्या 'उद्धवागमन' काव्यनिर्मितीनंतर लाभले!

'उद्धवागमन' काव्याची रचना चार सर्गात असून ती सर्वच अक्षरगणवृत्तात आहे. त्यांच्या नेहमीच्या ओवी छंदात नाही. ओवी छंदाइतकेच अधिकाराने ते अक्षरगणवृत्तही वापरतात. 'लघुस्रग्धरा' या एका नव्या वृत्ताची भर (क्र. ४१) त्यांनी छंदशास्त्रात घातली आहे. एकूण श्लोकसंख्या १९१ आहे. भगवान् श्रीकृष्णांनी गोप-गोपीना दिलेला निरोप उद्धव गोकुळात जाऊन सांगतात नि परत येतात एवढीच कथा. याभोवती मांडलेला रसोत्कट भाव-प्रपंच पाहिला की दासगणुंच्या प्रतिभेचे दर्शन घडते!

**सर्ग पहिला :** गोपगोपींना निरोप सांग म्हणून उद्धवाशी भगवान कृष्ण बोलू लागले. त्यावेळी गोकुळाच्या गोपींच्या स्मरणाने भावविव्हल झालेले कृष्ण दासगणुंनी अप्रतिम रेखाटले आहेत. देव, ''उद्धवा, माझी स्थिती विचित्र झाली आहे. अस्वस्थ आहे. अरे अक्रूराने मला मथुरेत आणले त्यावेळी सारे गोप-गोपी रथापुढे आडव्या पडल्या. 'जा जाणे तर तुडवित हृदया' असा त्यांचा भाव होता. शेवटी निरुपायाने मी म्हटले, गोपींनो मी तुमचा विकला गेलो आहे. मी माझे मन तुमच्याकडे जामीन ठेवतो. तेव्हा माझी सुटका झाली! (१/३ ते ५) म्हणून सख्या, उद्धवा ते माझे जामीन पडलेले मन परत आण' असे म्हणून देव वाकले!

मन जामीन ठेवल्याची ही कल्पनाच फारच हृद्य आहे. त्यातूनच गोपींची भक्ती भगवंताला अत्याधिक प्रिय होती हेच सुचविले आहे. उद्धवाला ज्ञानाचा अहंकार असल्यामुळे देवाच्या म्हणण्यातील खोच त्याच्या ध्यानात आली नाही. सामान्य निरोप समजून तो देवाला म्हणतो, देवा एवढी काकुळती कशाला? या निमित्ताने तुझ्या भक्तांचे दर्शन मला घडेल! भगवान् म्हणतात,

**''धेनू सवत्स बघता तुजला शिरांनी।**  
**वंदून आणतील बा नयनात पाणी।।**  
**वाणी जरी तुजप्रती नच त्या पुसाया।**  
**पाठीवरून फिरवी कर रीझवाया।।**

येथे दासगणुंनी गाई, गुरे, पक्षी इ. सर्वांचे कृष्णावरील प्रेम व्यक्त केले आहे. त्या आठवणी सांगताना देवाचा स्वर कंपित झाला, नेत्र प्रेमाश्रूंनी वाहू लागले. त्याने उद्धवापुढे 'बद्धांजली करून वंदि पदारविंदा। ना एक शब्द वदवे पुढती मुकुंदा।'' दासगणुंचे भक्तिरसाने ओथंबलेले हृदय येथे दिसून येते.

उद्धव गोकुळात आले. येताच पक्षी कृष्णचिंतनात निमग्न असलेले त्याला दिसले. गाई गुरे कान टवकारून कृष्णध्वनी ऐकत आहेत हे पाहून तो भारावला। क्षणार्धात त्याची मनोवृत्ती म्हणू लागली – ''ही मृत्तिका असुनि युक्त पदांनी। ना तीर्थ थोर उरले जगि ईजहूनी।। गोकुळाला तो तीर्थ म्हणतो यातली रमणीयता लक्षणीय आहे.

गोपांनी रथ पाहिला. अशाच एका रथाने कृष्णाला आमच्यापासून हिरावून नेले त्यामुळे खंतावलेल्या गोपांनी हा रथ धार्जिणा नाही म्हणून त्यावर दगड फेकले, रथ पाडला. ते पाहूनही उद्धव शांत होता. 'यांची म्हणे हरिचिया पदि साच निष्ठा!' तो रागावला नाही. दासगणुंनी हा धीरगंभीर उद्धव छानच रेखाटला आहे. त्याचे मोठेपण त्याच्या या चिंतनातच आहे.

**सर्ग दुसरा :** उद्धवाचे स्वागत करणारी यशोदा अतिशय शालीन स्वरूपात चित्रित झाली आहे. ती उद्धवाचे स्वागत 'डोईवरती निज पल्लवाला। घे रक्षिणासी कुलीच्या नयाला। अशा प्रकारे करते. कृष्णबलरामांची चौकशी करते. कृष्ण राजा झाल्याचे जिला मान्यच नाही 'मला शिशुच वाटतो, बघू कशास त्याच्या नया' असा आपला मातृत्वसिद्ध हक्क ती प्रस्थापित करते. कृष्ण प्रेमाने ओथंबलेले तिचे हृदय दासगणुंच्या मुखातून असे व्यक्त होते –

**''खाई हरी हळुच चोरून दूध लोणी।**
**चित्तीं बळेच भय ते मम बाळगोनी।।**
**जाता तयास धरण्या उलथी दुधाणे।**
**'यांच्या'कडे बसत येऊन दीनवाणे।।**
**माझ्याकडे परि बघे बहु भीत भीत।**
**त्या पाहता मदिय कोप विरे क्षणात।।''**

यथार्थ शब्दचित्राचा हा नमुना लक्षणीय आहे.

हातात कृष्णाचे विटि–दांडू पावा धरून म्हणते, या साऱ्या वस्तू मी नीट सांभाळल्या आहे, केंव्हा हव्या म्हणाल्या तर देता येतील. संतांच्याही अभंगात 'चरित्र ते वाटे गावे, केले देवे जे गोकुळी' असा आलेला उल्लेख किती महत्त्वाचा आहे, हे ध्यानात येते.

आता कृष्णाच्या सवंगड्यांनाही हे वृत्त कळले. ते सारे जमले. एकेकाने आपल्याही आठवणी सांगितल्या. त्या ग्रामीण बालकांच्या भोळ्या मनोवृत्तीचेही यथार्थ रेखाटन येथे मिळते. एक म्हणतो, 'अहो आमचा कृष्ण तेथे ही गायी चारायला नेतो का हो? पेंद्या म्हणतो, 'गेला न एक क्षणही हरिवीण माझा। आम्ही कुडी असू अम्हां यदुराय राजा।' वाकड्याची मनोभूमिका अधिक उंच दाखविली. तो म्हणतो, ''आम्ही मारिले फार येथे तयाला। परीना हरी रुष्ट केव्हांही झाला!' सुदामा विचारतो, रानातून आल्यावर इथल्यासारखी त्याची कुणी दृष्ट काढतात का हो?' विविध मनोवृत्तींचे दर्शन विविध प्रकारे व्यक्त झाले तरी त्या सर्वांचे अधिष्ठान' एक माय कृष्णप्रेमच होते. क्षणाक्षणाने विरघळत जाणारा उद्धव म्हणतो –

**'गोपींनो तुम्हि धन्य या त्रिभुवनी कृष्णासवे खेळलां।**
**योग्या ना गवसे असा हरि तुम्ही भक्तीबळे बांधिला।।**
**पायांची करितात आस प्रभुच्या योगी तपी नी मुनी।**
**ती पद्मे तुमच्या ब्रजात फिरली धेनूसवे काननी।।** (२।३५)

**सर्ग तिसरा :** तिसरा सर्ग गोपींच्या अंत:करणाचे यथादर्शनच घडविणारा आहे. गोपींचे अलौकिक प्रेम – अव्यभिचारी भक्ती प्रस्फुटित करणारा आहे. गोपींच्या मनाचा भाव–विवशता उत्तम प्रकारे चित्रित झालेली आहे. अन्योक्ती, व्याजोक्तीनी नटलेल्या या सर्गात गोपींच्या प्रेमलक्षणा भक्तीचे मूर्तरूप पाहायला मिळते.

कृष्णप्रेमात तल्लीन झालेली एक गोपी त्याच्या धुळीत उमटलेल्या पदचिन्हास जपते आहे. ती म्हणते, यावर कुणी पाय देऊ नका नाही तर त्याचे सारे दुष्ट गुण तुमच्यात येतील! दुसरी म्हणते, अगं नको त्याची पूजा करा, कारण पहिलं वंदन दुष्टाला करावं म्हणतात ना! 'नाही नाही', तिसरी म्हणते, आमची मनेच चोरून नेलेल्या या दुष्टाचा माग त्यावरून काढता येईल म्हणून ते सांभाळा.

श्रीमद् भागवताप्रमाणेच भुंग्याच्या आश्रयाने रंगविलेला उपरोध फार वेधक आहे. एक म्हणते, ''हे भुंग्या, तुझ्यासारखाच पण एक द्विपाद भुंगा येथे होता. पण फार दुष्ट! दुसरी म्हणते, 'भुंग्या, तू कुणाचा प्रेषित आहेत ते तुझ्या रंगावरूनच कळते. तिसरी म्हणाली, संदेश म्हणून म्हणशील तर ऐक – ''संदेश माझा म्हणशील ऐका। आहे सुखाची परि तेथ शंका। आगीमध्ये ओतून तूप काय। घ्यावा करूनी आपणा अपाय।।''

विरहाग्नीने पोळणाऱ्या गोपींच्या मनासाठी आगीत तूप ओतण्यासारखी उपमा विलक्षण समर्पक आहे!

उद्धव म्हणतो बायांनो, अन्योक्तीने असा दोष देऊ नका बरं! तो विसरला नाही तुम्हाला. 'केल्या आहेत प्रतिमा तुमच्या पुजाया।' यावर चंद्राबळी शीघ्र उत्तर देते. 'किती खोटे बोलता हो उद्धवजी! असंच जर असतं तर तो आला नसता का? आणि काय हो, हे खोटं बोलण्यासाठी तुमचा तो मालक किती पगार देतो?' गोपींनी ज्ञानावर मिळविलेला विजयच म्हणायचा हा!

उद्धव निरुत्तर झाला होता. आता त्याने वेदान्ताचा आश्रय घेतला. दासगणुंच्या कल्पकतेची खुमारी इथेच कळते. ज्ञानाच्या अहंकाराचा उद्धवाला झालेला स्पर्शच! पण परमेश्वरापाशी तेवढेही द्वैत नाही चालत! उद्धव म्हणतो – 'बायांनो तोच आला पाहिजे असे नाही ज्याच्या दर्शनासाठी तुम्ही तळमळता आहां तो तुमच्या हृदयात आहेच की! अगदी अणूरेणूत सर्वत्र तोच आहे. मग गोकुळात नाही असे कसे म्हणता? (४/४९ ते ५१)

राधा उसळून म्हणते, 'वृथा या वेदान्ता वदुनि वदनाते न शिणवी। तृषा तान्हेल्यांची मृगजळ जगीं काय शमवी' येथला दृष्टान्त ही मार्मिक आहे. तृषा तान्हेल्याची म्हणण्यात कृष्णभेटीसाठीची गोपींची उतावीळ लक्षात येते तर मृगजळ शब्दाने वेदान्ताची व्यर्थता स्पष्ट होते. खरे सुख त्याच्या भेटीतच आहे. 'आल्यास तो नेत्र भरून पाहू। ना ये जरी तद्गुण

गात राहू।'' द्वैताच्याच आश्रयाने अद्वैत तर निर्गुणावर सगुणाची मात! त्याच्या ओसरलेल्या अहंकारातून तो म्हणतो,

**'अध्यात्माचे मलरहितसे ज्ञान संपूर्ण व्हाया।**
**बायांनो हा पथचि तुमचा साधका योग्य जाया।।**
**म्हणत सगुण भक्ती श्रेष्ठ आहे हरीची।**
**कपिलही नच पावे योग्यता गोपिकांची।।''**

(सांख्यतत्त्वज्ञानी कपिल येथे अभिप्रेत नाहीत.) 'माहात्म्यज्ञानपूर्वक सुद्धा रतिः भक्तिः।' ही व्याख्याही येथे स्मरते?

**सर्ग चौथा :** गोपींनी नंतर वेगवेगळे निरोप दिले. भेटवस्तूही दिल्या. त्यांच्या अवस्थेचे यथार्थ वर्णन दासगणु करतात. ''एकच गोकुळ तुझ्या विरहानलाने। चित्ती झुरे थमकरी नच त्यास देणे।'' (तद्विस्मरणे परम व्याकुळता - या नारदभक्तिसूत्राचे स्मरण अवश्य व्हावे) कृष्णा, एकदातरी येऊन भेट कारण 'झालो आम्ही तुजविणे जगतात दीन।'' (४-४१) परमार्थतः या दीनतेचे गांभीर्य ध्यानात घ्यावे लागते. गोकुळ म्हणजे भक्तीचा मळा असे उद्धव म्हणतो.

उद्धव मथुरेत आले. म्हणाले, देवा तुझे उपकार झाले, तुमचे अद्वैत कळण्यासाठीच मला पाठविलेस नां? त्यांचे निरोप त्या वस्तू आता कशा देऊ, कां आधीच तुझ्याजवळ आल्या आहेत.

कृष्ण गोपींचे हे अद्वैत फारच मनोहर आहे. 'अद्वैतादपिसुंदरम्' विलोभनीय आहे. उद्धवाच्याच काही पंक्ती पाहून विस्तारलेला लेख आटोपू.

उद्धव म्हणतो -

**''नाही तुम्हां उभयतांत मुळीच भेद।**
**तो कस्तुरी यदुपती, तुम्हि तत्सुंगध।।''**
**''का की तुम्ही मुळिच एक न वेगळाले।**
**नावाला मथुरा पुरीत तन हे वास्तव्य नारायणा।**
**आहे रंजविल्या व्रजात वससी तू गोकुळींच्या जना।।**
**हे सारे कथिले मला तन मने जे भेटले गोकुळी।**
**जेथे प्राण तिथेच ते मन वसे येथे न येते मुळी।।''**

''एक गोपिके प्रेममे बह गये कोट कबीर'' असे कबीर म्हणाले ते उगीच नाही!

तळटीप : मार्गशीर्ष वद्यपक्षातले दिवस! (साल १९८४) पू. अप्पांच्याच घरीं 'उद्धवागमन' काव्यावर प्रवचने होती. पू. अप्पांची रसाळवाणी, भक्तिरसपूर्ण खंडकाव्य, आणि गोपगोपींचे कृष्णविषयक मधुरप्रेम हा विषय - असा हा अभूतपूर्व त्रिवेणीसंगम होता. प्रारंभाची वेळ निश्चित होती. पूर्णतेला बंधन नव्हते. पू. अप्पांची अमोघवाणी प्रवाहित झाली -

''अतीव गोड असे हे काव्य! निरभिलषतेने गायलेले. महाराजांनी नमन केले. शेवटचा चरण आहे, 'तो कामारी त्वरित करवो काव्य हे पूर्ण माझे!' इतक्या रसाळ काव्याला ही 'त्वरित' पूर्ण होण्याचा योग मात्र नव्हता.'' अप्पांचा कंठ अवरुद्ध होता. त्यांनी सांगितलेली ही आठवण!

''हे खंडकाव्य १९२३ मध्ये लिहायला प्रारंभ झाला आणि त्याची पूर्णता १९३९ तर प्रकाशन १९४०! केवढा मोठा खंड! माझे वडील (दामूअण्णा) या काव्याचे लेखन करीत. दुसऱ्या सर्गाचे १९-२० श्लोक झालेले! नंतर ते आजारी पडले. त्या आजारपणातून त्यांचे वैकुंठगमनही झाले. दादांचे लेखन थांबले. पुत्रनिर्विशेष शिष्याच्या निधनाचा आघात मोठा होता. वर्ष-दीडवर्ष घराचे वातावरण गंभीर होते. महाराज दुःखित अवश्य होते पण हतप्रज्ञ नव्हते अमृतानुभवाचेही लेखन रेंगाळलेले मार्गी लागले, हे मात्र नव्हते. घरातली काही व्यवस्था करताना ते कागद हाती लागले. मी ते पाहून दादांना दिले. त्यांनी ते नीट निरखिले, वाचले, दामू अण्णांच्या स्मृतीने त्यांचे डोळे पाणावलेही! पुढे दोन-तीन महिन्यात त्यांनी काव्याची पूर्तता केली. इतका दीर्घकालखंड रेंगाळलेले काम पूर्ण झाले, याची अस्पष्टशीही कल्पना काव्य वाचताना येत नाही कारण त्यांची श्रेष्ठ दर्जाची प्रतिभा! गोपीकृष्णाच्या मधुर प्रेमाचा हा विषय या खंडकाव्यात प्रत्ययकारी झाला आहे. 'अनन्वया'ने असेच म्हणावे लागेल की...

**(हे हि खरे नच) सत्य पाहाता प्रेम असे गोपींचे।**
**गोपी प्रेमासमचि बुध हो, वर्णवे न ते वचि।।''**

**- डॉ. ग. प्र. परांपजे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठलनगरी,
उपाशी विठोबा मंदिरा शेजारी, पुणे ४१००३०.
फोन : २४४७११०९

***



# शतकवीर श्रीपांडुरंग स्तोत्र

**सौ. अंशुमती अ. दुनाखे**

एम.ए. (हिंदी, इंग्रजी), साहित्यरत्न (हिंदी) साहित्य विशारद (मराठी) संस्कृत टि.म.वि.च्या तीन परिक्षा, पी.एच.डी. (हिंदी), भारत सरकार गृहमंत्रालय हिंदी शिक्षण योजना येथून उपनिदेशक म्हणून निवृत्त. काव्य संग्रहाचे लेखन. चित्रा नाईक यांच्या यूनो मधील शोध पत्राचे अनुवाद. शिक्षणविषयक कार्याबद्दल दोन पुरस्कार.

श्री पांडुरंगाचे स्तोत्र म्हणजे श्रीमद् शंकराचार्यांचे 'महायोग-पीठे तटे भीमरथ्या' - श्री पांडुरंगाष्टक. आणखी कुठले स्तोत्र व तेही मराठीत आहे व आज शंभर वर्ष नित्यपठनात आहे हे मला माहीत नव्हते. त्या दिवशी स्तोत्राला शंभर वर्ष झाली म्हणून हे स्तोत्र सर्वांना वाटले तेव्हा प्रथम श्री दासगणु विरचित 'श्री पांडुरंग स्तोत्रा'बद्दल ऐकलं, प्रथमच ते स्तोत्र पाहिलं, वाचलं!

श्रीदासगणु महाराजांचे वाङ्मय खरं पाहता खूप आहे. (दीड लाख) पण सर्वसामान्यांना एका 'गजानन विजय' खेरीज यांच्या अन्य ग्रंथांची, त्यांच्या प्रचंड कार्याची माहिती नाही. त्यांनी चाळीस वर्षांहून ही अधिक काळ शिर्डीचा कारभार सांभाळला. आज तिथे उपासनेची जी पद्धत आहे ती श्रीदासगणु महाराजांनी घालून दिलेली आहे.

परवा तर मी एक नवीनच गोष्ट ऐकली. आज श्रीतिरुपतीला जी धर्मदर्शनाची बारी आहे ती म्हणे श्रीदासगणु महाराजांमुळे सुरू झाली आहे. श्रीदासगणु महाराज जेव्हा श्रीबालाजीच्या दर्शनास गेले तेव्हा गर्दीमुळे व गाठी द्रव्य नसल्याने त्यांना श्रीबालाजीचे दर्शन न घेताच परत यावे लागले. इकडे देवाच्या जिवाची कासाविशी झाली. ते पुजाऱ्यांना म्हणाले, ''गणूला आणा, गणूला आणा, तो दर्शनाशिवाय गेला, रुसलाय तो.'' पुजाऱ्यांना प्रश्न पडला 'हा गणू कोण? त्याला कुठे शोधायचा?' पण देवाची आज्ञा. काढले शोधून. तेव्हा ते म्हणाले होते, 'देवा, पैसे नसले गाठी तरी तुझे दर्शन सर्वांना होऊ दे.' मग म्हणे धर्मवारीची व्यवस्था केली गेली. खरे खोटे देवच जाणे. पण एवढा प्रभाव पडण्याइतके महाराजांचे व्यक्तिमत्त्व होते. आम्ही त्यांच्याबद्दल जेवढी दाखवायला हवी तेवढी आस्था बाळगत नाही, ही खंत आहे. ते प्रसिद्धि पराङ्मुख होते पण आम्ही रत्नपारखी असायला हवे होते.

अशांतच मुंबईहून फोन आला, ''उद्या सकाळी ९.४५ ला श्रीपांडुरंग स्तोत्र म्हणा. भारतात सर्वत्र त्यावेळी अनेक भाविक म्हणणार आहेत!'' हे स्तोत्र, शके १८३२, साधारण नाम संवत्सरामध्ये श्रावणमासी सोमवारी, वद्य दशमीला लिहिले. म्हणजेच इ.स.१९१० मध्ये लिहिले. इ.स. २०१०च्या श्रावणात या स्तोत्राच्या रचनेला शंभर वर्षेपूर्ण झाली. व हे स्तोत्र त्या दिवसापासून श्रीदासगणु महाराजांच्या शिष्यांकडून रोज म्हटले जाते. गोरट्याला श्रीमती गार्गीताईंनी हे स्तोत्र अनेकांना शिकवले व त्या दिवशी त्या सर्वांनी एकत्र येऊन या स्तोत्राचे पठण केले. किती चित्तथरारक गोष्ट आहे ही!

वास्तविक पाहता श्रीदासगणु महाराज शिवभक्त. श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकरांकडून त्यांनी श्रीगोंद्याला बेलाच्या पानावर शिवमंत्राचा उपदेश घेतला होता. पण त्याबरोबर गुरूंनी दरवर्षी पंढरपूरला जाऊन पांडुरंगाचे दर्शन घेण्याचीही आज्ञा केली. महाराजांनी गुरूआज्ञेचे पालन मन:पूर्वक केले. नित्य वारीमुळे पांडुरंगाच्या दर्शनाची ओढ वाढत गेली. हरिहरांत असलेले ऐक्य त्यांच्या प्रचीतीला आले. अशा भावपूर्ण स्थितीत हे स्तोत्र स्फुरलेले आहे. रचायचे म्हणून रचलेले नाही.

**होती मला आवडी मोठी । श्री शंकराची प्रथमत: ।**
**तुझ्या कृपेने अद्वेष्टी । भक्ती उपजली जगजेठी ।।**
**आतां हरिहरात । भेद न मशी वाटत ।**
**एकरूप दोही सत्य । ऐसा निश्चय झाला ।।**

हे केवळ बोलणे नव्हते. ज्या आर्ततेने हे श्रीपांडुरंग स्तोत्र लिहिले आहे त्यावरून ते त्यांनी अनुभवले होते, हे आपल्याला जाणवते.

काव्य-रचना त्यांची सहज होती. फौजदारी परीक्षेसाठी पिनल कोडही त्यांनी पद्यात लिहून लक्षात ठेवला होता. ती सहजता, उत्स्फूर्तता या स्तोत्रांत प्रचीतीला येते. रसाळ, प्रासादिक व हृदयाला भिडणारे असे हे स्तोत्र आहे.

स्तोत्राची सुरुवात 'ॐ नमोजी उदारा । ॐ नमोजी मयुरेश्वरा' अशी झालेली आहे. ज्ञानेश्वरीच्या 'ॐ नमोजी आद्या । वेद-प्रतिपाद्या'ची आठवण करून देणारी ही सुरुवात आहे. त्यांच्या अभंगांत ते श्रीपांडुरंगाला 'उभा कैवल्याचा गाभा चंद्रभागे काठी' असेच म्हणतात. 'निर्गुणाचा सगुण झाला एक भक्तांसाठी' मूळ देव निर्गुण, निराकार, अज, अनंत, अविनाशी, भक्तांच्या सुखासाठी हे सगुण साकार रूप. ही जाण सर्व संतांप्रमाणे श्रीदासगणु महाराजांनाही आहे.

परंपरेप्रमाणे श्रीगणेश, श्रीसरस्वती, मग सद्गुरु वंदन, मग सिद्ध,

महंत, संत, मातापिता सर्वांना वंदन करून ते 'चंद्रभागातटविहारा' कडे वळतात.

श्रीविठ्ठल हा श्री विष्णूचाच अवतार आहे. तेव्हा दशावतारांचे स्मरण त्यांना झाले आहे. श्रीविष्णूंच्या नवव्या अवताराबद्दल बऱ्याच संतांच्या मनात वेगवेगळे विचार असतात. श्रीगौतम बुद्ध हे वेदप्रामाण्य न मानणारे. सनातन धर्माला विरोध करणारे. म्हणून कुणी नवव्या अवतारांत बलरामांची प्रतिमा ठेवतात. इथे श्रीदासगणु महाराजांनी विठ्ठलाला बौद्ध म्हटले आहे. म्हणजे श्रीपांडुरंग सर्वज्ञ आहे, जाणून घेण्यास योग्य असा 'बोद्ध' आहे, हा भाव आहे.

समर्थ रामदासांनीही आपल्या रामनामावलीत रामाला 'बोध्यरूप' म्हटलेले आहे.

नंतर भक्तवत्सल देवाने कुणाकुणाला मदत केली त्यांचा उल्लेख केला आहे. प्रल्हाद, शबरी, जटायु नळनीळ अंगद, महाबळी वगैरेंचा उद्धार केला. वानरांच्या मदतीने लंका जिंकली. गोकुळी अनंत लीला केल्या. यशोदेला मुखांत विश्वरूप दाखवले. कालियाला शासन केले. ब्रह्मदेवाचा गर्वहरण केला. रासलीला केली. पांडवांना, द्रौपदीला मदत केली. युद्धाआधी भीष्माचार्यांकडून पांडवांना अभय मिळविण्यासाठी द्रौपदीला घेऊन कृष्ण भीष्माचार्यांच्या तंबूत गेला. आपण तिच्या चपला संभाळत बाहेर थांबला. कांकणांचा आवाज ऐकून 'अखण्ड सौभाग्यवती' होण्याचा आशीर्वाद भीष्माचार्यांनी दिला. द्रौपदी उत्तरादाखल बोलली तेव्हा त्यांना काय झाले ते कळले. युद्धापूर्वी तदनुसार त्यांनी घोषणा केली की मी पांडव व शिखंडीला मारणार नाही. कृष्णाचा बेत सफल झाला.

**नाना मते नाना पंथ । जरी जगती अस्तित्त्वात**
**परी अवघ्यांचे सार सत्य । एक तूच असली की ।।४१।।**
**ज्यांना संमत शैवमत । ते तुज म्हणती उमानाथ ।**
**वैष्णव वदती लक्ष्मीकांत । यवन इलाही बोलती ।।४३।।**

वेगवेगळ्या देवांची नावे घेऊन सर्वात कशी एकच शक्ती आहे हे आवर्जून महाराज सांगतात.

**''तूच सगुणगुणातीत । मायबापा विठ्ठला ।।''**

मग विठ्ठलाच्या रूपाचे वर्णन येते.

**ते हे रुपडे मनोहर । गळा, घवघवीत तुळशीहार ।**
**सर्वांग श्यामसुंदर । कटी कर धरियेले ।।५५।।**
**पायातळी शोभते वीट । वरी आपण उभा नीट ।**
**बहु आतुरते पाहे वाट । आपुल्या भक्तवरांची ।।५६।।**

भक्त म्हणतात की, बाकीचे अवतार दुष्टांचे निर्दाळण व संतांचे, सज्जनांचे रक्षण करण्यासाठी, पण हा अवतार केवळ भक्तांच्या प्रेमासाठी आहे 'हा चोविसावेगळा' आहे.

मग सर्व भक्तांचे उल्लेख महाराष्ट्रातील व बाहेरच्या प्रांतातील ही भक्तांची त्यांच्यासाठी काय काय, कसे कसे केले त्याचे मोठ्या उत्साहाने वर्णन केले आहे. आठवण देऊन साधकांना आश्चर्यचकित केले आहे.

मग विठ्ठलाची मानसपूजा केली आहे. श्रीमत् शंकराचार्यांच्या मानसपूजेची आठवण होणे स्वाभाविक आहे.

**'तुझे कराया पूजन । साहित्य आणू कोठुन ।**
**तुझ्या व्याप्तीवाचून । वस्तू उरली नारायणा ।।८३।।**

तुकाराम महाराजांच्या,

**कासयाने पूजा करू केशीराजा**
**हाची संदेह माझा फेडी आता ।।**

किंवा कुसुमाग्रजांच्या

**मी काय तुला वाहू?**
**तुझेच अवघे जीवित वैभव काय तुला देऊ?**

या पदाची, कवितेची आठवण येते.

श्रीदासगणु महाराज प्रेमाश्रूंनी पांडुरंगाचे चरण धुतात. आपल्या भक्तीचे चंदन लावतात. मनाचे सुमन अर्पण करतात, मायेचा धूप जाळतात, क्रोधाचा कापूर जाळतात, मोहरूपी दीप उजळतात, भगवंताचे गोड नाम हेच पक्वान्न, त्याचा नैवेद्य व प्रार्थनापूर्वक नमस्कार करतात. प्रार्थना अर्थातच करुणेची पाखर देवाने त्यांच्यावर घालावी ही. पाप, ताप, दैन्य दूर व्हावे. मनाला चिंतेचा त्रास नको, वृत्ती आनंदी असावी, भगवंताच्या भजनात गोडी रहावी, नरदेहाचे सार्थक व्हावे. ज्ञानेश्वरीतील १८व्या अध्यायात वर्णिलेली सहजभक्ती मागतात. लडिवाळपणे सांगतात–

**लेकराची अवघी आळ । माता पुरविते तत्काळ ।**
**तैसा तू हे घननीळ । कोड माझे पुरविता हो ।।९६।।**

देव 'पतितपावन' आहे. याचे ते स्मरण देतात.

मग फलश्रुती सांगून दामूने (म्हणजे दामोदर आठवले) यांनी हे स्तोत्र लिहून घेतले. हेही नमूद केले आहे.

असे हे श्रीपांडुरंग स्तोत्र, भक्तिपूर्ण अंत:करणाचे उमललेले सुंदर फूल. यांत एकूण १११ ओव्या आहेत. त्यांत पुराणांचे उल्लेख आहेत, संतांचे उल्लेख आहे, पांडुरंगाचे रूपवर्णन आहे, मानसपूजा आहे, 'ईशावास्यम् इदं सर्वम्' ची प्रचीती आहे, सकल पंथांचा समन्वय आहे. परब्रह्म व विठ्ठल एकच, भक्तांच्या सुखासाठी हे सगुणसाकार रूप आहे. या स्तोत्रांत काय नाही? ज्ञानी भक्ताची गंभीरता आहे, भावुक भक्ताचा लडिवाळपणा आहे, संतांचा आठव आहे, भगवंतांना धमकी आहे, नरजन्माचे सार्थक कशांत आहे हेही सांगितले आहे, सहजभक्तीचाही आविष्कार आहे. उपनिषदांचे सार आहे–

**'ऐसा तू अनिर्वाच्य अचिंत्य । सर्वसाक्षी रुक्मिणीकांत ।**
**सर्वाद्य सर्वातीत । ॐ नमोजी विठ्ठला ।।१००।।**

लडिवाळपणा आहे,

**हे सर्वेश्वरा गुणधामा । हे महामंगला पूर्ण कामा ।**
**संतजनांच्या विश्रामा । पांडुरंगे माझे आई ।।१०१।।**

प्रापंचिकांसाठी धन मिळेल, पुत्र होईल, भूतबाधा जाईल, आरोग्य

प्राप्ती होईल. दीर्घआयुष्य मिळेल अशी ऐहिक फळे मिळतील, असे आश्वासन आहे.

तुम्हांला वारीला जायला जमत नाही का? वाईट नका वाटून घेऊ.

**हे स्तोत्र केवळ पंढरी । वर्ण्य विषय हा श्रीहरी ।**
**उभा अक्षर-विटेवरी । पद्यरचना ही चंद्रभागा ।।१०६।।**
**पारायण हीच वारी । करा अत्यादरे निर्धारी ।**
**भक्तिपताका स्कंधावरी । घेऊनिया भाविक हो ।।१०७।।**
**निश्चय हा पुंडलिक । भेटवील वैकुंठनायक**
**या अवघ्यासी आहे भाक । समर्थ साईबाबांची ।।१०८।।**
**स्वस्तिश्री पांडुरंग स्तोत्र । भावे वाचोत भाविक भक्त ।**
**त्यांचे अवघे पुरोत हेत । हेचि इच्छी दासगणु ।।१११।।**
**श्रीरुक्मिणी पांडुरंगार्पणमस्तु । शुभं भवतु ।। श्रीरस्तु ।।**

असे हे सहजसुंदर, प्रासादिक, रसाळ स्तोत्र श्रीदासगणु महाराजांची सर्व वैशिष्ट्ये घेऊन आलेले आहे. १०० वर्षे सतत पाठ झाल्याने सिद्ध झालेले स्तोत्र मंत्रसामर्थ्याने युक्त आहे. वैकुंठनाथाजवळ पोचण्याचा सुलभ-सोपा मार्ग आहे. आपण याचा लाभ घ्यायलाच हवा!

**– सौ. अंशुमती अ. दुनाखे**
'विन्दांशु' प्लॉट नं. १३, तेजस सहकारी गृहरचना,
तेजसनगर, कोथरूड, पुणे ४११०३८.
फोन २५३८५०२३



# संतदासगणुंचे उपनिषद्भावार्थ लेखन
# ईशावास्य भावार्थबोधिनी

**सौ. वसुधा ग. परांजपे**

बी.ए. (आनर्स) भारत हायस्कूलमध्ये ३० वर्षे शिक्षिका, अध्यात्म विषयावर प्रवचने, राणी लक्ष्मीबाई मंडळ असो. कार्यकारी विश्वस्त, विपुल लेखन, ग्रंथलेखन, विविध मासिकांतून लेखांचे लिखाण.

पू. श्रीदासगणु महाराजांचा 'श्रीगजानन-विजय' हा ग्रंथ सर्वसामान्यपणे सर्वांच्या देवघरात पोचलेला आहे. भाविक ज्या श्रद्धेने या ग्रंथांची पारायणे करतात त्यावरून महाराजांचे लेखनामागे त्यांनी केलेली साधना प्रत्ययाला येते. श्रीमहाराजांनी केवळ संतचरित्रेच लिहिली नसून परमार्थात ज्या ग्रंथांना महत्त्व आहे अशा संस्कृत ग्रंथावरही त्यांनी लेखन केले आहे. ईशावास्य उपनिषदावरील ही टीका त्यापैकीच एक.

पू.महाराजांचे शालेय शिक्षण फारसे झालेले नव्हते. पोलिस हवालदार म्हणून नोकरीत असता त्यांना कै. वामनशास्त्री इस्लामपूरकर या पारमार्थिक अधिकारसंपन्न अशा विद्वान गृहस्थांची सेवा करण्याची संधी मिळाली. अत्यंत मनोभावे ही सेवा करून महाराजांनी कै. वामनशास्त्रींचा कृपानुग्रह प्राप्त केला. या परीसस्पर्शानेच लावण्या रचणारे हे हवालदार पूर्णपणे बदलले. संस्कृत ग्रंथ समजावून घेऊन, त्यावर मनन, चिंतन करीत.

ईशावास्याच्या पहिल्या श्लोकात 'तेन त्यक्तेन भुंजीथा:' या वचनापाशी दासगणु अडले. त्यांना समाधान मिळेना. श्रीसाईनाथांना त्यांनी अडचण सांगितली. त्यांनी विचारले, "इथून कुठे जाणार आहेस?" दासगणु, "विलेपार्ल्याला काकासाहेब दीक्षितांकडे!" साईबाबा म्हणाले, "दीक्षितांची मोलकरीण तुला उत्तर देईल."

श्रीदासगणु महाराज दीक्षितांकडे गेले. सकाळच्या पूजेच्या तयारीत असताना त्यांची मोलकरीण (१०-११ वर्षांची) भांडी घासताना खिन्न स्वरात जरतारी लुगड्यासंबंधी गाणे गात होती. तिच्या स्वरात खिन्नता असल्याचे दासगणुंना जाणवले. दीक्षितांच्या घरी काही सण असल्याने सर्वांच्या अंगावर नवे कोरे कपडे होते. मोलकरणीच्या अंगावर एक फटकूर. श्रीमहाराजांनी ते पाहून एक चांगले पातळ त्या मुलीला देण्याविषयी दीक्षितांना सांगितले. त्यांनी त्वरित ते आणून तिला दिले. अनपेक्षितपणे एक उत्तम साडी मिळाल्याने ती आनंदित झाली.

दुसरे दिवशी त्याच फटकुरावर ती दीक्षितांकडे तेच गाणे म्हणत काम करीत होती. अर्थात् तिचा स्वर आनंदी होता हे श्रीमहाराजांना जाणवले. आणि त्यांच्या कविमनाला त्या मंत्राचा अर्थ उलगडला!

'सर्व पदार्थांचा मालक मीच' ही भावना प्रबळ असेल तर उपभोगाची वस्तू जवळ असलीच पाहिजे अशी एषणा रहात नाही. साडी आपल्या मालकीची आहे, केवळ याच भावनेचा आनंद साडी प्रत्यक्षात तिच्याजवळ नसतानाही तिला मिळत होता! 'तेन त्यक्तेन भुंजीथा:!'

आपल्या प्रासादिक भाषेत, दृष्टान्त, रूपके योजून त्यांनी हे ग्रंथ सर्वसामान्यांना समजावेत म्हणून लेखणी उचलली. ईशावास्य भावार्थ बोधिनी ही टीका १९१५ मध्ये त्यांनी गोदातीरावरील रामेश्वर या मराठवाड्यातील गावी लिहिली.

ईशावास्य उपनिषद म्हणजे शुक्ल युजर्वेद संहितेचा शेवटचा म्हणजे चाळीसावा अध्याय. प्रत्यक्ष संहितेचेच अंग. हे उपनिषद केवळ अठरा श्लोकांचे पण अतिशय महत्त्वाचे मानले जाते. हे सर्व विश्व हे परब्रह्माचे निवासस्थान आहे. त्यामुळे जगतातील यच्चयावत वस्तू त्याच्याच आहेत. तुला वापरायला त्याच्या कृपेने मिळाल्या आहेत. तेव्हा गरजेपुरताच त्याचा वापर कर व उरलेले ज्याला गरज आहे त्याला देऊन टाक. 'मा गृध: कस्यस्वित् धनम्' कोणाचेही धन ओरबाडू नकोस हा महत्त्वाचा संदेश देऊन हे उपनिषद सांगते भोगाला, त्यागाची, व्यक्तिविकासाला, समाज विकसनाची, अधिभौतिकाला अध्यात्म ज्ञानाची जोड असणे आवश्यक आहे. कोणत्याही एकाच अंगाची उपासना अध:पतनाला कारणीभूत होते. ज्ञान, कर्म व भक्ती यांचा समन्वय प्रत्येक मानवी जीवनात असायला हवा; हे १३३२ ओव्यात मांडले आहे.

पू. महाराज स्पष्टपणे सांगतात की, खंडण मंडणासाठी, वादविवाद व मनरंजनासाठी, पैसा, प्रतिष्ठा प्राप्त होण्यासाठी उपनिषदांचा अभ्यास करू नका. उपनिषदातील तत्त्वज्ञान हे व्यष्टि समष्टी जीवनाच्या हितासाठी आचरणात आणणे महत्त्वाचे आहे. या तत्त्वज्ञानाची बैठक आज मानवी आचरणाला नसल्यानेच समाजातील नीतिमूल्ये हरवली आहेत. उपनिषदांचा अभ्यास करून ती जीवनात उतरवावीत.

अभ्यास करायला वातावरण ही शांत लागते. मोगल शासन काळात अशी शांतता नव्हती त्याचा उल्लेख करून पू.म. म्हणतात,

**''तो हा आंग्लपती राजराज । शान्ततेचे साम्राज्य ।**
**केले याने । चहूकडे ।।**
**नाना यंत्रे नाना कळा । शोधिले भूगोल खगोला ।**
**अन्य अन्य जातीला । पाहे भूप समदृष्टी ।।**
**तरी स्वातंत्र्याची सरी । येत नाही कवणेपरी ।**
**स्वतंत्रता जी व्यवहारी । तीच मुक्ती परमार्थी ।।** १, २६ ते २८ ।।

या ओव्या वाचताना ''मोक्ष मुक्ती ही तुझीच रूपे तुलाच वेदान्ती, स्वतंत्रते भगवती योगिजन परब्रह्म वदती ।।'' या स्वातंत्र्यवीरांच्या काव्याचे स्मरण झाल्याशिवाय रहात नाही.

शांत वातावरणात ईशावास्य उपनिषदाचा अभ्यास का करायचा, याविषयी पू.महाराज म्हणतात,

**''जैसे एकाच गांवासी । मार्ग अनेक जावयासी ।**
**तैसे त्या सद्‌वस्तुसी । जाया मार्ग अनेक हे ।।**
**त्या रस्त्यांपैकी जवळचा । हा ईशावास्य मार्ग साचा ।**
**म्हणून श्रोते तयाचा । विचार करीन ये ठायी ।।१,५०,५१।।**

प्रत्येक उपनिषदाचा प्रारंभ व सांगता शांतिपाठाने होते. प्रारंभी शांतिपाठ म्हणावयाचा तो वातावरण अभ्यासाला अनुकूल व्हावे म्हणून. मी अपेक्षिलेले ज्ञान मला मिळाले. त्याचे समाधान व्यक्त करण्यासाठी अभ्यासाची सांगता शांतिपाठाने करावयाची.

ईशावास्याचा शान्तिपाठ असा आहे,

**ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।**
**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।।**

हे विश्व पूर्ण व विश्वंभर ही पूर्ण । पू. महाराज याचे स्पष्टीकरण करताना एक सहज समजेल असा दृष्टान्त देतात,

**''जैसे समुद्राचे जीवन । उपाधीने होतसे लवण ।**
**परी दोहोमाजी भिन्नपण । एतुलेही असेना ।।१,५५।।**
**तैसे ब्रह्म आणि जगत । एकचि जो मानी सत्य ।**
**तोच म्हणावा ज्ञानवंत । त्या ज्ञात्यास शान्ति असे ।।१,५७।।**

देहाची उपाधी स्वीकारल्याने जीवात्मा परमात्म्यापेक्षा वेगळा होतो. उपाधी पूर्णपणे सुटली तरच अहं ब्रह्मास्मि' ही अनुभूती येते.

ही अनुभूती येण्यासाठी कर्म व ज्ञान यांचा समन्वय हवा. कर्म तर दर क्षणाला घडतेच, तो निसर्ग आहे, प्रकृती आहे. मग संस्कृती कशात? निष्काम कर्म करून चित्त शुद्ध राखण्यात संस्कृती आहे.

**निष्काम कर्माचे आचरण । केल्या होय अपरोक्ष ज्ञान ।**
**ज्ञानाचे ते फल पूर्ण । श्रोते जाणा मुक्तता ।।२,४५।।**

मुक्तता, मोक्ष प्राप्तीसाठी राग, लोभ, ममत्व, कर्तृत्व हे सर्व मनातून निघून मन पवित्र झाले पाहिजे, तरच परमेश्वराचा साक्षात्कार होऊन मोक्ष मिळेल. देवलोक मिळावेत म्हणून साधना जर सकाम असेल तर तो साधक स्वतःच स्वतःची हत्या करतो, आत्महत्यारा होतो. पुनरपि जननं पुनरपि मरणं या चक्रात अडकतो.

**स्थावर जंगमापासूनी । देवलोकापर्यंत जाणे ।**
**जे जे जन्म घेतील कोणी । त्याते हत्यारीच म्हणावे ।।३, ६६**

साधकाला आत्मज्ञान हवे आहे. त्या आत्मतत्त्वाचे स्वरूप कसे आहे याचे वर्णन यापुढे आले आहे. ते स्वरूप सांगताना व त्यासाठी काय करावे याचे मार्गदर्शन करताना अनेक विरुद्धार्थाचे शब्द या उपनिषदात आले आहेत. दूर, जवळ, विद्या, अविद्या, संभूति असंभूति इ. हे या उपनिषदाचे वैशिष्ट्य मानावे लागेल. आत्मतत्त्व शब्दातीत आहे. ते दूरही आहे, जवळही आहे. चंचलही आहे अचंचळही आहे. याचे स्पष्टीकरणासाठी पू. महाराज लिहितात,

**'कापणे, हलणे आणि चळणे । हे न ठावे ज्या कारणे ।**
**जगत्रय व्यापिले जेणे । तेच जाणा आत्मतत्त्व ।।४,१५।।**
**बैसल्या अग्निरथी । (रेल्वे) वाटती झाडे धावती ।**
**तैसे आत्मतत्त्व निश्चिती । अचळ असता चपळ वाटे ।।२४।।**
**उपाधिचा हाचि गुण । की सत्य टाकावे झाकून ।**
**भलतेच करावे भासमान । आपुलिया स्वरूपाचे ।।**
**दाहक शक्ती अग्नीसी । वा चलन शक्ती प्रभंजनासी ।**
**त्या परीच ज्ञानियासी । आहे जवळ आत्मतत्त्व ।।५,२३।।**
**मुंगीस मेरू मांदार । आक्रमण्यासी जैसा दूर ।**
**वा पंतगासी अंबर । तैसे आत्मतत्त्व मूढासी ।।५,२५।।**
**स्वार्थावरीच ज्याची दृष्टी । पराविषयी द्वेष पोटी ।**
**जो मनाचा असे कपटी । मूढ त्यासी म्हणावे ।।५,३४।।**

मनातले हे सगळे दुष्ट भाव साधनेने निपटून काढून टाकले की, शुद्ध मनात आत्मसाक्षात्कार होतो. मग सुखदुःखाची बाधा होत नाही.

**म्हणून भेद टाकून । पहावे शुद्ध चैतन्य ।**
**आपल्या स्वानुभवे करून । मग नुपजे सुख दुःख ।।६,७४।।**

ज्याला आत्मसाक्षात्कार झाला, सर्वं खलु इदं ब्रह्म! याची अनुभूती आली त्याला वस्तूंचा बाह्याकार दिसतच नाही. सगळीकडे ब्रह्मच भरलेले दिसते मग त्याला मोह कशाचा होणार, शोक कशासाठी तो करणार? वेगळे काही नाहीच. हे स्पष्ट करताना सहज समजेल अशी उदाहरणे महाराज ओव्यातून गुंफतात.

**''जो स्वतःच सूर्य झाला । तो पाहे केवी तमाला ।**
**वा उजेडार्थ दीपाळा । तो काय उजळील ।।७,८।।**

हे आत्मस्वरूप अशरीरी आहे, सर्वव्यापक, शुद्ध तेजस्वी, अक्षय, निर्मळ, सर्व तंत्र स्वतंत्र, सर्वांचा नियामक इ. अकरा विशेषणे देऊन साधकाला प्रोत्साहित करण्यासाठी आठव्या श्लोकात आत्मतत्त्वाचे भावात्मक स्वरूप वर्णन केले आहे.

**'ईश आकारशून्य । सच्चिदानंद, आनंदघन ।**
**सर्वसाक्षी प्रकाशमान । अनाद्यनंत तोच की ।।८,१९।।**

**मज्जा, स्नायू, शिरा, अस्थी । ह्या नाहीत आत्म्याप्रती ।**
**म्हणून देह निश्चिती । नाही जया आत्म्याते ।।२०।।**
**शक्ती आपुलीच वाटुन । करी अवघ्यांचे नियमन ।**
**अवघ्याचा साक्षी होऊन । आपण अकर्ता राहिला ।।४०।।**

पू. महाराजांना दांभिकतेचा अति तिटकारा होता. त्यामुळे ९व्या श्लोकात विद्या अविद्येचे स्पष्टीकरण करताना त्यांच्या शब्दाला धार आलेली दिसते.

**बालकांची खेळणी । सहज जाती मोठेपणी ।**
**तैसे झाल्या पूर्ण ज्ञानी । कर्म सुटे आपोआप ।।९,४०।।**
**डोई टोपी बनातीची । शालजोडी जरतारीची ।**
**पदवी मिरवून दीक्षितांची । विकत घेती अभिमाना ।।४३।।**
**कर्म टाळून उपासना । केल्यानेही अज्ञान जाणा ।**
**भिंत टिकणे पायाविना । अशक्य आहे सर्वथा ।।६६।।**
**उपासने माझारी । संकल्प विकल्पाची थोरी ।**
**सच्छिद्र पात्रा । भरल्या जळ टिकेना ।।९,६७।।**
**जे अनुष्ठान सकाम असता । त्यासी अविद्या नाम सर्वथा ।**
**मग त्या अविद्येचा भोक्ता । काय पावे मोक्षासी ।।१०,३१।।**

निष्काम कर्माने गतजन्मीचे पाप नाहिसे होते व मृत्यूची भीती जाते असे सांगून उपासना शुद्ध श्रद्धेने करा, अंधश्रद्धा नको असेही बजावतात. शाळिग्राम शिळेची विष्णू म्हणून उत्कट भावाने व शुद्ध श्रद्धेने अखण्ड उपासना केली तर त्या उपासनेनेच भगवंताचा साक्षात्कार होतो. मृत्यूच्या वेळी भगवंताचे स्मरण होते व वैकुंठलोक प्राप्त होतो.

संभूति असंभूति, विविधता व एकता याचे सोदाहरण सहज सोप्या शब्दात वर्णन करून पू.महाराज सूर्य-प्रार्थनेकडे वळतात ते मंत्रशक्ती व त्याचे महात्म्य सांगण्यासाठी सूर्याने आपले प्रखर किरण आवरून घ्यावेत म्हणून प्रार्थना.

**''मग तुझ्या पलीकडचे । त्या आद्यकारण ब्रह्माचे ।**
**दर्शन मला होऊन साचे । मी तू पण हरेल ।।१६,३८।।**
**आणि तुझे मंगळ असून सुंदर । जे स्वरूप साचार ।**
**ते ही सद्वस्तूचि मजवर । कृपा होता दिसेल की ।।१६,३९।।**

अंतकाळी ॐकाराचे स्मरण होऊन,

**''माझा वायुरूपी प्राण । जावो हिरण्यगर्भासी मिळून ।**
**आणि पंचभूतात्मक हे शरीर जाण । जावो भस्म होऊनी ।।१२।।**

शेवटच्या श्लोकाचे महत्त्व वर्णन करताना ओवी येते,

**''कर्म, उपासना आणि ज्ञान । यांचे भरले संमेलन ।**
**याच मंत्रामाजी जाण । या अवघ्या उपनिषदी ।।१८, १८।।**

अशा तऱ्हेने पू. महाराजांनी ही टीका संस्कृत न समजणाऱ्यांसाठी लिहिली आहे. ती टीका मुळातून वाचणेच महत्त्वाचे.

**ईशावास्य हाचि ऊस । ऋचा ह्याच पेरी त्यास ।**
**भाष्यरूपी चरकास । शंकराचार्ये धरियेला ।।७३,७२।।**
**अर्थरूपी रसनव्हाळी । जगद्गुरूने काढिली ।**
**महाराष्ट्रमृत्तिका घटी भली । भरली दासगणुने ।।**
**पात्र ओखटे म्हणून । रसा अव्हेरू नका सूज्ञ ।**
**रसपरीक्षा पात्रावरून । करणे न योग्य सूज्ञाते ।।३,७४।।**

अशातऱ्हेने पू. दासगणु महाराजांनी या ईशावास्य भावार्थ-बोधिनीचा समारोप करताना आपल्याकडे लीनता घेतलेली आहे व या बोधिनीची उपेक्षा करू नये अशी प्रार्थनाही केलेली आहे. यानंतर मधे बरीच वर्षे गेली व महाराजांनी मांडुक्य उपनिषद समजावून घेतले. मांडुक्य उपनिषद व त्यावरील गौडपादांच्या मूळ कारिका यांचेवरही ओवीबद्ध टीका लिहावयास घेतली. मूळ उपनिषद व कारिका यांच्यावरचे त्यांचे लिखाण मांडुक्योपनिषद मंत्रार्थ प्रकाशिका व कारिका विवरण या नावाने प्रसिद्ध झाले आहे. ईशावास्योपनिषद् हे सर्वात प्रारंभीचे उपनिषद तर मांडूक्य हे शेवटचे उपनिषद मानले जाते. त्यामुळे वेदान्त तत्त्वज्ञानाचे सारे सार या उपनिषदात साठवलेले आहे; म्हणून श्रीशंकराचार्य या उपनिषदाला 'वेदान्तार्थसारसंग्रह' मानतात. मांडुक्य हे अथर्ववेदाचे उपनिषद असून सर्वात लहान म्हणजे केवळ बारा मंत्रांचे आहे. पूर्णावस्थेतले तत्त्वज्ञानाचे रूप नेमक्या व मोजक्या शब्दात या उपनिषदात व्यक्त केले आहे. महाराजांनी येथे फक्त मंत्राचा शब्दाचा अर्थ समजावा म्हणून अठ्ठ्याऐंशी ओव्यात ते लिहिले आहे. भावार्थ समजावून सांगण्याचा हेतू नाही.

संस्कृत भाषेचा अभ्यास फारसा नसतानाही आपण या लेखनाला उद्युक्त का झालो याचे स्पष्टीकरण करताना पू. महाराज लिहितात, मिरजचे संस्थानिक श्री. नारायणराव पटवर्धन यांनी गौडपादांच्या कारिकांचे एक प्रकरण मराठीत लिहिले,

**''ते मजला दाविले । माझे मन आनंदले ।**
**म्हणून मीहे साहस केले । श्रीहरीच्या बळावरी ।। विवरण १, १५**

आपल्या या लेखनाला ते 'साहस' म्हणताहेत यात सर्व आलेच. केवळ अर्थ कळावा एवढ्याच हेतूने हे लिहिले आहे.

ॐकार हा या उपनिषदाचा विषय असून त्याच्या चार विभागांपैकी ३ विभागांकरता मात्रा ही संज्ञा वापरली आहे. चौथा भाग मात्रारहित आहे. हे चार विभाग म्हणजे मनाच्या चार अवस्था असून जागृती, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या अशी त्यांची नावे आहेत. या चार अवस्थांमध्ये काम करणारे जे मन त्याची नावे त्या कार्यानुरूप वैश्वानर, तैजस, प्राज्ञ व तूर्यात्मा अशी आहेत. या अवस्था अर्थातच चैतन्ययुक्त देहाच्या आधारावरच उपभोगता येतात.

प्रारंभी ॐकाराला वंदन करून शांतिपाठाचा अर्थ विशद करतात.

**''हे देवांनो या जनी । आम्ही आपल्या कानांनी ।**
**मंगल श्रवण करोनी । असावे की सर्वदा ।।१,५।।**

चांगले पहावे, ऐकावे, करावे हीच आपली प्रत्येकाची अपेक्षा असते. पण इच्छा नसूनही वाईटाला सामोरे जावे लागतेच. म्हणून तर ईश्वराला प्रार्थना!

**''हे यज्ञ रक्षण करण्याचे । काम आहे ज्या देवांचे ।**
**त्यांनी आमच्या इंद्रियांचे । ऐसेच रक्षण करावे ।।१,२।।**

यानंतर श्लोकांचा अर्थ सांगायला पू. महाराज प्रारंभ करतात.

**'ॐ हेच अक्षर । सर्वत्र भरले साचार ।**
**भूत, भविष्य, वर्तमान थोर । हे जे तिन्ही काल ।।१२।।**
**त्या सर्व कालांतून । ॐकारच भरला पूर्ण ।**

ॐ म्हणजे नादब्रह्मच. तेच सर्वत्र भरले आहे. त्याचे स्वरूप समजावे म्हणून त्याचे चार विभाग कल्पिले आहेत. हे चार विभाग कसे? तर,

**''रुपयाच्या चार । पावल्यापरी साचार ।**
**त्याच्या पायाचा प्रकार । आहे की विबुध हो ।।१६,१७।।**

जनावरांचे चार पाय व रुपयाच्या ४ पावल्या यातील एकत्त्वाच्या दृष्टीने पावल्या मानणेच योग्य ठरते. मूळ श्लोकातल्या 'अयं'चे स्पष्टीकरण मात्र येथे झालेले नाही. वैश्वानराचे वर्णन तिसऱ्या मंत्रात आहे. त्याचे स्पष्टीकरण सहज सुंदर शब्दांनी केले आहे.

**''स्वर्ग हे डोके जाण । सूर्य हा डोळा पूर्ण ।**
**वायु हाच होय प्राण । देहमध्यभाग आकाश ।।**
**उदक हेच मूत्रस्थान । पृथ्वी हेच पाय पूर्ण ।**
**आहवनीय अग्नी वदन । आहे त्याचे विबुध हो ।।२२, २३।।**

मग तैजस व प्राज्ञ यांचे स्पष्टीकरण करून ७व्या मंत्रात तूर्याक्ताचे वर्णन म्हणजे जी अनिर्वचनीय अवस्था आहे तिचे वर्णन व स्पष्टीकरण करताना ते म्हणतात,

**''जो ज्ञानेंद्रियांना समजत नाही । तो व्यवहाराच्याही उपयोगी नाही।**
**जो कर्मेंद्रियांना येत नाही । घेता की विबुध हो ।।४६।।**
**जो प्रपंच मिथ्या आहे । ऐसे ज्ञान करून देतो पाहे ।**
**राग द्वेष शून्य आहे । जो आहे परमानंदरूप ।।५०।।**
**जो आहे भेदरहित । तो या आत्म्याचा तुरीय साथ ।**
**चौथा पाद आहे खचित । ऐसे ज्ञाते मानिती ।।५१।।''**

ॐकाराचा चौथा पाद असा आहे.

मनुष्यमात्राला ज्या प्रसन्नतेची, समाधानाची, शांततेची अपेक्षा आहे. जे सुख, जो आनंद सतत हवासा वाटतो तेच आत्म्याचे स्वरूप आहे. म्हणून आत्म्याचे ज्ञान करून घ्या असा आदेश देऊन आत्मा व ॐकार यांची अभिन्नता, एकरूपता दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे.

**''मात्रा रहित ॐकार । हा चौथा तुरीय आत्मा साचार ।**
**तो करावया व्यवहार । मुळीच उपयोगी नाही की ।।८३ ।।**

आत्मा व ॐ चे असे साधर्म्य आहे.

हा जो तुरीय तो कुणाचे कार्य नाही व कारणही नाही. पण सर्वज्ञ सर्व सामर्थ्यवान आहे. कारण ते परब्रह्मच आहे. अशातऱ्हेने ॐ म्हणजे प्रणव, नादब्रह्म त्याची साधना करणाऱ्याला तुरीया अवस्था प्राप्त होते. म्हणजे नीरव शांतता, समाधान, प्रसन्नता व उत्साह प्राप्त होतो, जो कोणत्याही बाह्य परिस्थितीतही टिकून राहतो. स्वामी वरदानंद भारती म्हणतात, ''वायूला झुळूक नाही, पानांना सळसळ नाही, पक्ष्यांची किलबिल नाही, अशा त्या दिव्य वातावरणात जो आनंद दाटून राहिलेला असतो तशी स्थिती तुरीय आत्मा अनुभवतो.

मांडुक्योपनिषद मंत्रार्थ- प्रकाशिकेप्रमाणेच महाराजांनी गौडपादांच्या कारिकांचे विवरणही अत्यंत थोडक्या शब्दात फारशा दृष्टान्त, रूपकांच्या भानगडीत न पडता केवळ अर्थ सांगण्यापुरतेच केलेले आहे. वस्तुत: एकच असलेला आत्मा अवस्था भेदाने व उपाधि भेदाने तीन प्रकारांनी समजतो. वैश्वानर हा उजव्या डोळ्यात, तैजस हा मनात तर प्राज्ञ हा हृदयात असतो व तो केवळ आनंदाचा उपभोग घेत असतो. पुढे सृष्टिनिर्मितीचा विषय आहे. त्यातील मत मतांतरे व्यक्त करताना महाराज लिहितात,

**'सृष्टी प्राण्यांच्या भोगाकरता । ईश्वरे उत्पन्न केली सर्वथा ।**
**काही म्हणती स्वत:करिता । सृष्टी उत्पन्न केली असे ।।१,४१।।**

परी हे म्हणणे ना संभवत । ईश्वर मुळीच वासनारहित । व त्याच ईश्वराप्रत । इच्छा झाली हे कसे? असा प्रश्न निर्माण करून महाराज म्हणतात, 'विद्वत्ता ही काही वेळा शब्दच्छलाकरता वापरली जाते, सोपे करून सांगण्यासाठी तिचा वास्तविक उपयोग व्हायला हवा. परमेश्वराने आपले वैभव दाखवावे किंवा आपले वैभव आपणच उपभोगावे, म्हणून सृष्टी निर्मिलेली नाही. सूर्य आला की, प्रकाश, उजेड, उष्णता असणारच. ती त्याची प्रकृती. तसेच विश्व ही त्या परब्रह्माची सहज निर्मिती म्हणावयास हरकत नसावी.

अशा तऱ्हेने समजण्यास सोप्या ओव्या रचून महाराज आगम प्रकरणाचा शेवट करताना लिहितात,

**'ॐकार मात्रारहित आहे । तसाच अनंत मात्रांनी युक्त आहे ।**
**तो सदैव नाशित आहे पाहे । द्वैताप्रती विबुध हो ।।१, ११२।।**

सर्व द्वैताचा निरास ह्याच ॐ काराने होतो हे जो जाणतो त्यालाच मुनी म्हणजे ब्रह्मज्ञानी म्हणावे.

दुसरे प्रकरण 'वैतथ्य' नावाचे. जे सत्य वास्तव नाही ते मिथ्या, भासमय. यामध्ये स्वप्नातील दृश्ये जशी भासमय तशीच जागृतीतील दृश्येही सत्य नाहीत असे मांडले आहे. स्वप्ने भासमय, हे सर्वमान्य पण जागृतीतीलही तशीच आभासमय असे का? त्याचे कारण सांगताना महाराज लिहितात,

**''जे आधीही नाही । वा अखेरीलाही नाही ।**
**ते वर्तमानकाळीही । नाही हेच खरे असे ।।२,३२,**

आपण जे पहातो जागेपणी ते आपण आपल्या कल्पनेच्या दृष्टिकोनातून, आपल्या स्वत:च्या संस्कारांच्या माध्यमातून पाहतो म्हणून तर जसे आहे तसे पहात नाही असे म्हटले आहे. सौंदर्याच्या वेगवेगळ्या व्याख्या त्यामुळेच तर निर्माण झाल्या. सर्प रज्जूचा दृष्टान्त त्यासाठीच दिला जातो. जगाच्या आद्यकारणांबाबत अनेकांची जी मते आहेत ती महाराजांनी नोंदवली आहेत पण कुठल्याही मताच्या

खंडणाचा अभिनिवेश त्यात नाही. अशा तऱ्हेने सुलभ ओव्या रचित या प्रकरणातील ३७व्या श्लोकात ते म्हणतात,

**''अशा यत्नशील साधकाने । जगती यदृच्छेने ।**
**जे मिळेल त्यात रहाणे । संतुष्ट की सर्वदा ।।१७०।।**

तत्त्ववेत्ता हा शरीर, मन, बुद्धीचे स्वरूप जाणून घेतो. पंचमहाभूतात्मक सृष्टीचे ही ज्ञान करून घेतो अन् अनुभवाने बाह्याकार काही खरा नाही, तर सर्वत्र आत्मस्वरूप अनेक रूप-गुणांनी विलसते आहे असेच ज्याला जाणवते. ब्रह्म 'सत्यं जगत् मिथ्या' हे लक्षात घेऊनच या प्रकरणाचा समारोप करताना महाराज लिहितात,

**''ज्या माजी नाही तथ्य । तेच वैतथ्य साक्षात् ।।१७६।।''**

तिसऱ्या प्रकरणाचे नाव आहे अद्वैत. 'जीव: ब्रह्मैव नापर: ।' हे लक्षात घेऊन महाराज लिहितात,

**''घटाकाश मठाकाश पाही । भेद उठती त्या ठायी ।**
**परी आकाशात भेद नाही । हे ध्यानात असू द्या ।।१४।।**
**येणे प्रमाणे जाण । नानाविध जीवांच्या रूपे करून ।**
**परमात्म्याचे भिन्नपण । येत आहे आविर्भावा ।।१६।।**

जीवदशा ही उपाधीमुळे येते. उपाधी सुटली की उरते ते निखळ ब्रह्मच! म्हणून देहभाव, मीपणा, आसक्ती सुटण्यासाठी प्रयत्न करावे लागतात, तरच जन्ममरणाच्या चक्रातून सुटका होते. ब्रह्मज्ञ आसक्ती सुटल्यानेच सदोदित शांत, प्रसन्न, उत्साही दिसतात. या प्रकरणाचा उपसंहार करताना महाराज लिहितात,

**''कोणत्याही जीवाचा । जन्म कधी होत नाही ।।२११।।**
**कारण त्या जीवास । जन्म तो द्यावयास ।**
**कोणी न राहिले खास । तोच ब्रह्मरूप असे ।।२१२।।**

'सर्वं खल्विदं ब्रह्म' अशी स्थिति ज्या वेळी ब्रह्मज्ञ अनुभवतो तेव्हा त्याला ब्रह्माव्यतिरिक्त वेगळं काही दिसतच नाही, मीच सर्वत्र भरून राहिलो आहे हीच अनुभूती हेच अद्वैत. दोरी कधी साप झालीच नव्हती. सापाचा भास दोरी पेक्षा कुणी वेगळा द्रष्टा असला तर होणार, अदृश्य ब्रह्माच्या ठिकाणी हे दृश्य द्रष्टेपण संभवत नाही म्हणून ब्रह्माकडून कधी जीव नाहीच.

चौथे प्रकरण अलांत शांति या नावाचे आहे. अलांत म्हणजे कोलीत, जळके लाकूड. आपण उदबत्ती पेटवून जशी फिरवू तसे व ज्या वेगाने फिरवू त्यानुसार हे आकार भासतात. उदबत्ती स्थिर ठेवली की, एकही आकार प्रत्ययाला येत नाही. विश्वाचे तसेच आहे. आत्मचैतन्याधिष्ठित सारे विश्व आहे, गतिमान आहे.

अद्वैतात स्थिरावलेला ब्रह्मवेत्ता कोणतीही परिस्थिती असो त्याही परिस्थितीत तो शांत, प्रसन्न असतो. बाहेरच्या कोणत्याही परिस्थितीचा त्याच्या प्रसन्नतेवर परिणाम होत नाही. अद्वैताचा सर्वांशी असलेल्या स्वाभाविक अविरोधाचा तो सहज परिणाम असतो. सुखाने तो उचंबळत नाही. तसेच दु:खाने निराशही होत नाही. स्थितप्रज्ञ असतो. ज्ञानाला आकाशाची उपमा दिली आहे. त्याचे निर्लेपत्व, अखंडत्व कळावे यासाठीच या प्रकरणाचा समारोप करताना महाराज म्हणतात,

**''सर्व आत्मे आवरणशून्य ।**
**स्वत: निर्मल नित्य ज्ञानी व नित्यमुक्त जाण ।**
**आहेत की परिपूर्ण । ऐसे गौडपाद सांगती ।।३३८।।**
**ज्ञानरूप असणाऱ्या ज्ञानी माणसाची निरंतर ।**
**वृत्ति केंव्हाही अन्य विषयाकार ।**
**होत नाही पहा साचार । जन्म मरण नाही तया ।।३४१।।**
**जाणावयास अति कठिण । अति गंभीर 'अज' जाण ।**
**सम शुद्ध भेदरहित परिपूर्ण । आहे जे आत्मपदे ।।३४४।।**
**या आत्मपदाला जाणून । आम्ही यथाशक्ती वंदन ।**
**करितो की परिपूर्ण । नमस्कारास योग्य असे ।।३४३।।**

असो. अशातऱ्हेने पू. दासगणु महाराजांनी अत्यंत अभ्यासू वृत्तीने उपनिषदांवर मराठी भाषेतून ओवीबद्ध साहित्य निर्माण केलेले आहे. त्यांच्या एकंदर चरित्राचा विचार करता त्यांना अशा लेखनाची प्रेरणा मिळाली याचे कारण गुरू पू. वामनशास्त्री इस्लामपूरकर व श्रीसाईनाथ यांची कृपा, त्यांचा सहवास हेच होय, पुष्पासंगे मातीस वास लागे असे म्हणतात. पण मातीचा वास फार काळ टिकत नाही. महाराजांचे साहित्याचा दरवळ हा अविनाशी आनंद देणारा आहे. पू. दासगणु महाराजांचे साहित्य क्षेत्राला एक अपूर्व असे योगदान आहे अन् ते म्हणजे त्यांच्या शिष्योत्तमाचे साहित्य.

आपल्याला संस्कृत येत नाही ही उणीव त्यांनी भरून काढली ती अनंत दामोदर आठवले या त्यांच्या शिष्यपुत्राला संस्कृतज्ञ करून. हेच अ.दा. आठवले पुढे आयुर्वेद विद्यालयाचे प्राचार्य झाले. संन्यास स्वीकारून स्वामी वरदानंद भारती झाले. प्राचार्यांनी महत्त्वाच्या उपनिषदांवर व ब्रह्मसूत्रे, मनुस्मृति इ. पारमार्थिक महत्त्वाच्या ग्रंथांवर भाष्ये लिहिली आहेत. अन् त्या प्रत्येक ग्रंथात त्यांनी आपल्या या सद्गुरूंना पू. दासगणु महाराजांना विनम्र वंदन करून त्यांचे कृपेमुळे मी लेखनास धजावलो असा आदर दर्शवून आपल्या सद्गुरूंचे नाव प्रकाशात ठेवले आहे.

या सर्व ग्रंथांचा मुळातून अभ्यास करणे महत्त्वाचे आहे. मर्यादित शब्दसंख्येत त्यांचे विवरण वाचून अंशत:ही समाधान होणार नाही याची मला जाणीव आहे. पण मुळातले ग्रंथ वाचावेत अशी प्रेरणा जरी आपल्याला या लेखनामुळे झाली तरी या लेखाचे सार्थक होईल. तशी सद्बुद्धी आपणास लाभो अशी त्या परब्रह्माकडे प्रार्थना करून लेखणीला विराम देते.

**- सौ. वसुधा ग. परांजपे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठलनगरी,
उपाशी विठोबा मंदिरा शेजारी, पुणे ४१००३०.
फोन : २४४७११०९

***



# श्रीदासगणु महाराजांची वचने व सुभाषिते...

**सौ. सुखदा संजय देशमुख**
शिक्षण- बी.कॉम., गृहिणी, प.पू. अप्पांची नात

**थोरांचे जितुके तयावरि असे सत्ता जगाची खरी ।**
**गंगेला बुध, भूप, विप्र, खलही येऊन पाणी भरी ।**
**सूर्याची किरणे समान सकला मेघोदरीचे जल ।**
**केली का महि ने कधी निवड ती हा सुष्ट बा हा खल ।**

संतकवी दासगणुमहाराज रचित हे सुभाषित आहे. यात त्यांनी थोर महात्म्यांची तुलना गंगा, सूर्य, मेघ, पृथ्वी अशा परोपकारी दिव्य शक्तींबरोबर केली आहे. गंगेचे जल, सूर्याची किरणे, मेघांतील जल (पाऊस) या सर्व गोष्टी सर्वांसाठी समानतेने उपलब्ध असतात. 'पृथ्वी सर्वांना धारण करताना हा मनुष्य चांगला अथवा हा दुष्ट असा भेद करत नाही. संतांचेही असेच असते. त्यांची सर्व जमापूंजी ही सर्वसामान्यांसाठी असते. आधुनिक महिपती संतकवी दासगणु महाराज हे याच थोरांच्या पंक्तीतले आहेत. 'कल्याणी' मासिकाने संत श्री दासगणु महाराज यांच्या चरित्रावर विशेषांक काढण्याचा निर्णय घेतला, या उपक्रमाबद्दल संपादक मंडळाचे हार्दिक अभिनंदन व आभार.

समाजाचे सर्वांगीण प्रबोधन हे एकमेव ध्येय संतांचे असते. भवसागरात सांसरिक त्रासांनी दु:खी कष्टी झालेल्या बापुड्या जीवांना योग्य ते मार्गदर्शन करून, त्यांना आनंदाचा, सुखाचा मार्ग दाखवणे, त्यांना ऐहिक अभ्युदय व पारमार्थिक नि:श्रेयस साधण्यासाठी प्रोत्साहित करून योग्य ते मार्गदर्शन करणे, हेच संतांचे जीवितकार्य असते. बुडत हे जन देखवेना डोळा म्हणून कळवळा येतो मनी । अशी कोमल भावना संतांची जनसामान्यांविषयी असते. मातेच्या ममतेने संत समाज प्रबोधनासाठी कष्टत असतात. सर्व प्रकारच्या त्यागास सिद्ध असतात.

महाराष्ट्रास लाभलेल्या याच विशाल संतपरंपरेची श्रीदासगणु महाराज हे एक कडी आहेत. श्री साईबाबांचा सहवास व अनुग्रहानंतर 'समाजप्रबोधन' हे एकमेव जीवितकार्य दासगणु महाराजांचे होते. या कार्यासाठी त्यांनी भक्तिमय काव्यनिर्मिती व स्वरचित संतचरित्राचे गायन हा मार्ग निवडला. महाराजांची विशाल काव्यरचना दोन लाख ओव्यांच्या घरात आहे. या रचना श्लोक, अष्टके, स्तोत्रे, भजने, आरत्या अशा विविध काव्यप्रकारात आहेत. महाराजांनी या रचना ओवी, आर्या, दिंडी, झंपा, लावणी, पोवडा, कटाव अशा अनेक वृत्तांत केलेल्या आहेत.

प.पू. दासगणु महाराजांच्या काव्यात गेयता, उत्कटता, प्रसाद, आर्तता, भावमधुरता प्रकर्षाने जाणवते. तसेच अतिशय सुंदर, चपखल उपमा हे महाराजांच्या संपूर्ण काव्यरचनेचे वैशिष्ट्य आहे. या विशेषांकातून या सर्व गोष्टींची जाणीव वाचकांना होईलच. माध्यम काव्य व त्याचे विविध प्रकार असले तरी भगवद्भक्ती, विशेषत्वाने पांडुरंगाविषयीचे निरतिशय नि:स्सीम प्रेम, साधकांना भक्तीचा, नामाचा महिमा पटवून देणे ही एकच तळमळ या सर्व रचनांमागे दिसते. महाराजांच्या मार्गदर्शनात एक प्रकारची सर्वसमावेशकता दिसून येते. सर्वांना बरोबर घेऊन जाण्याची वृत्ती प्रत्ययास येते.

**'शैवा जो शीव, वैष्णवा हरी गमे, वेदान्तिया ब्रह्म जो ।**
**बुद्धा बौद्ध ही जो खुदाही यवना, अर्हन्त जैनास जो ।**
**कर्ता जो हि गमे प्रमाणपटुना, जे कर्म मीमांसका ।**
**ख्रिश्त्या येशू हि, तोच हा गणु म्हणे घ्या रुक्मिणीनायका ।**

हा श्लोक सर्वसमावेशकतेचा मूर्तिमंत पुरावा आहे. कोणत्याही प्रकारचा एककल्लीपणा अथवा अतिरेक महाराजांच्या काव्यात नावालाही आढळत नाही. वाणी कधी ग्राम्य झालीच तर त्यामागे आईसारखी 'मर मेल्या' म्हणण्या मागची, बालकाच्या हिताचीच तळमळ दिसून येते. याच साठीच तर संतांना माऊली म्हणतात.

श्री दासगणुमहाराजांच्या चरित्राचे व काव्याचे विविध पैलू या अंकाद्वारे आपल्यापुढे येणारच आहेत. तेव्हा पुनरावृत्तीच्या भयाने अधिक विस्तार करत नाही. महाराजांच्या सर्व जीवितकार्यामागे हिंदुधर्म, संस्कृती, राष्ट्रप्रेम, भगवद्भक्ती तसेच समाजहिताची तळमळ हीच भावना दिसून येते.

मला देण्यात आलेला विषय संतकवी श्रीदासगणु महाराजांची वचने व सुभाषिते असा आहे. महाराजांच्या काव्यातील प्रत्येक ओळ ही एक वचन व प्रत्येक ओवी सुभाषित ठरू शकते. तेव्हा वचन व सुभाषितांची निवड ही गोष्ट तशी अवघड आहे, सर्वच चांगलं आहे,

सर्वच महत्त्वाचे आहे, सर्वच अर्थगर्भ आहे. या विषयाचा विस्तार कितीही होऊ शकतो.

व्याकरणदृष्ट्या वचन म्हणजे सिद्धान्त प्रतिपादन सूक्ती, जी एखाद दुसरी ओळ असते. तसेच वचनातील सिद्धांत गद्य अथवा पद्य दोन्ही स्वरूपात असू शकतो. सुभाषित म्हणजे एक संपूर्ण श्लोक की ज्यास मागचा अथवा पुढचा संदर्भ सांगण्याची गरज नाही, तो स्वयंपूर्ण असतो. म्हणजे त्या श्लोकात वर्णिलेला विचार, मुद्दा अथवा प्रतिपादित सिद्धांत त्या श्लोकातच संपतो. मागच्या अथवा पुढच्या श्लोकात त्याचा अंश अथवा चालू धागा रहात नाही. अशा श्लोकांना मोघमपणे सुभाषित असे म्हणतात.

अशी वचने व सुभाषिते श्री दासगणुमहाराजांच्या काव्यात अगणित आहेत. पण लिखाणाला सुसूत्रता व बांधिलपणा येण्यासाठी काही वचने व सुभाषिते...

१) वैयक्तिक आचरण.

२) सामाजिक हिताची जाणीव.

३) राष्ट्रप्रेम.

४) भगवद्भक्ती.

अशा चार विषयांत विभागून आपणासमोर मांडण्याचा यथाशक्ती, यथामति प्रयत्न करत आहे. लेखातील उणीवा या सर्वस्वी माझ्या असतील.

### वैयक्तिक आचरण

**सदाचार, सन्नीती तशीच ती तिसरी सद्वासना ।**
**जागृत असल्या रक्षण होते जगताचे सज्जना ।**

मनुष्य, मनुष्य म्हणून जन्माला आला की तो सज्जन असलाच पाहिजे हे गृहीतच आहे. अन्यथा तो मनुष्यतेच्या पातळीवरूनच घसरतो. जो सदाचारी आहे, नीतिमान म्हणजे अर्थकामाची शुचिता पाळणारा आहे व ज्याची भावना सर्व भूतमात्रांविषयी चांगली आहे. त्यास सज्जन म्हणावे. अशा व्यक्ती बहुसंख्येने असल्या तरच समाज-राष्ट्र व जगताचे संरक्षण होते. इतके महत्त्व सदाचारास आहे. अन्न, वस्त्र व निवारा ही जशी मनुष्याची प्राथमिक भौतिक गरज असते, तशी सदाचार, सन्नीती व सद्वासना ही प्राथमिक पारमार्थिक गरज आहे. या मुख्य तीन गोष्टी साधल्याशिवाय पहिली पारमार्थिक पायरीही चढणे अशक्य आहे. म्हणून तर सदाचार- सन्नीती व सद्वासना या विषयांवर महाराजांची बरीच काव्ये आहेत.

वैयक्तिक आचरणाच्या दृष्टीने साधा वाटणारा पण वैयक्तिक उत्थानाच्या दृष्टीने महत्त्वाचा असणारा उपदेश महाराजांच्या काव्यातून जागोजागी आढळतो. जसे...

**१) वडील जनांचा सन्मान, ठेवावा मनापासून ।**
**निज जननीचे वचन, वेदतुल्य मानावे ।।**

**२) जो नियमाने वागतो, तोच निरोगी राहतो ।**
**जो शरीरा न जुमानतो, त्याचे दैन्य वरचेवरी ।**

**३) शुद्ध अभाचे भक्षण, केल्या सुसंस्कृत होते मन ।**

**४) चैन करता दैन्य होईल, आळस कधिही नाही बरा ।**

अशातऱ्हेने माता-पिता, गुरूंचा आदर, योग्य तो आहार-विहार, संयमित जीवनशैली, कार्यक्षम जीवन, अद्रवेष्टेपणा, प्रेम, सद्भावना या अत्यंत महत्त्वाच्या पण साध्या वाटणाऱ्या गोष्टींविषयी मार्गदर्शन महाराज करतात. हे साधले की पुढे महाराज सांगतात,

**अंतर्मुख वृत्ती करी । जरी बघणे असेल हरी ।**

वृत्ती अंतर्मुख होण्यासाठी आधी 'मन बुद्धीवर ताबा यावयास हवा. सहसा मनबुद्धीचे सख्य नसते. आणि हेच कारण मनुष्याच्या सर्व तणावांचे आहे. श्रेयस विरुद्ध प्रेयस असा हा अनादी कालापासूनचा संघर्ष आहे. याचसाठी महाराज म्हणतात,

**'बुद्धी कराया पुण्य जायपरी । मन खेची अगडोही ।**

मन हे चंचल, प्रमाथी आहे पण फार बलवान आहे. हे लक्षात घेऊन दासगणुमहाराजांनी मनाच्या श्लोकाची रचना केली. काय कर व काय करू नको याचा मनालाच उपदेश महाराजांनी केला आहे.

**मना वासना दुष्ट ही भ्रष्टविते,**
**जशी ती सुरा मद्यपा नाचविते ।**

महाराज सांगतात मद्याच्या कैफामुळे मनुष्य जसा कोणत्याही पातळीपर्यंत भ्रष्ट होऊ शकतो, तशीच दुष्टवासना मनुष्यास भ्रष्ट करते. याचसाठी मनुष्याने सदैव स्वतःच्या मनात निर्माण होणाऱ्या इच्छा, कामना, वासना यांबद्दल सावध रहावे. महाराज एके ठिकाणी म्हणतात,

**परा तापविणे, तया पाप नाम ।**

दुसऱ्याला त्रास होईल असे वागणे अथवा बोलणे म्हणजेच पाप. हे फार महत्त्वाचे आहे. काही माणसांना सतत बोचक, वाकडे, मर्मघाती, अडचणीत आणणारे असे बोलायची सवय असते. पण असे करणे पाप आहे. हे सर्वांनी लक्षात ठेवावे.

आजच्या आधुनिक काळात, आमच्याकडे देव-धर्म परंपरेसाठी वेळ नसतो. कोणत्याही प्रकारचे धार्मिक कुलाचार, कुळधर्म, वैयक्तिक स्नानसंध्या, प्रार्थना यातले काहीच आज घरात घडत नाही आणि याला कारण वेळ नाही असे दिले जाते. अशांना विशेषतः पुरुषवर्गास खडसावून महाराज सुनावतात,

**स्नानसंध्या, ध्यान-धारणा, ईशभक्तीला वेळ नसे ।**
**घंटा घंटा सावरी नेकटाय, केस डोईचे विचरतसे ।**

वैयक्तिक आचरणात तरुण पालकांसाठीही एक धोक्याची सूचना दासगणुमहाराजांनी केली आहे. ती अशी,

**'निष्कलंक ज्याचे बालपण, गेले त्यालाच तरुणपण ।**
**सुखदायी होते जाण, ऐहिक सुखे भोगावया ।**

मुलांना सर्व सुखसुविधा उपलब्ध व्हाव्यात म्हणून आजचे दोन्ही पालक दिवसरात्र काम करतात. यातून मुलांना उत्तम शैक्षणिक सुविधा, क्रीडा साहित्य, वाहने, घर, बँकेतील जमारक्कम, विविध बचत योजना हे

सर्व देता येते. पण पालकांनी जर मुलांना वेळ दिला नाही, तर ते भावनिकरीत्या असुरक्षित होऊन भरकटतात व बालपणीच काही विपरीत घडले तर त्यांचे उर्वरित आयुष्य त्रासदायक होऊ शकते. तेव्हा सर्व सुजाण पालकांनी ही गोष्ट लक्षात घ्यावी.

### समाजहिताची जाणीव

दासगणु महाराजांच्या वाङ्मयात समाजहिताची जाणीव जागोजागी आढळते. समाजधारणेसाठी प्रत्येकाने काय करावे व काय टाळावे याचा उल्लेख आढळतो. वर्णाश्रम-पद्धती व जातिव्यवस्था महाराजांना मान्य होती. प्रत्येकाने जर आपले अधिकार व कर्तव्ये यांची जाणीव ठेवली तर सुंदर, सशक्त, सक्षम, सामर्थ्यशाली समाजाची निर्मिती होऊ शकते. याचसाठी महाराज पांडुरंगाकडे मागतात, जाती शुद्ध राखूनी, एकी शीर्घ होऊ दे । पुढे महाराज म्हणतात,

**जाती मत्सर करू नये, उणे पराचे पाहू नये ।**
**संभ्यते सोडू नये, काही केल्या ।**

यापुढे एक सुंदर उपमा महाराज देतात,

**अवघा समाज एकच व्यक्ती । अनन्त व्यक्ती अवयव ते ।**
**अवयवधर्मी दुही माजल्या । सौख्य कुठोनी मग देहाते ।**

एकाच व्यक्तीच्या शरीरातील विविध अवयवात जर परस्पर संघर्ष निर्माण झाला तर जशी शरीराची दैन्यावस्था होईल, तशीच अवस्था समाजाची जातीजातीतील वैराने होईल. जसे प्रत्येक अवयवाचे कार्य दुसऱ्याहून वेगळे असते. तसेच वर्ण व जातींचे आहे. पण आधुनिक बुद्धिवाद्यांना अनैसर्गिक अशी समानता अभिप्रेत आहे, तर स्वार्थी राजकारण्यांना जातीजातीत द्वेष, मत्सर, वैर हवे आहे. पण या दोन्ही अवस्था समाजहिताच्या नाहीत. मुळात निसर्गातच इतकी विविधता असताना, बळाने समता येऊ शकत नाही. याचे रशिया हे जिवंत उदाहरण आहे.

बळाने समानता आणता येत नाही यावर महाराज म्हणतात,

**'मानव आणि पशूला । समान मानणे हा सिद्धांत झाला ।**
**म्हणून का त्या दोघांना । खाया गवत घालावे? ।**

जाती वर्णामध्ये माजलेला कलह समाजाच्या नाशास कारणीभूत होऊ शकतो. परकीय शत्रू देशावर आक्रमण करू शकतात म्हणूनच महाराज म्हणतात,

**'देश झाल्या दुर्बल, परकीयांचे फावेल ।**
**हे सर्वांचा करतील, पाटावरवंटा ध्यानी धरा ।।**

याचा अनुभव भारतवर्षाने इंग्रजी राजवटीच्या रूपाने घेतलाच आहे. आणि इंग्रजांनी केलेल्या बुद्धिभेदाचे दुष्परिणाम आपण आजही भोगत आहोत. इंग्रजांनी आपल्या स्वत्वावर घाला केला. आपली परंपरा, संस्कृती चुकीची ठरवली. त्याकाळचा वरवर पाहणारा बुद्धीवादी वर्ग या भुलावणीला फसला. याचे मूर्तिमंत दुष्परिणाम आजच्या भरकटलेल्या तरुण पिढीच्या रूपाने आपल्या समोर आहेत. आपली जी सनातन वैदिक जीवन पद्धती होती तीच उत्तम होती. अधिक नैसर्गिक होती. याचसाठी दासगणुमहाराज म्हणतात,

**'मूळ चाल बदलू नये । नवे ढंग काढू नये ।**
**केल्याविण राहू नये । समय येता सुधारणा ।।**

सुधारणेशी वैर नाही पण होणारा बदल खरच अत्यावश्यक व लाभकारी आहे अथवा नाही हे तपासून पाहिलेच पाहिजे. उगीचच आहे त्यास चुकीचे मानून, अहितकारी नवे अंगीकरणे योग्य नाही.

### हिंदुराष्ट्र प्रेम

कोणाला हिंदू म्हणावे? याची व्याख्या करताना श्रीदासगणु महाराज म्हणतात,

**'जे समाजाचे हीत झाले, तें प्रत्येकी म्हणावे आपुले ।**
**आणि हे ज्याचे मनी वरिले, तोचि हिंदू म्हणावा ।।**

ज्यात समाजाचे हित आहे त्या गोष्टी जो अंगीकारतो त्यास हिंदू म्हणावे. पुढे हिंदु-धर्माची शिकवण सांगताना महाराज म्हणतात,

**'हिंदु धर्माचा हाच धडा । व्यक्तीस्वातंत्र्ये द्वेष सोडा ।**
**समाजस्वातंत्र्याचे प्रेम जोडा । म्हणजे अवघेच करी ये ।**

व्यक्तीव्यक्तीतील द्वेष सोडून, समाजाच्या प्रगतीचा, उन्नतीचा, स्वातंत्र्याचा ध्यास घ्या. समाजावर प्रेम करा म्हणजे सर्वकाही हाती येईल म्हणजे समाज प्रगत होईल. असे विचार महाराजांचे हिंदू धर्माविषयीचे आहेत. त्यांच्यादृष्टीने हिंदुधर्म व हिंदुराष्ट्र ही एकच संकल्पना आहे. हिंदुधर्माविषयीचा जाज्वल्य अभिमान महाराजांच्या काव्यातून प्रत्ययास येतो. अतिशय स्पष्टपणे ते लिहितात,

**म्हणून हिंदूधर्मासमान । सर्वांगसुंदर धर्म जाण ।**
**कोठे न झाला निर्माण । हे तुम्ही विसरू नका ।**

यास कारण हिंदुधर्माने -

**ऐहिक, पारमार्थिक तत्त्वाचा, ज्यात विचार केला साचा ।**

हिंदुधर्म एकांगी नाही. मनुष्याच्या सर्व आवश्यकतांचा विचार आपल्या धर्माने केला आहे. अर्थ व काम यास पुरुषार्थात स्थान केवळ हिंदुधर्माने दिले आहे. अर्थकामास मात्र धर्माची चौकट घट्टपणे घातली आहे. नेटकेपणाने, निष्कामभावनेने केलेला संसारच परमार्थात परिणत होतो. म्हणून तर पूर्वरंगाच्या एका पदात दासगणु महाराज म्हणतात,

**सर्व सुखाते भोगून उरवा, निज किर्ती भूवरी ।**
**गणू म्हणे सार्थकता ही खरी ।**

असे असले तरी याच बरोबर 'होऊनिया निष्काम घ्यावा जानकी जीवन राम' हे साधले की संसार व परमार्थ हातात हात घालून चालतात.

हिंदुधर्म अनैसर्गिक वैराग्यही शिकवत नाही. तसेच व्यभिचारी उपभोगही मान्य करत नाही. कुटुंब व विवाहसंस्थेच्या चौकडीत राहून सर्व सुखे प्राप्त करण्यास मात्र प्रतिष्ठेचे मानतो. आणि असे वागण्यातच व्यक्ती- कुटुंब- समाज- राष्ट्राचे हित असते. हिंदुधर्माचा महिमा, त्याची कालातीतता, त्याची उपयोगिता, अनेक ठिकाणी व्यक्त होते. दासगणु महाराजांनी छाती ठोकपणे 'असे श्रुतीज धर्म हा, महीवरी

अनादी खरा' असे वचन श्री जगन्नाथ पंडीतांच्या तोंडी घातले आहे.

दासगणु महाराज भक्तीमार्गी रत असले तरीही, त्यांच्या राष्ट्र विषयक भावनाही तितक्याच उत्कट होत्या. त्या काळी भारत परतंत्रच होता, याविषयी कळवळून महाराज लिहितात,

**स्वातंत्र्य प्राण राष्ट्राचा सर्वतोंपरी ।**
**तें नाही जिथे तें राष्ट्र मढ्याच्या परी ।**

स्वातंत्र्याची चाड नसलेल्यांसाठी महाराज लिहितात,

**स्वातंत्र्यप्रिय जो तोच म्हणावा नर ।**
**नावडे जया तो कलालगृहीचा खर ।**

समाजहित तसेच राष्ट्रभक्ती यासंदर्भात महाराज अतिशय संवेदनाक्षम होते हे त्यांच्या काव्यातून दिसून येते. धर्म व राष्ट्र यांच्या विरुद्ध वर्तन करणाऱ्यांवर महाराजांनी अतिशय कडक शब्दांत चाबूक चालवला आहे. आजच्या निवडणुकीचे, देशाचा नेता निवडीचे स्वरूप आपल्याला माहितच आहे. कोणाला आपला नेता निवडा याविषयी महाराज सांगतात,

**'दुर्दर्शी, चतुर, शहाणे खरे सज्जन ।**
**असतील तयां द्या कौन्सिलात निवडून ।**

नेत्याची जणू पात्रताच महाराजांनी सांगितलेली आहे. आपण नागरिक ३० ते ४० टक्के कर सरकार दरबारी जमा करतो. पण रस्ते, पाणी, वीज या प्राथमिक गोष्टीही आपल्याला सहजतेने उपलब्ध होत नाहीत. यासंदर्भात महाराज म्हणतात,

**'सरकार दिलेल्या काय धनाचे करी**
**हे कसून पहा, ना भीड धरा अंतरी ।**

आता पर्यंत जे लिहिले त्याचे सार सांगायचे तर महाराजांची पुढील दोन सुभाषिते पुरे आहेत.

**'आहो आपण भारतीय सगळे एका हरीची मुले,**
**याची जाण धरून सज्जनपणे वागा त्यजोनी खुळे,**
**निंदा, स्वार्थ, असत्य, मत्सर अशा टाकोनिया दुर्गुणा,**
**निष्ठा ठेवून संस्कृतीवर सुखे संपादणे जीवना ।**

यापुढे दासगणु महाराज सांगतात,

**स्वधर्म स्वजनावरी अमित प्रेम तें ठेवणे,**
**स्वराष्ट्रहीत साधण्या सतत सज्ज की राहणे,**
**असे श्रुतिज आपुला जगति धर्म त्या मानणे,**
**तयांत भलती खुळें धरूनि हट्ट ना काढणे ।**

### ईशभक्ती

पांडुरंगाविषयीचे प्रेम त्याची भक्ती, त्याचे ध्यान, त्याचे वर्णन, त्याची प्रार्थना हा महाराजांच्या काव्याचा गाभा आहे. केवळ एका विठ्ठलाचा ध्यास, महाराजांच्या सर्व रचनांमागे आहे. 'उभा कैवल्याचा गाभा, चंद्रभागे काठी' असे महाराज म्हणतात. चंद्रभागेच्या तीरावर, विटेवर दोन्ही हात ठेवून उभा असलेला विठोबा म्हणजेच निराकार, निर्गुण, निरंजन ब्रह्म आहे. अशी निस्सीम भक्तिभावना महाराजांची आपले आराध्यदैवत असलेल्या पांडुरंगाविषयी आहे. असे असले तरीही साधकांनी सुरुवातीस सगुणस्वरूपाचीच भक्ती करावी असे स्पष्टपणे ते सांगतात,

**'भक्ती मार्गीची गोष्ट खोटी, ऐशी न करी वल्गना ।**
**भजून बघ भावे नारायणा ।**

इतके स्पष्ट आव्हान महाराजांनी केले आहे. ईश्वरापर्यंत पोचण्यासाठी भक्ती हा राजमार्ग असला तरी यात काही पथ्ये पाळावी लागतात, तरच प्रगती होऊ शकते. याचसाठी दासगणु महाराज सांगतात,

**'भक्ती तीच खरी, हरीची भक्ती तीच खरी**
**दंभा फाटा अद्वेष्टेमन, सन्नीतिला आदरी ।**

वरवर पाहता भक्ती कितीही साधी, सरळ, सोपी वाटत असली तरीही ती प्राप्त होण्यासाठी काही पात्रता अंगी यावीच लागते. अहंकार, द्वेष, मद, मत्सर, क्रोध, लोभ हे दूर झालेच पाहिजेत. अंत:करणातील क्षमा, दया, शांती वाढती असली पाहिजे. सदाचारी आचरण असले पाहिजे. तरच चित्तशुद्धी होऊ शकते आणि चित्त जर शुद्ध नसेल तर इतर साधनेला काहीच अर्थ उरत नाही, याचसाठी महाराजांनी लिहून ठेवले आहे,

**'साधका असावे मन जणू गंगा जल.'**

स्वर्धुनी गंगाभागीरथी जशी परम-पवित्र आहे तसे साधकाचे अंत:करण विकाररहीत झाले पाहिजे. तरच हृदयस्थ परमेश्वराचे दर्शन होऊ शकते. साधकाच्या कर्म-भक्ती-ज्ञान-मोक्ष या प्रवासात गुरूंची महती आपल्या परंपरेत फार उच्च दर्जाची आहे. 'परब्रह्म मूर्ती, सद्गुरू हाच एक जगती ।' असे सद्गुरूस परब्रह्माचे स्थान दासगणुमहाराजांनी दिले आहे.

मनुष्याचे आयुष्य ही तारेवरची कसरत आहे. अत्यंत विवेकाने इथे तोल सांभाळावा लागतो. एखादाही दुर्गुण अथवा दुराचार इतर सर्व चांगल्यावर पाणी फेकू शकतो. म्हणून तर आपल्याला सावध करताना महाराज म्हणतात,

**'तेजी, मृदु, चपल, सुंदर, शीत, रोष ।**
**ना ठेवितो परि तया कुणि संग्रहास ।**
**एका विषे करून तो दडला बिळास ।**
**नाही बरा म्हणून एकही अंगि दोष ।**

इतर गोष्टी चांगल्या असूनही एक विष सर्पास माणसाचा शत्रू बनवते. तसेच माणसातला एखादाही दुर्गुण फार मोठे नुकसान करू शकतो. पण आपल्या अंगी काही अवगुण आहेत हेच आपल्याला पटत नाही. उलट त्याचेच भांडवल आपण करू पाहतो. पण हे घातक ठरते. कारण अशा दुर्गुणांमुळे आपण सज्जनमाणसांपासून दूर जातो व दुष्टांच्या संगतीने वेढला जातो, यासाठी दासगुण महाराज लिहितात,

**'ज्याचा तयास कधि दुर्गुण तो कळेना,**
**वाटे कुठे स्वरव वाइट रासभांना,**

**ते उच्च काढूनि रवा जरि गर्जताती,**
**ज्ञाते कदा न परि ढुंकून त्या पहाती ।**

यावर अधिक भाष्याची गरज नाही. आणि अगदी याउलट स्थिती सज्जनांची असते,

**'पाहून तो समय सज्जन बोलताती,**
**येता वसंत रव कोकिल काढिताती,**
**काका सदैव करिसी जरि कंठशोष,**
**तू बा परी नच पटे स्वर तो कुणास ।**

आपण यात कुठे बसतो हे ज्याचे त्याने शोधून पहावे. सर्वसामान्यांचे आयुष्य कितीही वर्षांचे असले तरी त्याचे सार पुढील चार ओळीतच असते. जसे -

**शिशुपणि बहु राहे प्रेम क्रीडेत मोठें,**
**तरुणपणि नरांना कामिनी ब्रह्म वाटे,**
**जरठपणि मुलाची काळजी व्यर्थ वाही,**
**गमवि वय परी ना आठवी शेषशायी ।**

आपलेही असेच तर होत नाही ना याचा विचार करावयास हवा.

प.पू. दासगणु महाराजांच्या काव्यरूप क्षीरसागरातली ही वचने व सुभाषिते मौक्तिकमय शिंपले आहेत ती किती म्हणून वेचणार? माझ्या अत्यल्प शक्तीनुसार व उपलब्ध साधनांनुसार मी हे मोती वेचण्याचा प्रयत्न केला तो आपण सुजाण वाचकांनी गोड मानून घ्यावा.

संतजनांचा सहवास हा मोक्षदायी असतो. ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी, तुकारामांची गाथा, रामदासांचा दासबोध तसेच श्रीदासगणु महाराजांचे काव्य ही त्यांची वाङ्मयमूर्ती असते. या ग्रंथांच्या वाचन-मनन-चिंतनाने प्रत्यक्षात संतांच्याच सहवासाची अनुभूती येते. म्हणून तर थोरामोठ्यांचा सहवास आवर्जून करावा. दासगणु महाराजांच्याच शब्दात शेवट करायचा तर,

**जो जो कराल तुम्हि घर्षण चंदनाला,**
**तो तो सुवास अधिकाधिक ये तयाला,**
**सत्संग हा फलद त्यापरि साच होतो,**
**जो जो कराल सुख देईल जाण तो तो**

या विशेषांकाच्या रूपाने श्री दासगणु महाराजांच्या वाङ्मयाची ओळख आपण सर्व साधक वाचकांना होणारच आहे. पण एवढ्यावरच न थांबता आपण जाणत्या वाचकांनी समग्र दासगणु वाङ्मयाचा परिचय करून घ्यावा अशी नम्र विनंती. मला ही संधी उपलब्ध करून दिल्याबद्दल संपादक मंडळाचे आभार!

। पुंडलीक वरदा हरी विठ्ठल ।
। सद्गुरू दासगणु महाराज की जय ।

**- सौ. सुखदा संजय देशमुख**
डी-१०४, विन्डलाज रेसिडेन्सी, कर्झन रोड, दालनवाला,
डेहराडून- उत्तराखंड - २४६००१. फोन : ०८७५५०७८७७७



# विदेही संत श्री गजानन महाराज!

## (श्री गजानन विजयग्रंथ - दासगणु)

**डॉ. श्री. ग. प्र. परांपजे**

एम्. ए.बी.एड., पी.एच्.डी. (संत दासगणु वाङ्मयीन अभ्यास) पुणे, न्यू इंग्लिश स्कूल येथे उपप्रमुख म्हणून ३२ वर्षे सेवा. ५०० च्या वर लेख प्रकाशित. २० वर्षे शिक्षक संघटनेचे कार्य. विपुल लेखन. मुख्यत: संत व त्यांचे वाङ्मय आणि धार्मिक विषय, श्रीकृष्ण कथामृतातील संस्कृत वंदनांचे मराठी रूपांतर, रेडिओवर मुलांसाठी आकाशदर्शन कार्यक्रम

'श्रीमद् गजाननगुरुं शिरसा नमामि।'
(प्रा. अनंतराव आठवले)

**श्री गजाननविजय ग्रंथनिर्मितीचा इतिहास**

श्री गजानन महाराज हे 'श्री समर्थ साईबाबांचे' समकालीन तसेच साईनाथांचा सहवास लाभलेले 'संत दासगणु महाराज'. साईनाथांच्या अमृतवाणीतून श्री गजाननमहाराजांचे नाव त्यांनी अनेकदा ऐकले होते. शेगावहून अकोटला जाताना एका खेडेगावी ओढ्याच्या काठी भर दुपारी आत्मानंदात तल्लीन होऊन 'गणगण गणात बोते' या भजनात दंग झालेल्या देहभान विसरलेल्या श्री गजाननमहाराजांचे प्रत्यक्ष दर्शन घडलेल्या संतकवी दासगणु महाराज यांच्या सिद्ध वाणीनेच 'श्री गजानन विजय' हा ग्रंथ पावन व्हावा हा जणू ईश्वरी संकेतच.

शेगावचे श्री रामचंद्र कृष्णाजी पाटील व काही प्रतिष्ठित मंडळी यांना वाटत होते की, गजानन महाराजांचे चरित्र ओवीबद्ध लिहून घ्यावे. त्यासाठी महाराजांच्या लीला, विशेष घटना, प्रत्यक्ष घेतलेले अनुभव, इतर भाविकांचे अनुभव यांचे संकलन त्यांनी केले. नाशिकला ह.भ.प. श्री लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांना भेटून तशी विनंती त्यांना केली पण त्यांनी दासगणु महाराजांचे नाव सुचविले. मंडळी श्री दासगणु महाराजांना भेटण्यास पंढरपूरला आली. दासगणु महाराजांनी आनंदाने त्यांना संमती दिली. त्यांना म्हणाले, 'मला प्रेरणा देणारा विटेवर उभा आहे. त्याच्याच कृपेने काव्य जुळते.'

श्रीदासगणु महाराज शेगावी आले. शेगावकरांनी उत्साहात त्यांचे स्वागत केले. गजानन महाराजांचा जयघोष करत श्रीदासगणु महाराजांना मंदिरात आणले. सर्व कागदपत्रांच्या सत्यतेची पडताळणी करून ओवीबद्ध ग्रंथाच्या लिखाणास सुरुवात झाली. नमनाच्या ओव्यांनतर दासगणु महाराज म्हणतात,

'जे जे तुम्ही वदवाल काही। तेच लिहीन कागदी पाही।
स्वतंत्रता मजला नाही। मी पोसणा तुमचा असे।।

हा ग्रंथ म्हणजे श्रीदासगणुंच्या कवित्वाचा मेरूमणी. रोज एक अध्याय याप्रमाणे एकवीस दिवसांत एकवीस अध्याय पूर्ण झाले. अत्यंत प्रासादिक, रसाळ, भक्तिरसप्रधान अशा श्री गजानन विजय ग्रंथाची निर्मिती अशी झाली. या ग्रंथाचे मानधन म्हणून श्रीदासगणु महाराजांनी फक्त श्रीफळ व रुमाल यांचा गजानन महाराजांच्या पवित्र चरणांचा स्पर्शित प्रसाद म्हणून स्वीकार केला. या ग्रंथाचे सर्व हक्क गजानन महाराज संस्थानास दिले. दासगणु महाराजांनी 'श्रीगजानन विजय' ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात संतश्रेष्ठीचे वर्णन केले आहे. तसेच वर्णन या 'ज्ञानयोगी, कर्मयोगी संतश्रेष्ठास तंतोतंत लागू पडते.

**संत हेच भूमीवर। चालते बोलते परमेश्वर।**
**वैराग्याचे सागर। दाते मोक्षपदाचे।।**

**ग्रंथाचे अलौकिकत्व :**

एखाद्या ग्रंथाला असे अलौकिक भाग्य लाभलेले असते, की त्याचे आश्चर्य वाटल्यावाचून रहात नाही. असा ग्रंथ पराकोटीच्या भक्तिभावावाचून निर्माण होत नाही. संतकवी श्री दासगणु महाराज लिखित श्री गजानन विजय ग्रंथाचे नाव या संदर्भात उल्लेखावे लागेल. शेगाव संस्थान (गजानन महाराजांचे)च्या अलीकडच्या विवरणामध्ये या ग्रंथाच्या ४० आवृत्त्यांच्या व १५ लाखांवर प्रती खपल्याचा उल्लेख सापडतो. महाराष्ट्रात अनेक ठिकाणी या ग्रंथाची सामुदायिक पारायणे होतात. व्यक्तिगत पातळीवर तर महाराष्ट्रात एकही घर असे नसेल की जेथे ही पोथी नाही. श्रद्धेला मिळणारे असे अलौकिक फळ फार क्वचित पहायला मिळते. या दिव्यग्रंथाचे सर्वाधिकार दासगणुंनी शेगाव संस्थानला अर्पण केले होतेच. मात्र ते तोंडी होते, पुढे त्यांच्या उत्तराधिकारी प्राचार्य अ. दा. आठवले यांनी ते लेखीस्वरूपातही दिले. त्या गुरुशिष्यांची अफलाकांक्षी वृत्तीच त्याला कारणीभूत आहे. आजही या ग्रंथाचे विविध अनुभव भाविकांना येतात!

१९३९ मध्ये दासगणुंनी या ग्रंथाची रचना केली. २१ अध्याय आणि ३६६८ ओवी संख्येचा हा भक्तिरसप्रधान ग्रंथ आहे. मोजक्याच शब्दात रेखाटलेली व्यक्तिचित्रे, उत्तम वर्णने, उपमा दृष्टान्तादि अलंकार, अत्यंत मार्मिक अशी रूपके, सोपी, प्रासादिक, प्रवाही भाषा आणि या गुणसमुच्चयाला आधारभूत ठरलेली दासगणुंच्या हृदयातील निरपेक्ष

भक्तिपरिप्लुतता यांनी हा गजानन-विजय ग्रंथ मंडित झालेला आहे. वे. शा. सं. भाऊशास्त्री वझे, बा.गं. खापर्डे, प्रा. लिमये इ. दासगणुंच्या समकालीन विद्वान मंडळींनी ग्रंथगौरव मुक्तकंठाने केलेला आहे. नगरच्या श्री. ल. हा. पाठक यांना याच ग्रंथाने 'गणि गणि गणात बोते' ही कादंबरी निर्मिण्याची प्रेरणा मिळाली. श्री गजानन महाराजांचे चरित्र अद्‌भुत आहेच पण दासगणुंची वाणी म्हणजे 'रत्नं समागच्छतु कांचनेन।' श्री गजानन महाराज प्रकट झाल्यापासून तो ते देह ठेवीपर्यंतच्या विविध अनुभवकथांची सुंदर गुंफण दासगणुंनी या ग्रंथात केलेली दिसून येते. उत्कट भावभक्तीने संतकवींचे हे ग्रंथशिल्प चिरतरुण झालेले आहे.

**संतकवींची लेखन दृष्टी :** संत व संतचरित्रे म्हणजे भाकडकथा असा एक प्रवाद ५०-७५ वर्षांपूर्वी सरसकट होता. आता त्याचे स्वरूप काहीसे सौम्य झाले आहे. चमत्कार कथांची गुंफण या ग्रंथात त्यांनी केलेली असली, तरी त्या रचनेला भाकडकथा म्हणण्याचे धाडस कुणीही करू शकणार नाही. 'मी आकोटास त्यांना प्रथम पाहिले होते (१-५६) असा उल्लेख ती. दादांनीच (दासगणुमहाराज) प्रथम केलेला आहे. चमत्कारांच्या भोवती बुवाबाजीचे-ढोंगाचे वलय पहातापहाता निर्माण होते याची, त्यांची जाणीव पक्की आहे. ती ध्यानात घेऊनच ते म्हणतात - ''माझ्या मनी हेत होता। गावे गजानन चरित्रात परी त्याची (चमत्कारांची) तत्त्वत: । संगत नाही लागली'' (१-६०) म्हणून त्यांनी शेगाव-मठातले सर्व कागदपत्र चाळले, पाहिले, खऱ्या-खोट्याची शहानिशा केली (या अंकात अन्यत्र याचा लेख आलेला आहे) या संदर्भात रतनसाचा उल्लेखही त्यांनी केला आहे. 'कल्पनेचा उपयोग केला नाही - साधार लेखन केले आहे (२१-२४९) असे ही त्यांनी सांगितले आहे. चमत्कारांसंबंधी त्यांचा दृष्टिकोन त्यांनी 'भक्तिसारामृत' ग्रंथात मांडलाच आहे. 'नदीचिया गारे प्रत। हिरा मी लेखिल्या सत्य। जन, देवा, फसतील अंतिम। आणि दोषी ठरेन मी।। (भ.सा.६२/३) याचा निष्कर्ष इतकाच की ते निराधार लेखन करीत नाहीत! यामुळेच साहित्यइतिहासकारांनी त्यांची दखल घेतली आहे!

आपण जी लोकाचारानुरूप भाषा वापरतो तशी श्री गजानन महाराज वापरीत नसत. खापर्डेम्हणतात, की दासगणुंनी अशा त्यांच्या बोलण्याचा योग्य अर्थ लावला आहे. गजानन महाराजांची दोन भजने आहेत - १) गणगण गणात बोते २) गणि गणि गणात बोते. संतपरंपरा ध्यानात घेऊन दासगणूंनी त्यांचा अर्थ करताना म्हटले, 'हे जीवा, सर्वच जीवांची गणना त्या ब्रह्मातच कर, अन्य कशातही नको.' (९.२९)

**चमत्कार कथांचे सार :** कधी समाजाकडून पूर्ण अवहेलना पत्करावी तर कधी आदर नमस्कार! कधी मधमाशांचा हल्ला स्वीकारावा तर कधी सुरुंगाच्या दारूपासून एखाद्याचे रक्षण करावे; कधी गावच्या पाटलाशी कुस्ती खेळावी तर कधी त्याचेचकडून मारही खावा; एखादे वेळी पलंगासह स्वत:स जाळून घेण्याचे कर्म, तर कधी भक्ताचा महारोगही नष्ट करण्याचे कर्म! कधी एखाद्या कोरड्या विहिरीला झरे फोडावेत तर कधी नर्मदा नदीमध्ये फुटकी नावही तारावी. कधी कधी भानामतीचे आविष्कार तर कधी अतिशय प्रेमाने सर्वांना नर्मदेचे दर्शन घडवावे! एकदा तर एका भक्ताला स्वस्वरूपात पांडुरंग दर्शन घडवले. एखाद्याचा रोग आपल्याच पद-तीर्थाने दूर करावा तर एखाद्याला पादुकाच अर्पण कराव्या. अशा अनेकविध कथा संतकवींनी या ग्रंथात आकर्षकपणे गोविल्या आहेत. एकमात्र जगत्‌कल्याण हा सर्व संतांचा जीवन हेतू! त्याचे प्रत्यंतर श्री गजानन महाराजांच्या या स्वैरकथा गुंफताना संतकवींनी दाखवून दिले आहे. प्रासादिक भाषेमुळे ग्रंथाला आकर्षकता प्राप्त झाली आहे.

**दासगणुंची अर्थसंगती :** संत गजानन महाराज अयोनिसंभव होते. रस्त्यावर पडलेल्या उष्ट्या पत्रावळीतील शिते वेचून खाणाऱ्या तरुणाच्या रूपात शेगावत २३-२-१८७८ या दिवशी ते प्रकट झाले असे वर्णन पहिल्या अध्यायात झालेले आहे. आपल्या संस्कृतीत ईश्वराचे अवतारही असेच मानले जातात. दासगणुंनी या संदर्भात केलेले स्पष्टीकरण चांगले आहे.'' सर्वत्र ओतप्रोत भरून राहिलेल्या ब्रह्माचा ठावठिकाणा कसा सांगणार! हिऱ्याचे तेज बघून ज्ञाते सुखावतात. त्याची खाण बघायला कोणी जात नाही. तसेच गजानन महाराजांच्या जन्मासंबंधी निश्चित विधान करणे असंभव आहे. योग्यांचे ही असेच आहे. 'गोरख जन्मला उकीरड्यात। कानिफा गजकर्णात। चांगदेव नारायण डोहात। योनी वाचून जन्मले।।' (१/७०-८०) दासगणुंची ही अर्थसंगती योग्यच आहे.

**दासगणुंची राष्ट्रीयवृत्ती व समाजमनस्कता :** आपले राष्ट्र सतेज व वैभवसंपन्न झाले पाहिजे याची त्यांची जाण स्पष्टपणे प्रत्ययाला येते. समाजस्थैर्याचा विचार ते गांभीर्याने करतात हे, एका ओवीत दिलेल्या भडक दृष्टान्तामुळे स्पष्ट होते. संतांचे संतत्व असा विषय सांगत असताना ते लिहितात : 'संतत्व नाही मठात। संतत्व नाही विद्वत्तेत। संतत्व नाही कवित्वात। तेथे स्वानुभव पाहिजे।।

**दांभिक मुलाम्याचे सोने। त्याला सांगा काय घेणे।**
**गृहिणी म्हणून ठेवणे। काय कसबीण सदनात।।'** (६-८४/८५)

सातव्या-आठव्या अध्यायात खंडुजी पाटील व देशमुख यांची कथा येते. महाराजांनी खंडूला वाचवलेले असते. त्या निमित्ताने दुफळीमुळे समाजाचा घात होतो हे स्पष्ट करून वैयक्तिक अहंकारही द्वेषाला कारणीभूत होतो हे सुचवितात. म्हणतात, ''उत्सव नावास मारुतीचा। परी जयजयकार पाटलाचा। म्हणतील तो शब्द त्याचा। झेलणे भाग रयतेला।। ' (७/२५) 'जमेदारीण खाणसत्य/आहे प्रत्यक्ष द्वेषाची'।। (७-१५०)

शेतकऱ्यांचा कणव तर त्यांनी १९०२ मध्ये लिहिलेल्या 'उसाचा पोवाडा' मध्ये स्पष्ट व्यक्त केलीच. येथेही ५ व्या अध्यायात शेतकऱ्याची दु:खद स्थिती ते समाजापुढे मांडत आहेत. ''शेतकऱ्यांची पहाता स्थिती। ते अवघ्यात मुख्य असती। कृष्णावल हा निश्चिती। अन्नदाता जगाचा।। अंगी ऐसे मोठेपण। परी सोशी यातना दारूण। बिचाऱ्यांना ऊन तहान। सोसणे भाग सर्वदा।।'' (५/९०-९१)

धार्मिक समन्वयाचा त्यांचा विचार असाच लक्षणीय आहे.

अकोल्यात बापूराव या भक्ताकडे कुरूम गावचे एक यवन सत्पुरुष भेटतात व तेथे एक जेवणाचा कार्यक्रम होतो. धर्मतत्त्वांच्या ऐक्याचा प्रामाणिक विचार ते येथे व्यक्त करताना म्हणतात, ''खुले देऊळ मशीदीची। तुम्ही नका वाढवू साची। ती वाढता दोघांची। हानी आहे होणार।। यवन तेवढा खुदाचा। आणि हिंदू काय भुताचा। पोक्त विचार करा याचा। मनुष्यपण टिकवाया।। धर्म बापा ज्याचा त्यानी। प्रिय मानावा प्राणाहूनी। परी विधर्म्याच्या ठिकाणी। अलोट प्रेम धरावे।।' (१७/१२१ ते १२७)

गजानन महाराज नागपूरला गोपाळ बुटीकडे जातात. नागपूर नाव येताच दासगणु 'भोसल्याची ती राजधानी' म्हणून उल्लेखितात. गतवैभवाचे दु:खही तेथे व्यक्त होते. 'स्वातंत्र्याची त्यांची जाणही व्यक्त होते.' स्वातंत्र्यरूपी प्राण गेला। खराधनी याचक झाला। परक्यांचा बोलबाला। झाला ज्या शहरात।। (१९/१८) पारतंत्र्याची ही बोच लक्षणीय आहे. याच अध्यायात त्यांनी कर्म, भक्ती व योग या तिन्ही साधनमार्गांचे विवेचन चांगल्या प्रकारे केले आहे. सिद्धान्तदृष्ट्या ते मार्मिक आहे. ईश्वरप्रेमाची आवश्यकता तिन्ही मार्गात फार महत्त्वाची आहे असे ते म्हणतात.

हुबेहूब वर्णने हा दासगणुंचा विशेष म्हणता येईल. गजानन महाराजांनी बाळकृष्णबुवांना रामदाशी वेषात दर्शन दिले. दासगणु लिहितात – ''..... पहाती जो येऊन दारी। आजानुबाहू साजिरी। उभी निजानंदामधे।। करण्या गेला नमस्कार। तो रामदास दिसले साचार। हाती कुबडी जटाभार। रुळत होता पाठीवरी।। भाली त्रिपुंड्र उभा साचा। होता गोपीचंद नाचा। नेसलेल्या लंगोटीचा। रंग होता हिरमुजी।।'' (९/१३०-३३) सुंदर व्यक्तिचित्र!

''सदैव कर जोडुनी 'करुण ज्यापुढे ठाकतो' असे दासगणुंचे काव्यासंबंधी त्यांचे शिष्योत्तम अनंतराव आठवले यांनी म्हटले आहे. दासगणु लीलया 'करुण' वर्णन करतात. चिलीम पेटवायला विस्तव न देणाऱ्या सोनाराला नंतर विपरीत परिणाम भोगावा लागला. त्याचे पश्चात्तापदग्धतेने निघालेले उद्‌गार, करुणरसाचे चांगले उदाहरण आहे.'' .... गजानन जान्हवी नीर। मी त्या थिल्लर मानिल'' ..... गजानन राजराजेश्वर। मी त्या भिकारी मानिले।। हाय हाय रे दुर्दैवा। त्वा कैसा साधिला दावा। माझ्या हातून संतसेवा। होऊ न तू दिलीस।। असो मज धिक्कार। मी भारभूत साचार। जन्मपावलो भूमीवर। दो पायांचा पशू मी।'' (४/४९ ते ५५)

दासगणुंची रूपकेही अशीच मार्मिक आहेत. रूपके ते वापरतात ते भाषेचा अलंकार म्हणून नाही, विषय सुस्पष्ट, आकर्षक व्हावा म्हणून. ग्रंथ समारोप करताना ते म्हणतात – ''हे गजानन चरित्र भागीरथी। कथा या तोय निश्चिती। महाराष्ट्र ओव्या त्यावरती। लहरी समजा विबुध हो'' वा कल्पवृक्ष स्वामीचरित्र। शाखा अध्याय तयाप्रत। पद्यरचना हीच सत्य। पल्लवी या वृक्षाची।।'' (२१/२२४-२२५)

श्री गजानन चरित्र सारामृत : ग्रंथ महिमा प्रारंभी आलाच आहे. त्याचा अनुभव घेतलेले गजानन महाराज संस्थानचे प्रमुख श्री. रा. कृ. पाटील यांनी विनंती केल्यावरून नित्यपाठासाठी हे गजानन चरित्र दासगणुंनी निर्माण केले. त्याचे नाव जरी गजानन स्तोत्र असले तरी, ते चरित्रच आहे, त्यात कुठेही पुनरावृत्ती नाही, अवतरणिकेसारखेही त्याचे स्वरूप नाही. काव्यदृष्ट्या ते एक स्वतंत्र छोटेखानी चरित्रच श्री ती. दादांनी लिहिले आहे. यातही प्रवाही–प्रासादिक भाषा असून दृष्टांतादि व रूपकाहि योजनेने समृद्ध झालेले ते छोटेसे चरित्र आहे. १८१ ओव्यांची ही रचना १९४६ साली ती. दादांनी रचली. संक्षेपात्मक चरित्र कसे असावे याचा जणू हा छोटा ग्रंथ आदर्शच ठरावा. १ ते २० ओव्यात नंदने, १५२ व्या ओवीपर्यंत चरित्र कथा, शेवटच्या तीस ओव्या, समारोपाच्या. त्यास गजाननचरित्र सारामृत' म्हणणे योग्य ठरेल!

भक्तीचा परमोत्कर्ष ज्यामध्ये अनुभविता येतो, असा हा श्री गजानन विजय ग्रंथ मराठी वाङमयाला संतकवी श्रीदासगणुंकडून मिळालेली एक उत्तम देणगीच आहे, असे म्हणता येते.

**– डॉ. ग. प्र. परांपजे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठलनगरी,
उपाशी विठोबा मंदिरा शेजारी, पुणे ४१००३०.
फोन : २४४७११०९

***





# संतदासगणुंच्या स्फुट वाङ्मयातील :
# स्तोत्रे-अष्टके-पदे

**सौ. मीना रमेश वाटवे**
शिक्षण- एम्.ए.बी.एड., २० वर्षे माध्यमिक शिक्षिका, आध्यात्मिक लेखनाची आवड.

संतकवी श्रीदासगणु महाराजांचे नाव अध्यात्माच्या क्षेत्रात मूर्धन्यस्थानी आहे. ते जसे संतकवी आहेत तसे ते संतही आहेत. त्यामुळे त्यांच्या वाङ्मयातून व्यक्त होणाऱ्या विविध विचारांच्या मुळाशी त्यांचे आध्यात्मिक अधिष्ठान आहे. त्यांची भावपरिप्लुत भक्ती आहे. दीड लाखावर वाङ्मय रचून त्यांनी मराठी वाङ्मयात मोलाची भर घातली आहे, यांत शंका नाही. त्यांचे शिष्योत्तम प्राचार्य अनंतराव आठवले (नंतरचे स्वामी वरदानंद भारती) यांनी त्यांच्या समग्र वाङ्मयाचे १० खंड प्रसिद्ध केलेले आहेत. त्यावरून दासगणुंच्या विशाल वाङ्मयाची कल्पना येते. वाङ्मयेतिहासकारांनी त्यांच्या संतचरित्रात्मक लेखनाची दखल घेतलेली आहे. प्रस्तुत लेखाला या समग्र वाङ्मयाच्या खंड ३ व खंड १०चा आधार आहे.

संतकवी श्री दासगणु कीर्तनेही करीत त्यामुळे या वाङ्मयीन कार्याबरोबरच कीर्तनाद्वारे खूप मोठे समाज जागरणाचेही कार्य त्यांनी केले. हजारोंचा समुदाय त्यांच्या कीर्तनाला येत असे. कधी कधी तर गंधर्वांची नाटके कमी चालत. ही कीर्तने इतकी लोकप्रिय होण्याची दोन प्रधान कारणे आहेत. एक त्यांची भक्तिप्रवण प्रामाणिकता आणि दुसरे त्यांचे शुद्ध सदाचरण! प्रा. वा. ल. कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणे 'भक्ती मन: शुद्धीचाच एक मार्ग आहे. स्वत: दासगणुंचा या संदर्भातला उल्लेख लक्षणीय आहे. ''धर्मासी न माना उगाच भाकडकथा। जे करणे असेल ते खरे करा तत्त्वता।'' शुद्ध सद्वर्तन मनाच्या शुद्धतेच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरते. त्यांच्या भक्तीलाही एक प्रकारचा डोळसपणा आहे. त्यांच्या सर्व वाङ्मयात- स्फुट लेखनातही- स्वार्थ, द्वेष, मत्सरादि दुर्गुणांचा निषेध आढळतो, तर बुवाबाजीवर- दांभिकतेवर त्यांनी कोरडे ओढलेले आहेत.

देशभक्ती, समाजमनस्कता तर त्यांच्या वाङ्मयात सर्वत्र प्रत्ययाला येते. दलितांसंबंधी त्यांना वाटणारी कणव आश्चर्य वाटण्याइतकी सुस्पष्टपणे व्यक्त झालेली आहे. (''महार मांग ते भिल्ल रामोशी मरू लागले नच खाया । लहान भावंडेती तुमची । तुम्हांस त्यांची न ये दया?'') प्रा.गो.म. कुलकर्णी म्हणतात, त्याप्रमाणे 'संतकवींचा आत्मा त्यांच्या विशाल रचनेप्रमाणेच स्फुट काव्यातही प्रत्ययास येतो' हे विधान दासगणुंच्या बाबतीतही लागू पडते. त्यांचे सारे स्फुटकाव्य उद्बोधक तर आहेच पण ते कौतुकास्पदही आहे. कारण एक परमार्थश्रवण संतकवी समाजहित- राष्ट्रहिताची एवढी कळकळ बाळगतो!

गोदामाहात्म्य, मांगीशमाहात्म्य यासारखी विशाल ओवीबद्ध महात्म्ये, व्यंकटेश मोहिनी राज, गणेशस्तवन, महालक्ष्मी, गायत्रीस्तव, संतस्तवन, साईनाथ स्तवन मंजिरी यांसारखी ओवीबद्ध स्तोत्रे, अनेक देवदेवतांची अक्षरगणवृत्तातली स्तोत्रे, अष्टके, भूपाळ्या, काकडे, गोंधळ, फटके, पोवाडे, शिष्यांना उपदेश आदि विविध प्रकारात मोडणारी स्फुटरचना १० हजारांहून अधिक भरेल. ईश्वराची सर्वव्यापकता, जगाची नश्वरता, खरी भक्ती, धर्म व त्याचे महत्त्व, दैनंदिन जीवनातील सदाचरण, नामस्मरण, निष्ठा, सततोद्योग, अंत:करणाची शुद्धता आदि विविध प्रकारचे महत्त्वाचे विषय त्यांच्या या स्फुटकाव्यातून मांडले गेले आहेत.

'गोदा माहात्म्यात' त्यांनी तीर्थांचे दैवी, राक्षसी व ऋत्विज या तीन प्रकारांसह चौथा प्रकार सांगून भर घातली. विविध संतांची क्षेत्रे ही ती भर! (डोमगाव, शिर्डी, शेगांव). त्यांच्या समाजमनस्कतेचा उत्तम परिचायक उल्लेख प्रवरासंगम तीर्थाच्या उल्लेखात येतो- 'जेथे ज्ञानेश्वरी झाली, तेथे सांप्रत मशीद बनली!' त्यांचे 'शनिप्रताप' मूळ शनी माहात्म्याच्या आकाराने दुप्पट झालेले असून ब्रह्मपुरातील कथेची भर व दशरथोक्त शनिमंत्राचा स्पष्टार्थ ही भर त्यात आहे.

त्यांच्या व्यापक समन्वयाचे मार्मिक उदाहरण व्यंकटेश स्तोत्रात मिळते. ''कोठे समूळ जटेचा त्याग केला । अल्लाइलाही तुम्हीच वदला । वेदांऐवजी निर्मिला । नमाज तेथे तुम्हीच ।। कोठे बनून अहिंसक । झालात जैनमत पोषक । कोठे नीति व्यावहारिक । बौद्ध होऊनी सांगितली ।। कोठे झगा घातला । शांतपणाचा कळस केला कोठे होऊन राहिला । पारशांसाठी अग्नि तुम्ही ।।' (४७ ते ४९) समाजचिंतनाच्या संदर्भात 'ईशप्रार्थने'तील वचन चिंतनीय आहे. ते म्हणतात-'' (आर्या)

**''अन्योन्यजातिमत्सर तैसा दुष्काळ प्लेग हाकलाया ।**
**अपुल्या देशामधुनी, गोविंदा ऊठऊठ यदुराया ।।''**

कारण, ''**नरकाहुन परवशता, जाचक ती शतगुणे असे देवा ।**
**अमुच्या भारतभूला आता दास्यामधे न लव ठेवा**''

कोणाही क्रांतिकारकाइतकेच त्यांचे अंत:करण स्वातंत्र्यासाठी तळमळते आहे, असे दिसून येते.

तत्कालीन एक समस्येचा उल्लेखही मार्मिक आहे, (गणेशस्तवराज).

''**हिंदू मुली कारण । नेऊ लागले मुसलमान ।**
**म्हणून डोळे झांकून । आता ऐसा बसू नको।।'' (१४०)**

'ईश्वराची व्यापकता, विठ्ठल स्तोत्रात ते वर्णन करतात, ती मनोहर आहे,

''**हे अफाट दृश्यविश्वरूपकी तुझे भले ।**
**अस्तिभाति प्रिय तूचि सर्व काही विठ्ठले ।।**
**जी जगा आधार प्रकृती पुरुष तीही तू ।**
**तूच दृश्य, तूच ज्ञेय, भासमान हि तू ।।**
**मूळ एक पादपास तू जगास त्यापरी ।**
**खोड फांदि फूलपत्र विश्व हे तयापरी ।।**

दासगणुंची एकविधा भक्ती एका वेगळ्याप्रकारे कशी व्यक्त झाली आहे ते पहा : महांकालाचे दर्शन झाल्यावर त्याच्या प्रार्थनेत ते म्हणतात,

''**भेटाभेटा तुम्हि विठुरूपे । हीच इच्छा गणूची ।।**'
'**नको देऊ देवा द्रव्य...**''

या तुकारामांच्या वचनांची आठवण व्हावी अशी एक रचना लक्षणीय आहे. ते त्र्यंबकेश्वराला म्हणतात,

''**नको मजसि संतती तशिच संचया संपदा ।**
**परास मजपासुनी लवहि त्रास हो ना कदा ।**
**वरो सतत लीनता मन, जसा लव्हाळा खरा ।**
**प्रसीद परमेश्वरा मजसि त्र्यंबकेशा हरा ।।**

पुण्याजवळील बनेश्वर या क्षेत्रात शंकरांची शाळुंका पाण्यात खाली आहे. या वस्तुस्थितीचे वर्णन करताना ते जी कलाटणी देतात ना ती रमणीय आहे. ते म्हणतात, ''समुद्रमंथनाचे वेळी हालाहल पुढे आले. ते पाहून देव घाबरले, पण भगवान् लोकहितासाठी आपण मात्र ते कंठात साठविले. त्याचा ताप फार होऊ लागला म्हणून तो शमविण्यासाठी गळ्याभोवती जल धरून ठेवले!'' यातली कल्पकता लक्षणीय आहे.

'भूपाळ्या' व 'काकडे' दोन्ही प्रकारात त्यांच्या रचना आहेत. रूपकाच्या वापरात ते सिद्धहस्त आहेत. मात्र रूपक, ते वापरतात, ते विषय चांगला सोपा व्हावा, समजावा म्हणून. अलंकार म्हणून ते रूपकाकडे पहात नाहीत. साईबाबांवरील एका भूपाळीमध्ये,

''**कर्मदशाही रात्र भयंकर मोहतपे भरली ।**
**क्रोधरूपे दिवाभिताने घूं घूं ध्वनि केली ।।**
**कामपिंगला किलबिल करतो रतिसुख वृक्षावरी ।**
**आशा सटवी टिटवी दुर्धर अक्षय टीटी करी ।।**''

अर्थात् हे रूपकही स्पष्ट करावे लागते पण तात्त्विक विषय त्यावाचून पुरेसा समजत नाही. 'काकडे' ही रचना थोडी शिथिल आहे. म्हणून लेखाच्या संदर्भात त्यांचा उल्लेख टाळला आहे.

पंढरपूरच्या पांडुरंगालाच 'विठाबाई' म्हणून देवीच्या रूपात ते पहातात आणि म्हणतात,

''**पंढरपुरवासिनी विठाबाई अनंत सुखदायिनी ।**
**उदो उदो बोला ग बया ही तापत्रयमर्दिनी ।।**'

संतकवींच्या स्फुटरचनेत हा एकमेव गोंधळ आहे. आणि तरीही त्याचा दर्जा उत्तम आहे. एकनिष्ठ भक्तिभाव कसा असतो तेही यारूपाने पहायला मिळते. तीसपस्तीस ओळींची ही रचना त्यांच्या अनेक उत्तम रचनांपैकी एक आहे. ते म्हणतात, ''सारे विश्व व्यापूनही तू पंढरपूरला आपले ठाणे निर्मिलेस. कटीवर हात ठेवून ही सावळी बया विटेवरी उभी आहे. हिच्या हातात भयंकर आयुधे असून विक्राळदाढा असलेली सिंहाचा तोंडवळा असणारी हीच गुरुगुर ध्वनी करून स्तंभातून प्रकटली. सारे ब्रह्मांड डळमळले ते पाहून. दिनकर वरुणादि देवही भयचकित झाले. सव्वा हात लळलळणारी जीभ आणि तिसऱ्या डोळ्यात भयंकर वन्हि! अशावेळी माते तुला प्रल्हादाने गोंधळ घालून संतोषिले.'' असे पहिल्या कडव्यात वर्णन करून पौराणिक दाखल्यातून राम, कृष्ण, मारुती, उद्धव, शबरी, पेंद्या, यांच्या संदर्भासह नारदादि अनेक या विठाईचे गोंधळी असल्याचे सांगितले. याच संदर्भात मच्छेंद्रनाथ, नामदेव, ज्ञानेश्वर, नानक, तुलसीदास, मेहता, जनाई, श्रीधर, दामाजी, गोरा, तुका- आदि संतांनी गोंधळ घातले. आणि या देवीला मनामध्ये कोंडले! 'मनात कोंडण्याची' कल्पना फार महत्त्वाची आहे! या गोंधळाची रचना 'यतस्तन्मया:' या सूत्राची आठवण करून देते.

यासाठी तुम्हीही विठाई देवीचे गोंधळी व्हा असे सांगत ते पुढे म्हणतात, 'यासाठी काय हवे? या बयाला क्रोधरूपी बोकड बळी द्या. अंगात दृढनिश्चाचा झगा घाला. सद्गुणांचे तुणतुणे हवे. वैराग्याच्या पोतावर आशेचे तेल ओता. कीर्तीरूपी संबळ वाजवा. (मात्र यासाठी) पायामध्ये निरिच्छेची घुंगरे हवीत! असे गोंधळी झालात तर तुमच्या रंगाला ती येईल- बया मला स्तनी लाव.''

वर नारद भक्तिसूत्राचा संदर्भ आलाच आहे, अशाच तन्मयतेने त्यांनी पांडुरंगाचे स्तोत्र रचले. भक्तिप्रेमाच्या तन्मयतेचा प्रत्यय कोणालाही येईल असे हे स्तोत्र आहे. प्रासाद या स्तोत्राचा मुख्य गुण! श्री दासगणुंचे शिष्योत्तम स्वामी वरदानंद भारती म्हणतात, 'भागवतधर्माच्या सर्वच संतांचा हा विजयच मानला पाहिजे की, त्यांनी निरनिराळ्या पंथोपपंथातील द्वेष पार नाहीसा केला. शाश्वत सत्याच्या मालिकेत सर्वांना गोविले! अशा या समन्वयालाच ते अद्वैत सिद्धांत मानतात!'' याचे एक सर्वोत्तम उदाहरण आहे -

''**नानामते नानापंथ । जरी जगती अस्तित्वात ।**
**परी अवघ्यांचे सार सत्य । तूच एक असशी की ।।**
**ज्यांना संमत शैवमत । ते तुज म्हणती उमानाथ ।**

**वैष्णव वदती लक्ष्मीकांत । यवन इलाही बोलती ।।**
**चष्मे जरी भिन्न भिन्न । परी प्रकाशी न फरक जाण ।**
**तैसा तू रुक्मिणी रमण। वंद्य सेव्य सकलांसी ।।** ४३.४४ (पां.स्तो)

या स्तोत्राचा विशेष हा की हे स्तोत्र परिवारात रोज म्हटले जाते व याच वर्षी त्याची शताब्दी साजरी झाली.

**पदे :**

आता संतकवी श्रीदासगणुंच्या पदांचा विचार करू.

''दासगणु महाराज हे अस्पष्ट ध्येयवादी वा निव्वळ हवेत विहरणारे कवी नव्हेत, तर ते खरोखरीच समाजाशी एकरूप झालेले (कवी/शिक्षक) आहेत.'' हे प्रा. ना. म. छत्रे यांचे विधान महत्त्वाचे आहे. ते कीर्तनकार असल्यामुळे समाजाशी त्यांचा संबंध जवळून होता. १०० पेक्षा अधिक संख्येने त्यांची पदे उपलब्ध आहेत. त्यातही विषयांचे वैविध्य आहे. मात्र त्या सर्वांचे अधिष्ठान ईश्वरभक्तीच आहे. सर्व पदांचा विचार करणे एकाद्या लेखमालेचाच विषय ठरावा, इतकी ती मौलिक आहेत. आपल्या लेखमर्यादेचा विचार करता काही मर्यादित पदांचा संक्षेपत: विचार करणे इष्ट ठरेल!

''हे मना गड्या सज्जना समजधरि काही । या नरतनुसमपर्वणी दुजी बध नाही ।'' येथे ते नरतनू परमार्थ साध्य करण्याचे उत्तम साधन म्हणून व्यक्त करीत आहेत. त्यांचा हा सकारात्मक दृष्टिकोण महत्त्वाचा आहे. संसारातल्या विविध उपभोगांच्या संदर्भात ते उदासीन नाहीत- उपभोग घ्या म्हणतात पण- 'संसारी होइ जागा । गव्हारा ध्याइ पांडुरंगा ।' सूचना देतात. 'नको मरमर मरमर करुस काही । पहिल्या काही तुझे नाही ।' संसाराची नश्वरताही ते यथार्थपणे व्यक्त करतात. त्यावरचा उपाय म्हणून त्यांनी 'काम-क्रोधासि आळा घाली' आणि 'अनीतिला देऊ नको जागा' अशी दोन सूत्रेही सांगितली आहेत. या नरदेहाचे सार्थक करून घ्यायचे असेल तर श्रीहरी आपलास केला पाहिजे- या पदात 'निर्लोभता ही तू माळ गळा घालणे । अक्षय्य शांतिची वरि मुद्रा लावणे । सद्‌भक्तिपताका मग निजकरि मिरविणे'' असे झाले तर 'तुजला भेटेल माझा हरी- अमोल ऐशा नरदेहाचे...''

माणसाचे संसारा विषयीचे ममत्व हेच खरे त्रासदायक आहे. त्यांनी परमार्थाचे शत्रू म्हणून त्यांचा उल्लेख केला आहे. 'माया ममता लोभ अहंता परमार्थाचे अरि । तदंकित मन झाल्या नुमणे बाप्पा तुजला हरी।'' या चतुर्विध विकारावर नियंत्रण करण्याचा विषय अगदी सोपेपणाने व्यक्त झाला आहे.

सदाचाराच्या आदर्श स्वरूपाचे वर्णन एका उत्तम पदामध्ये त्यांनी केले आहे.

**''सदाचार हा शरिर खरोखर अध्यात्माचे नरा ।**
**येथ ना शंका घ्यावी जरा ।।ध्रु।।**
**अलोट श्रद्धा रुधिर असावे त्या शरिराभीतरी,**
**दयेची कातडि त्याचे वरी ।**
**(धा.ब.) विवेक मांस, धैर्याची अचलशी हाडे ।**
**सौजन्य हेच सौंदर्य समज फाकडे ।**
**मग पवित्रपणाची वाण मुळी नच पडे ।**
**दासगणु म्हणे अशा शरीरी भ्रम हा निरखुनी खरा ।**
**जीव हा शिव होईल साजरा ।**

पद रूपकामुळे सोपे आहे पण अर्थगांभीर्य चिंतनीय आहेच.

भक्तीचे महात्म्य सांगणाऱ्या एका रूपक पदात ते म्हणतात, ''या भक्ति तरूची मुळे दृढविश्वास ही आहेत. सन्नीती हे खोड, प्रेम त्या झाडाची साल. विविध उपासना फांद्या, मनाची कोमलता ही पाने! अशा भक्तिवृक्षाला साक्षात्काराचा मोहोर येतो मग फळ लागते ते ज्ञानाचे'' या पदाचे ध्रुपद असे- 'भक्तिमार्गाच्या गोष्टी खोट्या ऐसी न करि वल्गना, भजुन बघ भावे नारायणा' विज्ञानातील प्रयोगाइतकीच भक्तिमार्गातही प्रयोगसिद्धता हवी असे त्यांना सुचवायचे आहे.

विविध प्रकारच्या मत-मतांतरांनी सामान्य माणूस गोंधळतो. चित्ताची व्यग्रता त्यामुळेच वाढते त्यासाठी चिंतनाचा मार्ग सांगताना ते पद लिहितात, ''काय करावे, हरि पहाया कोठे जावे?'' तत्कालीन मत मतांतरे सांगताना ते म्हणतात,

**'प्रार्थना समाजी' म्हणती । प्रभु असे ढगांच्या वरती ।**
**घ्यावया करुन तत्प्राप्ती । नेत्र झाकावे ।।**
**सांगते 'थियासफि' लोका । द्या चालिरितींना धक्का ।**
**ॐकार शब्द हा घोका । विधी टाकावे ।।**

असे मोजकीच मतमतांतरे मांडून संभ्रम सूचित केला, पण यातून ही खरा मार्ग नेमकेपणानेच त्यांनी सांगितला,

**''गणुदास म्हणे यासाठी । नामि प्रीति धरुनिया मोठी । विश्वास धरुनिया पोटी । चारिला जावे । डोळे भरुनी प्रभुला पहावे ।।''**

हे पद म्हणजे दासगणुंचा बहुश्रुतपणा आणि सामाजिक निरीक्षणाचा उत्तम नमुनाच आहे.

'नर समजा त्याला' या पदामध्ये त्यांनी सत्कीर्ती महत्त्वाची मानली. हरिचरणप्राप्तीत ज्याने आयु घालविले, राष्ट्रहिताच्या कळकळीने समाजकार्य केले, स्वातंत्र्यप्राप्तीसाठी रणांगणावर मृत्यू स्वीकारला, नाना शास्त्रांचे संशोधन करून जो अभिनव ग्रंथनिर्मिती करतो- असे सारे खरे नर आहेत. इतरांचे जन्म तरवडासारखे! येथे क्रांतिकारकांसह शास्त्रज्ञही त्यात गोविले आहेत हे पदाचे वैशिष्ट्य.

'अंतर्मुख वृत्ती करी', 'विवेक निशिदिनी बरा' अशीही काही पदे परमार्थ प्रवणता कशी राखावी हे शिकविणारी आहेत. 'संत म्हणा त्याला' व 'तोचि म्हणावा जगि संत' या दोन्ही पदातून संतत्वाची सर्व लक्षणे त्यांनी लीलया गायली आहेत. त्यांच्या जीवनात त्यांनी घेतलेल्या अनुभवांचा आधार.

केलेला उपदेश 'आहे चित्तवृत्ति जोंवरी' या पदात सापडतो. जोवर मनुष्य स्वत:ला शहाणा समजतो तोवर त्याने केलेली प्रवचने. पूजा-अर्चा व्यर्थ आहेत. मानापमानाच्या भावना तीव्र असतील तर मग ज्ञानेश्वरी वाचनाचा उपयोग काय? मनांत वैराग्यच नसेल तर पत्नी दूर

ठेवून काय उपयोग? यासाठी,

**गुण म्हणे ज्ञान आणि कृती जेथे नांदती ।**
**तेथेची स्थिरावे मन घरी चालत ये श्रीपती ।।**

पदांवरील विवेचनाचा समारोप करताना त्यांनी नामचिंतनाला दिलेले महत्त्व सांगून लेख आवरता घेते. 'भक्ती तीच खरी' यात 'नामस्मरणा वाचून आवडे गोष्ट न ज्या दुसरी ।' असा उल्लेख येतो तर 'तेच म्हणावे भजन हरीचे जे नाशवि कलिमला- तसेच- दया, क्षमा व्याबळे वाढणे शशिसम एकेक कळा । गणु म्हणे अशाच भजनी वळा ।'' भजनाची- नामस्मरणाची ही परिणती लक्षणीय आहे.

तात्पर्य, दासगणुंनी अखंडपणे केलेल्या कीर्तनाख्यानातून या पदांचा व अन्यरचनांचा उपयोग करून समाजाच्या शिक्षकाचे काम निरपेक्षपणे केले. आजही अनेक कीर्तनकार त्यांच्या वाङ्मयाचा उपयोग आपल्या कीर्तनात करतात. एक संतचरित्रकार, एक लोभस आख्यान कवी, आणि एक प्रासादिक कीर्तनकार अशा त्रिविध रूपाने ते मराठी- भक्ति वाङ्मयात अजरामर झाले. आत्मोद्धार हा कीर्तन भक्तीचा मूळ हेतू! 'आपुलिया सुख-स्वार्थी केलीच करावी हरिकथा'' हा समर्थोक्त ध्येयवाद आचरून धन्यतेला पावलेल्या श्रीदासगणु- पदी लोटांगण घेते.

**– सौ. मीना रमेश वाटवे**
१७ जयप्रसाद रेसिडन्सी, जुनी पंडित कॉलनी,
व्हेपा नर्सरी जवळ, नाशिक ४२२००२.
फोन : ९४२३९७१६५३



## श्रीदासगणुंचे वाङ्मय

# समाजप्रबोधनाचा चैतन्यदीप

**श्री. विद्याधर मा. ताठे**

एम.अे. (मराठी), प्रथम वर्ग बॅचलर ऑफ जर्नालिझम (प्रथम वर्ग), बी.कॉम. एकता मासिकाचे संपादक, १८ ग्रंथांचे संपादन. विविध पुरस्कारांनी सन्मानित, माजी कार्यकारी संपादक, साई लीला मुंबई.

आधुनिक महिपती संतकवी दासगणुमहाराज हे थोर कीर्तनकार होते. त्यांची कीर्तन-आख्याने व त्यांनी लिहिलेली संतचरित्रे आदि भक्तिवाङ्मय, त्यांच्या समाजजागृती, समाजकल्याणाच्या उदात्त, व्यापक दृष्टिकोनाचे दर्शन आहे. प्रखर राष्ट्रनिष्ठा, समाजातील दंभाचा तिरस्कार, पंथ संप्रदायाचा समन्वयात्मक विचार या गुणांनी संपन्न असलेले त्यांचे वाङ्मय म्हणजे समाजप्रबोधनाचा चैतन्यदीपच आहे.

### आरंभिक

**आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी ।**
**बोलले जे ऋषी । साच भावे वर्ताया ।**
**अर्थेलोपली पुराणे । नाश केला शब्दज्ञाने ।**
**विषयलोभी मने । साधने बुडविली ।।**
**झाडू संतांचे मार्ग । आडरानी भरले जग ।**
**उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवू ।।**
**पिटू भक्तिचा डांगोरा । कळिकाळासी दरारा ।**
**तुका म्हणे करा । जयजयकार आनंदे ।।**

श्री संतकवि दासगणु महाराज ज्या संतपरंपरेचे पाईक व उत्तराधिकारी मानले जातात, त्या संत परंपरेच्या प्रबोधनात्मक समग्र कार्याचे उद्दिष्ट जगद्गुरू तुकाराममहाराज यांनी वरील अभंगात नेमकेपणाने व्यक्त केलेले आहे. सकल संतांच्या अभंग वाङ्मयाचेही हेच उदात्त, व्यापक असे उद्दिष्ट आहे. संतकवि दासगणुंच्या समग्र वाङ्मयाचे प्रयोजनही हेच आहे. काही वेळेला संतांचे अभंग वाङ्मय आपणास स्वांत:सुखाय, आत्मनिष्ठ वाटले तरी त्यांचे अंतिम लक्ष्य सकल जनकल्याण हेच आहे. कारण संतांचे व्यक्तिजीवन हे 'तुका म्हणे आता । उरलो उपकारा पुरता ।' असे परोपकारार्थ जनताजनार्दनासाठी समर्पित असते. आपण का आलोत? कोठून आलोत? कशासाठी आलोत? काय करणार आहोत? आणि कशाप्रकारे करणार आहोत? या सर्व प्रश्नांची स्पष्टपणे व नेमकेपणाने उत्तरे तुकोबारायांनी वरील अभंगात अगदी तपशिलाने दिलेली आहेत. आडरानी भरलेले जग, भक्तीचा डांगोरा पिटून प्रकाशमय- आनंदमय करण्यासाठीच आम्ही वैकुंठातून भूतलावर आलो आहोत आणि ऋषिमुनींनी जे सांगितले तेच आम्ही सांगणार आहोत अशी संतांची प्रांजळ भूमिका आहे. संतकवि दासगणु महाराज यांचीही अशीच भूमिका आहे. एवढी स्पष्टता अन्य कवी- साहित्यिकांत अभावानेच आढळते. उद्दिष्टांची निसंदिग्ध स्पष्टता हे संत साहित्याचे वैशिष्ट्य आहे. संतकवि दासगणुंचे समग्र वाङ्मय या वैशिष्ट्याने संपन्न आहे. अगदी एकाच ओळीत सांगायचे तर संतकवि दासगणुंचे वाङ्मय म्हणजे समाज प्रबोधनाचा चैतन्यदीप आहे.

'श्री दासगणु महाराजांच्या वाङ्मयातील समाजप्रबोधन' असा मला विषय दिलेला आहे. त्यामुळे दासगणुंचे जीवन; त्यांचे विपुल वाङ्मय या गोष्टींचा अधिक तपशिल देऊन मी पुनरावृत्ती करणे उचित ठरणार नाही. पण काही गोष्टींची पुनरावृत्ती ही अपरिहार्य व आनंददायकही असते असे मला वाटते. असो. 'प्रबोधन' हा शब्द आपणाकडे राजा राममोहन राय यांच्या कार्यापासून वापरण्यास प्रारंभ झाला. सुमारे १५व्या शतकात विदेशात सुरू झालेल्या रिनेसान्स (Renaissance) या नवमूल्य मांडणी करणाऱ्या सुधारक विचाराचा, भारतामध्ये 'प्रबोधन' या अर्थाने प्रथम वापर झाला तो १९व्या शतकाच्या प्रारंभकाळात राजा राममोहन राय यांच्या कार्याला अनुलक्षून. 'रिनेसान्स' हा मूळ शब्द फ्रेंच भाषेतील असून 'नवजन्म' असा त्या शब्दकोशातील मूळ अर्थ आहे. पण या शब्दाचा भारतामध्ये समाजशिक्षण, समाजजागृती, उद्बोधन अशा व्यापक अर्थाने 'प्रबोधन' या प्रतिशब्दाने उपयोग करण्यात आला आहे. पुढे त्याला अनेक अर्थछटा लाभत गेल्या. मूल्याची नवी मांडणी, ज्ञानोपासना आणि मानवतावाद ही प्रबोधनाची प्रमुख तीन अंगे मानली गेली व यावर आधारित नव्या संस्कृतीचा पाया घातला गेला.

प्रत्येक देशात प्रत्येक समाजात काही श्रद्धा, विचार, धारणा, आचार, चालिरीती, समज, प्रथा आणि परंपरा या शाश्वत असतात तर काही कालसापेक्ष, तात्कालिक असतात. बदलत्या काळानुरूप व बदलत्या समाजानुरूप नवे बदल, सुधारणा याही प्रत्येक समजालाच अपरिहार्य असतात. तात्कालिक कालबाह्य भागाचा त्याग करून शाश्वत सत्याच्या मूल्याची पुनर्मांडणी करणे, विवेकविचाराधिष्ठित आचार-

व्यवहाराचा पुरस्कार करणे, सुजाण सात्त्विक सौजन्यशील निकोप समाजाची निर्मिती करणे असे 'प्रबोधन' शब्दाचे क्षितिज विस्तारलेले आहे. हे करण्यासाठी काहींनी आंदोलने, चळवळी उभ्या केल्या. विरोध, विद्रोहाने बंडाचे रूप घेतले व प्रबोधनाची वाट संघर्षाच्या दिशेने गेली.

### समन्वयाचा मार्ग

संतांनी आपल्या अभंगकार्याद्वारे जे कार्य केले, ते कार्य प्रबोधन (रिनेसॉन्स) शब्दाचा, संकल्पनेचा जन्म होण्याआधी काही शतके जुने आहे. संतांनी केलेल्या कार्याचा व 'प्रबोधन' शब्दावली मागच्या प्रेरणा व प्रवृत्तीमध्ये खूप साम्य आहे. समाजातील अनिष्ट दूर करुन इष्टाची प्रतिष्ठापना करणे, समाजहिताच्या, समाजकल्याणाच्या गोष्टींचा पुरस्कार करणे हेच जर प्रबोधनाचे मुख्य लक्षण मानले तर हेच कार्य संतसाहित्याने केलेले आहे. अर्थात् भौतिक समाजातील सुधारणांपेक्षा संतांच्या प्रबोधनाची कक्षा खूपच व्यापक असून प्रेयसापेक्षा समाजाला श्रेयस काय हे संतांनी सांगितलेले आहे. आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे संतांच्या प्रबोधनाचा मार्ग हा संघर्षाचा नसून समन्वयाचा, सौजन्याचा आहे. कीर्तन, प्रवचन ही प्रमुख आणि सामूहिक भजन, पारायण, नामसप्ताह दिंडी, पालखी सोहळा, तीर्थयात्रा ही संतांच्या प्रबोधनाची अन्य सत्त्वसंपन्न, सौजन्यशील, आनंदघन अशी साधने आहेत. या व्यापक पार्श्वभूमीवर महाराष्ट्राचे आधुनिक महिपती श्री दासगणुमहाराज यांच्या प्रबोधनकार्याच्या आलेखाचे आपण अवलोकन करणार आहोत.

संतकवि दासगणु महाराज यांच्या नावावर विपुल व विविधांगी साहित्यसंपदा जमा आहे. दासोपंतांनंतर लाखांच्या घरात भरेल एवढी ओवी-पद्य रचना करणारे दासगणुमहाराज हे एकमेवाद्वितीय आहेत. त्यांची संतचरित्रे व आख्याने पाहून उभ्या महाराष्ट्रात दासगणुंचा गौरव 'आधुनिक महिपती' या विशेषणाने केला जातो. संतचरित्रपर आख्यानकाव्ये लिहावीत ती फक्त दासगणु यांनीच! असे एकमुखाने म्हटले जाते. दासगणुंची रसाळता आणि प्रासादिकता विलक्षण आहे. 'संतलीलामृत', 'भक्तलीलामृत', 'भक्तीसारामृत' हे संतचरित्रपर *आख्यानांचे खंड, अमृतानुभव, भावार्थमंजिरी या रचना पाहून भाविक* वाचक थक्क होतो. या सर्व साहित्यातून दासगणुंनी गुणांचे पूजन व दुर्गुणांचा धिक्कार केलेला आहे. समाजातील अनिष्ट गोष्टींवर प्रहार केलेले आहेत.

### दंभाची चीड, विकृतीवर प्रहार

दासगणुमहाराजांचे उत्तराधिकारी व महाराष्ट्रातील थोर विचारवंत प्राचार्य कै. अ. दा. आठवले तथा स्वामी वरदानंद भारती यांनी संतकवि दासगणु वाङ्मयाचे ग्रंथरूपाने विवेचन केलेले आहे. त्या ग्रंथात प्राचार्य आठवले म्हणतात- ''दासगणु महाराजांचे वाङ्मय एकांगी नाही, हृदयाच्या विशाल अनुभूतीमुळे त्यांच्या काव्याला आकर्षक अशी विविधता प्राप्त झालेली आहे. त्यांचे वाङ्मय सागरासारखे विशाल आहे. अनेक अलंकारांनी ते रमणीय आहे. प्रसादगुण हापूस आंब्यातील रसाप्रमाणे भरलेला आहे. समाजातील अनेक प्रकारच्या दंभाची त्यांना चीड आहे. समाजातील घटकांचे आपसातील भांडण त्यांच्या जिव्हारी लागलेले आहे. दलितवर्गाविषयी त्यांना कळवळा आहे. समाजाच्या उद्धारासाठी द्रष्टेपणाने त्यांनी अनेक उपायही सांगितले आहेत. समाजातील चालीरीतींचे आणि विचारप्रवाहाचे सूक्ष्म निरीक्षण करून त्यावर योग्य, उपयुक्त टीकाही त्यांनी केली आहे. तीर्थक्षेत्रातील पंडेगिरी, एखाद्या सुधारकाप्रमाणे त्यांना तिरस्करणीय वाटते. ढोंगी, बुवाबाजीचे तर त्यांनी आपल्या वाङ्मयात अक्षरश: वाभाडे काढले आहेत.'' प्राचार्य आठवले यांचा हा अभिप्राय, दासगणुंच्या वाङ्मयातून घडणाऱ्या समाज-प्रबोधन कार्याला नेमकेपणाने अधोरेखित करणारा आहे असे मला वाटते. दासगणु हे प्रथम संत आहेत नंतर कवी आहेत. त्यांच्या वाङ्मयाचे पहिले व मुख्य प्रयोजन, समर्थ रामदास म्हणतात त्याप्रमाणे मुख्य 'हरिकथानिरुपण' हेच आहे. हे लक्षात घेऊनच त्यांच्या वाङ्मयातील समाज प्रबोधनकार्याचा विचार केला पाहिजे.

**मना सज्जना सावध व्हावे, गाफिल वेड्या राहू नको ।**
**अमोल ऐशा नरदेहाला येऊनि वाया जाऊ नको ।।**

अशा शब्दात दासगणुमहाराज श्रोत्यांना सावध करतात व सत्कार्याने नराचा नारायण होण्यास आवाहन करतात. त्यासाठी 'सद्धर्माचे आचरण हेचि कारण अभ्युदया ।' असे मातेच्या ममतेने मार्गही दाखवितात. एवढेच नव्हे तर 'सन्मार्ग टाकू नको।', 'नीच कुणाला लेखू नको', 'द्वेष कुणाचा करू नको', 'ऋण काढून सण साजरा करू नको' असेही बजावण्यास विसरत नाहीत. सन्मार्गाने, सदाचाराने, सत्संगाने साधनेने बद्ध जीव मुक्त होऊन शिवरूप होऊ शकतो असे सांगून दासगणु एका पद्यात सांगतात- लोभ, क्रोध, मद, अहंकार हे मार्गातील शत्रू आहेत. 'नाही लोभ कुणाचा बरा' हे त्यांचे पद चिंतन करण्यासारखे आहे.

समाजसन्मुखता हे दासगणुंच्या सर्व वाङ्मयाचे वैशिष्ट्य आहे. त्यामुळे समाजातील भेदाभेदात्मक द्वेषाची, दुफळीची त्यांना चीड आहे. त्यांना सामाजिक एकता एकसंधता महत्त्वाची वाटते. त्यामुळे ते विविध *पद्यातून एकतेचे महत्त्व सांगतात. समाजातील कुप्रथा, अनिष्ट रीति* आणि ढोंगी साधू- बुवाबाजी याविरुद्ध तर त्यांचे शब्द शस्त्रासारखे धारदार व तीक्ष्ण होतात. दासगणुंच्या 'भक्तीसारामृत' मधील अध्याय ५६ वाचा. पनवेलचे संत काका पुराणिकांच्या संतत्वाचे वर्णन करतानाच दासगणु अन्य अनाचारी, भोंदु बाबांवर आसुड कसे ओढतात ते कळेल.

**ढोंग धत्तूरा माजवुनिया जन नादी लाविती**
**अशाला भेटेल काय श्रीपती?**

असा रोखठोक प्रश्न करीत दासगणु भोंदू- बुवाबद्दल लिहितात-

*** भोवती, स्त्रियाही अती म्हणुन मजप्रती सांगतेस ।**
**आणिक त्याला साधू म्हणतेस भोंदू तो ।।...**

**** या नागव्याप्रति नका शहरात ठेवू**
**संतत्व एक शशि, हा त्याप्रति राहू ।**
**याचा विसंगत विधी, श्रुतिशास्त्रमार्गा**
**दुर्वर्तनी नरपशु करि व्यर्थ सोंगा ।।**

भोळ्याभाबड्या स्त्रियांना भोवती जमा करून आपण नंगे साधू आहोत असे म्हणणाऱ्यांना दासगणु 'दुर्वर्तनी नरपशु' म्हणतात. एवढी तिखट, एवढी जहाल भाषा वापरून दासगणुंनी समाजातील विकृतीवर, दुष्टप्रवृत्तीवर हल्ला केलेला आहे. वाचकांनी दासगणुंची काही आख्याने मुळातून वाचावीत म्हणजे 'बुडते हे जन न देखवे डोळा' असा त्याचा सामाजिक कळवळा आपल्यालाही अस्वस्थ करेल व सामाजिक विकृतीविरुद्ध उभे राहण्याची प्रेरणा देईल.

### धर्मपंथ – संप्रदाय एकतेचा दृष्टिकोन

समाजातील विकृतीवर दासगणु जसे तीक्ष्ण प्रहार करतात तसेच ते आपसी मतभेद- वादविवाद संपवून एक होण्याचे वारंवार आवाहन करतात. विविध धर्म पंथ, संप्रदाय याच्यातील भेद दासगणुंना अस्वस्थ करतात व त्या सर्वांना ते व्यापक दृष्टीने एकीचा बोध करतात. दासगणु म्हणतात-

**शैवा जो शिव, वैष्णवा हरि गमे, वेदांतिया ब्रह्म जो,**
**बौद्धा बुद्धहि, जो खुदाहि यवना, अर्हंत जैनास जो ।**
**कर्ता जो गमतो प्रमाणपटुना, जे कर्म मीमांसका,**
**ख्रिस्त्या येशुहि, तोच हा गणु म्हणे घ्या रुक्मिणीनायका ।।**

विविध धर्म, पंथ, संप्रदायांच्या समन्वयाचा दासगणुंचा हा विचार केवळ भारतात नव्हे जगात सामंजस्य निर्माण करणारा आहे. त्यांचा हा विचार केवळ शाद्बिक नव्हता तर त्यांचा आचारही असाच होता. दासगणु मुळात रामदासी पंथाचे होते, सद्गुरू वामनशास्त्रींनी त्यांना अनुग्रह देऊन पंढरीची वारी दिली आणि दासगणु वारकरी झाले. त्यानंतर दासगणुंच्या जीवनात शिर्डीचे साईबाबा गुरू म्हणून आले. यामुळे वारकरी, धारकरी, दत्तसंप्रदायी, हिंदू, यवन असा कोणताही द्वेषमूलक भेदाभेद त्यांच्या ठायी नव्हता. हा पंथसमभाव, संप्रदायसमभाव, धर्मसमभाव त्यांनी आपल्या साहित्यात ठायी ठायी प्रतिपादला आहे.

**अल्ला राम रहीम एक असता**
**का द्वैत हे मानिता ।**

असा प्रश्नही दासगणुंनी अज्ञानी भाविकांना केला असून आत्मचिंतन करण्यास प्रवृत्त केलेले आहे. न्या. रानडे, चंदावरकर यांच्या प्रार्थना समाजाने अशाच धार्मिक समन्वयाचा पुरस्कार केलेला होता. वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू प्राचार्य कै. मामासाहेब दांडेकर श्री दासगणुंबद्दल लिहिताना म्हणतात – "वेगवेगळ्या पंथांचा समन्वय दासगणुंच्या ठिकाणी आढळून येतो, यामुळे त्यांच्या काव्यात एकांगीपणा आढळून येत नाही. त्यांची वृत्ती संकुचित पंथाभिमान्याची राहिली नाही. ते उदार अशा भागवतधर्माचे उपासक व प्रचारक बनले."

### राष्ट्रपुरुषांचे गुणसंकीर्तन

समाजात सात्त्विकता वृद्धिंगत व्हावी म्हणून दासगणुंनी संतचरित्राचे लेखन व गुणसंकीर्तन केले. तसेच समाजात विशेषत: युवकांमध्ये राष्ट्रभक्ती- देशभावना जागृत करण्यासाठी, युवकांना प्रेरणा देण्यासाठी दासगणुंनी छत्रपती शिवरायांसारख्या राष्ट्रपुरुषांचेही गुणसंकीर्तन केलेले आहे.

**हाच राजा शिवाजी । ज्याने हिंदूंची राखिली बाजी ।**
**हिंमत बहाद्दर वीर गाजी । महाराष्ट्राचा केसरी जो ।**
**महाराष्ट्राचे भाग्य धन्य । शिवाजीसारखे रत्न ।**
**शिवांशाने निर्माण । झाले जगदुद्धारास्तव ।।**

छ. शिवाजी महाराजांच्या प्रतापकार्याचा दासगणुंनी वरील शब्दात गौरव केला आहे. तद्वतच थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या अतुल पराक्रमाचीही त्यांनी गौरवगाथा गायलेली आहे.

**परशुरामानंतर । ज्यांनी गाजविली तरवार ।**
**असून ब्राह्मणांचे कुमार । संरक्षाया निजधर्मा ।**
**यवना पादाक्रांत केले । भगवंता आपुल्या बाहुबले ।**
**सम्राट शाहूंचे वाढविले । वैभव दिल्लीपर्यंत ।।**

परंतु थोरल्या बाजीरावांच्या पराक्रमाचे दासगणु जेव्हढ्या अभिमानाने वर्णन करतात तेव्हढ्याच त्वेषाने ते पेशवाईतील दोषावर व रघुनाथरावांच्या वर्तनावर कठोर टीका करतात. दासगणुंचा हा नीरक्षीरविवेक व रोखठोकपणा क्वचितच अन्य लेखकात आढळतो. 'धनुर्धर बाजीच्या पोटी । हा रघुनाथ जन्मला गारगोटी ।' असे रघुनाथरावांना 'गारगोटी' म्हणताना दासगणु कोणाचीही भीडभाड ठेवत नाहीत. या दोन दाखल्यावरून दासगणु गुणांचा गौरव करतानाच दुर्गुणांचा कसा निषेध करीत होते हे स्पष्ट होते. वर्ण-जात, श्रीमंत-गरिब असा कोणताही भेद दासगणु करीत नाहीत कारण त्यांना कोणाची खोटी भलावण करून ना दरबारी सन्मान मिळवायाचा होता, ना कोणाचे दुर्गुण पाठीशी घालून काही साधायचे होते. 'सत्यअसत्यासी मन केले ग्वाही' अशी त्यांची एकूण भूमिका होती. त्यामागे समाजाचे हित-कल्याण एवढाच उदात्त हेतू होता. देशाच्या स्थितीगतीची त्यांना वाटणारी चिंता वारंवार विविध संतचरित्रात, विविध प्रकारे दासगणुंनी व्यक्त करून सर्वांना सावधान करण्याचे कार्य केलेले आहे. एका आख्यानात दासगणु म्हणतात-

**"ओवाळणी नरवरा मज हीच घाली ।**
**हा देश दीन आपुला करि भाग्यशाली ।।"**

### समारोप

संतकवी दासगणुंच्या साहित्य-सागरातून प्रबोधनात्म वचने- ओव्या, प्रसंग निवडून त्या सर्वांची एकत्रित मांडणी हा एका स्वतंत्र ग्रंथाचाच विषय आहे. एखाद्या लेखाच्या मर्यादेत हा सागर शब्दबद्ध करणे अशक्य आहे. दासगणु हे ख्यातकीर्त कीर्तनकार होते. कीर्तन हेच त्यांच्या प्रबोधनकार्याचे प्रभावी साधन होते. त्यामानाने त्यांचे वाङ्मय हे

नंतरचेच साधन मानले पाहिजे. त्यांच्या कीर्तनाला गावोगावी प्रचंड जनसमुदाय जमत असे. त्या काळात प्रचार व प्रसाराची आजच्या एवढी माध्यमे नव्हती. ना टीव्ही होता, ना शेकडो वाहिन्या होत्या. ना घरोघर रेडिओ होते, ना वृत्तपत्र वाचण्याएवढी साक्षरता व खेडोपाडी वृत्तपत्राचा प्रसार होता. त्या काळात 'कीर्तन' हेच एक जनप्रबोधनाचे समाजसन्मुख असे लोकप्रिय प्रभावी साधन होते. त्यामुळे दासगणुंच्या कीर्तनाच्या चाहत्यांमध्ये साहित्यसम्राट न.चिं. केळकर, भारताचार्य चिंतामणराव वैद्य, वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू मामासाहेब दांडेकर, महामहोपाध्याय द.वा. पोतदार, सेवक सेवानंद बाळूकाका कानिटकर होते. तत्कालीन समाजधुरीणांनी, मान्यवरांनी दासगणुंच्या कीर्तनाला एकमुखाने 'श्रुतिमनोहर उद्‌बोधन सोहळा' म्हणून गौरविलेले आहे.

कीर्तना एवढेच दासगणुंचे वाङ्मय समाजसन्मुख आहे. कल्पनाशक्ती, काव्यालंकार, रसपरिपोष, भाषाशैली, वर्णनशैली, अनुभूती व व्यासंग या गुणांनी संपन्न असलेले दासगणुंचे वाङ्मय 'समाजप्रबोधनाचा चैतन्यदीप' म्हणून गौरवास पात्र आहे असे मला वाटते. शेवटी, 'न्यून ते पुरते । अधिक सरते ।'... या ओवीच्या आधारे, विनम्र भावनेने या लेखनसेवेला पूर्णविराम देतो.


**– श्री. विद्याधर मा. ताठे**

ओंकार अपार्टमेंट, २ रा मजला, ७३५/१४, पोस्टाजवळ, धनकवडी, पुणे ४११०४३. भ्रमणध्वनी : ९८८१९०९७७५

Email : vidyadhartathe@gmail.com



# श्रीदासगणुंची सामाजिक बांधिलकी

**श्री. विनायकराव नांदेडकर**
बालपणापासून श्रीदासगणु महाराजांचा सहवास. गोरटे येथील 'दासगणु प्रतिष्ठान' ट्रस्टचे विश्वस्त सचिव. १९८८ सालच्या स्मरणिका प्रकाशनात मुख्य सहभाग.

आपल्या या भरतखंडात व्यासांपासून जी संतपरंपरा निर्माण झाली त्या ज्ञात अज्ञात अशा सर्व संतांनी समाजाच्या निकोप धारणेसाठी या देशात नैतिक मूल्ये रुजविली, जोपासली आणि वाढीसही लावली. या मानवी देहात प्राणाचे जेवढे महत्त्व आहे तेवढेच महत्त्व सामाजिक जीवनात नीतिमूल्यांचे आहे. ही मूल्ये ज्या ज्या संतांनी आपल्या वाङ्मयातून आणि जीवनातून आदर्श म्हणून उभी केली त्या संतपरंपरेतील आर्वाचीन प्रतीक म्हणून सर्व महाराष्ट्र आज श्रीदासगणु महाराजांना ओळखतो.

श्री दासगणु महाराज हे थोर अधिकाराचे परमार्थी, एक सत्पुरुष आणि त्यांच्या वाङ्मयाच्या दृष्टीने भाविक प्रासादिक संतकवी म्हणून प्रसिद्ध असले तरी त्यांची समाजहिताची जाणीव कोण्याही प्रामाणिक सामाजिक कार्यकर्त्याइतकीच मूलगामी आणि उत्कट आहे. परमार्थ किंवा अध्यात्म कधी समाजविन्मुख असत नाही; असू शकत नाही. श्रीतुकाराम, श्रीरामदास, श्रीज्ञानेश्वर, श्रीनानकदेव, श्रीनामदेव, श्रीकबीर, श्रीरोहिदास यांचे किंबहुना सर्वच संतांचे वाङ्मय या दृष्टीने विचार करण्यासारखे आहे. अशा संतांचा आदर्श व्यक्तिमात्रांनी जीवनांत ठेवून वागण्याची गरज आहे.

संतकवि श्रीदासगणु महाराज यांच्या साहित्याविषयी थोर न्यायाधीश श्री. वि. रा. तळाशीकर म्हणतात, ''त्यांच्या काव्याचा मुख्य गुण म्हटला म्हणजे प्रसाद. त्यांचे काव्य सुगम व रसाळ आहे. त्यांच्याइतका संतकाव्याशी व संतपरंपरेशी एकजीव झालेला मनुष्य क्वचितच सापडेल. संतांचे माहात्म्य वर्णन करण्यास संतकवीचेच हृदय पाहिजे. सहृदयतेशिवाय काव्य नाही. 'भक्ति' मग ती कोणत्याही प्रकारची असो हा त्यांच्या काव्याचा राजरस आहे. आणि त्यामुळेच लहानथोर व समाजाच्या सर्व थरातील माणसांच्या मनाचा पूर्णपणे ठाव घेण्याची कला त्यांच्या काव्यात जागोजाग दृष्टीस पडते. व्यक्तीकडे दोन दृष्टीने पहावे लागते; एक व्यक्ती म्हणून व दुसरा समाजाचा घटक म्हणून. केवळ व्यक्ती या दृष्टीने व्यक्ती ही निवृत्तीपर असावी व समाजाच्या दृष्टीने प्रवृत्तीपर असावी लागते'' या हेतूतून बघितल्यास श्रीदासगणु महाराजांच्या काव्यातून समाजाला दोन्ही प्रकारचे वळण लावण्याची तळमळ दिसून येते.

श्रीदासगणु महाराजांनी आपल्या लिखाणातून तसेच कीर्तनातून वरील प्रकारचे आदर्श; समाजाला सत्प्रवृत्त करण्यासाठी; अत्यंत प्रासादिक भाषेत उभे केले. त्यांच्या भक्तिरसपूर्ण वाङ्मयातूनही समाज हिताची ही जाणीव अनेक वेळेला, अनेक ठिकाणी, अत्यंत उत्कटतेने प्रकट झाली आहे. त्यांची काही प्रकरणे तर केवळ समाजाच्या अभ्युदयासाठी, ऐहिक कल्याणासाठी लिहिली गेली आहेत. मानवाचे जीवन भव्य, दिव्य, उदात्त, शांत, प्रसन्न, समाधानी, कार्यक्षम, निरलस आणि तेजस्वी होण्यासाठी त्यांनी त्यांच्या वाङ्मयाद्वारे, कीर्तनातून संपूर्ण महाराष्ट्रभर प्रयत्नांची पराकाष्ठा केली. इंदूर, ग्वाल्हेर, उज्जैन, हैद्राबाद, गुलबर्गा, बेळगाव या बृहन्महाराष्ट्रांतही त्यांनी मानवाच्या चारित्र्य संवर्धनासाठी प्रयत्न केले. नैतिक मूल्ये शिकविणारे पाठच क्रमिक पुस्तकातून काढून टाकणाऱ्या या काळात मनावर, बुद्धीवर चांगले संस्कार घडविणाऱ्या श्रीदासगणु महाराजांच्या किंबहुना सर्वच संतांच्या वाङ्मयाची आजच्या समाजाला आठवण करून देण्याची नितांत गरज आहे. आज आपण ज्या तऱ्हेचे जीवन जगत आहोत त्यात शरीर, मन, बुद्धीवर अनेक प्रकारचे ताण सतत पडत असतात. या वाढत्या ताणामुळेच अपचन, आम्लपित्त, निद्रानाश, रक्तदाब, मधुमेह, हृद्रोग यांसारख्या लहानमोठ्या विकारांचे प्रमाण बरेच वाढले आहे. या ताणाचे दुष्परिणाम नाहीसे करण्याच्या दृष्टीने सदाचार हाच श्रेष्ठ, आदरणीय, आचरणीय आहे असे सांगणारे श्रीदासगणु महाराजांचे वाङ्मय पुष्कळ उपयोगी पडण्यासारखे आहे. आणि ते समाजासमोर आणण्यासाठी या श्रीदासगणु विशेषांकाचे संयोजक; जे प्रतिवर्षी एका संतावर विशेषांक काढतात; ते विशेष अभिनंदनास पात्र आहेत. किंबहुना समर्थ रामदासस्वामींच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास ते करीत असलेले हे कार्य निश्चितच 'देवकार्य' आहे. आणि त्यासाठी आपला देह झिजविणारे हे सर्व संयोजकही निश्चितच सर्वोत्तमाचे धन्य दास आहेत.

समाजाचे प्रबोधन, वैचारिक जागरण हे नेहमीच संतांच्या माध्यमातून होत असते. ज्या जातीचा संत त्या जातीनेच त्यांचे उत्सव

साजरे करावेत ही अतिशय वाईट प्रथा या भारतात चालू करण्याचे प्रयत्न होत आहेत. संतांना जातीच्या चौकटीत बसवून आपणच त्यांना लहान करीत आहोत. या सन्मार्गरूपी गंगेवर असे मळकट घाट बांधून आपण त्या संतांचे, त्या महामानवांचे अपमान करीत आहोत. श्रीज्ञानेश्वर महाराज गंगेच्या पाण्याचे वर्णन करताना म्हणतात–

**कां फेडीत पाप ताप । पोखीत तीरीचे पादप ।**
**समुद्रा जाय आप । गंगेचे जैसे ।।**

या श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या ओवीचे रूपकात रूपांतर करताना श्री अनंतराव आठवले म्हणतात–

**तैसे संतांचे जीवन । जगत् कल्याणा कारण ।**
**सन्मार्गाते बोधून । ईशाठायीं लीन होते ।।**

या आपल्या भारतातील सर्वच संतांनी राष्ट्रीय एकात्मता बाणवली. श्रीदासगणु महाराजांची सर्वधर्मसमभावाची वा समन्वयाची भूमिका आजपर्यंतच्या सर्व समन्वयात्मक विचारांमध्ये सर्वश्रेष्ठ ठरावी अशी आहे. श्रीशंकराचार्य चरित्राचा उपसंहार करताना विविध मतांचा आणि संप्रदायाचा पुरस्कार करणाऱ्या सर्व संतांना ते आवाहन करतात की हे विविध संप्रदायाचे प्रवर्तकहो तुम्ही सर्वजण एकाच वेळी या पृथ्वीतलावर या आणि आपापल्या अनुयायांना समजावून सांगा की, 'तुमचा सर्वांचा मार्ग जरी भिन्न असला तरी ध्येय, उद्देश्य आणि तत्त्व सर्वांचे एकच आहे. स्थल, काल सापेक्ष जे आवश्यक ते आम्ही सांगितले ते तुम्ही आपसात भांडत रहावे म्हणून नव्हे.'' केवढी विलक्षण कल्पना आहे ही. या कल्पनेचा योग्य असा प्रचार प्रसार केल्यास समाजातील द्वेष, मत्सर कमी होण्यास खूप उपयोग होईल.

स्वत:च्या धर्माविषयी पूर्णपणे अभिमान बाळगूनही इतर धर्माचा सन्मान करण्याचे औदार्य; जे फक्त हिंदुधर्मातच सापडते; त्याचाच उत्कृष्ट भावनिक अविष्कार श्रीदासगणु महाराजांच्या वाङ्मयात ठिकठिकाणी आढळून येतो. त्यांच्या संपूर्ण वाङ्मयाचा सर्वांगीण विचार केल्यास असे जाणवते की, त्यांचे वाङ्मय हे सागरासारखे अथांग व विशाल आहे. जीवनातील जवळपास सर्वच विषयांना त्यांच्या प्रतिभेने स्पर्श केलेला आहे. समाजोन्मुखता तसेच राष्ट्राभिमान श्रीदासगणुंच्या वाङ्मयात जेवढा स्पष्टपणे प्रतिपादित झालेला दिसतो तितका इतर संतकाव्यात आढळून येत नाही.

**''अवघा समाज एकच व्यक्ति । अनंत व्यक्ती अवयव ते ''**

असे संबोधतानाच दुफळी आणि समाजद्रोह याबद्दल ते चीड व्यक्त करतात.

**''क्षयरोग तो शरीराला । दुफळी रोग तो समाजाला''**

किंवा

**''राष्ट्रासी जातीमत्सर । तोच क्षयरोग साचार ''**

अशा शब्दातून त्यांची समाजहिताची प्रामाणिक भावना व्यक्त होते.

श्रीशिवरायांसारख्या सम्राटालासुद्धा ओवाळणी मागताना एका ब्राह्मण स्त्रीच्या मुखी श्रीदासगणु महाराजांनी जे शब्द घातले आहेत ते भारतातील सर्व क्षत्रियांना, सैनिकांना, राज्यकर्त्यांना आदर्शवत आहेत. ती स्त्री श्रीशिवरायाला ओवाळणी करताना म्हणते –

**''सैनिक जे असति की कुलशीलवंत**
**त्यांच्या समस्त भरल्या भगिनी जगात**
**ओवाळणी नरवरा मज हीच घाली**
**हा देश हीन अपुला करि भाग्यशाली''**

राष्ट्रहिताची कळकळ व्यक्त करणारे असे कितीतरी विचार त्यांच्या साहित्यात विपुलतेने दिसून येतात.

भाषाभिमान व धर्मांतर या विषयावरील त्यांचे विचार एका द्रष्ट्याचे वाटतात. ते म्हणतात –

**स्वभाषेचा मलाही । अभिमान आहे हे खरे ।**

पण–

**भाषेप्रमाणे समाज झाले । वेगळेपण अवघ्यास आले ।**
**मग देशाचे तुकडे पडले । अवघाच झाला बोजवारा ।।**
**म्हणू लागला मारवाडी । मरेना का कानडी ।**
**बंगाली म्हणे द्राविडी । नाही आम्हा कामाचा ।।**
**ऐसे झाले म्हणून । हिंदूस आले दुबेळपण ।**
**हे विधर्मीयांनी पाहून । स्वाऱ्या केल्या या देशी ।।**

याच वेगळेपणाच्या भावनेतून ज्यावेळी सोरटीसोमनाथ लुटला गेला त्यावेळी इतर प्रांतीय मदतीला धावले असते तर ती दुर्घटना घडली नसती असे ते पुढे सांगतात. या भारतात गेल्या ५०-६० वर्षांपासून भाषावार प्रांतरचनेची जी कांही परवड चालू आहे आणि राष्ट्रीय एकात्मतेस, विशाल राष्ट्राभिमानास धोका पोचेल अशी भीती वाटण्याजोगा जो अतिरेकी प्रांताभिमान धिंगाणा घालीत आहे तो पाहता सध्याच्या काळालासुद्धा श्रीदासगणु महाराजांचे उद्गार तितक्याच समर्पकपणे लागू होतात.

आधीच वर्णन केल्याप्रमाणे श्रीदासगणुंची विचारधारा सर्वस्पर्शी आहे. आत्महितासह जनकल्याण व समाजहित साधण्यासाठी ते अतिशय दक्ष आहेत. त्यांची निरीक्षणशक्ती व कल्पनाविलास अद्वितीय आहे. त्या साहित्यनिर्मिती मागचा त्यांचा हेतू कुठल्याही अंगाने स्वार्थपरायण नाही. द्रव्यप्राप्तीसाठी त्यांनी आपली लेखणी व वाणी कधीच वापरली नाही. त्यांचा काव्यनिर्मिती मागील हेतू– श्रीतुकोबारायांनी वर्णन केल्याप्रमाणे –

**धर्माचे पालन । करणे पाखांड खंडन ।**
**हेचि आम्हा करणे काम । बीज वाढवावे नाम ।**
**तीक्ष्ण उत्तरे । हाती घेउनी बाण फिरे ।**
**नाही भीड–भाड । तुका म्हणे साना थोर ।**

असाच आहे. त्यांच्या काव्यात धर्मरक्षणाची कळकळ तर आहेच शिवाय त्यासाठी कुणाचीही भीडमुर्वत न ठेवता त्यांची लेखणी कशी प्रहार करते बघा. श्री. तुकोजीराव होळकर मोहरमची सवारी काढत

असत. त्याचे वर्णन करताना श्रीदासगणु महाराज म्हणतात -

**ही नच स्वारी धडाच केवळ इतर नृपासी घातियला ।**
**धर्मभेद तो मनीं न आणिता असे वागवा रयतेला ।**
**यवन नृपांनी या कित्याला झणीं आदरे वळवावे ।**
**धर्मभावना यासम रक्षुन नच हिंदूंना दुखवावे ।**
**राष्ट्र बगीचा नाना जाती हीच तेथची फुलझाडे ।**
**महीवरी महिपाल असावा वक्र न पहावे कुणाकडे ।**
**निज धर्म न त्यजिता इतर समाजाप्रती ।**
**पहाती प्रेम दृष्टीने लक्ष ठेविती ।**
**या राजनीतिला जे राजे सेविती ।**
**ते इहपरलोकी सौख्याला भोगिती ।**

श्रीदासगणु महाराजांचे वर्षाकाठी ४-५ महिने मराठवाड्यात म्हणजे निजामाच्या राज्यात राहणे व्हायचे. त्याकाळी त्यांनी हिंदूंवर मुसलमान शासनकर्त्यांनी केलेले अन्याय प्रत्यक्ष बधितले आहेत. किंबहुना 'श्रीचांगदेव भाग -२' या किर्तनाच्या प्रकाशनासाठी त्यांना अनेक वकीलांचे सल्ले घ्यावे लागले. छोट्या-मोठ्या सणासुदीच्या मिरवणुकीलाही निजामसरकारची परवानगी लागत असे. करोडगिरी (जकात) नाक्यावर प्रवाश्यांचे केवळ सामानच तपासले जात नसे तर तपासण्याच्या मिषाने हिंदु स्त्रियांचा विनयभंगही होत असे. हे सर्व श्रीदासगणुंच्या काव्यात उमटणे अपरिहार्य होते.

ज्या ज्या तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी श्रीदासगणु महाराज दर्शनाला गेले त्या त्या ठिकाणी त्यांनी यात्रेकरूंना होत असलेला त्रास बघितल्यानंतर त्यांनी ती समवेदना आपल्या काव्यात व्यक्त केली आहे. श्रीतिरुपती बालाजीस गेले असताना आरामशीर पहुडलेल्या श्रीगोविंदराजाला प्रार्थना करताना ते म्हणतात-

**''आता ऊठ मुकुंदा घोरणे पुरे झाले ।**
**त्वत्प्रिय आर्यमहीला संकटकाळे समूळ ग्रासियले ।**
**गेले गेले वैभव गेले धर्मवासना गेली ।**
**अश्रद्धा दांभिकता अनीति पाहे बळाउनी बसली ।**
**होता निघत जयास्थलिं सोन्याचा तो घरोघरीं धूर ।**
**तो देश काय व्हावा एक्या कौडीस आज बेजार ।**
**देवा धर्म बुडाला सत्यपणा तो समूळ मावळला ।**
**स्वार्थत्यागि समाजा धुरीण धार्मिक कुणी नसे उरला ।**
**नरकाहुन परवशता जाचक ती शतगुणे असे देवा ।**
**आमुच्या भारतभूला आता दास्यामध्ये न लव ठेवा ।।**

तसेच ते डाकोरजीचे दर्शनास गेले असता प्रत्येक अर्ध्या तासाला नैवेद्यासाठी दर्शन बंद होण्याचा प्रकार पाहून ते डाकोरजीलाच विनवितात-

**भक्त बोडाण्याने तुम्हा । आणिले जे पुरुषोत्तमा ।**
**ते न शिरापुरी खाया । आणिले पतीत तारावया ।**
**त्याची ठेवावी आठवण । द्यावे भक्तांसी दर्शन ।**
**गणू म्हणे वरच्यावरी । लावू नका दारे हरी ।**
**आठ प्रहरी तुझे द्वार । उघडे अवघे दीड प्रहर ।**
**त्याच देवा दीड प्रहरी । तुझे भोग नानापरी ।**

भक्तांना जो त्रास अनुभवावा लागतो तो त्यांनी आपल्या काव्यातून व्यक्त केला आहे.

कुणाचा भांडवलवाद, कुणाचा साम्यवाद, कुणाचा समाजवाद असे निरनिराळे वाद आपण ऐकतो. श्रीदासगणु महाराज मात्र समाजहितवादी आहेत. समाजात मानसन्मान कोणास मिळावा, राजकारणं कसे असावे, न्यायदान कसे असावे, पुढारी कसे असावेत या संबंधीचे त्यांचे विचार आजही तितकेच समर्पक आहेत. ते लिहितात -

**प्रजेच्या असंतोषाची । बीजे आता कथितो साची ।**
**सावधगिरी फार याची । ठेवावी की राज्यकर्त्यांनी ।।**
**लाच घेणे न्यायात । वा करणे पक्षपात ।**
**मत्सर वाढविणे जातीत । धरणे अति धनतृष्णा ।।**
**ज्यास समाजी असे मान । त्याची अप्रतिष्ठा करणे जाण ।**
**विद्वानांचा अपमान । व्यर्थ पीडा दुबळ्यांना ।।**
**ही कारणे अनर्थाची । आहेत अवघी जाणा साची ।**
**भलत्याच कामी भलत्याची । कदा योजना करूं नये ।।**

या सर्वांपासून पुढाऱ्याने सदा दूर रहावे असे ते सांगतात. पण लक्षात कोण घेतो? म्हणूनच भारताचा अध:पात का झाला याचे निदान करताना ते म्हणतात -

**या समाजरूपी पेंडीप्रत । विचार हाच आला सत्य ।**
**ते सुटल्या अवघेच होत । विपरीत या भूमंडळी ।।**
**विचार कळे पापपुण्य । विचारे टिके अभिमान ।**
**विचारे नीतिबंधन । दृढ होते विबुधहो ।।**
**विचार केल्या एकी होते । विचारे बुद्धी स्थिर होते ।**
**विचारवंता कधी न नेते । बुद्धी आडमार्गासी ।।**
**विचारे मावळे स्वैराचार । विचारे होतो जयजयकार ।**
**विचारे होतो पैलपार । मानव भवसिंधूच्या ।।**
**तो सदसद्विचार मावळला । समाज अवघा चैनी बनला ।**
**नेण्या अध:पाताला । हा बलाढ्य भारत ।।**

विवेक, दृष्टी आणि समन्वयवादी विचारसरणी यामुळे परमार्थसाधनेत निमग्न असतानाही श्रीदासगणु महाराजांचे समाजहिताचे भान कधी सुटले नाही.

राष्ट्राचा उद्धार व्हावा असे वाटत असेल तर त्यासाठी सत्पुरुष म्हणजेच संत महात्मे, संशोधक, तत्ववेत्ते, कवि, ग्रंथकार आणि शूरवीर असे चारही प्रकारचे पुरुष लागतात 'हे जणु राष्ट्राच्या सिंहासनाचे चार बळकट खांब आहेत. यातला कोणताही खांब दुर्बल वा आखुड असून चालणार नाही. अशा विचारातून त्यांची समाजाबद्दलची चौफेर जागरुकताच प्रकट होते.

कुटुंब सुरक्षित राहून प्रेमभाव वाढीस लागणे किती महत्त्वाचे आहे हे सांगताना ते म्हणतात –

**घरंदाजाची ही रीत । रहावे वडिलांच्या आज्ञेत ।**
**बंधु असल्या त्यासी नित्य । निष्कपट वागावे ।।**
**लोकाचार सोडू नये । भलतेच स्तोम माजवू नये ।**
**दांभिकपण असू नये । संग्रहासी येतुलेही ।।**
**कर्मठापरी शुचिर्भूत । भक्तापरी विश्वासयुक्त ।**
**ज्ञात्यापरी शांतचित्त । सर्वकाळ असावे ।।**
**द्वेष कुणाचा करू नये । मन कृपण असुं नये ।**
**स्वधर्म आपुला सोडू नये । कांही केल्या ।।**
**जाती मत्सर सोडू नये । उणे पराचे पाहू नये ।**
**सन्नीतीसी सोडू नये । कांही केल्या ।।**

अशी अनेक जीवनसूक्ते त्यांच्या काव्यात ठिकठिकाणी आढळतात. 'ह्यूमन रिसोर्सेस डेव्हलपमेंट' या पाश्चिमात्त्य नावाने शासन सध्या चारित्र्य संवर्धनाचे कार्य केल्याचे दाखविते. हे चारित्र्य घडण आणि संवर्धन श्रीदासगणु महाराजांसारख्या संतांनी कित्येक शतकापासून केले आहे. किंबहुना म्हणनूच समाजात आजही सज्जन बहुसंख्येने आहेत. राजदंडापेक्षा धर्मदंड आजही श्रेष्ठ आहे हेच खरे.

दंभाची सर्व संताप्रमाणे श्रीदासगणु महाराजांना अतिशय चीड होती. श्रीतुकाराम महाराजांप्रमाणे थोडी जास्त होती म्हटले तरी चालेल. महाराष्ट्रातील वारकरी व रामदासी या संप्रदायांच्या समन्वयासाठी त्यांनी जीवनभर प्रयत्न केले. त्यांच्यातल्या ढोंगीपणावर त्यांनी त्वेषाने प्रहार केले. वारकऱ्यांना ते स्पष्टपणे बजावतात–

**ॐकारा हृदयावरी प्रतिदिनी रेखोनिया काढिती ।**
**भाली घेउन दर्पणास स्वकरी द्वारावती फासिती ।**
**बाहू रंगवुनी नटासम पहा शिक्के वरी ठोकिती ।**
**तो ना वारकरी खचीत नटवे जाणा जगी निश्चिती ।।**

किंवा

**गाथा पाठ परी न वर्तन तसे ना प्रेम ते अंतरी ।**
**टाळांचा झणकार थोर उठता नाचे नटाच्या परी ।।**

तसेच ते रामदासी लोकांनाही ठणकावतात की –

**''गळा मेखळा काष्ठ ते सव्य हाती ।**
**शिरी रामनामी परी द्वेष चित्ती ।**
**करी जो धनाच्या सदा संग्रहासी ।**
**नव्हे हो नव्हे तो खरा रामदासी ।।**

श्रीदासगणु महाराज वर्षातून काही दिवस पुण्यात निवासाला असत. त्यांना मराठेशाही बुडल्याचे अतिशय दु:ख होत असे. त्याच्या कारणा–संबंधीचे विवेचन करताना ते म्हणतात –

**विप्र मराठे ज्या शहरीचे एक हि ख्याती दूरवर ।**
**होती तेची बसू लागले परस्परांच्या उरावर**
**भाई सावध व्हा ।।**

या 'फटका' प्रकाराच्या काव्यातून त्यांनी समाजहिताचे अनेक फटके रचले व समाजात गाऊन दाखविले.

नागरिकांच्या हक्कासंबंधी जाणीव करून देताना ते बोध करतात–

**दुरदर्शि चतुर शाहणे खरे सज्जन ।**
**असतील तया द्या कौन्सिलात निवडुन ।।**

किंवा

**समाजहित साधण्या झटत तोचि जाणा नर ।**
**असे न करि तोच की जगति लंबकर्णि खर ।**
**स्वधर्म तशि संस्कृति टिकविणे प्रयत्ने सदा ।**
**परस्पर प्रितिमधे विपट ते न आणा कदा ।।**

असे बोधपर काव्य त्यांचे विपुल आहे. प्रत्यक्ष समाजघटकांशी संपर्क साधून त्यांना सद्यस्थितीची जाणीव करून देण्यासाठी व त्यातून मार्ग काढण्यासाठी श्रीदासगणु महाराज प्रतिवर्षी एक उपक्रम करीत.

मकरसंक्रांतीचे वेळी ते सर्वांना स्वरचित काव्यरूप तिळगूळ पाठवीत असत व त्यातून योग्य ते मार्गदर्शन करीत. त्या शेकडो श्लोकातला एकच या ठिकाणी अवलोकनासाठी देत आहे. ते म्हणतात–

**आहो आपण भारतीय सगळे एका हरीची मुले ।**
**याची जाण धरून सज्जनपणे वागा त्यजोनी खुळे ।**
**निंदा स्वार्थ असत्य मत्सर अशा टाकोनिया दुर्गुणा ।**
**निष्ठा ठेवुनि संस्कृतिवरि सुखे संपादने जीवना ।।**

श्रीदासगणु महाराजांच्या काव्य सागरात बुडी मारल्यानंतर अशी अगणित रत्ने दिसतात. मन भांबावते. हे दाखवू का ते दाखवू असे होते. पण स्थळकालाची मर्यादा लक्षात घेऊन विराम गाठावा लागतो. यासाठी मी म्हणेन एवढे वाचून आपणास श्रीदासगणु महाराजांचे साहित्य मुळातून सर्व वाचावे अशी उर्मी येणार आहे. ती विरू देऊ नका. हे सर्व वाङ्मय मिळवून मुळातून वाचावे, असेच आहे. तेव्हा –

श्रीदासगणु महाराजांनी समाजहितासाठी संस्कृति विषयक, धर्मविषयक, प्रंपचविषयक, राजकारण, शेती, आचार विचार, न्यायपद्धती, अनेक व्यक्ती, संप्रदाय या व अशा अनेक विषयांवर अत्यंत मूलगामी विचार प्रकट केले आहेत. समाज सर्वांगानी पुष्ट व्हावा, दैन्य व दुरित नाहीसे व्हावे, वैमनस्य, मत्सर नष्ट व्हावा, निस्पृह, निर्भय, सशक्त सज्जन असे पुढारी पुढे यावेत या सर्व उदात्त हेतूने श्रीदासगणु महाराजांनी विपुल अशी साहित्य संपदा निर्माण केली, कीर्तनातून प्रबोधन केले, समाज विवेकी होण्यासाठी सतत प्रयत्न केले. अशा या महापुरुषाचे जीवन दर्शन घडविण्याच्या उद्देशाने ज्यांनी हा विशेषांकाचा उपक्रम राबविला त्याचे पुनश्च हार्दिक अभिनंदन!

**– श्री. विनायकराव नांदेडकर**
महावीर चौक, पुंडलिक वाडी, नांदेड – ४३१६०१.
फोन : ९३७२७५७५७२

***



# तीर्थ प्रयाग

**सौ. मुक्ता नांदेडकर**
बी.ए., गृहिणी, प.पू. वरदानंद भारती यांच्या सुकन्या, गोरटे येथील 'दासगणु प्रतिष्ठान' मध्ये कार्यरत.

**कर्म भक्तीज्ञानरूप त्रिपुंडतिलकांकीतं**
**मृदुलारक्तऱ्हस्ताग्रं वंदे दासगणुंगुरूं ।।**

श्री परमसद्गुरु दासगणु महाराजांच्या पावनचरणी साष्टांग वंदन करून त्यांच्याच विशाल वाङ्मय सागरातील काही तेजस्वी मौक्तिके वेचण्याचा हा अल्पसा प्रयत्न.

सर्व प्रथम 'ओंकार' विश्वस्त मंडळाच्या ह्या स्तुत्य उपक्रमाचे मनापासून अभिनंदन. ॐ हे एकाक्षरी ब्रह्मच होय असे उपनिषदात वर्णन आहे. 'सच्चिदानंद' स्वरूप असणारे हे ब्रह्म. सत्, चित्, आनंद या तिन्ही गुणांनी परिपूर्ण असणारे, व्यापक असणारे; तरीही जनसामान्यांच्या उद्धारासाठी तळमळीने कार्य करणारे, असे जे अनेक संत महात्मे आपल्या भारतवर्षात होऊन गेले, त्यांचे आदर्शवत् चरित्र समाजापुढे ठेवण्याचे महान कार्य 'ओंकार' विश्वस्त मंडळ करीत आहे. आज झपाट्याने बदलणाऱ्या आपल्या समाजापुढे, प्रसारमाध्यमे, दूरदर्शन, पाश्चात्त्य संस्कृतीचा पगडा, भ्रष्टाचाराला प्राप्त झालेले शिष्टाचाराचे स्वरूप, दहशत आणि धर्मांतरे, हिंदूसमाजाला आलेली मरगळ इ. अनेक समस्यांचे दाट धुके पसरलेले आहे. त्यामुळे मनुष्यजन्माचे जे अंतिमलक्ष्य 'मोक्ष' त्याकडे जाणारा मार्ग धूसर झाला आहे. आपल्या महद्भाग्याने प्राप्त झालेल्या अनेक महान व्यक्ती आज दीपस्तंभाप्रमाणे आपल्याला या मार्गावरून जाण्याचे मार्गदर्शन करू शकतात. दरवर्षी अशा एका विभूमीचे चरित्र समाजापुढे ठेवण्याचे महान् कार्य ओंकार विश्वस्त मंडळ करीत आहे. त्याबद्दल त्यांना शतश: धन्यवाद. यावर्षी त्यांनी श्रीसंतकवी दासगणु महाराजांची निवड याकामासाठी केली. ही गोष्ट आमच्या परिवाराला विशेष भूषणास्पद.

श्रीदासगणु महाराज (आमचे परमवत्सल दादा - यापुढे त्यांचा उल्लेख मी दादा म्हणूनच करेन) शिर्डीच्या साईबाबांच्या आज्ञेवरून पोलीस खात्यातील नोकरी सोडून, संतचरित्रे लिहिण्यासाठी प्रथम मराठवाड्यात आले.

**भक्तगोदातीरवासं भक्तीगोदाविहारीणं**
**भक्तीगोदाजलेस्नातं वंदे दासगणुं गुरू ।।**

सर्वसामान्यांसाठी असणारी गोदावरी त्यांच्यासाठी भक्तीरूपी गोदावरी झाली. अशा भक्तीगोदावरीकाठी ते प्रसन्न मनाने राहू लागले, यथेच्छ विहार करू लागले, तिच्या अमृतमय जलाने प्रत्यही स्नान करू लागले. आता श्री सद्गुरूंनी आज्ञापिलेल्या कार्याच्या दृष्टीने, दादांची वाटचाल सुरू झाली.

दादांनी जवळजवळ ३५० ते ४०० संतांची चरित्रे लिहिली. त्यानिमित्ताने खूप प्रवास झाला. आपल्या हिंदू संस्कृतीचे मानबिंदू असणारे ४ धाम (ज्योतिर्मठ, जगन्नाथपुरी, द्वारका, रामेश्वर), सप्त पुऱ्या, १२ ज्योतिर्लिंगे, अष्टविनायक, पंढरपूर, तिरुपती, कन्याकुमारी इ. अनेक तीर्थक्षेत्रांचे त्यांनी मनोभावे दर्शन घेतले. दर्शन घेतल्यानंतर त्यांचे कवीमन, संतहृदय हेलावून गेले आणि ते काव्यरूपाने त्यांच्या मुखातून पाझरू लागले. १२ ज्योतिर्लिंगाचे वर्णन करणारा हा श्लोक त्याचे उत्तम उदहारण.

**काशी वेरूळ वैजनाथ परळी ॐकार श्री उज्जनी ।**
**औंढे त्र्यंबक सोमनाथ बदरीकेदार मल्कार्जुनी ।।**
**भीमाशंकरिं तूंच भो वससि हे नानास्वरूपीं हरा ।**
**बोले दासगणु भवी बुडत मी मां पाहि रामेश्वरा ।।**

आता सुरू झालेल्या निरनिराळ्या तीर्थक्षेत्रांचा प्रवास, श्रीसद्गुरुंची आज्ञा, अंगिकारलेले जीवनकार्य, ईश्वरदर्शनाची आस हृदयामध्ये सतत जपतच सुरू झाला. ज्या जीवनाची सुरुवातच गंगोत्रीप्रमाणे शुद्ध, पवित्र, निर्मळ झाली त्याला पदविकारांचा मळ लागेलच कसा? असे अंतर्बाह्य शुद्ध झालेले अंत:करण परमेश्वरापाशी काय मागू लागले?

**घडो मजसि संगती सतत सज्जनांची हरी ।**
**जडो मन पदी, पडो तव कथा ती कानावरी ।।**
**असो हि रसना सदा रत तुझ्याच नामामृती ।**
**करोत कर सर्वदा भजन हे तुझे निश्चिती ।।**

प्रत्येक तीर्थक्षेत्रातील मुख्य देवतेचे दर्शन घेतले की जणू सरस्वतीच प्रसन्न होऊन श्री दादांच्या मुखातून बोलू लागे. दादांनी केलेले डाकूरच्या रणछोडदासजीचे मनोहारी शब्दचित्र आपल्याला पहावयास मिळते.

तीच स्थिती त्यांचे आराध्यदैवत असलेल्या पंढरीच्या विठुरायाची 'उभा कैवल्याचा गाभा चंद्रभागे काठी सावळे स्वरूप मूर्ति परम गोमटी' हे पद शांत मनाने, भावभक्तीने म्हणत असताना होई. दादा कोठेही असले तरी प्रत्यक्ष पांडुरंगाची, साजिरी गोजिरी मूर्ती त्यांच्या चर्मचक्षूंपुढे प्रगट होई. दादा त्या समाधीसुखात देहभान हरपत. आजही दादांच्या या शब्दसामर्थ्याचा अनुभव कोणीही घेऊ शकतो. तीच गोष्ट रोज नियमित म्हटल्या जाणाऱ्या। वैकुंठपुरी वैकुंठपुरी, क्षेत्रराज पंढरी खरी। या पदाची, चंद्रभागेच्या वाळवंटात, नित्य वास करणाऱ्या पुंडलिकाच्या दर्शनाने सुरू होणारी पंढरपूरची नगर प्रदक्षिणा वारकऱ्याला, हनुमंत, मल्लिकार्जुन चोखा मेळा, नामदेव, गरुड, कान्होपात्रा, जनाबाई यांच्या मेळ्यात रमणाऱ्या विठोबा-रखुमाईचे दर्शन घडवित, नामसंकीर्तनात तल्लीन झालेल्या भगवंताच्या समुदायात अलगद आणून सोडून पूर्ण होते. घरात बसल्या बसल्याच या पंढरपूर नगरीच्या मानस प्रदक्षिणेचा अनुभव कोणीही घेऊ शकतो. आमच्या दादांसारख्या अनेक संतांनी पंढरीचा, दुजे वैकुंठ हा भाव मराठी माणसाच्या मनात खोलवर रुजवला आहे. 'ज्ञानेश्वर माऊली ज्ञानराज माऊली तुकाराम' च्या भजनानंदात तल्लीन होऊन, देहभान हरपणारे, नाचत खेळत आळंदी-देहू ते पंढरपूर अशी वारी माऊलीची - तुकोबांची पालखी समवेत घेऊन लाखो वारकरी जिथे निष्ठेने करतात तीच आपली वैकुंठपुरी माणसाला मोक्ष मिळवून देणारे अक्षय्यस्थान.

मराठवाड्यात गोदावरीच्या काठी असणारे 'राहेर' हे दादांच्या जिल्हाळ्याचे दुसरे तीर्थक्षेत्र. दादांचा निवास उमरी तालुक्यातील 'गोरटा' या गावी पुष्कळ होत असे. तेथून जवळच हे राहेर क्षेत्र आहे. हिरण्यकश्यपूसारख्या भयंकर राक्षसाचा वध करणाऱ्या, तितक्याच उग्र रूपात प्रगट झालेल्या नरसिंहाचे हे स्थान.

**राहेर क्षेत्र अति पवित्र गोदातिरी**
**नांदतो तेथ हा सदैव नरकेसरी**

या पदामध्ये नरसिंहाच्या रुद्र अवताराचे वर्णन करून झाल्यावर दादा म्हणतात.

**प्रल्हाद पाय वंदिता शांत जाहला**
**तो नारसिंह म्या सिंहासनी देखिला**

वनराज असणाऱ्या सिंहाचे भय इतरांना. त्याचा छावा आनंदाने त्याच्याच कुशीत विसावणार. मनातील गूज दादांच्या मुखातून असे अभावितपणे बाहेर पडले. 'अंतरीचे घावे, स्वभावे बाहेरी.'

श्री वामनशास्त्री इस्लामपूर या थोर सद्गुरुंचे दादा एकमेव शिष्य. दादा पोलिसांच्या नोकरीत असताना योगायोगाने या अधिकारी सत्पुरुषाची भेट झाली. २-३ दिवसांच्या अल्प सहवासात ही भेट गुरु-शिष्याच्या दृढ नात्यात परिणत झाली. अल्प काळातच हे गुरु-शिष्याचे नाते, पिता-पुत्राच्या अतूट भावबंधात बांधले गेले. 'माझ्या देहावसानानंतर तुला काही मार्गदर्शन हवे असेल तर तू शिर्डीला साईबाबांकडे जा. ते माझे थोरले बंधू आहेत. ते तुझा उद्धार करतील' असे श्रीवामनशास्त्रींनी दादांना सांगितले होते. त्यानुसार दादा शिर्डीला आले.

**चक्रवाक् चंडौल पक्षि ते प्रभातकाळाला।**
**सूर्या बघण्या आतुर होऊनि घालिति घिरट्याला।।**
**तेवी बघण्या तुला पातले भक्त तुझे द्वारी।**
**दर्शन देऊनि तयास तारा गणु म्हणे संसारी।।**

आर्तभावाने भूपाळी म्हणत, साईबाबा केव्हा दार उघडतात त्याची वाट पाहत बसले. श्रीवामनशास्त्रींनी "माझ्या लेकराला आपल्याकडे पाठवतो आहे. त्याचे कल्याण करावे" हा मनोमन पाठविलेला निरोप बाबांना मिळाला होताच. दादांची हाक कानी पडताच बाबांनी 'ये गणु, आलास, लई बरं झालं' असे म्हणून दादांना जवळ केले ते कायमचेच. श्री साईबाबांच्या सहवासात दादांचे पारमार्थिक जीवन आकार घेऊ लागले. बाबांच्या साध्या साध्या बोलण्यातूनसुद्धा गुप्तरूपाने असलेला त्यातील भावार्थ दादांच्या ध्यानी येऊ लागला. बाबा आणि दादा दोघांमध्येही समाजहिताचे एक सूत्र समान होते. एके दिवशी दादांनी काशी-प्रयाग क्षेत्री गंगास्नानासाठी जावे म्हणून बाबांकडे अनुमती मागितली. आत्ताच नको म्हणून बाबांनी त्यांना थांबविले. असे ४-५ वेळेस घडले. दादांची गंगास्नानासाठी तळमळ वाढतच होती. ती पाहून एक दिवस बाबाच म्हणाले, "गणु, गंगास्नानासाठी इतक्या दूरवर कशाला जावयास हवे? मी तुला इथेच गंगास्नान घडवितो." असे म्हणून बाबांनी एक चमत्कार केला. (केला म्हणण्यापेक्षा झाला म्हणणे जास्त योग्य होईल) बाबांच्या दोन्ही पावलांच्या अंगठ्यातून गंगेसारखे निर्मळ जल झुळुझुळु वाहू लागले. बाबांच्या चरणापाशी बसलेले दादा हे अघटित दृश्य पाहून स्तिमित झाले. त्या गंगेत अवगाहन करताना, आचमन करताना, मार्जन करताना दादांच्या नयनातूनही गंगा-यमुनेचा झरा वाहू लागला. धन्य ते गुरुशिष्य. बाबांच्या जीवनातील अनेक चमत्कारांचे दादा साक्षी आहेत. साईबाबांच्या समाधीनंतर गुरुऋणातून अंशत: उतराई होण्यासाठी दादांनी त्यांच्या सहकाऱ्यांच्या साहाय्याने शिर्डी संस्थानची उभारणी केली. तेथे पूजापाठाची एक शिस्त लावून दिली. रामनवमीचा उत्सव तेथे सुरू केला. त्या संस्थानचे अध्यक्ष म्हणून दादांनी जवळ जवळ ४० वर्षेकाम पाहिले. आजचा ह्या शिर्डी संस्थानचा व्याप पाहिला की मन आश्चर्याने थक्क होते. अपरोक्षज्ञानाची अनुभूती आलेल्या दादांच्या श्रीमुखातून शब्द पाझरले

**शिर्डी माझे पंढरपूर साईबाबा रमावर**
**शुद्ध भक्ती चंद्रभागा भाव पुंडलिक जागा**
**या हो या हो अवघे जन करू बाबांसी वंदन**
**गणु म्हणे बाबासाई धाव पाव माझे आई**

अनेक संतांची चरित्रे लिहिणाऱ्या दादांची किर्ती आधुनिक महिपती म्हणून सर्वदूर होऊ लागली. त्यांच्या भावपूर्ण रसाळ कीर्तनांनी अवघ्या महाराष्ट्राला वेड लावले. ही कीर्तने ऐकून शेगावच्या रामचंद्र पाटलांनी श्रीसंत गजानन महाराजांचे चरित्र लिहिण्याची दादाना विनंती केली. दादांनी ती तत्काळ स्वीकारून, खुद्द शेगावलाच मुक्काम करून ती पूर्ण केली. गावातील प्रौढ, भाविक मंडळी रोज दादांना भेटावयास येत. त्यांनी सांगितलेल्या माहितीच्या आधारे रोज १ या प्रमाणे २१ दिवसात

'श्री गजाननविजय' या ग्रंथाची रचना पूर्ण केली. आजपर्यंत या ग्रंथाच्या २०-२५ आवृत्त्या निघाल्या आहेत. इंग्रजी सहित भारतातल्या इतर ८-१० भाषांमध्ये या ग्रंथाचे भाषांतर झाले आहे. 'श्री गजानन महाराजांच्या चरणांपाशी बसून लिहिलेला हा विजयग्रंथ त्यांच्याच चरणी दादांनी अर्पण केला. या ग्रंथाच्या छपाईचे सर्व अधिकार, लेखक म्हणून कोणतेही मानधन न घेता दादांनी शेगावच्या विश्वस्तांच्या स्वाधीन केले. श्री गजानन विजय या ग्रंथामुळेच गजानन महाराजांची किर्ती, महती भारतभर पसरली. आज या शेगावनगरीला तीर्थक्षेत्राचे स्वरूप प्राप्त झाले आहे. ग्रंथाची पूर्णता झाल्यानंतर केलेल्या गजानन महाराजांच्या आरतीत दादा म्हणतात,

**ब्रह्म सनातन जे का ते तू साक्षात।**
**स्थावर जंगमि भरला तुम्ही ओतप्रोत।।**
**तव लीलेचा लागे कवणा नच अंत।**
**तुज वानाया नुरले शब्दहि भावेत।।**

'सर्वं खलु इदं ब्रह्म' या महावाक्याचा अनुभव श्री दादांनी, लौकिकदृष्ट्या 'ब्रह्मसूत्र', 'उपनिषद' या तत्वज्ञानांच्या ग्रंथांचा विशेष अभ्यास न करता घेतला होता हे यावरून दिसून येते.

श्री दासगणु महाराजांनी शके १८४९, ५०, ५१ अशी क्रमाने ३ वर्षे गायत्रीची पुरश्चरणे केली. त्यातील पहिले हे 'रत्नेश्वर रामपुरीस २४ लक्षांचे केले. दुसरे वऱ्हाडातील 'लोणार मेहकर' येथे १२ लक्षांचे केले आणि तिसरे सुप्रसिद्ध ज्योतिर्लिंग भीमाशंकर येथे ३ लक्षांचे केले. ही तिन्ही पुरश्चरणे सामुदायिक स्वरूपाची होती. पवित्र आचरणाची गोडी काय असते व त्यामुळे कशी मन:शांती मिळते हे साधकाच्या नीट लक्षात यावे यासाठीच दादांनी या सामुदायिक पुरश्चरणाचे आयोजन केले होते. आपल्या धर्मांमध्ये या गायत्रीजपाचे विशेष महत्त्व सांगितले आहे. हा 'गायत्रीमंत्र' मंत्रसामर्थ्याने युक्त असा मंत्र आहे. ज्या ठिकाणी या मंत्राचा जप होतो ते स्थान, वातावरण, शरीर, मन, बुद्धी या मंत्राच्या सामर्थ्यामुळे प्रभावित होते, पवित्र होते, शुद्ध होते, निर्मळ होते, सफल होते. एखादी गोष्ट संकल्पपूर्वक, अनुष्ठानाच्या स्वरूपात केली की तिचे सामर्थ्य कितीतरी पटीने वाढते. त्यामुळे 'रत्नेश्वर रामपुरी', 'लोणार मेहकर' आणि भीमाशंकर या तीनही स्थानांना तीर्थक्षेत्र म्हणून गौरव प्राप्त झाला आहे. भविष्यकाळात साधकांनी, दादांनी घालून दिलेल्या या अशा अनुष्ठानाचे आयोजन करून स्वहित-समाजाचे हित साधून घ्यावे.

शके १८४२ च्या सिंहस्थामध्ये दादांनी गोदावरीची प्रदक्षिणा पायी केली. नांदेड हे गोदावरीचे नाभीस्थान आहे. येथून गोदावरीस उजवे घेऊन प्रदक्षिणेस सुरुवात झाली. शंखतीर्थावर गोदावरी ओलांडून दादांसमवेत इतर मंडळी नाशिकाजवळ त्र्यंबकेश्वरास आली. तेथील ब्रह्मगिरीस प्रदक्षिणा घालून मंडळी परत फिरली. नांदेड येथेच पायी प्रदक्षिणेची सांगता झाली.

श्रीदासगणु महाराजांनी 'गोदामहात्म्याची' ३१ अध्यायात रचना केली. सर्व तीर्थात विख्यात असणारी ३ तीर्थे गौतमी, गंगा, गोदावरी. या गोदेचे महात्म्य ब्रह्मदेवांनी नारदमुनींना सांगितले. त्यात त्यांनी सांगितले तीर्थांचे ४ प्रकार आहेत. दैवी, राक्षसी, ऋषिज आणि मानवी. स्वर्ग मृत्यु पाताळात असंख्य तीर्थे आहेत. पण मृत्यूलोकातील तीर्थांना काही आगळे महत्त्व आहे. अशा अनेकानेक तीर्थांनी पावन झाला आहे आपला भारतदेश. या सर्व तीर्थांमध्ये गोदावरीला वृद्धा हे नामाभिधान प्राप्त झाले आहे. 'गोदामहात्म्यात' दादांनी अनेक तीर्थक्षेत्रांचे वर्णन केले आहे. यमुना-नर्मदा, भागीरथी, सरस्वती, गंडकी, शोणवती ही उत्तरेकडील तीर्थे- तापी, गोदावरी, कृष्णा, तुंगा, कावेरी, भीमा, प्रवरा, अमजी ही दक्षिणेकडील तीर्थे. संपूर्ण भारतातील मिळून अयोध्या, गोकुळ, वृंदावन, द्वारका, गिरी, पुरी, पंढरपूर, गया, प्रभास, पुष्कर, कोल्हापूर, श्रृंगेरी, उडुपी, नाथद्वार, देहू, आळंदी, तरे, अरण, मंगळवेढे, सज्जनगड, डोमगाव, लहूळ, घामणगाव, पैठण, शिर्डी, शेगाव इ. तीर्थक्षेत्रांचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. गंगा-गोदावरीच्या केवळ दर्शनाने, स्पर्शाने, स्नानाने, सेवनाने आधिभौतिक, आध्यात्मिक, आधिदैविक या त्रिविधतापांचा नाश होतो. ब्रह्महत्या, गोहत्या, स्त्रीहत्या, भ्रूणहत्या इ. महापातकांचा नाश होतो. जन्मजन्मांतरीचे दोष नाहीसे होतात. तुंगा-कृष्णा, भीमा ह्यांच्या संगमावरचे स्नान पुण्यप्रद आहे. गोदावरी मात्र सर्वच ठायी मोक्षदायी आहे. ६० हजार वर्षे भागीरथीचे स्नान केल्याने जे पुण्य लागेल ते गोदावरीच्या एका स्नानाने लाभते. गुरू सिंहराशीत आला असता म्हणजेच दर १२ वर्षांनी येणाऱ्या सिंहस्थात तर गोदास्नानाचे विशेष पुण्य आहे. ह्या १ वर्षाच्या कालावधीत सर्व देव-देवता, ऋषी मुनी ह्यांचा निवास गोदेच्या तीरावर असतो. इतर सर्व नद्या, अंश रूपाने गोदेत वास करीत असतात. अशा या परमपावन गोदावरीच्या दोन्ही तीरांवर मिळून ३।। कोटी तीर्थे आहेत असे भगवान शंकर गौतममुनींना सांगतात. त्र्यंबकेश्वरी असलेल्या गोदावरीचे आचमन केल्यास १ यज्ञ केल्याचे पुण्य लाभते, तर स्नान केल्याने वैकुंठलोकाची प्राप्ती होते. कुशावर्त या तीर्थात स्नान केल्याने कपोत-व्याधाचा उद्धार झाल्याचे कथा सांगते. गौतमीच्या स्नानाने मला वैराग्याचा लाभ झाला असे कार्तिकस्वामी आपल्या पिताश्रींना सांगतात. ज्ञानप्राप्ती झाल्याशिवाय मोक्ष मिळत नाही. आणि अंगी वैराग्य बाणल्याशिवाय ज्ञानाची प्राप्ती होत नाही. म्हणून वैराग्य मिळवण्यासाठी गोदावरी आपल्याला मदत करते हा तिचा अजून १ मोठा गुण. कुमारतीर्थात स्नान केल्याचा हा प्रभाव आहे. दशाश्वमेघतीर्थात स्नान केल्याने दशाश्वमेध यज्ञ केल्याचे पुण्य लाभते. पैशाचतीर्थात स्नान केल्याने दान धर्म केल्याने पिशाच्च योनीतून मुक्तता होते. इथेच स्नान केल्याने अद्रिका आणि अंजनी या २ अप्सरा इंद्राच्या शापातून मुक्त झाल्या. क्षुधातीर्थी कण्वमुनींच्या क्षुधाव्यथेचे शमन झाले. हेच कण्वमुनींचे तपस्थान होय. अहिल्यासंगमतीर्थावर स्नान केल्याने इंद्राच्या अंगावरली भगे नेत्रात परिणत झाली. येथे स्नान केल्याने पापांचा नाश होतो. जनस्थानतीर्थात स्नान केल्याने प्रपंच आणि परमार्थ दोन्हींची प्राप्ती होते. चक्रतीर्थात स्नान केल्याने अपरोक्ष ज्ञानाची प्राप्ती होते. पंचवटीमधील अरुणावरुणा संगमावर स्नान केले असता सर्व सुखांची प्राप्ती होते. गरुडतीर्थावरच्या स्नानाने सर्व व्याधींचे निरसन

होते. गोवर्धन तीर्थ सुखसौभाग्यदायक आहे. धूलपापतीर्थाच्या प्रभावाने महापातकांचाही नाश होतो. शुक्रतीर्थात स्नान केल्याने सर्व विद्या अवगत होतात. इंद्रतीर्थ सर्व सुखे मिळवून देते. असेच महिमान घनदतीर्थ, अग्नितीर्थ, ऋणमोचनतीर्थ, सरस्वतीसंगम, पंचतीर्थ, प्रियव्रततीर्थ, विष्णुतीर्थ, सोमतीर्थ.

भगवान शंकरांनी सांगितलेली ३ ।। कोटी तीर्थेकाळाच्या ओघात लुप्त झाली असतील. त्यातील ३-४ शे तीर्थांची वर्णने दादांनी केली आहेत. विस्तारभयास्तव त्या सर्वांची वर्णन इथे करणे शक्य नाही. वानगीदाखल १०-१२ तीर्थांची नावे व महती वर सांगितली आहे. थोडक्यात सर्व तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी, विविध तापांचा नाश करून सर्व पापांचे विमोचन करून, इहपरलोकीचे कल्याण, मोक्ष साधून देण्याचे अतुलनीय सामर्थ्य आहे. एवढी गोष्ट मात्र खरी. म्हणूनच दादा मोठ्या प्रेमाने, जिव्हाळ्याने, आर्ततेने म्हणतात,

**''माय माझी गोदावरी, राहे त्र्यंबकाच्या शिरी।**
**माझ्या गौतमीचे तीर, प्रति वैकुंठ साचार।।**
**तिचे पाहताच नीर वेडा होतो शारंगधर**
**गणु म्हणे गोदाबाई, धाव पाव माझे आई।।**

दादांची वाणी, आपल्या आईचे वर्णन करताना थकत नाही. तिच्या गुणांचे वर्णन करताना त्यांची लेखणी थांबत नाही. तिचे कितीही दर्शन घेतले तरी त्यांचे नयन तृप्त होत नाहीत. तिची विलक्षण ओढ त्यांना स्वस्थ बसू देत नाही. परम सद्गुरु श्रीदासगणु महाराजांचा मागोवा घेत आपणही त्या दिशेने मार्गक्रमण करू या.

श्री दासगणु महाराजांच्या जीवनातील कोणत्याही पैलूचे वर्णन, आमचे अप्पा तथा स्वामी वरदानंद भारती तथा पूर्वाश्रमीचे अ. दा. आठवले यांच्या सहभागाशिवाय अधुरे आहे. या दोन्ही अलौकिक गुरुशिष्यांचे जीवन सर्वसामान्यांच्या आकलनापलीकडचे आहे. आदरणीय श्री पांडुरंगशास्त्री एकदा म्हणाले होते ''श्री दासगणु महाराजांनी सर्वात महत्कार्य केले ते म्हणजे प.पू. अप्पांना घडविले.''

लहानपणापासून ज्याचा पुत्रवत सांभाळ केला, ज्याच्यावर अनेकानेक उत्तमोत्तम संस्कार केले, अथक परिश्रम घेऊन ज्याला घडवले त्या अप्पांनी मनुष्यजन्माचा परमोत्कर्ष साधलेला पहाताच दादांच्या मुखांतून 'दामूने मला पुढे आणले पण अनंताने मागे टाकले'' हे वाक्य उत्स्फूर्तपणे बाहेर पडले. ज्याला हे गुरुवचन ऐकावयास मिळाले त्या शिष्याची दुसरी कोणती धन्यता असू शकते? कोणती कृतार्थता असू शकते? नजिकच्या काळात अशी गुरु-शिष्यांची जोडी पहावयास मिळणे दुर्लभ आहे.

श्री दासगणु महाराज व स्वामी वरदानंद भारती या संतांच्या वास्तव्याने पुनित झालेले 'गोरटा' हे छोटेसे गाव. या २ महाकवींची तपोभूमी असणारे 'गोरटे. आता श्रीदासगणु महाराजांच्या समाधीमुळे, मराठवाड्यातील एक पावनतीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्धीस आले आहे. हे स्थान एक चांगले साधनाकेंद्र म्हणून विकसित व्हावे ही ती. अप्पांची आस हळूहळू पुरी होत आहे. संपूर्ण महाराष्ट्रात ह्या तीर्थक्षेत्राची महती दुमदुमू लागली आहे. प.पू. अप्पांच्या चरित्रात, विश्रामने मोठे हृद्य वर्णन केले आहे.

**श्री दादांनी भक्तिरसाची आणियली गंगा**
**तीच जाहली भक्तजनांची कलीमलभयभंगा**
**या भगीरथ कार्या आशिर्वच आहे विठ्ठलाचे**
**गोरटे स्थान साधनेचे, गोरटे स्थान साधनेचे**

अशा ह्या तीर्थक्षेत्रांचा प्रवास कधीही न संपणारा आहे. विविधतेने नटलेली, अतिशय प्राचीन, वैभवसंपन्न, संपूर्ण समाजाला आईच्या वात्सल्याने सांभाळणारी आपली हिंदू संस्कृती. आचार-विचार धर्म यात कितीही विविधता असली तरी त्या प्रत्येकाचे हित साधून देण्यासाठी अनंत तीर्थक्षेत्रांची निर्मिती, निरनिराळ्या देवतांनी केली आहे. प्रत्येकाने आपली आवड, स्वभाव, क्षमता, परिस्थिती लक्षात घेऊन एखाद्या देवतेचा उपास्य म्हणून स्वीकार करावा. त्या देवतेचा ज्या तीर्थक्षेत्रात निवास असेल त्या ठिकाणी पुन:पुन्हा जाऊन सद्गुरूंनी सांगितलेली उपासना निष्ठेने करावी. मोक्षप्राप्तीचे ध्येय उराशी बाळगून कालक्रमणा करावी यातच मनुष्य जन्माची इतिकर्तव्यता आहे.

मर्यादेयं विराजते.

**सौ. मुक्ता नांदेडकर**
महावीर चौक, पुंडलिक वाडी, नांदेड - ४३१६०१.
फोन : ९३७२७५७५७२

***



# श्री दासगणुंच्या आख्यानातील संगीतात्मकता

**सौ. प्रियंवदा नवाथे**

बी.ए. (मानसशास्त्र), एम्.ए. (संगीत प्रथम क्रमांक), एस्.एन्.डी.टी. विद्यापीठ शास्त्रीय, उपशास्त्रीय, नाट्यसंगीत, सुगम संगीत या शाखांचा शिक्षण व सादरीकरण. प.पू. दासगणु महाराजांच्या पदांचे स्वरलेखन. प.पू. स्वामी वरदानंद भारती यांचा सहवास. त्यांच्या भावार्चना या काव्यसंग्रहातील पदाना चाली.

प्रसिद्ध संतकवी प. पू. श्री दासगणु महाराज (आमचे ती. दादा) त्यांच्या सर्व परिवारासह पुण्याला आमच्या शेजारीच राहत होते. अनेक वर्षे आम्ही सख्खे शेजारी होतो. त्यामुळे अगदी लहानपणापासून ती. दादांच्या कीर्तनातील पदे सतत कानावर पडत होती. प्रत्यक्ष ती. दादांची कीर्तने आम्ही ऐकू शकलो नाही. पण दादांचे उत्तराधिकारी प.पू. अप्पांची तसेच त्यांच्या परिवारातील अनेक उत्तम कीर्तनकारांची कीर्तने खूप ऐकली. संगीताचे पहिले संस्कार कीर्तनातील पदांमुळेच होत होते. मोठेपणी संगीतशास्त्र आणि या पदांचे स्वरलेखन (notation) करण्याच्या निमित्ताने पुन्हा एकदा या पदांकडे लक्ष गेले आणि त्यामधील सांगितिक वैशिष्ट्ये हळूहळू जाणवू लागली.

सर्वात प्रथम जाणवलेले वैशिष्ट्य म्हणजे या पदांमध्ये असलेली संगीतातील विविधता. साकी, दिंडी यासह संगीतातील इतर सर्वच प्रवाह या कीर्तन संगीतात सामवलेले दिसले. या पदांच्या चाली लोक संगीत, शास्त्रीय व उपशास्त्रीय संगीत यावर आधारित आहेत. इतकेच नाही तर काही पदांच्या चाली त्या वेळच्या लोकप्रिय नाट्यगीत, चित्रपट गीत, भावगीत यांच्या चालींवर आधारित आहेत. काही कीर्तनात विशिष्ट प्रसंगांच्या अनुरोधाने इस्लाम धर्मातील प्रार्थना संगीतसुद्धा आलेले आहे. महाराष्ट्राबाहेर होऊन गेलेल्या संतांच्या आख्यानामध्ये त्या त्या प्रांताचे संगीत प्रतिबिंबित झाले आहे. अशा या सर्व प्रकारांचा थोडक्यात क्रमवार परामर्श घेऊ.

**लोकसंगीत :** कीर्तने करण्याआधी ती. दादांचा 'तमाशा' या लोककलेशी घनिष्ट संबंध होता. (कालांतराने सद्‌गुरू श्री साईबाबांच्या आज्ञेने त्यांनी कीर्तने रचण्यास सुरुवात केली.) त्यामुळे कीर्तनातील अनेक पदांच्या चाली जुन्या लावण्यांच्या चालीवर आधारित आहेत. प.पू. स्वामी वरदानंद भारती (आमचे ती. अप्पा) असे सांगत की कीर्तनातील पदे आणि चाली लावण्याची ही गोष्ट सुरुवातीला लोकांना खटकत असे. प्रत्यक्ष कीर्तनात उत्कट भक्तिरसात न्हाऊन आल्याने या पदांच्या चाली लावण्यांच्या चालींवर आधारित आहेत. या गोष्टीचा कालांतराने लोकांना विसर पडला. अशी असंख्य पदे या सर्व कीर्तनातून आहेत. उदाहरणादाखल पुढील पदांचा उल्लेख करता येईल.

१) तुज काय देऊ सावळ्या मी खाया तरी – संत जनाबाई चरित्र

२) महाराष्ट्र मुलुख बहू खट – श्री चांगदेव चरित्र

३) बोलेल काय दगडाची मूर्ती – संत मीराबाई चरित्र

लावणीशिवाय लोकसंगीतातील इतरही अनेक प्रकार या पदांमध्ये आढळून येतात. उदा.

काकडा – "मान्य करा हा देवा आता काकडा रामा" – श्री रामदास चरित्र जात्यावरील ओवी –

**आई का न मला धाडिले। मूळ दिपवाळीला तरी ग।।**
**काय झाले जड मी तुला। नको सारुस मजला दुरी ग।।**

श्री नरसी मेहता चरित्र

**देवीचा गोंधळ**

**जगदंबा नारायणी, बया रुक्मिणी, जगत्स्वामिनी आली रंगाला।**
**या संतमंडळी सारी, आईचा गोंधळ घाला याला।।**

– संत सखू चरित्र

पोवाडा – या कीर्तनात अतिशय स्फूर्तिदायक असे काही पोवाडे सुद्धा आहेत उदाहरणार्थ –

छत्रपती श्री शिवाजी महाराज यांच्यावरील पोवाडा – संत तुकाराम चरित्र

लोकमान्य टिळकांवरील पोवाडा – लोकमान्य टिळक चरित्र मंगलाष्टक

**शंभो शंकर धुर्जटे शिवहरा। विश्वेश विश्वंभरा।**
**हे रामा चतुरानना, सुरवरा। इंद्रायणीच्या वरा।**
**हे गोदे शरयू महेंद्र तनये। भागीरथी स्वर्धुनी।**
**धावाधाव करी तुम्ही त्वरित या। कुर्यात सदा मंगलम।।**

– श्री नरसी मेहता चरित्र

कीर्तनातील त्या त्या प्रसंगाला अनुकूल असेच हे वरील सर्व प्रकार आहेत.

**कटाव** – लोकसंगीताशी जवळचे नाते सांगणारा 'कटाव' हा

वैशिष्ट्यपूर्ण गीत प्रकार कीर्तनात आलेला आहे. या पदांमध्ये कीर्तनातील एखाद्या विशिष्ट प्रसंगाचे धावते वर्णन केलेले असते. एरवी कीर्तनातील पदे आकाराने लहान तरीही मोठा आशय असणारी आहेत. त्या मानाने कटावांची लांबी जास्त दिसते. काही काही कटाव २५/३० ओळींचे सुद्धा आहेत.

या पदांमध्ये गायकीला फारसा वाव असत नाही. पदामधील सर्व चरणांची चाल साधारण एक सारखीच असते. चालीपेक्षाही अधिक महत्त्व ढंगदार, आकर्षक ठेक्यासह पद म्हणून त्यातील सर्व वर्णन श्रोत्यांसमोर जिवंत करण्याला असते. श्री देवी अहिल्याबाई, संत मीराबाई, श्री लाखाभक्त या आख्यानातील कटाव लोकप्रिय झाले आहेत.

**गजर** – आकर्षक चालीमधले, भक्तिरसाने ओथंबलेले, एकाच ओळीत गुंफलेले, क्रमाक्रमाने लय वाढवीत नेणारे असे गजर हे सुद्धा कीर्तनाचे सांगीतिक वैशिष्ट्य आहे. पूर्वरंगातील आध्यात्मिक विवेचन झाल्यावर आख्यान सुरू करण्यापूर्वी कीर्तनकार जेव्हा गजर म्हणतो तेव्हा उपस्थित सर्व श्रोत्यांना तो त्यामध्ये सहभागी करून घेतो. त्या योगे सुयोग्य वातावरण निर्मिती होऊन सर्व श्रोते नकळत कीर्तन भक्ती मधे एकरूप होऊन जातात.

**''जय सच्चिद घन जानकी जीवन नारायण तव दासो ऽ हं''**

किंवा ''ज्ञानेश्वर माऊली, ज्ञानराज माऊली, तुकाराम

तर कधी फक्त 'विठ्ठल विठ्ठल' असे काही गजर कीर्तनामध्ये ऐकावयास मिळतात आणि वातावरण पवित्र करतात.

कीर्तन म्हटले की आर्या, साकी, दिंडी, श्लोक असणारच तसे ते इथे आहेतच.

आर्या – ती. दादांनी आख्यानाची सुरुवात करताना प्रत्येक संताची ओळख आर्या वृत्तात करून दिली आहे. उदा. श्री देवी अहिल्याबाईच्या आख्यानाची सुरुवात –

**''देवी सती अहिल्या भारतभूला ललामभूता जी।**
**राजकारणी चतुरा असुनि जिने ठेविला हरी राजी।।**

अशी केली आहे (साक्या व दिंड्या अगणित असल्याने त्यांची उदाहरणे येथे देत नाही.)

**श्लोक** – कीर्तनामध्ये कथानक पुढे नेण्यासाठी, कथानकातील नाट्यमयता वाढविण्यासाठी किंवा उचित उपदेश करण्यासाठी वेगवेगळ्या अक्षरगणवृत्तातील श्लोकांचा अतिशय चपखल उपयोग जागोजागी केलेला आढळतो. मालिनी, इंद्रवज्रा, शार्दूलविक्रीडित, पृथ्वी इ. वृत्तामधील श्लोक आहेत. भक्त गोरा कुंभार चरित्रामधील दोन श्लोक उदाहरण म्हणून देण्यासारखे आहेत. प्रसंग पुढील प्रमाणे – विठ्ठल नामात दंग होऊन, पायाने चिखल तुडविण्याचे काम करीत असता, पाया खाली आपले तान्हे मूल आल्याचे गोरोबांच्या लक्षात येत नाही. गोरोबांची पत्नी हे भयंकर दृश्य पाहते. आपला सारा शोक, संताप विठ्ठलाला शिव्या देत पुढील श्लोकातून ती व्यक्त करसे (वृत्त – शार्दूल विक्रीडित)

**''काळ्या तू विभवी न सार म्हणूनी लोकांप्रती सांगसी**
**आणि आपण नेसूनी भरजरी पीतांबरा बैस सी।**
**कंठा, गोफ, कडी, कशास तुजला मेल्या मुदी चौकडा**
**घेते सर्व हिरावूनी मग सुखे वाजीव तो चौघडा''।।**

पत्नीचे सांत्वन करीत, उपदेश म्हणून गोरोबा पुढील श्लोक म्हणतात. (मालिनी वृत्त)

**''मरण नच जिवाला ती असे सर्व भ्रांती**
**ठकवित परि माया मानवा जाण गे ती।।**
**म्हणुनि भ्रमित ऐसी गे सखे तू न होई।**
**स्थलि स्थलि भरलीसे माय माझी विठाई''।।**

### शास्त्रीय संगीत

ती. दादांनी कीर्तनातील पदांमध्ये भारतीय (हिंदुस्थानी) शास्त्रीय संगीताचा मोठ्या प्रमाणात उपयोग केलेला आहे. अनेक पदे निरनिराळ्या रागांवर आधारित आहेत. काही पदे तर हुबेहुब रागदारीतील चीजांवर आधारित आहेत. विशेष म्हणजे या सर्व पदांमध्ये रागांचे नियम, रागांची शुद्धता काटेकोरपणे सांभाळली आहे. उदा.

१) यमन – रामदास माय माझी – नमनाचे पद
२) बिहाग – मुरली कशास्तव ही करी धरिली – श्री लाखा भक्त चरित्र
३) भीमपलास – कन्या मी संत तुकयाची – संत तुकाराम चरित्र
४) भीमपलास – त्वा बंध मदीय सोडविला – श्री रामदास चरित्र
५) केदार – चलबाई पळत तू हे भिंती – संत ज्ञानेश्वर चरित्र
६) दरबारी – गेली कुठे मम रमणी – तुलसीदास चरित्र
७) सोहनी – घर जाने दे, जाने दे शाम मुरारी – मीराबाई चरित्र
८) तिलककामोद – मम तात नाथ गे प्रभूचा – नरसी मेहता चरित्र
९) बागेश्री – धिक्कार या सर्व संसार कृत्या – रामदास चरित्र
१०) भैरवी – जय जय प्रभु कमळ नाभ – संत सखू चरित्र

रागदारीवर आधारित पदांचा फार मोठा साठा या कीर्तन संगीतात आहे. वरील पदे ही त्याची अल्पशी झलक आहे.

**नाट्यसंगीत** – जुन्या संगीत नाटकांप्रमाणे ती. दादांनी आपल्या कीर्तनातसुद्धा नाट्य आणि संगीत (पद) यांची गुंफण घातलेली दिसते. संगीत नाटकांच्या प्रभावामुळे असेल कीर्तनातील काही पदांच्या चाली त्या काळातील लोकप्रिय नाट्यगीतांवरून घेतलेल्या दिसतात. उदाहरणार्थ –

१) वद जाऊ कुणाला शरण – नर तनू तुला लाधली – पूर्णरंगाचे पद
२) मर्मबंधातली ठेव ही – काढु उद्या साजिरी तोडती – शंकराचार्य चरित्र
३) पांडु नृपति जनक जया – जोडुनिया द्वय करास
४) रजनिनाथ हा नभी उगवला – सूर्य प्रभेच्या समती साची – संत एकनाथ चरित्र

५) हा नाद सोड सोड – हा आहे काव्य निपुण – मुकुंदराज चरित्र
६) लग्नाला जातो मी द्वारकापुरा – हाल नको करूस वृथा माझे या परी – संत नामदेव चरित्र

**चित्रपट व भावगीत** – "यमुनाजळी खेळू खेळ कन्हैया का लाजता." ब्रह्मचारी चित्रपटातील त्या काळच्या गाजलेल्या या गीताच्या चालीवर 'मज देऊनिया ती भाक मुकुंदा का विसरता" या पदाची चाल रचली आहे.

"रानारानात गेली बाई शीळ" हे जी. एन. जोशी यांचे गाजलेले भावगीत. ती. दादांच्या संत तुकाराम चरित्रामध्ये तुकाराम महाराज व त्यांची पत्नी जिजाई यांच्या तोंडी वरीत भावगीताच्या चालीवर आधारित पद आहे. जिजाई "घरादाराचा झाला बाई खेळ" म्हणून तक्रार करते. तर तुकाराम महाराज त्याच चालीवर "घरादाराचा केला नाही खेळ" म्हणून उत्तर देतात. कीर्तनामधून प्रबोधन आणि मनोरंजन हे दोन्ही उद्देश्य साध्य करायचे असल्याने या प्रकारच्या चालींचा उपयोग केला असावा.

**इस्लाम धर्मातील प्रार्थना संगीत**– कीर्तनावर संगीत साज चढविताना आख्यानातील घटना कोणत्या प्रदेशात घडलेली आहे याचाही विचार कीर्तनात काही ठिकाणी केला आहे. हे पुढील उदाहरणांवरून लक्षात येईल. संत एकनाथ चरित्रामधील एक प्रसंग, एकनाथ महाराज गुरूच्या शोधात, जनार्दन स्वामींच्या दर्शनासाठी दौलताबादच्या किल्ल्यांवर आलेले आहेत. दौलताबादवर मुसलमानांची सत्ता आहे. जनार्दन स्वामींकडे मुसलमान फकिरांचे येणे जाणे आहे. त्यांच्या तोंडी इस्लाम धर्माची महती वर्णन करणारी पदे (ग़ज़ल) आहेत. उदाहरणार्थ –

**नही दुनिया इला ही है, दिलो में ख्याल कर लेना।**
**शरारत ना किसे करतू, सभी को एक जगह जाना।।**
**महंमद मुस्तफा सल्ले अल्ला को जिसने पैछाना।**
**वोहि जिंदा, वोहि आदमी, खुदाका हो जो दीवाना।।**

याच आख्यानात – जनार्दन स्वामींच्या प्रार्थनेवर प्रसन्न होऊन श्री दत्त प्रभू फकिराच्या रूपात प्रकट होतात. या प्रसंगाचे वर्णन करणारी ग़ज़ल पुढीलप्रमाणे –

**गुलिस्तामें खुदबखुद् खुदाही आ गया।**
**दस्त दुवा पंतजीके सिरपे धर गया।।**

श्री जगन्नाथ पंडित हे ती. दादांचे अत्यंत लोकप्रिय आख्यान आहे. या आख्यानातील एक प्रसंग असा आहे की, शहाजहाँ बादशहाच्या आज्ञेने धर्मवाद करण्यासाठी जगन्नाथ पंडितांचे आग्रा येथे आगमन झाले आहे. प्रत्यक्ष धर्मवाद करण्यापूर्वी ते इस्लाम धर्माचे तसेच उर्दू व फारसी भाषांचे समग्र ज्ञान मुसलमान फकिरांकडून करून घेतात. या प्रसंगाच्या अनुरोधाने इस्लाम धर्मातील संगीताचा अगदी कुराणातील आयातींसह उपयोग केला आहे. याच कीर्तनात ती. अप्पा "अगर है शौक मिलने का तो हरदम लौ लगाता जा" हे एका फकिराच्या तोंडी असणारे पद अत्यंत ढंगदारपणे सादर करीत असत. या पदावर सूफी संगीताची छाप स्पष्ट दिसते.

संत सेना न्हावी चरित्रामधील एक प्रसंग याच संदर्भात सांगता येईल. सेनामहाराजांच्या पुण्याईमुळे ते ज्यांच्याकडे चाकरीला असतात त्या बादशहाला अल्लाचा साक्षात्कार होतो व तो नमाज पढू लागतो.

कीर्तनातल्या या प्रसंगाच्या वेळी –

**"अलेहम् दुलिल्ला, इलाही इलिल्ला।**
**अजब तेरी कुदरत है अल्ला हु ताला।।"**

या पदाचे भावपूर्ण गायन ऐकावयास मिळते.

**प्रादेशिक संगीत** – मागे उल्लेख केला त्या प्रमाणे महाराष्ट्राबाहेर होऊन गेलेल्या संतांच्या आख्यानामध्ये त्या त्या प्रांतांचे संगीत प्रतिबिंबित झालेले दिसते. उदाहरणार्थ – संत मीराबाईच्या चरित्रामध्ये राजस्थानी लोकसंगीताचा ढंग प्रकट झाला आहे. हे

१) अब लेऊ बलय्या तोरी रे नंदलालजी मोरे शाम।।

२) बनी बैरागन मैं तो बैरागन, चरनों के खातिर तोरे प्रभुजी या सरत्या पदांमधून स्पष्ट होते. 'होरी' या उत्तर भारतात गायल्या जाणाऱ्या उपशास्त्रीय संगीताच्या प्रकाराचा एक सुंदर नमुना याच कीर्तनात "ठाकूर खेलो तुम होरी" या मीराबाईच्या तोंडी असलेल्या पदामध्ये आढळतो.

प्रसिद्ध गुजराथी संत नरसी मेहता यांच्या आख्यानामध्ये

१) तमे आवोरे नंदलाला, २) अमने करो भवपार,
३) सुण अरतजी रणछोड, ४) चालो चालो मोहनजी जुय्ये.

या सारख्या पदांमधून गुजराथी भक्तिसंगीताचा नमुना ऐकावयास मिळतो.

**ताल वैविध्य –**

ती. दादांनी कीर्तनात इतक्या विविध प्रकारच्या संगीताचा उपयोग केला असल्याने तालांचीही विविधता पदांमध्ये दिसून येते. लोकसंगीतासाठी उपयुक्त असणारे भजनी धुमाळी केरवा हे ताल आहेत तर शास्त्रीय उपशास्त्रीय या संगीतातील तीन ताल, झपताल, पंजाबी, दीपचंदी दादरा हे ताल वापरले आहेत. एरवी फारशा ऐकू न येणाऱ्या झंपा तालामध्ये बरीच पदे गुंफलेली दिसतात.

तालांची विविधता पाहण्यासाठी मीराबाई व रामदास चरित्रामधील पदांचा निर्देश करता येईल.

**श्री मीराबाई चरित्र**

१) रहम नजर करो – नमनाचे पद – दीपचंदी
२) भक्तिपंथावीण इतर पंथ – पूर्वरंगाचे पद – धुमाळी आख्यानातील पदे
३) बोलेल काय दगडाची मूर्ति – धुमाळी
४) घर जाने दे जाने दे शाम मुरारी – त्रिताल
५) भूपते, ठार वेगे करावी मीरा – झंपा

६) जय बोलो भगवानकी – केरवा
७) कांत ये मेरो शाम कन्हा ई – दीपचंदी

**श्री रामदास चरित्र**

१) रामदास माय माझी – नमनाचे पद – दादरा
२) विवेक निशिदिनी वरा – पूर्व रंगाचे पद – धुमाळी आख्यानातील पदे
३) लोलूप भवी जो सदा – धुमाळी
४) जेथे होईल श्री रामाच्या नामाची गर्जना – धुमाळी
५) मान्य करा हा देवा आता – काकडा – केरवा (मध्य लय)
६) सत्वरी पाव तू मला – केरवा (द्रूत लय)
७) जावो गिरफ्तार करो – दादरा
८) धि:कार या सर्व संसार कृत्या – झपताल
९) प्रभू नको मला महती – त्रिताल
१०) त्वा, बंध मदिय सोडविला – त्रिताल

**समारोप :**

समर्थ रामदासांनी दासबोधामधील ''कीर्तनभक्ती'' निरूपणात

**''नित्य नवा हव्यास धरावा। साक्षेप अत्यंतचि करावा।।** (४.२.५)

असे जे म्हटले आहे त्याचे मूर्तिमंत स्वरूप ती. दादांच्या कीर्तन संगीतामध्ये प्रकट झालेले दिसते.

येथे एका गोष्टीचा उल्लेख करणे आवश्यक आहे.

ती. दादांच्या आख्यानाची संख्या सुमारे ८०/८५ इतकी आहे. प्रत्येक आख्यानात ३०/४० पदे आहेत. संगीताचे हे शिवधनुष्य पेलू शकतील असे समर्थ 'गायक साथीदार' सुरुवातीच्या काळात ती. दादांना आणि नंतर ती. अप्पांना लाभले. स्वत: ती दादांना ती. दामुअण्णा (ती. अप्पांचे वडील) गायनाची साथ करीत असत. ती. दामू अण्णांचा पहाडी, गोड आवाज व गाण्याची तयारी पाहून त्या काळच्या प्रसिद्ध नाटक कंपन्या त्यांना आपल्या कंपनीत घेण्यास उत्सुक होत्या. ती. दादांच्या कीर्तनामधील पदांना चाली लावण्यात सुद्धा ती. दामू अण्णांचा महत्त्वाचा सहभाग होता. ''कीर्तन म्हणजे संगीत जलसा नव्हे. कीर्तनात भक्ती, भाव महत्त्वाचे. त्यांना उठाव येण्यासाठीच संगीताचा उपयोग'' – या ती. दादांच्या सूचनेनुसारच ती. दामूआण्णांची कीर्तनातील संगीत साथ असे म्हणूनच आपल्या या सत्‌शिष्याविषयी स्वत: ती. दादांनी पुढील गौरवोद्‌गार काढले आहेत.

**''आवाज होता मधुर, तैसे जबर पाठांतर।**
**सुवाच्य वदे अक्षर, देऊनी दृष्टी अर्थावर।**
**त्या योगे कीर्तनाचा। लौकिक झाला साचा।**

असे गौरवाद्गोर काढले आहेत. तसेच ती. दादांनी ती. दामूअण्णांसाठी 'कीर्तन पद्धती' नावाचे मार्गदर्शनपर ओवीबद्ध काव्य केले आहे. त्यातील निवडक ओव्यांचा उल्लेख या लेखाच्या विषयाच्या संदर्भात योग्य होईल.

**दामोदरा हे कीर्तन । म्हणजे शब्दब्रह्माचे खेळ जाण ।**
**म्हणून शब्दाचे उच्चारण । कीर्तनी स्पष्ट असावे ।।**
**शब्दास फाटा देऊन । कदापि न घ्यावी तान ।**
**का कि कीर्तनी गायन । गौणस्थानी असे की ।।**
**येन केन प्रकारेण । पदांचे उत्तम करावे गायन ।**
**की ज्याचे श्रवणे तल्लीन । श्रोतृसमाज होय की ।**
**शुद्ध गावे गान । वेडी वाकडी न हालवी मान ।**
**तान घेता नयन वदन । निरर्थक हालवू नये ।।**
**ताल तान शब्दार्थ । हे कीर्तनाचे खांब साच ।**
**या तिहींवाचून अवघे व्यर्थ । आहे जाण दामोदरा ।।**

पुढील काळात ती. आप्पांनाही ती. छगनकाकांच्या रूपाने (कै. छगनराव बारटक्के) उत्कृष्ट पेटीवादक व गायक साथीदार लाभले. खरोखर ही दैवी योजनाच असावी असे वाटते. म्हणूनच अनेक सुरेल, व्यासंगी कीर्तनकारांच्या रूपाने आजही ही परंपरा वृद्धिंगत आहे.

संगीताचे कोणतेही औपचारिक शिक्षण झालेले नसून सुद्धा ती. दादांनी आपल्या कीर्तनांमध्ये एवढा मोठा संगीताचा माहौल निर्माण केलेला पाहून त्यांच्या दैवी प्रतिभेपुढे आपण नतमस्तक होतो.

(टीप : ती. दादांच्या कीर्तनामधील सर्व सांगितीक वैशिष्ट्यांचा या लेखात उल्लेख झाला असेलच असे नाही. काही महत्त्वाचे मुद्दे राहून गेल्याची शक्यता आहे. त्याबद्दल जाणकारांनी क्षमा करावी.)

विस्तारभयास्तव सर्व संगीत प्रकारातील मोजकीच उदाहरणे दिली आहेत. याची नोंद घेतली जावी.

**– सौ. प्रियंवदा नवाथे**

ब्लॉक नं. ७, देशपांडे पूरम, दशभुजा गणपतीजवळ, कर्वे रोड, पुणे – ४११००४. फोन : २५४५५७६६, मो. : ९४०५०१५९७१

***

।। श्रीशंकर ।।

**सुमध्व विजय सारामृत :**

११ अध्यायांचा व १९२४ ओवी-संख्येचा हा ग्रंथ म्हणजे श्री मध्वाचार्यांचे चरित्र असून त्यांच्या कर्तृत्वाचा अतिशय सोप्या भाषेत त्यांनी परिचय करून दिला आहे. दासगणुंनी या चरित्रलेखनाचा आपला उद्देश अशाप्रकारे व्यक्त केला आहे!

''मी शंकराचार्यांचा पदरज असलो आणि म्हणूनच अद्वैतवादी असलो 'तरी हे माध्वमत । भक्तीस उपयोगी अत्यंत । म्हणून मी झालो भक्त । श्रीमध्वाचार्य स्वामींचा ।। (कारण) मध्वसिद्धान्त भक्तीसी । पोषक आहे सर्वांशी । सेव्य सेवक भावासी । जागृत ठेवणे हा विधी।।'

''सुखदशा भक्तिपथा लागून । दाविण्या ही दीपिका ।।' श्री संत दासगणुंची समन्वयात्मक दृष्टी येथे प्रत्ययाला येते!



# उपासना मार्ग - भक्तिसूत्रांचा

**डॉ. श्री. अजित कुलकर्णी**
बी.ए., एम.ए., पीएचडी (श्रीमत् भगवद्गीता एक जीवनप्रणाली) रजिस्ट्रॉर बी.एम्.सी.सी. (निवृत्त), पुस्तके व लेखमाला प्रकाशित, गेली ३० वर्षे दासबोध, भागवत, ज्ञानेश्वरी, भगवान रामकृष्ण व स्वामी विवेकानंद यावर व्याख्याने व प्रवचने. आदर्श शिक्षक पुरस्कार पुणे महानगरपालिका, धर्मभूषण पदवी.

वैदिक धर्म परंपरेत ज्ञान, कर्म, भक्ती, योग व उपासना हे मार्ग उपासनेसाठी सांगितले आहेत. या प्रत्येक मार्गातून ईश्वराशी अनुसंधान ठेवता येते. वेदकाळातही भक्तीची उपासना करणारे लोक होते. हे आढळून येते. संतकवी दासगणु महाराज म्हणतात -

त्या तुझ्या प्राप्ती करितां । शास्त्रालागी धुंडाळितां ।
तेथे न एकवाक्यता आता काय करू तरी ।।४।।
शास्त्रे मतमतांतरे माजली । शब्दच्छला पर्वणी आली ।
त्या योगे द्वेषवल्ली । वाढू लागली समाजात ।।५ ।।
म्हणून तया नाना मतां । मी न पाहे सर्वथा ।
तुलाच एक पंढरीनाथा । दृढ धरोनी राहतो ।।६ ।।
सर्व मतांचा रर्ण्य विषय । जगदाधार ईश होय ।
आणि ईश्वर तो तू पंढरीराय । ऐसे संत सांगती ।।७ ।।
ईश्वर वाचक नामे सारी । तुझीच की रे श्रीहरि ।
मेघांतून पडता वारी । नामेघरी गोदा-भीमा ।।८ ।।
जैसी आवडी जयाला । तैसा तो ध्यायी तुला ।
नगाचा बाजार भरला । परि सोनेच सर्व ठायी ।।९ ।।
तू सच्चिदानंद सनातन । तूच देवा रुक्मिणीरमण ।
पिनाकपाणि भाललोचन । उमापति तूच की ।।१० ।।
ऐसे तुझे रूप अचिंत्य, वेदहि झाले कुंठित ।
ऐसे अगम्य तत्त्व लाभत । एक अहेतुक भक्तीने ।।११ ।।

(शांडिल्यसूत्रे)

या ईश्वराला उपासनेच्या मार्गातून पराभक्ती साधून घ्यावी. ही पराभक्ती सांगणारे - शांडिल्य, गर्ग, बादरायण। चौथा ब्रह्मदेवाचा नंदन।

ऐशा चौघांनी केली कथन । भक्तिसूत्रें गीर्वाणी ।।१७ ।।

(शांडिल्य सूत्रे)

दासगणु हे संतकवी म्हणून प्रसिद्ध होते. त्यांनी ओवीरचनेतून संताचे विचारधन, ऋषीमंडळींचे विचार ओवीबद्ध रचनेत आणून साधक, उपासकांच्या दृष्टीस आध्यात्मिक चिंतन आणून फार मोठे उपकार केले आहेत. तेव्हा या लेखातून शांडिल्य भक्तिसूत्रे व नारदभक्तिसूत्रांचा विचार करणार आहोत.

**भक्तीची व्याख्या : आणि भक्ती संबंधी :**

'भज्' या संस्कृत धातुपासून, भक्ती, भजन हे शब्द निर्माण होतात. याचा अर्थ असा की, 'सेवा करणे', 'ईश्वराच्या ठिकाणी निरतिशय प्रेम करणे (सा परानुरक्तिरीश्वरे) असे शांडिल्यसूत्रात सांगितले आहे. भक्तीच्या प्रांगणात प्रेम किंवा भाव ह्याला प्राधान्य असते. आणि इतर सर्व बाह्य उपचार गौण असतात. भक्तीच्या या उपासनेत एकमेव भगवंत प्राप्तीचा विषय असतो. यात अन्य आश्रयांचा त्याग असतो. त्यात त्याची अनन्यता असते, गोपींचे श्रीकृष्णांवरील प्रेम. हा या भक्तीचा आदर्श म्हणता येईल.

वेदातील भगवंताची स्तुस्ती, स्तोत्रे, सूक्ते, प्रार्थना ही भक्ती उपासनेची बीजे आहेत. निराकारावर प्रेम करणे, वृत्ती तादाकार करणे, कठीण असल्याने नामरूपात्मक सगुणावर प्रेम करण्याचा मार्ग, हा भक्तिमार्ग आहे. त्यामुळे ऋषीमंडळी, संतांनी सगुण उपासनेचा मार्ग सांगून साधकांना हा उपासना मार्ग दिला आहे. यात प्रतीके, मूर्ती यांचा विचार असला तरी साधकांच्या 'शुद्ध भावाला' महत्त्व आहे. त्यामुळे ऋषींनी सूत्र रूपाने जे भाव व्यक्त केले त्याविषयी जाणून घेणे आवश्यक आहे.

तेव्हा भक्ती म्हणजे भगवंतावरील 'प्रेम' होय. हे प्रेम निरनिराळ्या प्रकारातून आढळून येते. श्रवण, कीर्तन, नामस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन हे नऊ प्रकार आहेत. भगवंतावर निर्हेतुक, निर्व्याज, निरतिशय प्रेम करणे ही 'पराभक्ती' आहे. हे प्रेम अत्यंत सूक्ष्म, अनुभवगम्य असते. त्याचप्रमाणे सकाम, सहेतुक भक्ती करणारे असतात. त्या भक्तीला 'गौणभक्ती' म्हणतात. यात सकाम भक्ती-उपासना करणाऱ्याचे जे भाव असतात, त्यातून सात्विक, राजसी व तामसी भक्ती असते. भक्तीच्या हेतूवरुन, अतिजिज्ञासू, अथार्थी, ज्ञानी असे भक्तांचे प्रकार पडतात.

## शांडिल्यसूत्रे :

शांडिल्य ऋषींनी भक्तीचे महत्त्व सांगणारी भक्तीसूत्रे सांगितली आहेत. ही एकूण १०० सूत्रे असून संतकवी दासगणु महाराजांनी ही तीन अध्यायात १६२६ ओवीरचनेत मांडली आहेत. पहिल्या अध्यायात नमनाच्या ओव्यानंतर १ ते २६ सूत्रांचा विचार आहे. (ओव्या २८५) दुसऱ्या अध्यायात २७ ते ८४ सूत्रांचा विचार आहे (ओव्या ४१४) अशा १६२६ ओव्यांचा विस्तार आहे.

या सूत्रांच्या अंतरंगाचा विचार केला तर लक्षात येते की, प्रथम शांडिल्यांनी भक्तीची व्याख्या केली आहे. भक्तिः परानुरक्तिः ईश्वरे/(ईश्वराच्या ठिकाणी परम अनुरक्ति) असणे ही व्याख्या केली आहे. (शांडिल्य सूत्र - २)

अध्यायातील पहिल्या ९ पराभक्तीविषयी विचार सांगितले आहेत. ते असे- ही पराभक्ती म्हणजे (१) भक्ती हाच एकमेव भगवद्प्राप्तीचा मार्ग आहे, तो साधक उपासकांनी अवलंबावा. मोक्षाची इच्छा करणाऱ्यानेही याच मार्गाने जावे. शांडिल्य ऋषी ईश्वरभक्तीला श्रेष्ठत्व देत आहेत, (२) ईश्वराविषयी अत्यंतिक प्रेम, हीच पराभक्ती आहे, (३) ब्रह्मनिष्ठ (ब्रह्मज्ञानी) व्यक्तीबाबत भक्ती ही मुक्तीच ठरणार आहे, (४) ज्ञानी असला तरी भक्ती म्हणजे प्रेम असणे आवश्यक आहे, (५) भगवंताशी भावरूपानेही समरस होणे आवश्यक आहे. केवळ ज्ञान असून उपयोग नसतो, (६) अशी भक्ती प्रेम असावे की त्याने द्वैत संपून जाते, (७) ही भक्ती /क्रियारहित असते. (उदा. सूर्याने सूर्याला पहावे तद्वत), ८) ही भक्ती अविनाशी फळ देणारी आहे, ९) भक्ती हे ज्ञान नसून भक्तीचे कार्य म्हणजे ज्ञान आहे. चराचरात सच्चिदानंद आहे या ठिकाणी प्रेम निर्माण झाले पाहिजे. मन निष्काम झाल्याशिवाय ही पराभक्ती प्राप्त होणार नाही.

पहिल्या अध्यायात १० ते २६ सूत्रात अशा पराभक्तीची साधने सांगितली आहेत. ईश्वरासंबंधी विशुद्ध प्रेम हीच साधकाला शांती व आनंद देऊ शकते. अशी भक्ती करता येणे ही ईश्वराची कृपा आहे. उपासकांनी जरी प्रयत्न केले, नित्यकर्मानुष्ठान केले तरी त्याने केवळ हे केले म्हणून पराभक्ती प्राप्त होईल असे नाही. यासाठी प्रत्येक क्रियेचा संबंध ईश्वरापाशी आला पाहिजे. अंतर्बाह्य भगवंत पाहता आला पाहिजे. आत्मा हा शुद्ध, बुद्ध, सच्चिदानंद, कैवल्यकंद हे जाणून घ्यावयाचे. भक्ती कल्याण करणारी आहे ही श्रद्धा हवीय. गोपींसारखे प्रेम करता आले पाहिजे. भगवंतावर निरतिशय प्रेम करावे. मन स्थिर झाले पाहिजे. हे भजनानेही होऊ शकते. यासाठी सत्संगती धरावी. विषयी अनासक्त, विकाररहित असावे. या भक्तीसाठी केवळ श्रद्धा असून उपयोगी नाही. तर ज्ञान प्राप्ती, त्यातून दृढ श्रद्धेची निर्मिती, त्यातून भगवंताविषयी अत्यंतिक प्रेम निर्माण झाले पाहिजे. यासाठी दासगणु महाराज म्हणतात, ''प्रथम उपनिषदांचा मतितार्थ समजून घेतला तर ईश्वरी तत्त्वाचे ज्ञान होईल त्याविषयी प्रेम निर्माण होईल. याच ज्ञान, श्रद्धा व प्रेमाचे अमोघ फळ म्हणजे मोक्ष हे प्राप्त होईल.''

या सूत्रांच्या दुसऱ्या अध्यायात (२७ ते ८४) या साधनांची विशेष लक्षणे सांगितली आहेत. या सर्वांचा सारांश असा की, 'तत्संस्थस्यामृतत्वोपदेशात' म्हणजे त्या ईश्वराची संस्था म्हणजे भक्ती जो करतो तो अमृतत्व प्राप्त करतो. भक्ती भावना उत्पन्न होणे हे देखील भगवंताच्या कृपेमुळेच. कारुण्यामुळेच शक्य आहे. (४९) भक्तीची अनेक रूपे असून, त्यात विदुराची प्रेमभक्ती, वसु उपरिचराची भगवंताशी तादात्मरूप भक्ती, गोपींची विरह भक्ती, हनुमानाची रामार्थ प्राणस्थितीरूप भक्ती, बलि, मार्कंडेय प्रल्हादाची सर्वभूतांच्या ठिकाणी भगवंत पाहण्याची अव्याभिचारी भक्ती, भीष्माचार्यांची अप्रतिकूल्य भक्ती अशा प्रकारची विशेष भक्तीचे स्वरूप, लक्षणे सांगितली आहेत.

'यान्ति मद्याजिनोऽपि माम्' या गीतावचनातील 'य' धातूचा अर्थ 'पूजा' असा केला आहे (६६) यज्ञादिककर्माहून भजन पूजन श्रेष्ठ आहे. हे पराभक्तीचे अंग आहे. या माध्यमातून पराभक्तीचे द्वार उघडले जाते. थोडक्यात या अध्यायात भक्तीची मीमांसा केली आहे.

या सूत्रातील तिसऱ्या अध्यायात ८५ ते १०० सूत्रांचा विचार असून यात उपसंहार केला आहे. ईश्वराचे व्यापकत्व व अलौकिक शक्ती सांगितली. नाम व रूप हे नाशवंत असून परमात्मा अविनाशी आहे. हेच चेतन व अचेतन असून सर्वव्यापी आहे. दासगणु महाराज सांगतात, ''कोणत्याही प्रकारची उपाधी न वाढविता, सदाचार न सोडता, चित्तात श्रीहरी साठवावा.''

तेव्हा भगवद्चिंतनासाठी अनन्यता, एकान्तभाव, भगवंताची सेवा, त्यावर निरपेक्ष प्रेम करावे. असे भक्त निवेदित, समर्पित, तदरूप आणि तन्मय झालेले असतात.

शांडिल्यसूत्रांमध्ये श्रीमद्भगवद् गीतेचा उल्लेख आहे म्हणजे या सूत्रांची रचना श्रीकृष्णावतारानंतर असावी हे दिसून येते. तसेच, छांदोग्योपनिषदांत शांडिल्यविद्येचा एक प्रवक्त म्हणून वर्णन आहे.

अशा प्रकारे या शांडिल्य सूत्रांचा विचार दासगणु महाराजांनी वेद उपनिषदातील महाभारत, रामायण, गीता, ऋषींच्या विचारातून अत्यंत ओघवत्या व नेटक्या शब्दांतून व्यक्त केले आहे. याला नाव देतानाही ते असे दिले की, ''श्री शांडिल्य भक्तीसूत्र - भावदीपिका'' हा संतकवि श्रीदासगणु महाराज समग्र वाङ्मय खंड नववा आहे. यातून त्यांनी भक्तीच्या भावातून चिंतन व्यक्त केले आहे असे दिसते.

## नारदभक्तिसूत्रे :

ब्रह्मदेवांचे पुत्र महर्षि नारद यांनी भक्तीची ८४ सूत्रे मांडली आहेत. ही भक्तीसूत्रे ज्ञानोत्तर पराभक्तीची आहेत. याला दासगणु महाराजांनी 'श्री नारद-भक्तिसूत्र-बोधिनी' असे म्हटले आहे. या ग्रंथात १०४९ ओव्या आहेत.

नारद हे स्वतः भक्तीचे आचार्य आहेत. भक्ती व्याख्या, तिचे स्वरूप, तिची लक्षणे आणि त्यातून प्राप्त होणारी उपासक-साधकांची अवस्था हे नारदांनी सूत्ररूपाने आपल्या पुढे दिली असून, दासगणु महाराजांनी ओवीबद्ध चिंतन व्यक्त केले आहे.

नारदांची भक्तीची व्याख्या व लक्षणे :

**सात्व ऽ स्मिन् परमप्रेयरूपा ।।२।।**

"ईश्वराबद्दल अत्युच्च प्रेम म्हणजे भक्ती!"

हाच ईश्वराकडे जाण्याचा भक्तीपंथ श्रेष्ठ आहे. कारण भक्ती हा साक्षात् प्रेमाचा एक आविष्कार आहे.

भक्ती ही अमृत स्वरूप म्हणजे मोक्षरूप आहे. ती प्राप्त झाली तर पुन्हा जन्माला यावे लागत नाही. भक्त हा निरिच्छ होतो. तो सदैव आत्मरंगात रंगून जातो. भक्ताचा द्वैतभाव गळून पडतो. जरी भक्ताचा व्यवहार सुरू असला तरी त्याचे मन ईश्वरापाशी स्थिर असते. बुद्धि स्थिर झालेली असते. ईश्वराशी तो अनन्य झालेला असतो. अशा प्रकारची 'भक्तीची लक्षणे' भक्ताकडे कशी दिसतात हे सांगितले आहे.

या अनुभूतीसाठी काय करावे तर, ईश्वराच्या ठिकाणी सर्व कर्मे अर्पण करणे! ईश्वराचे विस्मरण झाले तर परमव्याकुळता होते. (१९) ईश्वराचा गुणावाद करावा व ऐकावा. शास्त्रविहित पूजा करावी. सद्वृत्तीने रहावे, सदाचरणी असावे. अशा प्रकारची निष्काम वृत्तीने हरिभक्ती केली तर जन्माचे सार्थक होते.

अशा प्रकारची भक्ती कोणी केली हे नारदांनी सांगितले. ते दासगणु महाराजांनी अत्यंत मधुर शब्दांत व्यक्त केले आहे. व्रजातील गोपीनी केलेली भक्ती ही होय. कर्मयोग, ज्ञानयोगाहून भक्तीचे महत्त्व अधिक असे सांगितले. शांडिल्य, गर्गमुनी, पाराशर मुनी इत्यादींची उदाहरणे दिली असून त्यांनी कशी भक्ती केली हे पहावे. या दृष्टीने नारदांनी त्याचे उल्लेख केले आहेत.

भक्तीचे साधन हे ज्ञान आहे. ज्ञान असल्यावाचून खरी भक्ती होत नाही. भक्ती व ज्ञानाचे नाते अन्योन्य संबंधी आहे. भक्ती हीच फल देणारी आहे. विषयांचा त्याग करावा. त्याग म्हणजे सोडणे नव्हे तर विषयांचा त्याग करून भगवद्भक्तीच्या संगतीत राहणे, सान्निध्यात राहणे. संतसंगतीत व भगवद्भक्तांच्या संगतीत राहणे. अखंड नामस्मरणात रहावे. यामुळे भगवंताची कृपा होते.

अशा कृपाप्रासादिक भक्तीचे स्वरूप कसे हे सांगितले आहे अशा भक्तीचे स्वरूप अवर्णनीय आहे, अनिर्वचनीय आहे. 'मुक्या मुलाला' ज्याप्रमाणे आस्वादनसुख वर्णन करून सांगता येत नाही असे असते. भक्तिप्रेम हे संवेद्य असून प्रमाणान्तराने सिद्ध करावयाची आवश्यकता नाही (५९) भक्तांनी वादाच्या फंदात पडू नये. कारण वादाला अंत नसतो. बुद्धिपेक्षा श्रद्धा, परमेश्वरावर 'अनिर्वचनीय प्रेम' हा या सूत्रांचा प्रतिपाद्य विषय असून ज्ञान, कर्म व भक्ती या तिहींमध्ये 'त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी' (१) भक्ती प्रेम श्रेष्ठ हे सांगितले आहे. हा या सूत्रांचा सिद्धांत आहे.

भक्ती प्रकार सांगताना नारद म्हणतात –

१) भगवंताचे गुणकीर्तन करणे.
२) भगवंताच्या दर्शनाची तळमळ वाटणे.
३) भगवंताच्या मूर्तीची पूजा करणे.
४) भगवंताचे ध्यान करणे.
५) भगवंताची सेवा करणे.
६) भगवंताशी सख्यत्वाने राहणे.
७) पत्नी पतीवर प्रेम करते तसे भगवंतावर एकांतभावाने प्रेम करणे.
८) भगवंताशी आत्मनिवेदन करणे.
९) भगवंताशी तादात्म्य होणे.
१०) भगवंताशी विरहाचे दु:ख होणे.
११) भगवंतावर निर्हेतुक प्रेम करणे.

नारद भक्ती सूत्रातील भक्ती प्रकारातील दोन वैशिष्ट्य म्हणजे (एक) भगवंताशी तादाम्यता (तन्मयाक्ती) (दोन) विरहातही सौख्य (परमविरहासक्ती) म्हणता येते.

**भक्तीचे फळ :** भक्ती ही प्रेम स्वरूप असल्याने अशा भक्तीने भक्त मानसिक दृष्टीने पूर्ण समाधानी आनंदी होतो. सर्व प्रकारच्या वासनांचा क्षय होतो. हे मोक्षासाठी, जीवनमुक्तीसाठी आवश्यक आहे. असा भक्त स्वत:बरोबर इतरांचाही उद्धार करतो. अशा भक्ताला आध्यात्मिक स्थैर्य व शांती लाभते.

**समारोप :**

भक्तीमार्ग हा तसा पाहता सुलभ आहे. या नारद व शांडिल्य ऋषींनी हे विवेचन सूत्ररूपाने मांडले आहे. त्यात भाव-भावनांचे उदात्तरूप व्यक्त होत आहे. अशा प्रेमाला बाह्य साधनांची गरज नाही.

शांडिल्य ऋषींनंतर याची रचना नारदांनी केली आहे. असे १८ सूत्रांवरून दिसते. कारण यात शांडिल्यांच्या भक्तीप्रेमाचा उल्लेख आहे. या (८२) सूत्रांत सनत्कुमार, व्यास, शुक, शांडिल्य, गर्ग, विष्णु (भक्त), कौंडिण्य, शेष, उद्धव, अरूणि, बलि, हनुमान, विभिषण अशा थोर महात्म्यांचा उल्लेख केला आहे. यांच्या साधनात फरक आहे. पण यांच्या परा भक्तीत फरक नाही, हे नारदांना सूचित करावयाचे आहे.

पू. दासगणु महाराजांचे वैशिष्ट्ये असे की या सूत्रांचे शेवटी ते म्हणतात की, "वारकरी संप्रदायातील थोर अधिकारी वै. ह. भ. प. केशवराव देशमुख महाराज यांनी मला नारद भक्तीसूत्राचे पुस्तक दिले आणि याचा अभ्यास करावा हे सांगितले. म्हणून हे मी चिंतन लिहिले. या चिंतनाला आधार मी पांगारकरांच्या टीकेचा घेतला असून त्यातून ही रचना पांडुरंगाच्या व गुरूच्या कृपेने संपन्न झाली आहे."

वाचकांना नम्र विनंती ज्यांना अभ्यास करावयाचा असेल त्यांनी मूळ भक्तीसूत्रे आणि प. दासगणु महाराजांची ओवी रचना जरूर वाचावी. भक्ती पंथाची वाटचाल निश्चितच सुकर होईल.

**– डॉ. श्री. अजित कुलकर्णी**
३४६, शनिवार पेठ, पुणे – ४११०३०.
फोन : २४४८७०३०

***





# ‘अमृतानुभव - भावार्थ - मंजिरी’ - दर्शन

**प्रा. डॉ. शं. रा. तळघट्टी**
एम.ए., पीएच्डी., तत्त्वज्ञानाचे निवृत्त प्राध्यापक पुणे विद्यापीठ, अनेक इंग्रजी, मराठी लेख प्रकाशित, भारतीय तत्त्वज्ञान व संत वाङ्मयाच्या अभ्यासाची आवड, पीएचडी साठी विद्यार्थ्यांना मार्गदर्शन, ज्ञानदेव विचारदर्शन, चांगदेव पासष्टी इत्यादी पुस्तकांचे लेखन.

१) ‘ज्ञानियांचा राजा। गुरू महाराज।।’ असलेल्या ‘स्वानंद साम्राज्य चक्रवर्ती श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या समग्र वाङ्मयामधील ‘अमृतानुभवा’चे स्थान विशेष महत्त्वाचे आहे. कारण त्यांच्या सर्वच वाङ्मयामध्ये जरी ‘आत्मभाव’च प्रकट झालेला असला तरी ‘निकराचा आत्मभाव’ आपल्या वैभवाने विलसत असलेला दिसतो तो ‘अमृतानुभवा’मध्येच! हा आत्मभाव ‘मनबुद्धि अगोचर’ आणि केवळ ‘स्वसंवेद्य’ असल्याने शब्दातीत आहे. परंतु आपल्या अलौकिक शब्दप्रभुत्वाच्या व गुरुकृपेच्या आधारे ज्ञानेश्वरांनी ‘बोली अरूपाचे रूप दावीन’ ही प्रतिज्ञा सार्थ करून मराठी सारस्वताला दैवी लेणे प्राप्त करून दिले. ‘अमृतानुभव’ ज्यास ज्ञानेश्वर स्वत: ‘अनुभवामृत’ म्हणतात - हा त्यांचा ‘आत्मस्थिती’चे स्वरूप-वर्णन करणारा स्वतंत्र असा तात्त्विक ग्रंथ आहे. तात्त्विक म्हणायचे कारण - ‘अमृता’ची अपरोक्ष अनुभूती भाषाभिव्यक्त करीत असताना त्या संबंधीच्या अनेक तात्त्विक समस्यांची उकल ज्ञानेश्वरांनी केली आहे. ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञान हे औपनिषदिक, म्हणजेच वेदान्ती आहे. ते केवल अद्वैती आहे. ‘अमृत’पदाने सच्चिदानन्द स्वरूप आत्मतत्वाच्या आनंदमयत्वाचा प्राधान्येन निर्देश करून त्याचा ‘अनुभव’ हा सर्व प्रकारच्या द्वंद्वांच्या व सापेक्षतेच्या अतीत आणि शुद्ध भावात्मक आहे हे ज्ञानेश्वरांनी मुख्यत: स्वानुभूतीच्या आधारे ‘अमृतानुभवा’त विशद केले आहे. मुळात विषय हा व्यवहारातीत अशा परमार्थ पातळीवरील असल्याने आकलन करण्यास कठीण! ज्ञानेश्वरांनी तो अनेक दृष्टान्तांच्या साहाय्याने विशद केलेला असला तरी त्यांचेही विवेचन समजण्यासाठी अधिकारी सत्पुरुषाच्या मार्गदर्शनाची आवश्यकता भासतेच. संतकवी श्री दासगणु महाराज यांनी ‘अमृतानुभव - भावार्थ - मंजिरी’ हा ‘अमृतानुभवा’चा गूढार्थ सुस्पष्ट व सुबोध करणारा टीका ग्रंथ लिहून असे सर्वजन सुलभ मार्गदर्शन उपलब्ध करून दिले हा त्यांचा अभ्यासक, उपासक व साधक वाचकांवर फार मोठा उपकार आहे असे मनापासून वाटते. कारण हा खरोखरी प्रासादिक ग्रंथ आहे. ‘प्रसाद’ या गुणाने तो युक्त आहे म्हणून तर तो प्रासादिक आहेच; परंतु त्याची जन्मकथा वाचल्यावर कोणीही म्हणेल की ‘भावार्थ मंजिरी’ ला साक्षात पांडुरंगाने संमतीच्या रूपाने आशीर्वादपूर्वक ‘प्रसाद’ दिला आहे - ‘अमृतानुभवा’ला आपल्या कुशीत दिवसभर सांभाळून!! ती सर्व कथा मी येथे सांगत नाही; वाचकांनी ती, पूज्य आप्पांनी (स्वामी वरदानंद भारतींनी) लिहिलेल्या दासगणु महाराजांच्या चरित्र ग्रंथातून अवश्य वाचावी. एवढे मात्र खरे की त्या कथेवरून महाराजांची पांडुरंगावरील सप्रेमनिष्ठा व पांडुरंगाचे आपल्या भक्तावरील सदस्यप्रेम यांचा एकाच वेळी प्रत्यय येतो. समर्थांनी म्हटल्याप्रमाणे ‘नुपेक्षी कदा राम दासाभिमानी’ हेच खरे! याचे आणखी एक कारण असे की ग्रंथाची सात प्रकरणे लिहून झाल्यावर महाराज ज्यांना आपला पुत्र मानीत अशा प्रिय शिष्य श्री दामूआण्णांचा (पूज्य आप्पांचे तीर्थरूप) स्वर्गवास झाला. त्या दु:खाकुल स्थितीत ग्रंथाचे लेखन साहजिकच थांबले. पुढे ते होणार की नाही असेही वाटू लागले. परंतु पांडुरंगकृपेने महाराज त्या धक्क्यातून सावरले व ग्रंथ पूर्णत्वास गेला. विठ्ठलाने वाचकांना दिलेला हा कृपा ‘प्रसाद’च नव्हे काय?

२) ‘अनुभवामृत’ हा ग्रंथ ज्ञानेश्वरांनी सलग लिहिलेला होता, तो नंतर कोणीतरी अंतरंग अभ्यासपूर्वक दहा प्रकरणांमध्ये विषयवार विभागला असावा असे संशोधक मानतात. एवढे खरे की ही दहा प्रकरणे शिवकल्याणांच्या सर्वांत प्राचीन अशा ओवीबद्ध टीकेतही आढळतात. शिवाय ती अभ्यासकांच्या दृष्टीने सोयीचीही आहेत. श्री दासगणु महाराजांनीही त्यांचा स्वीकार करूनच भाष्य लिहिले आहे. त्याचा आपण आता मागोवा घेऊ.

ज्ञानेश्वरांचे तत्वज्ञान औपनिषदिक आहे असे मी वर म्हटले आहे. स्वत: श्री दासगणु महाराज ‘अमृतानुभवाला’ ‘अभिनव उपनिषद’च मानतात. ते ज्ञानेश्वरांना ग्रंथारंभी म्हणतात - ‘‘ग्रंथ श्री अमृतानुभव। मराठीचे ‘उपनिषद् अभिनव। जेथें तर्कवितर्काशी वाव। मुळीं न आपण ठेविला।।’ (१-९) ज्याप्रमाणे उपनिषदांत ऋषींनी स्वानुभूतीपूर्वक अध्यात्मज्ञान सांगितले आहे त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरांनीही अमृतानुभवात आपला ‘अमृत’ आत्मानुभव कथन केला असल्याने त्यास यथार्थपणे ‘उपनिषद्’ ही पदवी प्राप्त होते. त्यात तर्क-वितर्काला जागा नाही. म्हणूनच उपनिषदांना ‘श्रुति प्रस्थान’ म्हटले आहे; ‘श्रुति’ हेच

वेदान्तज्ञानाचे श्रेष्ठ प्रमाण. त्यामधील विचारांसंबंधी तार्किक पद्धतीने चर्चा करून एक सुसंगत असे वेदान्त-दर्शन मांडण्यासाठीच 'ब्रह्मसूत्रां'ची रचना भगवान वेदव्यासांनी केली. त्याला 'न्यायप्रस्थान' असेच म्हटले जाते. महाराजांनी अमृतानुभवाला 'उपनिषद्' म्हणून आपली मर्मज्ञताच प्रकट केली आहे.

मंगलाचरणाचे पाच श्लोक ज्ञानेश्वरांनी संस्कृतमधून लिहिले आहेत. त्यांचे महत्त्व हे की त्यात अमृतानुभवाचे सार सामावले आहे. पहिल्याच श्लोकात साक्षात परब्रह्म अशा दैवतरूप गुरूंना, निवृत्तिनाथांना ते आश्रयात्मक वंदन करतात. महाराजांनी 'आश्रय' या पदाचा 'समरस होणे', अहंकार विसर्जित करून एकरूप होणे, असा अर्थ केला आहे. तो तात्त्विकदृष्ट्या किती महत्त्वाचा आहे हे सांगायला नको. तसेच दुसऱ्या श्लोकातील 'शांकरी विद्या' याचा 'कल्याणाचे आगर असलेल्या शंकराला जाणण्याची विद्या' असा मार्मिक अर्थ ते सांगतात. तिलाच 'ब्रह्मविद्या', 'अध्यात्मविद्या' म्हणतात असा खुलासाही ते करतात. तिच्यामुळे द्वैतभान हरपून ऐक्यानुभूती प्राप्त होते - ''ही छेदून द्वैतभान। सोडी आणून ऐक्यत्वा।।'' (१ - २७). येथपासूनच अद्वैती तत्त्वज्ञानाच्या निरूपणास प्रारंभ होतो. शिव-शक्ती हे दोन भासत असले तरी स्वरूपत: ते एकरूपच आहेत. हे ज्ञान शांकरी विद्येने प्राप्त होते - ''शांकरी विद्येवरून। शिवशक्तीचें होय ज्ञान।।'' आणि ''शुद्ध ब्रह्मापासून। शिवशक्ती निर्माण।।'' (१-२९, ३७) येथे महाराजांचा एक विचार महत्त्वाचा आहे. शिव आणि शक्ती हे एकमेकांवाचून अपूर्ण आहेत. पूर्ण शंभूने - ब्रह्माने - द्वंद्वात्मक अपूर्णता जी धारण केली तिचे प्रयोजन पूर्णब्रह्म दाखविणे - त्यांचे ज्ञान करून देणे - हे आहे. ''या शिवशक्तीचे ठायीं जाण, जें उरलें अपूर्णपण। तें त्यानीच केले धारण। पूर्ण ब्रह्म दावावया।।'' (१-४२) जो जगताच्या उत्पत्ती-स्थिती-लयाचा मूल-मध्य-अग्र आहे त्या पूर्ण शंभूला नमस्कार करून मंगलाचरण समाप्त होते.

**३)** 'शिवशक्तीसमावेशन' हे पहिलेच प्रकरण जगताच्या व जगत्कारणाच्या स्वरूपाचे विवेचन करणारे असल्याने तात्त्विकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचे आहे. श्री दासगणु महाराजांनी त्यांचे अंतरंग मार्मिकपणे विशद केले आहे. त्यासाठी त्यांनी योजिलेली वेदान्त-परिभाषा अद्वैती तत्त्वज्ञानावरही प्रकाश टाकते. शिव आणि शक्ती! ज्यास ते पुरुष आणि प्रकृती असेही म्हणतात, ही दोन भिन्न तत्त्वे वाटली तरी तत्त्वत: ही एकाच अधिष्ठानावर स्थित राहून जगताभास दाखवीत असल्याने त्यांच्यात अद्वैतच आहे. त्यांचे दोनपण किंवा त्यावर आधारित जगताचे अनेकपण हे केवळ भासमान आहे; त्यास 'पूर्णशंभू'हून वेगळी 'सत्ता' नाही असा केवळ अद्वैती सिद्धान्तच ज्ञानेश्वरांनी या प्रकरणात मांडला असल्याचे महाराज स्पष्ट करतात. येथे एक गोष्ट ध्यानात घ्यायला हवी ती म्हणजे 'प्रकृती-पुरुष' पदांनी 'शिव-शक्ती'चा निर्देश केला आहे; सांख्य दर्शनातील द्वि-तत्त्वरूपातील 'प्रकृती' - 'पुरुषा'चा नव्हे. सांख्य दर्शन हे पूर्णपणे 'द्वितत्ववादी' आहे, तर ज्ञानेश्वर दर्शन पूर्णपणे 'एकतत्ववादी' किंवा 'अद्वैती' आहे. महाराजांच्या काही महत्त्वाच्या ओव्या पाहू - ''इच्छा बहु होण्याची/परमात्म्यातें होता साची। तर्यी तो पुरुष प्रकृतीचीं। स्वरूपें दावी आपणात।।'' (८४) ज्ञानेशांच्या मूळ ओवीत 'बहु' होण्याचा उल्लेख नाही. परंतु उपनिषदात - ''एको ऽ हं बहुस्याम् प्रयायेय।'' असा उल्लेख आहे. त्याचे कारणही ''स एकाकीन रमते।।'' हे आहे. माऊलींनी ''स्वसुखाची आळुकी' असा त्याचा उल्लेख केला आहे. महाराज सांगतात - ''हे यांचे दोन होणें। केवळ विलासा कारणें। कां कीं विलासाचे पारणें। न फिटे दोहोंवीण।।'' (९१) अर्थात हे द्वैत आणि तज्जन्य जगाचे अनेकत्व केवळ नामरूपात्मक आहे, सत्य नव्हे हे ही ते स्पष्ट करतात. या संबंधातील शंकराचार्यांचा एक श्लोक प्रसिद्ध आहे - ''अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंकम्। आद्यमयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयम्।।'' (वाक्य सुधा). यानुसार महाराज सांगतात - ''अस्ति भाती आणि प्रिय। हे शिवाचे ग्रंथ पाद्य। नामरूपाचा तो ठाय। सहज आहे शक्तीशी।। या पांचावीण पाही। कोणतीही वस्तू नाही। म्हणून *प्रकृती पुरुषाठायी। एकपणाच अक्षयींचा।।''* (१००, १०१) पुढे ''मृत्तिकेत्येव सत्यम।'' या औपनिषद विधानाचाही उल्लेख त्यांनी केला आहे. तात्पर्य - ''नामरूपे करून। जगासी आले - जगपण। जग प्रकृतीचे कार्य जाण। परमात्म्यावरी भासत।,'' (२०४)

या प्रकरणाअंती श्री दासगणु महाराजांनी एक रम्य व मार्मिक कल्पना मांडली आहे. वास्तविक 'शिव-शक्ती' म्हणजे 'विठ्ठल-रुक्मिणी'च होत. तरीही ज्ञानेश्वरांनी 'शिव-शक्ती' नावेच का योजिली? याचे उत्तर महाराज देतात - ''हे नरहरी भक्ताकरितां।। मुद्दाम केलें ज्ञानेश्वर।।'' (३४५) पुढे सांगतात - ''जो विठ्ठल तोच शिव। प्रकृतीचेंच रुक्मिणी नाव। हाच आला अनुभव। श्रीनरहरी सोनारा।।'' (३४८). अशी कल्पना केवळ महाराजच करू शकतात। मात्र ते सिद्धान्त सांगायला विसरत नाहीत - ''असो, कोण शिव कोण हरी। एक चिन्मय वस्तू खरी।। ती या प्रकरणाभितीरी। बोलले महाराज ज्ञानेश्वर।।'' (३५०) शेवटी शिवशक्तीस, खरे तर त्यांच्या मूळ अधिष्ठानास, ऐक्य भावे नमन करून ज्ञानेश्वरांनी प्रकरण समाप्त केले आहे.

**४)** दुसरे प्रकरण हे सद्गुरू स्तवनाचे आहे. सर्वच संतांनी सद्गुरू-माहात्म्य मुक्तकंठाने गायिले आहे. ज्ञानेश्वरांचे वैशिष्ट्य असे की ते सद्गुरूंना मूर्त ब्रह्मविद्याच मानतात. महाराज सांगतात - 'गुरू ब्रह्मविद्येचा। मंगळसूत्र होय साचा। म्हणजे ब्रह्मविद्येच्या सौभाग्याचा। असणेपणा याच्यामुळें।।'' (७) याचा अर्थ - ''म्हणून सद्गुरू वाचून। फोल अवघे ब्रह्मज्ञान।।'' (९). महाराजांनी केलेला 'मायाकुंजरू'चा 'विषयरूप हत्तीण' हा अर्थ मार्मिक आहे. विषयवासना नाहीशी झाल्याशिवाय मोक्षाची कल्पनाच करता येत नाही. आणि त्यासाठीच सद्गुरूंना शरण जायचे - ''या मायेचे निरसन। आहे सद्गुरूचे आधीन। ज्ञानरूप सद्गुरू चरण। धरितां नाश मायेचा।।'' (२४). सद्वस्तूचे ज्ञान म्हणजे काय तर - ''सद्वस्तूचें हेच ज्ञान। कीं जाणणें आपणां आपण। आणि याचेच नाव शिवपण। या अभावीं

जीवपणा ।।'' (३०) हेच आत्मज्ञान वा स्वरूपस्थिती. येथे श्री समर्थ रामदासांच्या प्रसिद्ध ओवीचे स्मरण अवश्यकपणे होते; ती ओवी अशी,

''ऐक ज्ञानाचे लक्षण, ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान। पाहावें आपणांसि आपण। या नाव ज्ञान।।'' (५-६-१) शिवास अविद्येमुळे - आत्मविस्मृतीने - जीवदशा प्राप्त होऊन तो सुखदु:खात्मक भोगांचा धनी होतो. सद्गुरूकृपेने ती अविद्या नाहीशी झाली म्हणजे त्याचे स्वयंभू शिवत्व प्रगट होते. ज्ञानेश्वरांनी सद्गुरूंच्या रूपातील अध्यात्मज्ञानाचे माहात्म्य अनेक प्रकारे विशद केले आहे आणि तात्त्विक दृष्ट्या महत्त्वाची गोष्ट म्हणजे तसे करताना त्यांनी अद्वैत वेदान्तामधील 'माया', 'अविद्या' या संकल्पनांचा स्पष्टपणे उपयोग केला आहे. कारण, महाराज सांगतात - 'जयीं अविद्या बळावते। तयीं आपलेपण हरपते। आणि ते हरपतां येते। शिवासीं जीवदशा।।'' (६४) येथे 'आपलेपणा' हा साधा शब्द पारिभाषिकपणे 'आत्मत्व' या अर्थाचा आहे हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. 'आत्मबुद्धी'चा विसर पडून 'देहबुद्धी' बळावणे हे अविद्येचे कार्य आहे कारण अनात्म असलेल्या दृश्य जगताचे नानात्व आत्मत्वाने भासणे हे मायाकार्य आहे. ''नाहीं ते जळीं बुडिजे...'' या ओवीवरील भाष्यात महाराज सांगतात - ''नसत्या मृगजळीं बुडाला। तो परिपूर्ण गुरुनें तारिला। तारिला तो न उरला। कोठेंही।।'' (१०८). स्पष्टीकरणार्थ ते म्हणतात - ''येथें तेंच तारणें। कीं अवघें। मिथ्या हें दाखविणें। तारिता तारिता नुरवणें। शब्दांवाचून कोठेही।।'' (११४) सद्गुरू स्वत: मात्र द्वंद्वातीत, गुणातीत, म्हणजेच मायातीत असल्याने त्याचे शुद्ध, विमल 'निवृत्ती' हे स्वरूप अप्रमेय आहे; तो साक्षात ब्रह्मच आहे. तो अद्वितीय असल्याने त्याला वंदनही करता येत नाही. कारण त्यात वंद्य-वंदक द्वैत अभिप्रेत आहे. गुरू-शिष्य-ऐक्य हेच सत्य होय.

'निवृत्तीनाथ' हे ज्ञानेश्वरांचे सद्गुरू. त्यांचे निरपेक्ष ब्रह्मत्व ज्ञानेश्वरांनी वर्णिले आहे. त्याचा भावार्थ मार्मिकपणे महाराज सांगतात. ''म्हणजे सकल धर्मांहून निवृत्त। जें का परमात्मस्वरूप सत्य। तोच हा सद्गुरू साक्षात। निवृत्ती माझा।।'' (३२३) त्यास अभिन्नपणे वंदन करताना - ''माझें हे उसने मीपण। तेथेच समरस जाहलें।। (३६०) असे ते सांगतात. येथील 'उसने मीपण' ही संकल्पना किती सुंदर व अर्थवादी आहे हे वाचकानीच अनुभवावे!

प्रकरणाचा बोध सांगताना महाराज म्हणतात - ''म्हणजे सद्गुरू तितके निवृत्ती। शिष्य ज्ञानेश्वर सन्मती। ऐशी साधकाची मानील मती। तरीच घडेल कृतार्थता।।'' (३६५) जे हे तत्त्व न मानता केवळ ऐहिक सुखाकरिता सद्गुरूचे 'पोवाडे' गातात पण आपण मात्र निराळे राहून गादी चालवितात - ''तो न शिष्य सद्गुरूचे''; अर्थात ते कृतार्थ होत नाहीत असा सावधानतेचा परखड इशारा देण्यास महाराज चुकत नाहीत.

**५)** 'वाचाऋण परिहार' नावाच्या तिसऱ्या प्रकरणात ज्ञानेश्वरांनी परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी' या चतुर्विध वाचेचे आत्मज्ञान प्राप्तीसाठी असलेले महत्त्व आणि मर्यादा यांचे विवेचन केले आहे. महाराजांनी त्याची सुबोध मांडणी केली आहे. पहिल्याच ओवीतील 'जें चेणेंचि नींद कीं।'' या ज्ञानेश्वरांच्या विधानाचा अर्थ करणे तसे कठीणच आहे. परंतु महाराजांनी त्याचा अर्थ किती सहजपणें सांगितला आहे पहा - ''जेंवी झोपेतील जागेपण। निद्रेच्याच स्वरूपाचें।।'' (३) आणखी स्पष्ट करतात - ''म्हणजे शास्त्रज्ञानें करून। जरी निरसलें अज्ञान। तरी ज्ञानाचा अभिमान बळावला।।'' (४) येथे ज्ञानच बंधाला कारण होत असल्याने वाचेचे बंधरूपी ऋण पूर्णपणे फिटतच नाही. अविद्याकाली माणसाला 'मी देही, सुखी-दु:खी' अशी भ्रांती असते, ती या वाचांमुळे; तथापि याचा वाचा विद्येला साहाय्य करतात तेव्हा माणसाला 'मी सच्चिदानंद स्वरूप आहे' असा यथार्थ बोध होतो. परंतु अज्ञान ज्ञानाचे हे दोन्ही व्यवहार म्हणजेच वाचांचा सर्व व्यवहार अविद्यामूलकच असतो. कारण आत्मा हा वाचेलाच काय पण मन आणि बुद्धीलाही अगोचर आहे. महाराजांच्या शब्दात ''परी हे दोन्ही व्यवहार। अविद्यामूलक साचार।।'' (३६) मुळात 'मी बद्ध आहे' असे वाटणे हीच अविद्याकृतभ्रांती. अर्थात 'मी मुक्त आहे' किंवा 'झालो' असे वाटणे ही सुद्धा भ्रांतीच म्हणावी लागेल. महाराज म्हणतात - ''म्हणूनि बंधचि मिथ्या जरी। मग कोठून मोक्ष खरा तरी। अविद्येनें मरून परी। ठिकाण केले मोक्षाला।।'' (६५) शुद्धज्ञान अर्थात ज्ञानमात्र स्वरूपात सापेक्ष अशा ज्ञान-अज्ञानाला व भाषेच्या व्यवहाराला मुळीच स्थान नाही. म्हणून महाराज स्पष्ट करतात, ''ज्ञान अज्ञान वाटणें। हीच भ्रांतीची लक्षणें।।'' (९८). ज्ञान हे सुद्धा अज्ञानसापेक्षपणे बंधनकारकच आहे. या आपल्या मताविषयी स्वत: ज्ञानेश्वर स्वानुभवाची साक्ष देतात, भगवान शंकराचे 'शिवसूत्र', किंवा श्रीकृष्णाचे गीतेतील वचन यावर केवळ आपले मत आधारित नाही. ही त्यांची स्वतंत्रप्रज्ञा फार महत्त्वाची आहे. ''परी शिवें का श्रीवल्लभें...'' या ओवीच्या स्पष्टीकरणात महाराज म्हणतात, ''स्वानुभवही आमुचा। येणें परीच आहे साचा। नुस्त्या शास्त्र वाक्याचा। अनुवाद केला नसे।।'' (७३) शास्त्रे ही सत्यच सांगतात हे खरे. परंतु त्या सत्याचा प्रत्यक्ष आपल्या अनुभवात पडताळा घेणे आवश्यक आहे; नाहीतर महाराज म्हणतात, ''अनुभवावीण सत्य म्हणतां। अंधश्रद्धा बळावे।।'' (७५) शेवटी वाचेचे ऋण कोणते ते स्पष्ट करून सांगतात - ''तेवीं शास्त्रादिकांचे साह्यें करून। जरी झालें द्वैताचें निरसन। तरी अहंब्रह्मास्मि ही खूण। उरलीच असे।। आणि ही जी उरली खूण। तेंचि चहू वाणीचें ऋण। शेष राहिलें जाण। बोधरूपे।।'' (११७, ११८) हे ऋण फेडण्याचा एकमेव मार्ग म्हणजे सद्गुरूंच्या पायावर डोके ठेवणें अर्थात अहंभावविसर्जनपूर्वक ऐक्यभावें वंदन करणे. कारण महाराज सांगतात, ''ज्ञानाज्ञाननिरसन। हें सद्गुरूंचे दर्शन। मग तेथें वाचाऋण। कोठून टिके।।'' (१३२)

**६)** चौथ्या प्रकरणाचे नाव 'ज्ञानाज्ञान भेद कथन' असे जरी असले तरी त्यात मुख्यत: ज्ञान आणि अज्ञान या संकल्पनांचे सापेक्षत्व दर्शवून त्या दोहोंनाही निरपेक्ष, शुद्ध ज्ञानस्वरूप आत्म्यात स्थान नाही किंवा त्यात त्या विलीन होतात हे ज्ञानेश्वरांनी दाखवून दिले आहे. जी स्थिती 'ज्ञान-अज्ञान' या द्वंद्वाची तीच 'आहे-नाही' या द्वंद्वाची. कारण 'सद्वस्तू' ही नित्य सत्तावान असल्याने 'नाहीपणा'चा तिच्यात अत्यंताभाव आहे. त्यामुळे तत्सापेक्ष 'आहेपण'चा व्यवहारही संभवत

नाही. या संदर्भात शून्यवादाचा पक्ष उभा करून ज्ञानेश्वरांनी त्याचे समूळ खंडन केले आहे. श्री. दासगणु महाराजांनी हा सर्व विषय त्यांच्या खास पद्धतीने सोपा करून सांगितला आहे. सामान्यपणे ज्ञान हे त्रिपुटीयुक्त असते, म्हणजे त्यात ज्ञान-ज्ञेय-ज्ञान असे तीन घटक असतात. आत्मज्ञान झाल्यावर मात्र जगत या आपल्या कार्यासह अज्ञान पूर्णपणे नष्ट होते, अर्थात त्रिपुटी उरतच नाही. हेच भेदरहित, अखंड, शुद्ध, निरपेक्ष, ज्ञान, आत्म्याचे हे चिन्मात्र स्वरूप. तिसऱ्या मूळ ओवीवरील दासगणु महाराजांचे विस्तृत विवेचन मुळातच वाचायला हवे. या ओवीतील 'ज्ञान'पदाचा अर्थ 'वृत्तिज्ञान' असा नसून 'ब्रह्म ज्ञान' असा असल्याचे ते सकारण सांगतात. ''आणि ज्ञान शब्दें करून। घेतल्यासी ब्रह्मज्ञान। होणार आहे खंडन। घेतलेल्या शंकेचें।।'' (३२). ज्ञानस्वरूप ब्रह्मच त्रिपुटीचे रूप धारण करीत असल्याने त्यात भेद संभवत नाही - ''म्हणून ज्ञेय ज्ञान ज्ञाता। हे अभेदी भेद सर्वथा। तात्त्विक विचारे पाहू जातां। भेदवार्ता मुळीं नसें।।'' (२७). जोपर्यंत अज्ञान आहे तो पर्यंतच ज्ञानाला महत्त्व आहे. अंधारामुळे प्रकाशाला महत्त्व; सूर्याला प्रकाशाचे काय महत्त्व? तात्पर्य - ''म्हणजे अज्ञानासी ज्ञान घालवितें। पुढे आपणही ना शेष उरतें। निखळ ज्ञानीं होते। त्या ज्ञानाची समाप्ती।। याच निखळ ज्ञानाप्रती। स्वरूपज्ञान ऐसें म्हणती। तेथें ज्ञानाज्ञानाची रूपें तीं। न दिसती अणुमात्र।।'' (८०, ८१). अर्थात आत्मा हा 'ज्ञानमात्र' किंवा 'चिन्मात्र' आहे. तो अज्ञानाने झाकला जात नाही आणि ज्ञानाने प्रगटही होत नाही. कारण तो 'ज्ञानपणेविण ज्ञानमात्र' आहे.

आता प्रश्न असा की ज्ञानमात्र आत्मा 'आहे' असे म्हणता येत नाही कारण ज्ञानाचा विषय नाही आणि 'नाही' असेही म्हणता येत नाही कारण अज्ञानाचा विषय नाही. मग तो 'शून्य' असला पाहिजे असे म्हणावे लागेल - ''मग तो शून्य परमात्मा। का न म्हणावा सर्वथा। आहे - नाहीची वार्ता। जेथ नाहीं तेंचि शून्य।।'' (१२६) या शून्यवादाचे खंडन ज्ञानेश्वरांनी केले आहे. 'शून्य आहे' असे म्हणणाराच त्याच्या अरूणेपणामुळे शून्यवादाचे खंडन करतो. महाराज सांगतात - ''शून्यवादाचे ठायीं। वादीच निजसिद्धांत खंडी पाही।।'' (१३२). आत्मा हा एकमेवाद्वितीय असल्याने ज्ञानाज्ञानाचा विषय नाही. त्याचे 'असणे' 'शुद्ध', निरपेक्ष (ॲब्सोल्यूट) आहे. अर्थात ''एवंच आहे नाही पणावीण। आहेच आत्म्याचे आत्मपण। येथे शून्यवाद म्हणून। लंगडा पडे।।'' (१६४) आत्मा जसा 'चिन्मात्र' आहे तसा 'सन्मात्र' आहे, आणि 'सुखमात्र' म्हणजे आनंदस्वरूपही आहे! याच 'सत्-चित्-आनंद पद त्रयाचे विवरण पुढील पाचव्या प्रकरणात ज्ञानेश्वर विस्ताराने करतात. त्याचे मर्म महाराजांनी सुरेखपणे विशद केले आहे.

**७)** परमात्मा हा वर्णनातीत - शब्दातीत आहे. तर मग त्याला 'सच्चिदानंद' असे म्हटल्याने उणीव येत नाही का? या प्रश्नाचे उत्तर महाराजांच्या शब्दात आहे. ''परी सच्चिदानंद शब्दें करून। परमात्मा न ये गौणपण। जेंवी विषअंगीचें विष जाण। बाधा न करी विषातें।। (८) वेदान्त दर्शनात परमात्मत्त्वाची दोन प्रकारची लक्षणे सांगितली आहेत - तटस्थ लक्षण आणि स्वरूप लक्षण. जे लक्षण सापेक्ष किंवा आनुषंगिक असते अर्थात ते नसले तरी 'वस्तू' असते, त्यास तटस्थ लक्षण म्हणतात. मात्र जे 'वस्तू'चे स्वरूपभूत लक्षण आहे, ज्याविना वस्तू असू शकत नाही, त्यास स्वरूप लक्षण म्हणतात. जगाच्या अपेक्षेने त्याच्या उत्पत्ती-स्थिती-लयाचा कर्ता हे जे ब्रह्माचे लक्षण आहे ते तटस्थ. मात्र 'सत् चित् आनंद' हे ब्रह्माचे स्वरूपच असल्याने स्वरूप लक्षण होय. या प्रकरणात त्यांचे तात्त्विक स्वरूप काय आहे याचे ज्ञानेश्वर विवेचन करतात. शेवटी लक्षण म्हणजे तरी वर्णनच; आणि वर्णन म्हणजे शब्द आलेच. ब्रह्म (आत्मा) त्या अतित आहे. मग या पदत्रयाचे प्रयोजन काय असा प्रश्न पडतो; पहिली गोष्ट म्हणजे ही पदे जरी तीन असली तरी सद्‌वस्तू एकच आहे. 'सत्ता' म्हणजे अस्तित्व, 'प्रकाश' म्हणजे 'ज्ञान', आणि 'सुख' म्हणजे निरपेक्ष आनंद हे एकत्रितपणे एकाच परमात्म्याचे निर्वचन करतात. अमृत आणि त्याची गोडी, सूर्य-प्रकाश, कापूर-परिमळ हे भिन्न नाहीत. तीच स्थिती परमात्मा आणि त्याचे सच्चिदानंदत्व यांची हीच पदे का? तर त्यांच्या विरोधी प्रतियोगी पदांनी जी लक्षणे सूचित होतात ती नाकारण्यासाठी या पदांचा उपयोग केला आहे. 'सत्' पदाने आत्म्याचा अस्खलपणा नाकारला; 'चित्' पदाने 'अचितपणा' नाकारला आणि 'आनंद' पदाने दुःखरूपता नाकारली. महाराज त्यांना 'योगी', 'प्रतियोगी' असे न्यायपरिभाषेत म्हणतात आणि भाव स्पष्ट करतात - ''तो (परमात्मा) मूळचाच आहे सत्। तो मूळचाच आहे चित्। आणि सत् चित् हे शब्द सत्य। उदेले असत् जडाच्या नाशार्थ।।'' (४९) ''म्हणजे असतादिकां घालविले। आणि सत्तादिकही नाही उरले। ऐसे एकमेकांच्या नाशें झाले। नामशेष योगी प्रतियोगी।।'' (५४) तात्पर्य 'सच्चिदानंद' हा शब्द वाचकपणे मिरवू शकत नसला तरी परमात्म्याचे 'भान' करवून देतो. असे महाराज म्हणतात. ''या प्रकारे करून। सच्चिदानंद हा शब्द जाण। परमात्म्याचेच करवी भान। वाचकपणे न भिन्न तो।।'' (५५) मूळ ओवीत ज्ञानेश्वरांनी 'वाचक नव्हे' यावर जोर दिला आहे, तर महाराजांनी त्या जोडीला 'भान करून देतो' असे त्याचे महत्त्वही सूचित केले आहे. ज्ञानेश्वर ज्या अमृतानुभवाच्या भूमिकेवरून विवेचन करीत आहेत त्या पारमार्थिक पातळीवर लक्षण, शब्द, कोणतेही प्रमाण, वाचकत्व इत्यादींच्या कोणत्याही व्यवहाराला किंचितही स्थान नाही हे समजून घेणे आवश्यक आहे.

आत्मा हा अप्रमेय आहे हा सिद्धान्त स्पष्ट करताना महाराजांनी मूळ ओवी १६ वरील टीकेत वेदान्ताची जी प्रमाणमीमांसा केली आहे ती मुळातच पहावी. प्रकरणाचे तात्पर्य सांगताना ते म्हणतात - ''दुःखरूप जड असत। नव्हे परमात्मतत्त्व। हेंचि करण्यासिद्ध सत्य। सच्चिदानंद म्हणीतले।। सच्चिदानंद म्हणितले। परी तेंही नाहीं उरले। ते प्रतियोग्यास घेऊन गेले। आपणांसह।।'' (१४२, १४३)

**८)** सहाव्या प्रकरणाचे नाव 'शब्द खंडन' असे आहे. मागील प्रकरणात आत्मा हा कोणत्याही प्रमाणाने जाणता येत नाही असे प्रतिपादन केले आहेच. परंतु वेदान्त दर्शनात 'श्रुति' किंवा 'शब्द' प्रमाणाला सर्वोच्च स्थान आहे. म्हणून ज्ञानेश्वर या प्रकरणात त्याच्याही

मर्यादा दाखवून देतात. अज्ञानी लोकांना त्यांच्या विस्मृत आत्मस्वरूपाचे स्मरण करून देणारा 'शब्द' महावाक्ये अत्यंत महत्त्वाची आहेत. विधी-निषेधांच्या वाटाही तोच दाखवितो. खरे तर आपला सारा ज्ञानाज्ञान व तदाश्रित अन्य व्यवहार हा 'शब्दा'वर - भाषेवरच अवलंबित आहे. महाराजांच्या शब्दात - ''शब्द अविद्या नाशी। शब्द नित्यानित्य विवेकासी। करवीतसे अहर्निशी। ऐसा त्याचा मोठेपणा।।'' (१०२) आकाश हे सूक्ष्म महाभूत; त्याचे ज्ञान शब्दामुळेच होते कारण 'शब्द' हा आकाशाचा एकमेव गुण आहे. 'दवपुष्प' याचा 'मिथ्या' असाही अर्थ असल्याचे महाराज निदर्शनास आणून देतात. 'आतां येथे पाहू जातां। शब्द दवपुष्प म्हणजे मिथ्या। असून सिद्धी तत्त्वात। करवितो हा व्यवहाराची।।'' (१६) व्यावहारिक जगतही मिथ्या आहे असे येथे सूचित होते.

अशा व्यावहारिक दृष्ट्या महत्त्वाच्या 'शब्दा'लाही आत्मज्ञानाच्या बाबतीत स्थान नाही. ''गुणत्रयाच्या ठायीं। शब्दब्रह्माचा बडिजाव पाही। परी निर्गुणाचे ठायीं न काहीं। तोंड दावण्या जगा या।।'' (६७) आत्मा हा स्वसंवेद्य आहे, स्वयंप्रकाश आहे; खरे तर त्याच्याच प्रकाशाने सर्व प्रमाणे प्रकाशित होतात. त्यामुळे त्याचे प्रकाशन - (ज्ञान) कोण करणार? अर्थात - ''म्हणजे स्वसंवेद्य आत्म्यासीं। शब्द काहीच न उपयोगासी।। (७०) आत्मविस्मृति म्हणजे अविद्या. तीच मुळात खरी नाही - अविद्यमान! मग तिच्या नाशासाठी शब्दाची गरजच काय? ''अविद्या वांझेचे पोर। म्हणजे अभावरूप साचार। मग शब्दरूपें खुरपें होणार। नाश तेथें कवणाचा।।'' (१२२) येथे, अविद्या ही पण परमार्थात: खरी नसल्याचे ज्ञानेश्वर आणि महाराज स्पष्ट करतात. या संदर्भात मूळ ओवी ३१ वरील भाष्यात श्री दासगणु महाराजांनी अद्वैत वेदान्तामधील पारमार्थिक, व्यावहारिक आणि प्रातिभासिक या सत्तात्रयाचे जे विवेचन केले आहे ते मुळात पहावे. अविद्येचे अनिर्वचनीयत्व त्यांनी सुरेखपणे विवेचिले आहे. - ''भ्रमरूप रात्री माझारीं। तमरूप अविद्या भासे खरी। परी त्याही स्थितिभीतरीं। ती शब्ददीपाच्या न दृष्टी पडे।।'' (२७३) तात्पर्य, अविद्येचा नाश व आत्मप्रकाश या दोन्ही गोष्टी शब्द करू शकत नाही कारण तो स्वत:च अविद्येच्या जातीचा आहे. म्हणून ''तात्त्विक विचारें पाहतां। आत्मस्वरूपाठायीं तत्त्वता। शब्दसंबंध सर्वथा। मुळींच नाही।।'' (३५७) शब्द नाही तर त्यावर आधारित ज्ञानाज्ञानाचा व्यवहार नाही आणि हा व्यवहार हेच जगताचे स्वरूप असल्याने जगतही 'मिथ्या' होय; सत्य म्हणजे ''तो आत्माच अवघा केवळ।।'' (३७२)

९) सातवे 'अज्ञान खंडन' हे प्रकरण सर्वांत मोठे २९५ ओव्यांचे (मूळ) असून ज्ञानेश्वरांची तात्त्विक भूमिका पारमार्थिक भूमिकेवरून स्पष्टपणे मांडणारे आहे. एक आत्मा ही सद्‌वस्तूच समस्त चराचर विश्वात भरून राहिलेली आहे. आणि ती चिन्मय असल्याने ज्ञानाशिवाय दुसरी वस्तूच नाही. ''जग असकी वस्तुप्रभा' हा ज्ञानेश्वरांचा केंद्रवर्ती सिद्धांत किंवा त्यांची अपरोक्ष अनुभूती. त्यामुळे 'अज्ञाना'चा अत्यंताभावच आहे. आहे तो सर्व ज्ञानाचाच प्रकाश किंवा विलास. ज्ञानेश्वर त्यास 'अद्वैत फांक - विस्तार' असेही म्हणतात. जसा शून्यवाद स्वत: खंडित आहे तसाच अज्ञानवादही स्वत: खंडित आहे कारण 'अज्ञान आहे' हेही ज्ञानच आहे. याचा अर्थ 'अज्ञान खंडन' म्हणजे एक प्रकारचे 'शून्य वाद खंडन'च म्हणता येईल. या सर्व पार्श्वभूमीवर हे प्रकरण समजून घेणे इष्ट ठरेल. मुळात ज्ञान-अज्ञान या परस्पर सापेक्ष कल्पना आहेत. त्यामुळे अज्ञान गेले की ज्ञानही राहत नाही. म्हणूनच पुढील आठव्या प्रकरणात ज्ञानाचेही खंडन ज्ञानेश्वर करतात. आत्मा ज्ञानस्वरूप आहे. ते निरपेक्षपणे. महाराज सांगतात - ''पाहतां ज्ञान अज्ञान। हे सापेक्ष एकमेका लागून।।'' (२३) ''म्हणून ते लटिकेचि दोघेजण। ज्ञान आणि अज्ञान। जेथें सापेक्षत्व जाण। तेथें लटपट केव्हांही।।'' (२६) ज्ञानस्वरूप आत्म्यात अज्ञान कसे राहील? - ''पहा अज्ञान गाढ अंध:कार। आत्मा प्रकाशाचें भांडार। मग या दोहोंचा होणार। समुच्चय कैसा।। (७५) आत्म्यात नाही तरी आत्मा वेगळे अज्ञान असू शकेल असा पूर्वपक्ष करून ज्ञानेश्वर त्याचे खंडन करतात असे महाराज सांगतात. 'पूर्वपक्ष' हा पारिभाषिक शब्द ते वापरतात हे महत्त्वाचे. अर्थात अज्ञान हे ज्ञानाश्रयी असल्याने स्वतंत्र राहू शकत नाही हे त्याचे खंडन आहे. थोडक्यात, 'अज्ञान' कोणत्याच प्रमाणाने सिद्ध होऊ शकत नाही. कारण 'प्रमाण' म्हणजेच ज्ञानाचे साधन. शिवाय - ''ज्याला अस्तित्वचि नाहीं। त्याची सिद्धी कोठुन होई।।'' (२१०)

''अगा ऐशिया ज्ञानातें...।।'' (९५) या ओवीवरील श्री दासगणु महाराजांचे भाष्य त्यांच्या शांकर वेदान्ताच्या गाढ ज्ञानाची साक्ष देणारे आहे. ते वाचकांनी मुद्दाम वाचावे. महाराजांची प्रतिभाही त्यात प्रगट झाली आहे. ते सांगतात - ''वेदान्त शास्त्रा माझारीं। अजातवाद मुख्य निर्धारी। पहा पहा बुध हो दोरी। सर्पत्वा न पावे कदा।।'' ... ''असो मंद मुमुक्षूसाठी। आभासवादाच्या खटपटी। सांगते झाले ज्ञानजेठी। ब्रह्मवेत्ते।।'' ... ''शिंपी ठायीं न रजत। तेवीं चैतन्या ठायीं न जगत। म्हणून ब्रह्म सत्य जगन्मिथ्य। ऐसे श्रुतीने प्रतिपादिले।।'' (२७०, २७५, २७७) इत्यादी ओव्या किती महत्त्वाच्या आहेत हे सूज्ञ वाचकास सांगणे नलगे. जगत हे दृश्य रूपात भासते; परंतु तो आत्मज्ञानाचाच विस्तार असल्याने जगत आत्मप्रभारूपच आहे. अर्थात आत्माच केवळ सत्य आहे; 'दृश्य' हे 'वावो' म्हणजे मिथ्या आहे. महाराज सांगतात - ''आत्मा दिसे दृश्य होऊन। वा असो द्रष्टा पूर्ण। परी तेथें आत्मावाचून। अस्तित्व ना दुसऱ्यांचे।।'' (७०२) परमार्थात आत्मा स्फूर्तिमात्र असल्याने 'द्रष्टा-दृश्य' या सापेक्ष कल्पना मिथ्या आहेत. ज्ञानेश्वरांचा स्फूर्तीवादाचा सिद्धान्त आहे - ''इथै स्फूर्ती कडोनि। नाही स्फूर्तीमात्र वांचूनि।।'' (अमृ. २४५) म्हणून - ''आत्म्याचिया लीलेस। नाही उपमा द्यावयास।।'' (७६४) तात्पर्य - ''ज्ञानरूप आत्म्याचे जे स्फूरण। तेच जगावे जगपण।।'' (८१०) किंवा - ''त्या चिन्मात्र वस्तू प्रकाशें। हे सर्व जग भासें। जग हाच प्रकाश असे। चिन्मात्र वस्तूचा।।'' (८२३)

आठव्या 'ज्ञान खंडन' प्रकरणात प्रारंभी आपल्या ज्ञानाज्ञानातीत अशा दृङ्मात्र स्वरूप स्थितीची अनिर्वचनीयता सांगून नंतर अज्ञानसापेक्ष ज्ञानाचेही खंडन केले आहे. 'आम्ही' पदाचे स्पष्टीकरण महाराज देतात - ''दृङ्मात्र जें द्रष्टेपण। तेंच आमुचें आम्हीपण।।'' (६) ''तो ठाय अनिर्वचनीय।।'' (२५) ज्ञानाविषयी सांगायचे तर ''या दृङ्मात्र

वस्तूठायी। अज्ञान तें मुळींच नाहीं। तत् सापेक्षित ज्ञानही। नाहीं तेथें।।" (३६) तात्पर्य - "येवी ज्ञानाज्ञानरूप दिवाराती। पोटीं घालूनि निश्चिती।। चिदाकाशीं हा गभस्ती। आत्मराजा उगवला।।" (५४)

**१०)** सर्व विश्वात एक आत्मतत्त्वच भरून राहिले आहे. असा ज्याला साक्षात्कार झाला तो जीवनमुक्त. नवव्या प्रकरणात 'जीवन्मुक्तदशा कथन' करणे ओघानेच येते. "आतां ज्ञानाज्ञान जाऊन। एक परमात्मा उरला जाण। तो प्रकाशलासे पूर्ण। जगद्रूप प्रकाशें।।" (३) पंच ज्ञानेंद्रिये, त्यांचे विषय न ज्ञाने, द्रष्टा-दृश्य-दर्शनादी सर्व त्रिपुट्या इत्यादी रूपात आत्माच विलसत आहे अशी अपरोक्ष अनुभूती ही निखळ आनंदाची 'अमृता'ची अनुभूती होय. या दशेत एक आनंदाशिवाय दुसरे काहीच असत नाही. हीच अखंड अद्वैतानुभूती! "दृष्टी, दृश्यजात दिसणें पण। हें मुळींच दृङ्मात्र वस्तू पूर्ण। तेथें एकावाचून। काहींच नाही।।" (८७) जगताची भासमान विविधता ही केवळ नाम रूपात्मक आहे, सत्तावान नाही. माणूस सुखासाठी आयुष्यभर धडपड करीत असतो. परंतु त्याचा शोध तो विषयात घेत असल्याने कायम दु:खीच राहतो. कारण द्वैतदशेमुळे अद्वैतानंदाची त्यास कल्पनाच नसते. मात्र, आत्मज्ञानी माणसाला 'भेद तंव तंव दुण। अभेदासीं।।" अशी अनुभूती येते - "एवं लाधलिया स्वानुभव खूण। अवघे काही द्वैत भान। विलयातें जाऊन। अद्वैत उरें।।" (१४०) अशा अवस्थेत वावरणाऱ्या जीवन्मुक्ताचे विषयसेवनही आत्मानंदसागरा-वरील तरंगांप्रमाणे असते. कारण "तो दिसतया विषयालागून। भिन्न न मानी।।" (१४१) "म्हणून ज्ञात्याचें विषयसेवन। कैवल्यावरी करी तान। त्याच्या पुढे मोक्ष गौण। कांकी तो सापेक्ष बंधाचा।।" (१५०)

यापुढे ज्ञानेश्वरांनी आपल्या अद्वैतानुभूतीस्वरूप पराज्ञानभक्तीचे स्वरूप प्रकाशिले आहे. ते मुळांत पहावे. भक्त आणि देव (भडद) भक्तिठायी एकरूप होतात. पूज्य, पूजक, पूजा, पूजासाहित्य सारे काही देवच! देव, देऊळ, परिवारही देवच! अशा रीतीने साऱ्या विश्वास देवाचीच दाटी झाल्याने कोणी कोणाची पूजा कशी करायची? "ऐशा ऐक्यभाव स्थितीत। देवचि झाला भक्त। प्राप्त स्थानाचि जाहलें पंथ। विश्व एकांत झाला असे।।" (१७०) 'शिवोभूत्वा शिवं यजेत्।' या स्वरूपाची ही भक्ती आहे - "तेवीं आत्मा निजभक्ती। आचारी आपुली आपण निश्चिती।।" (२१२) ही सहज-अकृत्रिम- आत्मभक्ती होतच असते; "कांकी जे दिसलें समोर। तें आपणाचि आहों साचार। देवभक्त प्रकार। उरलाच नसे।।" (२५२) अधिक स्पष्टीकरण असे ६ "म्हणजे ज्ञान कर्माविण। आत्मविदाच्या क्रिया जाण। तया आत्मस्फूर्ती करून। सर्व होती।।" (२५९) ज्ञानेश्वर हिला 'अकृत्रिम भक्ती' म्हणतात. महाराज 'आत्मभक्ती' म्हणतात. येथवर ज्ञानेश्वरांनी कशाची चर्चा केली तर - "ते आत्मरूप प्रत्या आलें। मग अस्ति भाति नाहीं उरलें। नामरूपाचेही मोडिले। ठाव तेथें शब्दासह।। एवच आत्माच अवघा संचला। कर्माकर्म नाहीं त्याला। याचाच ऊहापोह केला। ज्ञानेश्वरें येथेवरी।।" (२८६) या आनंदभूतिकेवर शिष्याला केवळ सद्गुरूच आरूढ करू शकतात. श्री दासगणु महाराज सांगतात की या भूमिकेवर वावरतानाही कर्म आणि उपासना यांना अकृत्रिम स्वरूपात स्थान असते "म्हणजे कर्म, भक्ती आणि ज्ञान। ही आत्म्याचीच प्रभा पूर्ण। म्हणून तो त्या लागून। सोडीत नसे।।... एवंच आत्माविदाठायीं। निखळ ज्ञानोत्तर काळींही। कर्म उपासनेचें राही। संकल्परहित अस्तित्व।।" (३३७, ३३९)

**११)** शेवटचे दशम प्रकरण म्हणजे 'ग्रंथपरिहार' - ग्रंथाच्या स्वरूपाचे स्पष्टीकरण. हा ग्रंथ म्हणजे केवळ सद्गुरूकृपेचे मूळ आहे. आत्मानंद ही सिद्ध वस्तू आहे. खरे तर तिची अखंड अनुभूती घेत राहणे हेच योग्य! परंतु ती 'पढियंती' म्हणजे अत्यंत आवडीची-प्रेमाची-असल्याने तिचा 'अनुवाद' करून पुन:पुन: आनंद प्राप्त करावा असे वाटणे साहजिकच होय. म्हणून "नुस्त्या दृङ्मात्र वस्तूचा। अनुवाद केला असे।।" (४९) बरे, ज्या 'अमृता'च्या - 'आत्म्याच्या' - अनुभवाची अभिव्यक्ती या ग्रंथात शब्दरूपात केली आहे, तो आत्मा तर सर्वदा सर्वत्र प्रगटच आहे आणि शब्दाने तो प्रगट करताही येत नाही - 'कांकी वाणीचिया योगें पाही। त्या दृङ्मात्र वस्तूठायीं। काहीच कमीजास्त होणें नाहीं। विबुध हो।" (६३) "म्हणून माझी वाणी खरी। मौनाचेही मौन वरी।।" (६२) मौनाचे खरे स्वरूप असे की - "मीच अवघ्या विश्वालागून। राहिलो आहे व्यापून। तेथें माझ्या वाचून। काहींच नाहीं।। ऐसें अहंतेच्या गुणें। जेव्हा वाटले मजकारणें। तेंव्हा मौनच झालें बोलणें। यथार्थपणे।।" (५४, ५५) या आत्मबोधाठायी दशोपनिषदांचे बोलणेही खुंटले म्हणून ती केवळ बोधरूपानेच राहिली. "म्हणजे ती आत्मखूण, हेंच बोधाचें अवसान। ती पाहतां न्याहाळून। स्वरूपता लाभे।। मुळींच आत्म्यायोगे भली। उपनिषदा शोभा आली। म्हणून बोधासी न उरली आन जागा।।" (६९, ७०). त्याच औपनिषदिक आत्मबोधाने या 'अमृतानुभवात' बुडी दिली आहे. त्याचे सेवन करून मानवमात्राने जीवन्मुक्ती प्राप्त करावी हाच माऊलीचा ग्रंथ सिद्ध करण्यामागील संतसुलभ उदात्त हेतू आहे. महाराज सांगतात - "म्हणजे मुक्तिचेच मुक्तिपण। अनुभवामृतीं जाय विरून। कांकी त्या मुक्तीचेंही जीवन। अनुभवामृत हें।।" (६३) साहजिकच - "ज्ञानदेव म्हणें म्हणून। अनुभवामृत हा केवळ सण। या सणाचें सेवन। करणें अवघ्या विश्वानें। (१०७) सण म्हणजे आनंदाचा दिवस. खरं तर आनंदोत्सव! साऱ्या विश्वात तो चालूच आहे. त्याची प्रत्यक्ष अनुभूती सर्वांना यावी हे संतहृदयीचे आर्त!!

**१२)** संतकवी श्री दासगणु महाराजांनी लिहिलेल्या अमृतानुभवभाष्याचे स्वरूप जाणून घेण्याचा आपण येथवर प्रयत्न केला. ग्रंथाचे नाव 'अमृतानुभव भावार्थ मंजिरी' असे जरी असले तरी स्वत: महाराज प्रत्येक प्रकरणातील भाष्याचा उल्लेख 'स्वस्ती श्री अमृतानुभव मंजिरी' असा करतात. या मंजिरीचा आस्वाद घेताना मी प्रस्तुत लेखात केवळ श्री दासगणु महाराजांच्या भाष्यामधील ओव्याच उद्धृत केल्या आहेत. त्यावरून महाराज ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवाशी किती तादात्म्य पावले होते याची कल्पना येते. त्यामुळे महाराजांचे भाष्य केवळ सुबोध नव्हे, तर ज्ञानेश्वरांचे मनोगत, त्यांचा भावार्थ, अकृत्रिमपणे विशद

करणारे एक समर्थ भाष्य झाले आहे. मुळात विषय अवघड, अद्वैत तत्त्वज्ञानाचा! त्यातून तो विश्वात्मक आत्म्याची अपरोक्षानुभूती अभिव्यक्त करणारा! काही प्रमाणात तरी हा अनुभव स्वत: चाखल्याशिवाय त्यावर भाष्य लिहिणे अशक्यच म्हणावे लागेल. महाराज संतचरित्रांचे संकीर्तन करता करता सद्गुरूकृपेने संतमय नव्हे संतच झाले होते. त्यामुळे त्यांचे भाष्य मर्मग्राही व भावस्पर्शी न झाले तरच नवल! 'अमृतानुभव' म्हणजे तोय आणि आपले त्यावरील लेखन म्हणजे केवळ लहरी असे ते मानतात – ''आता हे ज्ञानेश्वरांचे भाषण। हेंच केवळ तोय जाण। त्यावरी माझें लेखन। केवळ आहे लहरीसम।।'' (१०.११६). या लहरींमुळे तोयाचे वैभव प्रकट झाले आहे हे निश्चित! अमृतानुभवाचे माहात्म्य त्यानी एके ठिकाणी वर्णिले आहे. ते सांगतात – ''श्री ज्ञानेश्वर विरचित। हा अमृतानुभव ग्रंथ। ब्रह्मचि आहे साक्षात। साधकातें।। ह्या ग्रंथाच्या अवघ्या खुणा। साधकाने आणिल्या मना। बंधमोक्षाची कल्पना। जाऊनि तोच ब्रह्म होई।।'' (५.२९८, २९९) आरतीमधील ''प्रगट गुह्यबोले। विश्व ब्रह्मचि केलें।।'' या वचनाची येथे साक्ष पटते. ग्रंथाच्या अखेरीस अमृतानुभवाचे सेवन करणे म्हणजे काय ते महाराज साररूपाने सांगतात. ते सर्वांनी अवश्य जाणून घ्यावे. ते सांगतात, ''असो अमृतानुभवाचे सेवन। म्हणजे कळणें आत्मखुण। सुखदु:ख ज्ञानाज्ञान। तेथें नाहीं।। विधी अविधी नाही। कर्माकर्म नाहीं। भ्रमभ्रांती तीही। नाहीं ठायीं खुणेच्या।। त्या आत्मखुणेचा बोध होणें। हेंच कैवल्याला जाणें। तें अनुभवामृताच्या सेवनें। होणार आहे।।'' (१०-११८, ११९, १२०)

श्री दासगणु महाराज हे केवळ संतकवी नाहीत तर एक समर्थ भाष्यकारही आहेत. हे 'भावार्थ मंजिरी' या अभ्यासपूर्ण व मर्मग्राही अंतरंग भाष्यावरून दिसून येते. हे भाष्य आपणांस शिवकल्याणाच्या 'नित्यानंदैक्यदीपिके'ची आठवण करून देणारे आहे. ज्ञानेश्वर हे पूर्णपणे अद्वैती तत्त्वज्ञानाधिष्ठित ज्ञानभक्तीचे स्वानुभवाधारे प्रतिपादन करतात हे या भाष्यावरून स्पष्ट होते. या व्यतिरिक्त त्यांनी अन्यही चार ग्रंथांवर (पासष्टी, नारद-भक्तिसूत्र, शांडिल्य भक्तिसूत्र व भक्तिरसायन) उत्कृष्ट भाष्यरचना केली आहे. म्हणून मी त्यांना केवळ 'संतकवी' न म्हणता 'भाष्यकार संतकवी' असे संबोधून ही माझी अल्प वाङ्मयीन सेवा त्यांचे चरणी विनम्रपणे अर्पण करतो. संतांच्या ऋणातून मुक्त होता येत नाही. म्हणून ज्ञानेश्वरांच्याच शब्दात मी म्हणेन की –

**''तें ऋणशेष वाचा इया। न फेडवेंचि मरोनिया।**
**तें पाया पडोन तियां। सोडविलें।।''** (३.३२)

इति शम्।

**– प्रा. डॉ. शंकर रामचंद्र तळघट्टी**
'चैतन्य', प्लॉट नं. २, गणंजय हौसिंग सोसायटी,
युनिट १, आझादनगर, कोथरूड, पुणे ४११०३८.
फोन : (०२०) २५३८०००२



# संतकवि श्री दासगणु महाराज विरचित श्री शंकराचार्य चरित्र

**डॉ. सौ. अंशुमती अ. दुनाखे**

एम.ए. (हिंदी, इंग्रजी), साहित्यरत्न (हिंदी) साहित्य विशारद (मराठी) संस्कृत टि.म.वि.च्या तीन परिक्षा, पी.एच.डी. (हिंदी), भारत सरकार गृहमंत्रालय हिंदी शिक्षण योजना येथून उपनिदर्शक म्हणून निवृत्त. काव्य संग्रहाचे लेखन. चित्रा नाईक यांच्या यूनो मधील शोध पत्राचे अनुवाद. शिक्षण विषयक कार्याबद्दल दोन पुरस्कार.

मी श्री गजाननमहाराजांची अनुग्रहित आहे. त्यांच्या 'गजानन विजय' ग्रंथाचे पारायण मी करीत असते. त्यामुळे श्री दासगणुमहाराजांचे नाव परिचित होते. त्यांनी 'भक्तिलीलामृत, संतकथामृत व भक्तिसारामृत अशा तीन ग्रंथांतून संतांची चरित्रे गायिली आहेत. हे ठाऊक होते, पण त्यांनी श्री शंकराचार्यांचे चरित्र लिहिल्याचे ऐकिवात नव्हते. 'गजानन विजय' पोथीत वरील तीनही ग्रंथांचा उल्लेख आहे पण श्री शंकराचार्यांच्या चरित्राचा उल्लेख नाही. मग कळले की, ते स्वाभाविकच होते. कारण हा ग्रंथ त्यानंतर लिहिला गेलेला आहे. या सर्व संतचरित्रांच्या लेखनामुळे त्यांना आधुनिक महिपती म्हटले जाते.

श्री दासगणुमहाराज केवळ संतचरित्रेच गातात असे नाही. त्यांनी चांगदेव पासष्टी, अनुभवामृत या ज्ञानेश्वर माऊलींच्या ग्रंथांवर, शांडिल्यसूत्रांवर, भक्तिसूत्रांवर आणि आध्यात्मिक ग्रंथांवरही प्रासादिक व ग्रंथ उलगडून दाखविणारे लेखन केले आहे. त्यामुळे श्री शंकराचार्यांचे चरित्र लिहिण्यास अगदी योग्य व्यक्ती लाभलेली दिसून येते.

**जे श्री शंकराचार्य जगद्गुरू। पदनतांचे कल्पतरू**
**अध्यात्मविद्येचे मेरू। वेदरहस्य प्रतिपादिते।।१-४९।।**
**ज्यांनी चार्वाक मतखंडन। परम चातुर्येकरून**
**प्रस्थानत्रयींचे महत्त्वपूर्ण। निवेदिले जगताला।।१-५०।।**
**जो भगवान शंकराचा। अवतार होय प्रत्यक्ष साचा**
**त्या ज्ञाननभींच्या दिनकराचा। प्रभाव वानू कोठवर?।।१-५१।।**

श्रीमत् आद्य शंकराचार्य हे प्रत्यक्ष शिवाचे अवतार होते व त्या काळी भारतात माजलेल्या मतमतांचा गलबला शांत करून अद्वैताची स्थापना करण्यासाठी त्यांचा जन्म होता. श्री व्यासांनी त्यांना या कार्याची स्पष्ट जाणीव प्रत्यक्ष दर्शन देऊन करून दिली होती व त्या कार्यासाठी आयुष्यही वाढवून दिले होते. अशा शंकराचार्यांचे चरित्र श्री दासगणुमहाराजांनी परिपक्व वयामध्ये - जवळजवळ सत्तरी-पंच्याहत्तरीला लिहिलेले आहे. ज्ञाननभीच्या दिनकराचे चरित्र व सिद्ध, रसाळ, ज्ञानगर्भ लेखणी-हा योग जमल्यामुळे ह्या ग्रंथाचे एक वेगळेच मोल आहे. श्री दासगणुमहाराज हे स्वत: शिवभक्त व विठ्ठलभक्त होते. ऐक्याची प्रचिती घेतलेले होते. ह्या ग्रंथाचे लेखन करताना त्यांच्या लेखणीला विशेष बहर आलेला दिसून येतो. अशा ग्रंथाला वास्तविक खूपच लोकप्रियता मिळायला हवी होती. पण प्रत्येक ग्रंथ आपले नशीब घेऊन येतो हे खरेच. त्यांचा 'गजानन विजय' आज केवळ महाराष्ट्रातच घरोघरी पोचला आहे असे नाही. तर त्याचे अनुवाद गुजराथी, तेलगू, कानडी, हिंदी, इंग्रजी आदि भाषांमधून होऊन जवळजवळ भारतभर हा ग्रंथ पोचला आहे. तसे भाग्य श्री शंकराचार्यांच्या पोथीला लाभल्याचे ऐकिवात नाही. तशी माझ्या हातात आहे ती तिसरी आवृत्ती आहे. पण श्री शंकराचार्यांचे महान कार्य पाहता ही पोथी भारतभर पोचायला हवी होती. श्री दासगणुमहाराजांच्या शिष्यांत या गोष्टीबद्दल खंत आहे.

वास्तविक पाहता 'त्यांच्या सर्व संतचरित्रात्मक ओवीबद्ध वाङ्मयात श्री शंकराचार्य चरित्र हा ग्रंथ आपल्या सर्व गुण-वैशिष्ट्यांनी अग्रभागी शोभतो असे यथार्थतेने म्हणता येते.' असा निर्वाळा श्री वरदानंद भारतींनी दिलेला आहे.

'जगद्गुरू श्रीमद् शंकराचार्य हे आत्मद्भुत अवतारी असे व्यक्तिमत्त्व होते. ते आचार्य आहेत, तत्त्ववेत्ते आहेत आणि सत्पुरुष ही आहेत. असा त्रिवेणी संगम क्वचितच आढळतो असे म्हणता येते. आचार्य म्हणजे आपल्याजवळील ज्ञान दुसऱ्याला देणारा, तत्त्ववेत्ता म्हणजे सत्यसिद्धांत तपस्येच्या बळावर शोधून काढून प्रस्थापित करणारा आणि संत म्हणजे सदाचार सद्वासना यांचा आदर्श आपल्या जीवनात प्रकट करीत ईशभक्तीचा मार्ग समाजाला दाखविणारा नि त्यासाठी मातेच्या वात्सल्याने लोकसंग्रह करणारा (श्री वरदानंद) व्यक्तिमत्वाचे हे पैलू श्री दासगणुमहाराजांनी मोठ्या समर्थपणे उलगडून दाखवले आहेत.

**श्रीमद् शंकराचार्य जगद्गुरू। जे भाविकभक्तांचे कल्पतरू**
**जे अगाध ज्ञानाचे सागरू। योगयोगांग जाणते।।**

यांचे चरित्र गाण्याची श्री दासगणुमहाराजांना तळमळ लागून राहिली होती. श्रीमत् शंकराचार्यांनी जैन, बौद्ध वगैरे वगैरे मतांहून अद्वैत कसे श्रेष्ठ आहे व तेच तेवढे खरे कसे आहे हे सर्वांना पटवून दिले. वैदिक धर्म त्याकाळी लोप पावला होता. त्याला पुनरुज्जीवित केले. आज त्याच

गोष्टीची गरज आहे. आज धर्म म्हणजे काय, जीविताचे ध्येय काय असावे? सदाचारण म्हणजे काय? हे सर्व आम्ही विसरून गेलो आहोत. अशा वेळी सत्यासाठी आयुष्य कसे वेचावे? धर्मासाठी, राष्ट्रहितासाठील कसे झटावे? हे सांगणारे श्रीमत् शंकराचार्यांचे चरित्र प्रत्येक व्यक्तीने वाचले पाहिजे. त्याचे मनन केले पाहिजे. त्याप्रमाणे आपले वर्तन सुधारले पाहिजे.

कुठल्याही संताचे चरित्र लिहिताना श्री दासगणुमहाराजांची मोठी चिकित्सक दृष्टी असते. ते त्या त्या गावी जातील. डोळ्यांनी सर्व परिसर बघतील. कागदपत्रे बारकाईने तपासतील. त्या काळच्या लोकांच्या मुलाखती घेतील. तसेच कष्ट याही चरित्रासाठी त्यांनी घेतलेले दिसतात. पी.एच.डी. च्या थिसिसमध्ये जसे प्रथम पूर्वी होऊन गेलेल्या लोकांचे या विषयातील योगदान आधी सांगून मग आपला विषय मांडतात त्याप्रमाणे श्री दासगणुमहाराजांनी संस्कृतात व प्राकृतात लिहिलेल्या चरित्रांचा अभ्यास केलेला दिसतो. त्यांच्या नावांचे उल्लेख प्रारंभीच केले आहेत. शिवाय संस्कृत स्तोत्राबद्दल लिहिताना वारंवार श्री. केशवराव देशमुख वा भगवानशास्त्री धारूरकर यांच्याशी चर्चा करीत ग्रंथ सर्व बाजूंनी दोषरहित व्हावा, सत्याला धरून रहावा याची सर्वतोपरी त्यांनी काळजी घेतली आहे.

ग्रंथाच्या फलश्रुतीच्या वेळी महाराज सांगतात –

**या आचार्य अवतारी। प्रत्यक्ष भगवान मन्मथारि**
**अवतरले भूमीवरी। केरलदेशाकारणे।।३९–२४१।।**
**तेवीच हा आचार्यांचा। पूर्ण अवतार शिवाचा**
**नंबुद्रीच्या कुळीसाचा। झाला असे कालडीत।।३९–२४३।।**

प्रापंचिकांसाठी सुख मिळेल. भूतबाधा होणार नाही
पुत्रप्राप्ती होईल. अल्पायु शतायुषी होतील, कीर्ती मिळेल
शेवटी कैलासाला जाल वगैरे फळे सांगितली आहेत.

पण खरा उद्देश्य –

**नुसते चरित्र न वाचावे। ते आचरून पहावे।**
**तरीच ते फलापावे। एरव्ही नाही।।३९–२५४।।**

इच्छा हीच

**श्री दासगणु विरचित। श्री शंकराचार्य चरित्रामृत**
**होवो सोपान भाविकांप्रत। कैवल्य पेठेस जावया।।**

अध्यायाच्या अंतिम पंक्ती

ऐहिकांसाठी २१, २२, २४, २९ वगैरे अध्यायांच्या शेवटी प्रापंचिक फायद्यांसाठी हा अध्याय वाचावा. शिवाय हा वर प्रत्यक्ष श्रीमद् शंकराचार्यांनी दिला आहे. असा निर्वाळा ही ते देतात.

श्री वरदानंदभारती सांगतात, ग्रंथाच्या फलश्रुतीत उल्लेखिलेल्या गोष्टी ''हे केवळ आकर्षण निर्माण होण्यासाठी सांगितलेले प्रबोधन नाही तर हे एक प्रकारचे मंत्ररूप औषध आहे. ते त्या त्या व्याधींचा परिहार निश्चयाने करते. पठण करणाऱ्याचे अंत:करण प्रामाणिक श्रद्धेने मुक्त असावे. भाव उत्कट नि स्थिर असावा, सातत्य त्याने सोडू नये, म्हणजे यात वर्णिलेले लाभ नि:संशयपणे पदरी पडतील.''

ग्रंथकर्त्याची प्रचंड सात्त्विक भावना व चरित्रनामकाचा मंगल प्रभाव या ग्रंथाला मंत्रशक्ती देतो.

या ग्रंथांत एकूण ३९ अध्याय आहेत. ग्रंथाच्या ५८३७ व उपोद्घाताच्या ७३ मिळून ६९१० म्हणजे जवळजवळ ७००० ओव्या आहेत.

पहिल्या अध्यायांत त्यांच्या नेहमीच्या पद्धतीने आधी सर्वाद्या, अभेद्या, सर्ववंद्या, स्वयंवेद्या पूर्ण ग्रहजाला वंदन केले आहे. मग रीतीप्रमणे गणेश, शारदा, अन्य देवीदेवता, स्वत:चे गुरू वामनशास्त्री, शिर्डीचे साईबाबा, सकल संत यांना नमन करून श्रीशंकराचार्यांचे चरित्र लिहिण्यासाठी शक्ती व प्रसाद मागितला आहे. शुद्ध तत्त्वज्ञान व मधुर भक्ती दोन्हीचा संगम श्रीमत् शंकराचार्यांच्यात दिसून येतो. तसाच भाव या पहिल्या अध्यायाचा आहे.

याच भावनेने दुसऱ्या अध्यायाची सुरुवात होते

**मी सर्वतोपरी हीन दीन आचार्यचरित जे का गहन**
**त्याचे कराया लेखन। इच्छा चित्ती उदेली।।२–३।।**
**ती अवघी पूर्ण व्हाया। तुझी कृपा पाहिजे सदया।**
**हे भक्तवत्सला पंढरीराया। चरित्र–लेखना साह्यकरी।।२–४।।**

वेद खोटे ठरवायला अभक्त सरसावले होते. ज्ञान व उपासना यांना उणेपणा आला होता. लोक ऐहिक सुखाला हपापलेले होते. लोकांचा कल कर्मकांडाकडे झाला. पण त्यावरील श्रद्धाही कमी कमी होत चालली. याची परिणती अवंती देशातील चार्वाकाला जन्मात झाली. यावत् जीवेत् सुखं जीवेत्। ऋणं कृत्वा घृतं पिवेत।

भक्तीभूतस्य देहस्य। पुनरागमनाय कुत:?

मूल्यांना महत्त्व नाही. मजा करावी हे त्यांचे ध्येय

सांख्यांनी प्रकृतीला महत्त्व दिले. शाक्तपंथाने अनाचार वाढविला. भूतखेत भैरव आदींना महत्त्व प्राप्त झाले.

द्वैती होते. काश्यपाने भक्तिसूत्रे लिहिले. बौद्ध धर्म उदित झाला व बघता बघता भारतभर पसरला. भारताबाहेरही गेला. त्यांनी वैदिक मत नष्ट करण्यात यश मिळविले होते.

तिसऱ्या अध्यायात महावीरांचा जन्म व जैन धर्माचा उदय सांगितला आहे. बौद्धांप्रमाणेच जैन ही वेद प्रामाण्य पाळीत नाहीत. त्याही धर्माचा चांगला प्रसार झाला.

या दोन्ही अध्यायांचे वैशिष्ट्य म्हणजे महाराजांनी चार्वाक, काश्यप वा सिद्धार्थ वा महावीर सर्वांची यथासांग माहिती दिली आहे. त्यांचे आईवडिल, जन्मदेश, जन्मगाव वगैरेंचा उल्लेख इतिहासांतून क्वचित आढळतो. अन्यत्र हे उल्लेख सापडत नाहीत. पण महाराजांनी ते कटाक्षाने दिले आहेत. दोन्ही मतांची तत्वे अत्यंत सोप्या शब्दात प्रामाणिकपणे दिली आहेत. श्रीमत् शंकराचार्य आपल्या प्रतिमधर्माचे मत त्याच्याहूनही अधिक स्पष्टपणे व प्रभावीपणे मांडत. त्यांच्या चरित्रकारांतही श्री दासगणुमहाराजांमध्ये हे गुण दिसतात फक्त त्यांनी त्यातील उणिवाही

लगेच सांगून टाकल्या आहेत.

भारतातील ही भयंकर परिस्थिती पाहून नारदाला वाईट वाटले व त्याने ब्रह्मदेवाकडे धाव घेतली. ब्रह्मदेव सर्व देवांना घेऊन कैलासी गेले. शिवांनी कार्तिकस्वामीला कुमारिल भट्ट म्हणून जन्म घेऊन वेदांची परंपरा रक्षिण्याची आज्ञा केली. इंद्राला सुधन्वा राजा बनून कुमारिल भट्टाला सहाय्य करण्यास सांगितले. ब्रह्मदेवाला कुमारिल भट्टाचा शिष्य मंडणमिश्र होण्यास सांगितले व सरस्वतीला मंडणमिश्राची पत्नी होऊन जन्म घेण्यास सांगितले.

त्याप्रमाणे ५, ६ व ७ व्या अध्यायात कुमारिल भट्टाचे अध्ययन मग मेदिनीपुरी जाणे सुधन्वाच्या दरबारी जैन व बौद्ध पंडितांना हरवणे, कड्यावरून उडी मारून वेद प्रामाण्य सिद्ध करणे, दरबारी घागरींतील सापास विष्णू बनवणे वगैरे चमत्कारांचे वर्णन आहे. मग मण्डनमिश्र व शारदेचा अवतार सरस्वती यांचे लग्न सांगितलेले आहे.

आठव्या अध्यायात श्री शंकराचार्यांच्या आजोबांपासून कथा सांगितली आहे. शिवगुरूंनी पुत्रप्राप्तीसाठी शंकराची आराधना केली. शंकर प्रसन्न होऊन पोटी आले. वैशाख पौर्णिमेला रविवारी द्वितीय प्रहरी शंकर बनून भगवान अवतरले. पार्वतीमातेखेरीज सर्वांना आनंद झाला. सारीपाट खेळताना पार्वतीने शिवांची सर्व आभूषणे जिंकून घेतली होती. तो राग मनी ठेवून ह्या अवतारात त्यांनी पार्वतीमातेला बरोबर घेतले नव्हते. ह्या अवतारांत शिव लग्नच करणार नव्हते.

**'आचार्यांच्या देहावरती । शिवचिन्हें अवघीच होती'**

(अ ९-११)

पहिल्याच वर्षी ते बोलू लागले. काव्य, कोश, व्याकरण तिसऱ्या वर्षी पूर्ण झाले. ज्या ज्या गुरूंकडे जावे तिथे तिथे त्यांनी शिकविता शिकवतानच बाल शंकरचार्यांनी आत्मसात करावे. गुरूंचे गुरू आदिनाथ आहेत. त्यामुळे आचार्यांना ज्ञान सहजसाध्य झाले होते.

चवथ्या वर्षी शिवगुरू कालवश झाले. मातेने नातेवाईकांच्या मदतीने उपनयन संस्कार करविला व दशग्रंथी होण्याकरिता लेकराला गुरूगृही पाठवले. तिथे निघंटु, छंद, ज्योतिष तसेच चारीवेद त्यांनी अभ्यासिले. गुरू म्हणाले की, 'बाळा तू म्हणजे चमत्कार आहेस. आत्ता तूच शिकव मुलांना' आचार्य शिकवू लागले. सोपे करून सांगण्याची त्यांची हातोटी पाहून सर्वजण कौतुक करीत.

तिथे एका द्विजाघरी भिक्षा मागण्यासाठी गेले असता त्याच्या घरात काहीही नव्हते. बाईने कुठूनतरी एक आवळा शोधून भिक्षा घातली. बाल-शंकराचार्यांचे हृदय द्रवले. त्यांनी लक्ष्मीची प्रार्थना केली. त्या ब्राह्मणाने पूर्वजन्मी दान केले नव्हते. त्या रोषाचा परिहार करून शंकराचार्यांच्या शब्दाला मान देऊन देवींनी त्या ब्राह्मणाचे घर सोन्याच्या आवळ्यांनी भरून टाकले. श्री दासगणु महाराजांनी हे 'कनकधारास्तोत्र' उद्‌धृत केले आहे व त्याचे सार थोडक्यात सांगितले आहे. 'जी ही कथा गायिल तो धनवान होईल' असा आशीर्वाद देऊन लक्ष्मीमाता अदृश्य झाली. श्री दासगणुमहाराजांनी या संधीचा लाभ उठवून भिक्षेचे महात्म्य समजावून सांगितले आहे. भिक्षेचे अन्न शुद्ध असते. विद्यार्जनाच्या वेळी तर ते भीक्षान्न अवश्य सेवन करावे.

ही घटना ऐकून गुरू म्हणाले -

**हा गुरूंचा ही आहे गुरू । कामधेनू वा कल्पतरू ।।**
**अवघा विद्यांचा सागरू । मूर्तिमंत हा शंकर ।।**
**लोक त्यांच्या भजनी न लागले तरच आश्चर्य ।**

आचार्य गुरूगृहातून कालडीला परतले. पूर्णा नदी तशी गावापासून थोडी लांब होती. आईला आंघोळीहून येताना भोवळ आली. आचार्यांनी आईची शुश्रूषा केली व परत असा त्रास होऊ नये म्हणून पूर्णेला गावाजवळून वाहण्याची विनंती केली. पूर्णा नदीने ती अर्थातच ऐकली व तिने आपला मार्ग बदलला व ती गावाजवळून वाहू लागली. पूर्णा नदी म्हणाली त्याप्रमाणे कालडी महातीर्थ झाले. केरळपती राजशेखर आचार्यांच्या दर्शनाला आला व त्याने त्यांची षोड्‌पचार पूजा केली.

पण पाखंड मतांचे खंडण करून अद्वैताची प्रतिष्ठापना करण्यासाठी आचार्यांचा अवतार होता. ऋषीमुनींनी येऊन आठवण करून दिली तेव्हा ते कालडी सोडून निघाले. आईला वाईट वाटत होते. ते जाऊ नयेत म्हणून आईने ब्राह्मण अनुष्ठानास बसविले. पण पूर्णा नदीत मगरीने पकडलेला पाय संन्यास घेतल्याशिवाय सोडणार नाही म्हणता आईने संन्यास घेऊन कालडी सोडण्यास परवानगी दिली. आचार्यांनीही आईला स्मरण करताच येण्याचे आश्वासन दिले.

तेथून ते निघाले ते नर्मदातीरी ओंकारेश्वरी आले. महाराजांनी नर्मदेचे व नर्मदातीराचे फारच रम्य वर्णन केले आहे. आचार्य नर्मदेत स्नान करून ओंकारेश्वराच्या दर्शनाला गेले तेव्हा ईश्वराने सांगितले की, इथेच तुझे गुरू आहेत. रानावनांतून त्यांचा शोध घेत आचार्य गोविंदगुरूंपर्यंत पोचले. व्यासपुत्र शुकाचा ज्यांना अनुग्रह झाला त्या गौडपादाचार्यांचे गोविंदपाद हे शिष्य गोविंदपाद म्हणजे साक्षात् ब्रह्मज्ञान. त्यांनी विचारले, ''मुला तू कोण?'' तेव्हा 'आत्मषटकम्' नावाने प्रसिद्ध झालेले 'शिवोऽहं शिवोऽहं' स्तोत्रातून त्यांनी उत्तर दिले. गुरूंनी अंतर्ज्ञानाने जाणले आपल्या समोरील मुलगा खरच शिव आहे. त्यांनी आचार्यांना संन्यासदीक्षा दिली व 'शंकरभारती' नाव ही दिले. गोविंदगुरू हे शेषाचे अवतार होते. दोघांच्या ब्रह्मचर्चा रंगू लागल्या. श्रावणमासांत नर्मदेला पूर आला. आचार्यांनी नर्मदेला नमस्कार केला. तिची स्तुती केली व तिला कमंडलूत सामावण्याची विनंती केली. नर्मदेने ती मानली. लोक आचार्यांना मानू लागले. आचार्य मात्र म्हणाले की, हे वेदमंत्रांचे सामर्थ्य आहे. कमंडलू वेदमंत्राने अभिमंत्रित केला होता. म्हणून नर्मदा त्यात सामावली.

मग गोविंदपादाना आचार्यांनी दिग्विजयाचा प्रारंभ करण्यास सांगितले. 'वेदांचा उद्धार करण्यासाठी तुझा जन्म आहे' हा आठव त्यांनी दिला. तू आता कशीस जाऊन ब्रह्मसूत्रावर भाष्य करावे. ब्रह्मसूत्र म्हणजे वेदांचे हृदयच. त्यावर अन्य कोण भाष्य करू शकणार? सर्वत्र विजयी होण्याचा गुरूंनी आशीर्वाद दिला.

काशीत चांडाळवेषाने उमानाथांनी आचार्यांना दर्शन दिले. महाराज सांगतात की, त्यावेळी आचार्यांचे वय आठ वर्षांचे होते. शिवांनी त्यांना ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहिण्यास सांगितले. या भाष्याच्या पठणाने ऐहिक आणि पारमार्थिक सुख मिळेल.

पण काशीक्षेत्रात आचार्यांना ब्रह्मसूत्रांवर भाष्य लिहिण्यास निवांतपणा मिळेना तेव्हा ते शिष्यांसमवेत हिमालयात गेले. रूद्र प्रयाग, देव प्रयाग, कर्ण प्रयाग करून केदारी गेले. केदारनाथाचे दर्शन घेतले. मानससरोवराची यात्रा केली व त्यानंतर ब्रह्मसूत्रावर भाष्य लिहिण्यास घेतले. त्यांचे प्रथम शिष्य सनंदन भाष्य लिहून घेत होते. अन्य शिष्यांना सनंदनाचा हेवा वाटू लागला. कुजबूज सुरू झाली. आचार्यांनी सनंदनचे महत्त्व पटवून देण्यासाठी सनंदनाला गंगेच्या एका तीरावर भिक्षा मागण्यास सांगून आपण अन्य शिष्यांसह दुसऱ्या तीरावर गेले. गंगेला पूर आला. गुरूंना भिक्षा वेळेवर पोचली पाहिजे या ध्यासाने पोहता येत नसतानांही सनंदनाने गंगेत प्रवेश केला. त्याची गुरूभक्ती जाणून गंगेने प्रत्येक पावलाखाली कमळ ठेवले व सनंदन कमळांच्या सेतूवरून अन्य तीरीं पोचला. अन्य शिष्यांना त्याचे महत्त्व कळले. आचार्यांनी त्याला 'पद्मपाद' नाव दिले.

पशुपतमी पंडित वादाला आले. आचार्यांनी त्यांच्या मतांचे खंडण केले व अद्वैतमत प्रस्थापित केले. जीव व ब्रह्म दोन नाहीत एकच आहेत.

इथेच श्री व्यास ब्राह्मणवेषांत आचार्यांजवळ आले व त्यांनी ब्रह्मसूत्रांतील तिसऱ्या अध्यायातील एका सूत्राचा अर्थ विचारला. आचार्यांचे वय १४/१५ वर्षांचे होते. 'हा काय सांगणार?' असा भाव विचारतांना होता. पण आचार्यांनी सांगितले मी निमित्त आहे. भाष्य करणारे गुरू आहेत. तरीही त्यांनी त्या सूत्राचा अर्थ ब्राह्मणाला सांगितला. अन्य प्रश्नांची ही समर्पक उत्तरे दिली. पद्मपादाने श्री व्यासांना ओळखले मग व्यासही प्रकट झाले व त्यांनी श्री शंकराचार्यांची खूप प्रशंसा केली व अजून प्रचार कार्य राहिले आहे म्हणून आयुष्य वाढवून दिले. आचार्यांना सोळा वर्षांचेच आयुष्य होते ते श्री व्यासांनी बत्तीस वर्षांचे करून दिले व आशीर्वाद दिला.

**तुझा अद्वैत सिद्धांत। जे न कोणी मानिती मत।**
**ते कल्पपर्यंत। साच राहतील यमलोकी ।।१५-१६०।।**

या अध्यायात विशेषत्वाने जे जाणवले ते श्री दासगणुमहाराजांची तत्त्वज्ञानाची जाण. पाशुपतमताचें खंडण व अद्वैतमताचे मंडण महाराजांनी समर्थपणे पेलले आहे. महाराजांना पंढरपुरी एकाने छेडले होते. तेव्हा महाराजांनी ते आव्हान स्वीकारून अमृतानुभवावर उत्तम टीका लिहिली होती. ते स्वत: अद्वैतमताचे पुरस्कर्तेहोते. वेदांताचे उत्तम जाणकार होते. संतांबद्दल असणाऱ्या प्रेमामुळेच व साईबाबांच्या सांगण्यामुळे महाराजांनी संतचरित्रांचे गायन केले.

काव्याच्या अंगाने पाहिलं तर प्रसंग डोळ्यांसमोर घडतो आहे, असे वाटावे, अशा रितीने पू. दासगणुमहाराज वर्णन करतात. गंगा पार करणारा सनंदन, गंगेच्या मनांतील तळमळ, श्री व्यास व श्री शंकराचार्यांची भेट याची डोळां पाहण्याचे भाग्य श्री दासगणुमहाराजांमुळे आपल्याला लाभते.

त्यानंतर प्रयागक्षेत्री जाऊन श्री शंकराचार्य कुमारिल भट्टांच्या शोधार्थ विन्ध्य पर्वतापाशी आले. तिथे तमालशालिनीच्याकाठी कुमारिल भट्ट ऊर्फ भट्टपाद अग्निप्रवेश करीत होते. ईश्वराला न मानणे व जैन गुरू निकेतन याशी द्रोह करणे या दोन पापांचे प्रायश्चित्त घेण्यासाठी ते तांदळाच्या भुशाला अग्नी लावून आत बसले होते. श्री शंकराचार्यांनी त्यांची समजूत घातली व सांगितले की, तुम्ही आजपर्यंत कर्ममार्गाचा अवलंब केला. कर्मयोगी म्हणजे यज्ञभाग. तुम्ही आपले शरीर समिधा समजून अग्निला अर्पण करावी. श्री शंकराचार्यांनी अग्निला मंद केले. तेवढ्या वेळात भट्टपादांनी त्यांचे ब्रह्मसूत्रावरील भाष्य वाचून संतोष प्रगट केला व त्यावर हजारों वार्तिले लिहिली जातील असे भाकित केले. तुम्ही लवकर येता तर मला अपरोक्षज्ञान करविता आता माझा शिष्य मंडनमिश्राशी वाद घाला व त्याला जिंका. तो भाष्यावर वार्तिक लिहिल.

भट्टपादांच्या शिष्यांकडून केलेल्या पूजेचा स्वीकार करून श्री शंकराचार्य मंडनमिश्रांना भेटण्यासाठी महेश्वर क्षेत्री गेले. मंडणमिश्राकडे त्यादिवशी श्राद्ध होते. त्याच्या घरच्या शुक, मैना ही वेदान्त बोलणाऱ्या होत्या (सारखे कानांवर तेच पडे त्यामुळे पक्षी ही तेच बोलत) श्री शंकराचार्य दार बंद होते म्हणून योग सामर्थ्याने आत गेले. अचानक संन्याशाला घरात बघून मण्डनमिश्रांना राग आला. दोघांचा वाद झाला. शेवटी दुसऱ्या दिवसापासून वादाला बसण्याचे ठरले. निर्णय करण्यासाठी मंडणमिश्राची पत्नी बसली. या सतराव्या अध्यायात त्यांनी त्या दोघांचे भांडण मूळ संस्कृतात देऊन त्याचा अर्थ ही मराठीत दिला आहे. संस्कृत भाषेतील मजा इथे दाखवून दिली आहे.

अठराव्या अध्यायात दोघांचा वाद दिला आहे. मण्डनमिश्राची पत्नी सरस्वती - तिने दोघांच्या गळ्यांत पुष्पहार घातले व जो हरेल त्याचा हार सुकेल असे सांगितले. मण्डनमिश्राचा हार सुकला. सरस्वती म्हणाली मी मण्डनमिश्रांची पत्नी-अर्धांगी. मलाही तुम्ही हरविले पाहिजे. 'मन्मथाच्या कन्या किती? त्या स्त्रीपुरुषाच्या देहांत कुठे कुठे असतात?' इथे अठरावा अध्याय संपतो. या अध्यायात ही श्री दासगणुमहाराजांची तत्त्वज्ञानाची जाण दिसून येते.

या बालब्रह्मचाऱ्याला असे विचारणे वास्तविक योग्य नव्हते. पण श्री शंकराचार्यांनी थोडा अवधी मागून घेतला व अमसक राजाच्या देहात प्रवेश करून कामशास्त्राचा अभ्यास केला. आचार्यांचा देह शिष्यांनी एका गुहेत महिनाभर संभाळला. वाट बघून शेवटी पद्मपाद गवया बनून आचार्यांना भेटण्यास गेला. आचार्य पुन्हा आपल्या शरीरांत आले व महिष्मती नगरीत जाऊन सरस्वतीला तिच्या प्रश्नांची उत्तरे देऊन निरुत्तर केले. तिने त्यांना साक्षात् चंद्रमौळी म्हणून नमस्कार केला व ब्रह्मलोकी जाण्यासाठी तिने आज्ञा मागितली. आचार्य म्हणाले, 'आई, तुझ्या साहाय्याने अद्वैत मत टिकणार आहे. कर्म, उपासना व ज्ञान तिहींचे रक्षण होणार आहे. तू शृंगेरीला शारदांना म्हणून वास्तव्य कर.' सरस्वतीने ती विनंती मान्य केली व ती अंतर्धान पावली. इथे १९ वा अध्याय संपतो. आचार्यांची दूरदृष्टी महाराजांनी येथे दाखवून दिली आहे.

विसाव्या अध्यायात आचार्यांनी मण्डनमिश्रांना संन्यास दीक्षा दिली व त्यांचे नाव सुरेश्वराचार्य ठेवले.

तिथून ते शैलपर्वताजवळ आले. या प्रांती भैरवाचे खूप भक्त होते. ते अघोर कर्मेकरीत. तिथे एक दुराचारी कापालिक मनांत कपट ठेवून तिथे आला व आचार्यांचा आपल्यावर प्रभाव पडल्याचे त्याने सोंग केले. त्याचे नाव होते भैरवारव्य. त्याने स्वत:च्या हितासाठी आचार्यांचा देह मागितला. आचार्यांचे नरकपाल मागितले. त्यामुळे तो कापालिक भैरवांत विलीन होणार होता. आचार्यांनी ते मान्य केले. फक्त शिष्य मला त्रास देणार नाहीत आपण वनांत एखाद्या गुहेत जाऊ. मी समाधी लावतो. तेव्हा तू मला मार असे सांगितले. ते ऐकून कापालिक अतिशय आनंदित झाला.

पण अंतर्ज्ञानाने पद्मपादाला हे समजले कथा अशी ऐकली होती की त्याने श्री नरसिंहांना पाचारण केले व श्री नरसिंहांनी आचार्यांना वाचवले. त्यावेळचे त्यांचे नरसिंह स्तोत्र ही प्रसिद्ध आहे. इथे दासगणुमहाराज म्हणतात पद्मपादच नरसिंहाप्रमाणे उग्र रूप घेऊन आला व मांडीवर कापालिकाला धरून त्याने नखांनी त्याचे पोट विदीर्ण केले. आचार्यांनी सांगितले तेव्हा नरसिंहरूप मावळले व पद्मपाद दिसू लागला. या कथेच्या पठणाने वाचणारा संकटांतून मुक्त होतो. दासगणु महाराज आचार्यांच्या मुखांतून सांगतात. सदाचरणावाचून मंत्राला सामर्थ्य येणार नाही. 'अहेतुक कर्म करावे। कर्म मार्गा संरक्षावे। उपासनेने करून घ्यावे। आपुले सात्त्विक कल्याण।' प्रसंगाप्रसंगाने आचार्य शिष्यांना कसे घडवीत होते ते इथे कळते.

बाविसाव्या अध्यायात आचार्य गोकर्ण महाबळेश्वर, हरिहरेश्वरी जाऊन मूकांबिका देवीच्या क्षेत्रात आले. तिथे त्यांनी एका ब्राह्मणाच्या मृत मुलाला जिवंत केले. पुढे तेविसाव्या अध्यायांत प्रभाकराच्या मुक्या मुलाला बोलते केले. हा प्रभाकराचा तेरा वर्षांचा मुलगा काहीही केले तरी बोलत नव्हता. म्हणून प्रभाकर पत्नी व मुलाला घेऊन मंदिरात आचार्यांच्या दर्शनासाठी गेले. आचार्यांनी विचारताच मुलाने बारा श्लोकी स्तोत्रांत उत्तर दिले.

'मी शुद्धबुद्ध आनंदघन। सच्चिदानंदपूर्ण।' गुरूशिष्यांच्या या संवादाला 'हस्तामलक स्तोत्र' म्हणतात व शिष्याला हस्तामलकाचार्य म्हणतात. तिथून शृंगगिरीला जाऊन तिथे आचार्यांनी या शिष्याला संन्यास दिला. दासगणुमहाराजांनी अत्यंत समरसून हा प्रसंग रंगवला आहे.

चोविसाव्या अध्यायात शृंगेरी मठाची स्थापना सांगितली आहे. आचार्य शिष्यांना घेऊन इथे आले. विभांडकाकडून त्यांनी मठासाठी जमीन मागून घेतली. हा परिसर आजही इतका रमणीय आहे. तेव्हा तर किती सुंदर असेल. कल्पना केलेली बरी. इथे शिष्यांना आचार्यांनी उपनिषदे शिकवली. गिरि थोडा मंदबुद्धीचा शिष्य पण आचार्यांची सर्व सेवा तो भक्तिभावाने करी. आचार्यांच्या छाट्या धुवायला गेलेल्या गिरीसाठी आचार्य थांबले. पद्मपाद वगैरे म्हणू लागले की त्याच्यासाठी कशाला थांबायचे? तुम्ही सुरू करा. आपल्या शिष्यांना असा अहंकार योग्य नाही. असा विचार करून त्यांनी गिरीला विचारले 'तुला काय कळले सांग.' गिरीने तोटक वृत्तांत स्तोत्र रचून उत्तर दिले. त्यात उपनिषदांचे सार ग्रंथित केलेले आहे. सर्वजण प्रभावित झाले. आचार्यांच्या कृपेचा महिमा सर्वांना पुन्हां एकदा अनुभवाला आला. गिरी आता तोटलाचार्य म्हणून ओळखला जाऊ लागला.

आचार्यांनी शृंगेरी मठाची स्थापना केली. शारदांबेचे सुंदर मंदिर बांधले. तुंगभद्रेच्या तीरी हे अद्वैततीर्थ आजही दिमाखात उभे आहे. या मठाची जबाबदारी त्यांनी सुरेश्वरावर सोपवली. सर्व शिष्यांना अद्वैतमताच्या रक्षणार्थ लेखन करावयास सांगितले. आचार्यांनी शिष्यांना समजावले –

कर्माचरणे शक्ति येते। प्रकृति निकोप राहते।
मन अति पवित्र बनते। हा उपयोग कर्माचा ।।२४-९९ ।।
निष्कलंक ज्याचे बालपण। गेले त्यालाच तरुणपण
सुखराई होते जाण। ऐहिक सुखे भोगावया ।।२४-१०० ।।
येथे तारुण्य उपासना। ती उपास्याविना होईना।
उपास्यांचा असणेपणा। आकाराच्या हाती असे ।।२४-१०१ ।।
नाम अणि आकार। लागती उपासनेस साचार
अनन्यतेने येईल जोर। त्या उपासनेकारणे ।।२४-१०२ ।।
उपासना मार्गात। थोडा अद्वैत सिद्धान्त।
मानिला पाहिजे सत्य। व्हावया फलद उपासना ।।२४-१०३ ।।
पूर्ण झाला ब्रह्मज्ञान। मग कशाचे जन्ममरण
जिकडे पाहील तिकडे दर्शन। होईल तया ब्रह्माचे ।।२४-१०७ ।।

कर्म, उपासना व ज्ञान – सर्वांची उकल किती सुंदर शब्दांत दासगणु महाराजांनी केली आहे. हे पाहिले की त्यांच्या बुद्धीचे, प्रतिभेचे, शब्दसामर्थ्याचे अतिशय कौतुक वाटते.

कर्माच्या काढ्यात उपासनेची साखर घालून. अद्वैताची मात्रा भवरोग्यास पाजावी.

शंकराचार्यांच्या अद्वैतमताचे पुरस्कर्तेअसल्यामुळे प्रतिभेला असे उजाळे येतात.

सुरेश्वराचार्यांनी आचार्यांच्या भाष्यांवर वार्तिके लिहिण्याची आज्ञा मागितली. वरील चर्चा झाली. सुरेश्वरांनी 'नैष्कर्म्य सिद्धी' नावाचा ग्रंथ लिहिला. तैत्तिरीय व बृहदारण्यक उपनिषदांच्या भाष्यावर वार्तिक लिहिले. पद्मपादांनी भाष्यावर टिका केली. 'पंचपारिका', 'वृत्ति', 'विजयडिंडिमा' हे ग्रंथ लिहिले. आनंदगिरी वगैरे शिष्यांनी ही ग्रंथरचना केली.

आचार्यांनी शिष्य असे पक्के घडविले होते. त्यांचे कार्य पुढे चालेल याची व्यवस्था त्यांनी घालून दिली होती. हा अध्याय वाचला तर इच्छित कार्यभाग सिद्धीस जातो. मनाची चिंता नाहीशी होते व तत्त्वज्ञानात गती मिळते. बुद्धीचे मांद्य जाते.

इकडे कालडीला माता अतिवृद्ध झाली होती. संन्यासासाठी मातेकडे परवानगी मागतांना त्यांनी 'तू स्मरण केल्यावर मी येईन' असे आश्वासन दिले होते. मातेला मृत्यूपूर्वी पुत्राला भेटण्याची इच्छा होती व

अन्त्यकर्म त्याच्या हाती व्हावे असे वाटत होते. मातेचा अंत जवळ आलेला पाहून आचार्य आकाशमार्गाने कालडीला गेले. मातेला संतोष झाला. शिवदूतांबरोबर जाण्याची तिची इच्छा नव्हती तर विष्णूंना विनंती केली. स्वत: विष्णू येऊन मातेला घेऊन गेले. आचार्य अंत्यक्रियेची तयारी करू लागले. पण गावकऱ्यांनी असहकार केला. संन्याशाला अंत्यक्रियेचा अधिकार नाही. आचार्यांनी ते मान्य करूनही मातेला दिलेले वचन पूर्ण करण्याचा निर्धार व्यक्त केला. स्वत: सरपण गोळा करून चिता आपल्याच परसात रचली व मातेला अग्नी दिला. आकाशवाणी झाली व तिने नंबूद्री ब्राह्मणांना वेदवाहन घोषित केले व सर्वांनी आपापल्या घरची शवे आपल्याच परसात जाळावी अशी आज्ञा केली. शेवटी आचार्यांनीच दया करून तो शाप फक्त कालडीतील नंबूद्यांनाच तोही काही काळ भोगावा लागेल असे सांगितले.

आचार्य रूक्ष नव्हते. देवी देवतांच्या स्तोत्रांतून त्यांचे भक्तिरसाने भरलेले हृदय दिसतेच त्याप्रमाणे जीवनात ही ते सहृदतेनेच वागले. दासगणुमहाराजांनी हा अध्याय अतिशय भावपूर्ण असा लिहिला आहे. आचार्यांच्या मातृप्रेमाचे, माणूसकीचे, वचनपूर्तीचे अतिशय रम्य दर्शन येथे होते.

पद्मपादांनी शृंगेरीहून तीर्थयात्रेला जाण्याची परवानगी मागून घेतली होती. ते आता रामेश्वरी आपल्या मामाच्या घरी आले होते. मामा द्वैती होते. त्यांनी पद्मपादांचे सर्व ग्रंथ जाळून टाकले व त्यांची बुद्धी मंद होण्यासाठी बासुंदीत औषध घातले. पद्मपाद कालडीला आचार्यांच्या दर्शनाला गेले. ग्रंथ जळाल्याचे बुद्धी मंद झाल्याचे दु:ख व्यक्त केले. आचार्यांना ते ग्रंथ पाठ होते. त्यांनी पद्मपादाला ते लिहून घेण्यास सांगितले व हे मामाचे कृत्य असल्याचे ही सांगितले.

चंद्रशेखर राजाला आपल्या नावांवर नाटके असावीत अशी इच्छा होती. आचार्यांनी लिहवून घेतली. या कथा सव्विसाव्या अध्यायात आल्या आहेत. आचार्य कालडीतून रामेश्वरासाठी निघाले. तेव्हा त्यांचा मुक्काम मध्यार्जुनास झाला. रोज प्रवचने होत. पण लोक साशंक होत. अद्वैत मत वेदसंमत आहे का? सारे पंडित एकत्र आले व आचार्यांना म्हणाले, 'अद्वैत सिद्धांतच खरा असेल तर प्रत्यक्ष श्री शिवाकडून ऐकवा.' आचार्यांनी शिवाची प्रार्थना केली. लिंग विदीर्ण होऊन शिव प्रकट झाले ते म्हणाले, 'वेदाला फक्त अद्वैत मतच मान्य आहे. अद्वैतच कैवल्यपदी नेते.'

तिथून आचार्य रामेश्वरी आले. शाक्त येऊन आचार्यांना म्हणाले, 'तुम्ही शाक्तपंथी व्हा.' त्यांनी 'प्रकृती ही ब्रह्माची शक्ती आहे.' असे सांगून त्यांना अद्वैतमत पटवून दिले. विद्योपासकांनाही त्यांनी अद्वैत मत मान्य करण्यास भाग पाडले. पण समन्वयाची दृष्टी ठेवून त्यांनी पंचायतनाची पूजा सुरू केली. शिव, विष्णू, देवी, सूर्य व गणेश या पाच देवतांची सर्वांनी पूजा करावी. अशी रीत घालून दिली.

अठ्ठाविसाव्या अध्यायांत ही अन्य मतांचे खंडण करून अद्वैताची प्रस्थापन केली. शिवकांची व विष्णुकांची मंदिरांची स्थापना केली. नंतर रामेश्वर, व्यंकटाचल, कर्नाटकांत आचार्य गेले. तिथे क्रकच नावाचा कापालिकांचा पुढारी आचार्यांना मारण्यास सरसावला. पण त्यांचा देव भैरव प्रकट झाला व 'माझ्या स्वामींचा अपमान केल्याबद्दल ही तुला शिक्षा' म्हणून भैरवाने क्रकचाचे मस्तक उडविले. शंकराचार्यांनी कापालिकांना शुद्ध करून वैदिक करून घेतले. धर्माची ही लवचिकता विशेष उल्लेखनीय आहे.

एकवीसाच्या अध्यायांत शाक्त अभिनव गुप्ताने आचार्यांच्या शरीरात रोगाचा प्रवेश करविला. साबरी मंत्राने रोग आणला तो घालवायला ॐकाराचे अनुष्ठान हवे. ते पद्मपादाने केले. आचार्यांचा रोग गेला पण तो अभिनव गुप्ताचाच झाला व शेवटी त्यातच त्याचा अंत झाला.

बत्तिसाव्या अध्यायात स्वत: गौडपाद म्हणजे श्री शंकराचार्यांचे आजेगुरू, आपल्या शिष्याच्या शिष्याची भाष्ये बघण्यास आले. त्यांनी आचार्यांच्या ग्रंथांची खूप वाखाणणी केली.

विद्वानांनी त्यांना काश्मीरच्या सर्वज्ञ पीठावर आरोहण करण्याची विनंती केली पण त्यांची मते कलुषित होती. पण वाद मिटविण्याच्या हेतूने आचार्य काश्मीरात आले. सर्वज्ञपीठाच्या मंदिराचे दक्षिणद्वार बंद होते. सर्वज्ञालाच ते द्वार उघडण्याचा अधिकार होता. विद्वानांनी आचार्यांची अनेक प्रकारे परीक्षा घेतली. पुष्पवृष्टी झाली व पद्मपादाचा हात धरून आचार्य सर्वज्ञपीठावर आरूढ झाले.

**अद्वैत मताचे खरेपण। दावण्यासी आरोहण।**
**त्या सर्वज्ञपीठाप्रति जाण। करिते झाले जगद्‌गुरू।।३३.६।।**

तिथून आचार्य पुन्हा शृंगेरीला आले. त्यांनी शिष्यांना जमवून सांगितले –

**वेद पवित्र मानणे। वेदाज्ञा त्या पाळणे।**
**अद्वैताते सेवणे। जे वेदाचे हृद्‌गत।।३३.१७।।**

सर्वांना समान मानावे, निर्वैर असावे, समाजात एकी राहील असे पहावे. मूळ ब्रह्मापासून प्रकृती व नंतर हे विश्व कसे निर्माण झाले हे समजावले. जग सुरळीत चालण्यासाठी सन्नीति पाहिजे. सन्नीति टिकविण्यासाठी जे नियम बनवले त्याला शास्त्र म्हणतात. व्यवहारांत भेद असले तरी मूळांत सर्व एकच आहे. हे विसरू नये. एका शुभ्र किरणांतून सात रंग दिसतात. तसे आहे. वेगवेगळ्या झाडांना वेगवेगळ्या प्रकारची खते लागतात तसे वेगवेगळ्या जातींसाठी वेगवेगळे वर्णाश्रम, नियम असतात. हे सर्व लक्षात ठेवून वैदिक पंथाचे रक्षण करण्याची जबाबदारी या शृंगेरी मठाची आहे. समाजाचा नीट विकास व्हावा म्हणून वर्णाश्रम आहेत. ब्राह्मण वर्णाला शहाणपण, क्षत्रियाला शौर्य, वैश्यांना वस्तूंचे संपादन तर शूद्रवर्णाला बळ दिले आहे. शहाणपणाला वैराग्य हवे, सात्त्विक वृत्ती हवी, शौर्याला शक्तीबरोबर स्वाभिमान पाहिजे. समाज संरक्षणाची चिंता हवी. संग्रह हा सर्व समाजासाठी हवा. बल हे पृथ्वीप्रमाणे समर्थ व क्षमाशील हवे. सर्वांनी मिळून समाज घडवायचा, वाढवायचा असतो. त्यासाठी भगवंतांनी एकएक दोष ही या वर्णांना देऊन ठेवला आहे. अद्वैताच्या उपासनेने ब्रह्मप्राप्ती होईल. हरिहरांत भेद करू नका. दोघेही एकच आहेत.

व्यवहारांत द्वैत मानावे पण परमार्थात नाही. द्वैत हे शरीराप्रमाणे तर अद्वैत हे प्राणांप्रमाणे समजावे.

शंकराचार्यांच्या पोक्त, परिपक्व विचारांची उकल श्रीदासगणु महाराजांनी फारच उत्तम रितीने केली आहे. तत्त्वज्ञानातील त्यांचा अधिकार ठायी ठायी दिसून येतो.

३४ व्या अध्यायात आचार्यांचे व्यवस्थापन चातुर्य व दूरदर्शीपणा प्रत्ययाला येतो. त्यांनी देशाच्या चारी दिशांना चार मठ स्थापन केले.

प्रत्येक मठाच्या अधिकारात कुठले क्षेत्र येते, हे ही आचार्यांनी निश्चित केले. चारी दिशांनी वेदांचे, अद्वैतमताचे रक्षण व्हावे, मठाचे कार्य निश्चित असावे वगैरे वगैरे सर्व गोष्टी लक्षात घेऊन व्यवस्था केली. गादीवर बसवतांना उपनिषदातील वाक्यांचा उपदेश केला. 'सत्यं ज्ञानम् अनन्तं ब्रह्म', 'यो अन्यां देवताम् उपास्ते स पशुः।' 'सदैव सौम्य इदम् अग्रे आसीत्', 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म', 'सर्वं खलुइदं ब्रह्म', 'नेह नानास्ति किश्चन', 'ज्ञा नाद् एन तु कैवल्यम्', 'ब्रह्मविद आप्नोति परम्' वगैरे वगैरे.

ह्या मठांनी लोकांना अज्ञातापासून भ्रमापासून वाचवायचे आहे. अशी सर्व व्यवस्था लावून आचार्य बद्रिकाश्रमी आले. मागे इथेच सर्व उपनिषदांवर भाष्ये लिहिली होती.

पस्तिसाव्या अध्यायात आचार्यांचे कैलासगमन वर्णिले आहे. बद्रिकाश्रमी आचार्य आल्यावर हठयोगी येऊन भेटले. त्यांनी योग शिकविण्याची तयारी दाखवली. पण आचार्यांनी त्यांना समजावले. 'ज्ञानात् एन कैवल्यम्' वैराग्य आणि विवेक (नित्यानित्यविवेक) साधला की निष्कलंक ज्ञान प्रकट होते.

**'मोक्षमानना देण्याचा। अधिकार एक ज्ञानाचा'**

इथेच सरस्वती नदीच्या तीरावर आचार्यांनी आपल्या शिष्यांना उपनिषद भाष्यांचे सार सांगितले. पण शिष्य थंडीने बेजार झाले तेव्हा आचार्यांनी शिवांना प्रार्थना केली. त्यांच्या विनंतीला मान देऊन शिवांनी तिथे गरम पाण्याचा झरा निर्माण केला. आता निर्वाणाचा समय पातला म्हणून देव तिथे आले. त्यांनी आचार्यांना स्वस्थानी कैलासाला चलण्याची विनंती केली. आचार्यांनी शिष्यांचा निरोप घेतला व आश्वासन दिले.

**ज्या ज्या वेळी आठवण। माझी होय तुम्हा कारण।**
**त्या त्या वेळी भेटेन मी। तुम्हांस याच वेषाने।।३५-१०५**
**ब्रह्मचर्या ज्या ठायी। तेथे जी सर्वदा येई**
**संवाद ऐकण्याप्रतिपादी। तेथींचा, गुप्त वेषाने।।३५-१०६**

नंदिकेश्वर धावत पुढे आला. आचार्य त्यावर आरूढ झाले व शिवगणांसह, देवांसह कैलासी गमन करते झाले. सौम्य नामक संवत्सरी, वैशाखमासी, शुद्ध त्रयोदशीला प्रदोषकाळी आचार्य कैलासी गेले.

दासगणुमहाराज म्हणतात जसा कृष्णावतार हा पूर्ण अवतार आहे. तसा शंकराचार्य हा शिवांचा पूर्ण अवतार आहे.

हा ३५ वा अध्याय वाचला की गंडांतर टळते व आयुष्यात वाढ होते. दासगणुमहाराजांनी पहिल्या चरित्रकारांचा उल्लेख करून त्यातील खरेखोटे कसे निवडले, हे ही येथे सांगितले आहे. हे श्री दासगणुमहाराजांचे वैशिष्ट्य आहे. प्राप्त पुराव्यांची, कागदपत्रांची ते पूर्ण छाननी करून सारासार विचाराचा आधार घेऊन निर्णय करतात. अशी दृष्टी फार थोड्या लोकात आढळते. महाराजांनी विद्यारण्य स्वामींच्या 'श्री शंकर दिग्विजया'चा विशेष आधार घेतला आहे.

३६ व्या अध्यायात कांचीच्या पाचव्या मठाची कथा आहे. हा कामकोटी मठी ३७ व्या अध्यायात रामानुजाचार्य, निम्बार्काचार्य, मध्वाचार्य व वल्लभाचार्य यांच्याबद्दल लिहिले आहे.

३८ व्या अध्यायात आजची परिस्थिती वर्णिली आहे. श्री दासगणुमहाराजांचे हृदय आजच्या परिस्थितीने कासावीस केलेले आहे. आज तर परिस्थिती त्याहून ही भयंकर झालेली आहे. दासगणुमहाराज आचार्यांना व संतांना कळवळून प्रार्थना करतात की, तुम्ही पुन्हा अवतार घ्या व या समाजाचे रक्षण करा. त्याला सन्नीति शिकवा. योग्य मार्गावर आणा.

**तुम्ही अवतीर्ण झाल्यावर। अवघे दैन्य जाईल दूर।**
**भारताचा जयजयकार। करा येऊन चहूकडे।।३८-१४०।।**
**क्षेत्रे करावी नीतिमान। मठपति वैराग्यसंपन्न**
**स्वानुभवाचे असो ज्ञान। शास्त्री पुराणिका ठायी।।३८-१४१।।**

श्री दासगणुमहाराजांची देशभक्ती व राष्ट्रोद्धाराची तळमळ ह्या ही पोथीत ठायी ठायी दिसून येते.

३९ व्या अध्याय अवतरणिचा आहे. ''आचार्य देवाहून थोर। त्यांचे न फिटती उपकार। झालेले हिंदू धर्मावर। हे ध्यानांत असू द्या।'' म्हणून अवघ्या हिंदूंनी। शरण जाणे आचार्यचरणी। चरित्र यांचे वाचोनी। वर्तन आपुले सुधारा।।'' मग फलश्रुती सांगितली आहे.

आज आचार्यांनी अवतार घ्यावा पण ते नाही झाले तर निदान आपण त्यांच्या या चरित्राचे वाचन करावे व जीवन सावरावे. श्री दासगणुमहाराजांनी तेवढ्यासाठीच हा लेखन प्रपंच केला आहे. ग्रंथ अत्यंत रसाळ झाला आहे. घटना डोळ्यापुढे घडताहेत असे वाटते. वर्णनात अनेक पौराणिक कथांचे उल्लेख आहेत जसे आचार्यांचा परकाया प्रवेश सांगताना मच्छिंद्रनाथांनी केलेला परकायाप्रवेश सांगितला आहे. आईचे अंतिम कार्य करण्यासाठी श्रीमद् शंकराचार्यांनी पुराणातील अनेक दाखले दिले आहेत. महाराजांची आचार्यभक्ती शब्दाशब्दांतून ओथंबून भरलेली जाणवते. त्यांची कळकळ हृदयाला भिडते. त्यांची तत्त्वज्ञानाची जाण त्यांच्याबद्दल खूप आदर जाणवते. सर्व दृष्टींनी उत्कृष्ट असूनही पोथी जनसामान्यांच्या मनात का ठसली नाही. हे कळत नाही.

ही पोथी छापायलाही अनेक अडचणी आल्या. समाजाला अत्यावश्यक असलेल्या या चरित्रगायनाला प्रकाशक मिळेना. शेवटी एक श्रीमंत गृहस्थ पुढे आले. ग्रंथ छपाईसाठी गेला आणि अचानक त्या श्रीमंत गृहस्थांनी शब्द फिरवला. आता काय करायचे? मग लोकांकडून मिळेल ती मदत घेऊन ग्रंथ तडीला नेला. महाराजांनी सर्वांचे उल्लेख

कृतज्ञतापूर्वक केले आहेत. अगदी दामोदर आठवल्यांनी ग्रंथ लिहून घेतला, छगन बारटक्क्यांनी सुवाच्य अक्षरात प्रेसकॉपी तयार केली ह्याचाही उल्लेख आहे. श्री. केशवराव देशमुख व भगवानशास्त्री धारूरकरांनी संस्कृत ग्रंथांचा, स्तोत्रांचा अर्थ सांगणे, लिखाण मूळ ग्रंथाशी ताडून बघणे आदी सहाय्य केले. त्यांचा उल्लेख ही कृतज्ञतापूर्वक करतात.

या सर्वांच्या कष्टाला, श्री दासगणुमहाराजांच्या कष्टाला, कळकळीला आपण कसा प्रतिसाद देणार? दाद देणार की दुर्लक्ष करणार? या पोथीला मंत्राचे सामर्थ्य आहे. स्वतःचा व समाजाचा उद्धार करण्यासाठी ते वापरणार की वाया घालवणार?

ह्या ग्रंथाचा परिचय थोड्याशा विस्ताराने अशासाठी करून दिला आहे की वाचकांच्या मनात हा ग्रंथ वाचण्याबद्दल इच्छा निर्माण व्हावी. मुंगीला साखर मिळाली की ती इतरांनाही सांगते तसे मी सांगते आहे. अहो, फार छान ग्रंथ आहे. इथे वेदांत सोप्या भाषेत समजावलेला आहे. एक उत्तुंग चरित्र डोळ्यासमोर रसाळ भाषेत ठेवून आदर्श पुढे ठेवला आहे. हा ग्रंथ मिळवा व जरुर वाचा हीच विनंती.

**– डॉ. सौ. अंशुमती अ. दुनाखे**
'विन्दांशु' प्लॉट नं. १३, तेजस सहकारी गृहरचना,
तेजसनगर, कोथरूड, पुणे ४११०३८.
फोन २५३८५०२३

***









# प.पू. दासगणु महाराज आणि भागवत महापुराण

**श्री. शाम रघुनाथ साखरे**
बी.कॉम., हिंदी प्रवीण, निवृत्त राष्ट्रीयकृत बँक अधिकारी, निरनिराळ्या विषयावर व्याख्याने, प्रवचने, शुकताल, नैमिषारण्य, पुष्कर, वृंदावन मथुरा येथे भागवत पारायणासाठी घेऊन जातात. १९९६ साली मिरज येथे दासबोध मंडळाची स्थापना.

प.पू. दासगणु महाराजांनी समाज उन्नतीसाठी, भागवत धर्माचे रक्षणासाठी आणि स्वातंत्र्य प्राप्तीसाठी आपले पुरे आयुष्य वेचले. धर्माचे अधिष्ठान असल्याशिवाय खरी समाज सुधारणा पर्यायाने राष्ट्राची उन्नती होणार नाही असे त्यांचे प्रामाणिक मत होते आणि तसा त्यांचा विश्वास होता. हे सर्व करण्यासाठी नवविद्या भक्तीपैकी जी कीर्तन भक्ती हेच माध्यम प.पू. दासगणु महाराजांनी निवडले.

प.पू. दासगणु महाराज पंडीत कवीमध्ये बसत नाहीत, पण पंडीतांनाही थक्क करेल असे वाङ्मय त्यांनी निर्माण केले आहे.

प.पू. दासगणु महाराजांनी लोकजागृतीचा वसा घेवून ''न घेतले व्रत आम्ही अंधतेने'' ह्या वचनाप्रमाणे आत्मोद्धाराबरोबरच लोकोद्धाराची कास धरली होती. स्वार्थाला त्यांनी कधी जोपासले नाही. कष्ट आणि श्रम करण्यास कधीही मागे राहिले नाहीत. द्रव्य संचय केला नाही, पण लोकसंग्रह मात्र केला. माणसाने माणसाशी माणसासारखे कसे वागावे याचेच शिक्षण समाजाला आजन्म दिले.

सुमारे तीन साडेतीन तपे म्हणजेच पस्तीस-चाळीस वर्षे त्यांनी संत सेवा, वाङ्मय सेवा समाजसेवा आणि राष्ट्रसेवेत घालवली. सदाचार, नीतीमत्ता आणि सद्‌भावना हे गीतातत्व व भागवत धर्माचे सूत्र त्यांनी जोपासले व समाजानेही ते जोपासावे यासाठी त्यांनी निष्काम प्रयत्न केले. व्यक्तीच्या, समाजाच्या आणि धर्माच्या उद्धारासाठी आयुष्य वेचणाऱ्या संतांपैकी, श्रेष्ठापैकी प.पू. दासगणु महाराज यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल.

प.पू. श्री दासगणु महाराजांनीही भागवत महापुराणातील असंख्य कथा आपल्या कीर्तनातून सांगितल्या आहेत. ते साक्षात्कारी संत होते. भागवत महापुराण श्री शुकमुनींनी राजा परिक्षित यास जीवन उद्धरून जाण्यासाठी जो उपदेश केला ते क्षेत्र म्हणजे शुकताल, जिल्हा मुजफ्फरनगर (उ.प्र.) होय. ज्या वटवृक्षाखाली हे ज्ञान सर्व ऋषीमुनी-समवेत दिले, तो वटवृक्ष आजही आपणास या ठिकाणी पाहण्यास मिळतो. भागवत महापुराणाची सुरुवात दोन प्रश्नांनी झाली. ती म्हणजे माणसाने जगावे कसे? आणि माणसाने मरावे कसे? या दोन्ही प्रश्नांची अचूक उत्तरे भागवतांनी दिली आहेत. प.पू. दासगणु महाराज आणि त्यांचे परमशिष्य (प.पू. अप्पा) श्री वरदानंद भारती हे दोघेही गीता आणि भागवत जगले यात शंका नाही. याचे प्रतिबिंब त्यांच्या आचरणात व ग्रंथ रचनेत स्पष्ट दिसून येते. भागवतातील दशम स्कंद हा कृष्ण लीलेचा आहे. त्यामधील उद्धवागमन हे एक अत्यंत रसाळ आख्यान आहे. मी लवरकच गोकुळात येत आहे असा निरोप श्रीकृष्णानी उद्धवाबरोबर गोकुळात पाठवला तेव्हा उद्धव गोकुळात आला. त्यांनी गोकुळातील गोपींचे कृष्णाबद्दलचे प्रेम पाहिले. त्या निर्व्याज्य प्रेमाने उद्धव अगदीच भारावून गेला. त्यावेळचे वर्णन प.पू. दासगणु करतात.

**गोपानो तुम्ही धन्य या त्रिभुवनी कृष्णासवे खेळला।**
**योग्याना ना गवसे असा हरि तुम्ही भक्तिबळे बांधिला।।**
**पायांची करितात आस हरिच्या योगी तपी नी मुनी।**
**ती पडो तुमच्या व्रजात फिरली धेनू सवे काननी।।**

गोकुळात नंदाच्या वाड्यासमोर उभा राहिलेला रथ पाहून गोपींमध्ये त्याबद्दल तर्कवितर्क चालू होतात आणि कृष्णाचा निरोप घेवून उद्धव आला आहे हे समजताच गोपी त्याला घेरतात आणि आमचा कृष्ण कसा आहे, तो कुशल आहे ना? असे विचारतात. तेव्हा उद्धव म्हणतो,

नसे हरिवणे रिता मुळीच ठाव भूमंडळी। नसे म्हणून मानितां मग कसा हा गोकुळी?

उद्धवाचा हा युक्तीवाद ऐकून राधा तेवढ्याच तत्परतेने उद्धवाला विचारते,

**राधा म्हणाली मग उद्धवाला। हे ज्ञान का त्या जगदात्मयाला।।**
**नाही म्हणोनी वद पाठविला। संदेश त्याने व्रज गोकुळाला?**

भगवान गोपाळकृष्ण गोकुळातून मथुरेला गेला तेव्हा गोकुळातील कृष्ण आणि गोपगोपींच्या खोड्या थांबल्या. माठ, मडकी फुटेनात तेव्हा गोकुळातील कुंभार म्हणतो,

कधी म्हणत फोडण्या मडकि गोकुळी ये हरी? असा विनोदही काही ठिकाणी साधला आहे.

पण अत्यंत विनयाने, शालीनतेने प.पू. दासगणु म्हणतात,

**ना काव्यैभव जया कविता प्रबंधा।**
**साधेंसुधें मदिय काव्य असे मुकुंदा।।**

प.पू. दासगणुचे उद्धवाख्यान काव्य रसाळ, मार्मिक, दृष्टांताची रेलचेल असलेले प्रसादयुक्त आणि जिव्हाळ्याने ओथंबलेले आहे हे अगदी ओघवत्या व सरळ सोप्या भाषेत रचलेले आहे.

भागवतातील दशम स्कंधात कृष्णाला मारण्याचे काम कंसानी पुतना मावशीकडे दिले होते. प.पू. दासगणु महाराजांनी पूतनेचं वर्णन केले आहे ते पाहाण्यासारखे आहे.

**कुटील कुंतला हरिणाक्षी ती सुहास्य वदना करी।**
**कपटे अभिनव वेषा धरी।।**
**द्वयाधरांची प्रभा विलासे प्रवाळ रागा परी।**
**गुलाबी झांक कपोलावरी।।**
**सडपातळ बांधा नाजूक शोळे अती लवली।**
**नितंब भारे रंभोरूती अती।।**

प.पू. दासगणु महाराजांनी सुदामाचे चरित्र आपल्या कीर्तन आख्यानातून सांगितले आहे. सुदामदेव आणि श्रीकृष्ण यांच्यामधील खऱ्या निष्काम मैत्रीचे दर्शन घडवले आहे.

सांदिपनी आश्रमात, गुरूकुलात श्रीकृष्ण आणि सुदाम शिक्षण घेत होते. त्यामुळे ते बालमित्र होते. सुदाम सत्पात्री ब्राह्मण, गरिबी असली तरी 'भगवंतावर प्रेम,' 'केली लाभाविण प्रिती' असे भगवान तर सर्वांचे अंत:करण जाणणारे पूर्णावतार. सुदामाचा विवाह झाल्यावर संतती झाली, ती मुले बाळे खाण्यास द्या, कपडे द्या म्हणून सुदामाचे मागे लागतात. प.पू. दासगणु वर्णन करतात (साकी),

**कोणी ओढी दाढि कराने, कोणी कौपिन सोडी।**
**कोणी त्याचा पडून पाठिवर यज्ञोपविता तोडी।।**

ब्रह्मस्वरूपात असलेले सुदामदेव याने त्रासले नाहीत. ते मुलांना म्हणतात,

**मुलांनो, नसे सार अन्नात काही।**
**जपारे जपा राम तो शेषशायी।**
**दयाळू महांतात तो या जगाचा।**
**तया चिंतनी शीणवावी स्ववाचा।।**

पण सुदामदेवाची पत्नी मुलांना सांगते, देव देव करून काय होणार, पोटाला मिळणार आहे का? सुदामदेवानी आयुष्यभर देव देव केला, काय मिळाले? तो दरिद्री नारायणच राहिला. तो श्रीमंत कृष्ण तुमचा परममित्र आहे ना? मग त्याला जावून भेटा ना! काही मदत करताये का पाहू. कठीण समय येता कोण कामास येतो. सुदामदेवाना त्यांनी द्वारकेत कृष्णाकडे पाठवले. सुदाम म्हणतो,

**मी द्वारकेस जरि जावे। भेटीस कायतरि न्यावे?।**
(चाल) **हरि मागे त्या काय देऊ?।**
**का फजित तिथे मी होऊ।।**

सुदाम कृष्ण भेटीस निघाला. पत्नीनी पोह्याच्या कण्या फाटक्या वस्त्रात बांधून दिल्या त्याचे वर्णन प.पू. दासगणु करतात -

**पोहे घेऊनी मुठभरी। निघाला सुदामा सत्वरी।**
**द्वारावरती पाहून नगरी। आनंद झाला अतिशय।।**

सुदामा देवाच्या मनाची अवस्था दासगणु सांगतात - (पद)

**पहातील हे मदिया नयन आज श्रीवरा।**
**पूर्ण ब्रह्म चिद्विलास शामसुंदरा।।**
**धन्य धन्य धन्य जगती होय ही धरा।**
**चरणाचा नित्य घडे हिजसि आसरा।।**

सुदामा द्वारकेत आला तेव्हा दासगणुनी वर्णन केले -

लावणी

**त्या पुनीत द्वारकेमध्ये, सुदामा हो आला। मनी लज्जित झाला।**
**नाही वस्त्र धड अंगाला। म्हणे वदन दाखवू केवि असे श्रीहरिला।।**

पुढे सुदामा म्हणतो -

श्लोक

**लाजेल जो मजसि मित्र म्हणावयास।**
**या पाहता अशुभशा धनहीनतेस।।**
**वा यादवा मजसि ओळखिल्यास तू रे।**
**भो निंदितील जगती तुज लोक सारे।।१२।।**

सुदाम देव द्वारकेत आले कृष्णाचा पत्ता विचारू लागले तेव्हा लोक म्हणाले -

श्लोक

**वेड्या तू धनहीनता द्विज कुठे, कोठे रमेचा पती।**
**सिंहाला जगती न जंबुक कदा स्नेही पहा शोभती।।**
**ऐसा तो उपहास सर्व शहरी झाला तयाचा खरा।**
**काठी टेकीत आक्रमी हळूहळू तो बापुडा ती धरा।।**

या उपहासाकडे दुर्लक्ष करून सुदामा विश्वासाने राजवाड्यापाशी आला. द्वारपालाला त्यांनी विचारले मला माझ्या मित्राला भेटायचे आहे-

**राजगृहाचे येवून द्वारी भृत्यजनाला विनवी।**
**मम मित्राला जावून नाईक वर्दी माझी द्यावी।।**

राजदूत म्हणू लागले ''अरे तुझा मित्र राजवाड्यात कोण आहे?''

सुदामदेव म्हणतात -

**असे मदिय मित्र तो कमळनाभ भामापती।**
**जसे वसविली जळी परमरम्य द्वारावती।।**
**जया जनक नंदतो, जननि ज्या यशोदा सती।**
**तया हळधरा नुजा मजसि भेटवा निश्चिती।।**

हे ऐकून राजदूत सुदामदेवास भेटा म्हणतात आणि सांगतात -

**नको भकुस भटा गांजा प्याल्यावाणी।**

**नाही भिकारडा रे। आमचा धनी। तुझ्यासारखा।।**
**आणि त्याला राजदूतांनी तेथून घालवले**
**अर्धचंद्र देवून। लोटिला सुदाम खालती जाण।**
**धनहिनता न पावे मात। राजदरबारी साच हो।।**

एवढी पायपीट करून, चेष्टामस्करी ऐकून उपहास सोसूनही सुदामा मित्रप्रेमाने वेडा झाला होता. श्रीकृष्णाला भेटायला उत्सुक होता. त्याला काही मागायचे नव्हते, फक्त भेटायचे होते. तो मनात म्हणाला, तुझ्या दारात अर्धचंद्र मिळाला, आता मी परत जातो आणि सुदामाची भक्ती, प्रेम पाहून भावभक्तीला भुकेलेला देव सुदाम्यासमोर प्रगट झाला. प.पू. दासगणु वर्णन करतात.

।। पद ।। (नृपममता)

**परतता सुदाम द्वारी। जाहला प्रगट कंसारी। अतुरते।।**
**मिठी मारि घट्ट पायाला। भगवान लोळता झाला। तत् पदी।।**
**(चाल) द्विजवरा। मदिय तू खरा, गळ्यातील हिरा,**
**धरी ना जरा, राग मज विषयी।**
**मित्रास पदरि या घेई। द्विजवरा।।**

आणि भगवान श्रीकृष्ण प्रगट झाले. सुदामाला पाठी घेवून आनंदाने नाचू लागले.

**सुदाम्या ते घेवून पाठी। नाचू लागला जगजेठी।**
**ती मौज पाहण्या दाटी। फार झाली जनांची।।**

पुढे सुदामाचे सुंदर वर्णन करून त्याची दैना कशी आहे आणि भगवत प्रेम कसे आहे याचे यथार्थ दर्शन घडवले आहे.

**देवा अकिंचन असे तव हा सुदामा।**
**त्वन्नाम हेच धन की मम साच रामा।।**

कृष्णाचा मित्र आला आला अशी सर्वत्र बातमी पसरली आणि प.पू. दासगणुंनी या श्रीमंत आणि दरिद्री परंतु परममित्राचे सुंदर वर्णन केले आहे.

रुक्मिणीला सुदामदेवाच्या दर्शनाची घाई झाली होती. ती धावत धावत आली. त्याचे वर्णन दासगणुंनी अन्य भाषेत केले आहे.

**मुनी नारदके पीछे दौरत दौरत चलि मृगनयना।**
**धन्य भाग्य ये मुनिजी। मेरो साधुसंतसे मिलना।।**

रूक्मिणीनी सुदामदेवाचे अत्यंत आदराने दर्शन घेतले. सुदामदेवानी आशिर्वाद दिले. चार-आठ दिवस पाहुणचार घेतला. जवळ कृष्णासाठी आणलेले पोहे कृष्णाला ओशाळून दिले आणि कृष्णानी ते प्रेमाने खाल्ले.

(नृपममता)

**मटामटा देत मिटक्यासी। बहुमोल मानि पोह्यांसी।। श्रीहरी।।**
**करि टुकटुक माकड इतरा।।**

रुक्मिणी पोहे मिळविण्यासाठी धडपडत होती.

(कामदा)

**अर्थ द्या मला पृथु यदूपति। बोलूनी असे झोंबली सती।।**
**घेतले पृथु भक्षु लागली। निर्गुणा विभो शक्ती तव भली।।**

कृष्णानी मित्रोत्सव केला. खाऊ-पिऊ घातले. आदर सत्कार केला आणि परत काहीही न देता फाटक्या वस्त्रासह, पोह्याच्या मोकळ्या पुरचुंडीसह सुदाम्याला निरोप दिला.

पुढे नारदमुनी आणि भगवंतांनी गुराख्याचे रूप घेवून सुदाम्याला वाटेत गाठले आणि कृष्णाची निंदा करू लागले.

।। लावणी ।।

**लई कपटी भटूवा। द्वारायतिचा धनी।**
**तुज त्यास भेटण्या सांग। आणविले कुणी।।**
**नाहि चिंधि तुझी उतरली। कशाचा उदार तो बामणा।**
**तोंड पुजे तयाला। म्हणत्यात लई शहाणा।।**
**रांडबाज, चोरटा चारिली गुरे यमुनेच्या तिरी।**
**बदमाश घरी त्या गौळीयांच्या सुंदरी।।**

यावर सुदाम काहीही न बोलता त्या गुराख्यांना म्हणतो, बाळांनो, असे बोलू नका माझ्या परममित्राला. तो फार श्रेष्ठ आहे, मोठा आहे.

।। श्लोक ।।

**शिव शिव शिव बाळा। काय हे बोलतोसी?।।**
**कमलवदन कृष्णा का उगा निंदितोसी?।।**
**चरणि शरण गेल्या त्याचिया मोक्ष लाभे।**
**म्हणुनि वद मुखानी कृष्ण गोपाळ राधे।।**

पुढे देवांनी सुदामदेवास भरभरून दिले. सुदाम नगरी वसवली आणि सर्वत्र आनंदी आनंद झाला.

अशीच रचना प.पू. दासगणु महाराजांनी गोपाळकाला या किर्तनात केलेली आहे.

**होऊनिया निष्काम घ्यावा जानकी जीवन राम।।**
**सार न किमपी या संसारी। अनीतीचे हे धाम।।**
**कोण कुणाचे बाइल भाचे। सर्व धनाचे काम।।**
**दासगणु म्हणे राम जपावा। देईल तोचि आराम।।**

प.पू. दासगणु महाराजांनी शाश्वत सुखाची किल्ली रामनाम जपण्यातच आहे असे ठामपूर्वक सांगितले आहे. सर्व संतांचेही हेच सांगणे आहे. कुठेही काही आध्यात्मिक कार्यक्रम, पारायण, प्रवचन सोहळे झाले की शेवटी त्याचा सांगता समारंभ झाला की शेवट ललिताचे कीर्तनाने अर्थात काल्याचे किर्तनाने होते ही परंपरा आहे.

इतक्या वर्षांची ही परंपरा असून काल्याचे कीर्तन प्रत्येकवेळी नवीन असते. त्यातील आनंद कमी न होता उलट वाढत जातो याची प्रचिती येते. प.पू. दासगणु महाराजांनी यावर स्वरचित काव्यानी स्वतंत्र कीर्तनाचीच रचना केली आहे. भगवान श्रीकृष्णाचा अवतार पूर्णावतार

आहे, तसेच त्यांनी केलेल्या लीला अद्‌भुत असून अगणित आहेत. यावर प.पू. दासगणु महाराज म्हणतात -

**भक्ता पाहून आपुल्या खचित जे वेडेपिसे होतसे।**
**ऐशा अदभुत बालका गणु म्हणे वर्णू तरी मी कसे।।**

राक्षसाच्या त्रासाने त्रस्त झालेल्या भूमातेने श्रीविष्णूंना अवतार घेवून सर्व सज्जनाचे रक्षण करण्याची विनंती केली आणि दुष्टाच्या संहारार्थ श्रीविष्णूंनी पृथ्वीवर अवतार घेतला.

चौपाई

**सात जन्म तव अपूर्ण देवा। आता पूर्ण अवतार धरावा।।**
**लोकांनी हा सदा राहावा। आठवित तव जन्म आठवा।।**
**प्रत्येकाच्या हृदयामध्ये। तव भक्तीचा उदय होवू दे।।**
**श्री नारायण जय नारायण। दुजे न कानी येवो याविण।।**

सर्व सज्जनांच्या प्रार्थनेचा आदर करून भगवंतांनी आपला अवतार भूतलावर घेतला.

**मूल उपजलेले हरी झाला। सान लालसर देह कोवळा।**
**लुकलुकताती इवले डोळे। गर्भजलाने जावळ ओले।।**

वासुदेवांनी श्रीकृष्णांना गोकुळी यशोदा मातेजवळ आणून ठेवले आणि ते गेले आणि गोकुळांत जन्मोत्सव झाला आणि कृष्णाच्या लीला चालू झाल्या. त्यांनी पुतना मावशीला मारले, शकटासूर, संभासूर, बकासूर या राक्षसांना यमसदनी पाठवले. पुतनेचं वर्णन दासगणु करतात-

**वर्ण सावळा जणू कोळसा। दात मुखीचे नांगर जैसा।**
**एकेक बोट दुसरा वासा। वेष तियेचा अभिनव ऐसा।**
**साठ योजने लांबी धडाची। नाक बयाचे गुहा नगाची।**
**खबर घेतली गोकुळाची। गाळण झाली आयाबायांची।**
**स्मृती कुणा नच भगवंताची। श्रीकृष्णाची।**
**थकली वाणी दासगणुची।**

त्याच्या खोड्या पाहून सगळे गोप गोपी म्हणाल्या याला, आता गाईमागे वनांत पाठव.

।। आर्या ।।

**ठेवू नको या कृष्णा सदनि यशोदे वनामध्ये धाडी।**
**हा रूतलेला कंटक होय बरा ना म्हणोनी या काठी।।**

नंद यशोदेने कृष्णाला वनात पाठवले. अन्य गोपाळांना आनंद झाला. रानात ते शिदोरी घेवून जात. गाईंना सोडून फुगडी, विटीदांडू, सुरपाट्या, हमामा, रणघोडा, हातकोपर असा खेळ खेळत आणि थोडी विश्रांती घेवून सर्वांची शिदोरी घेवून एकत्र करत हाच गोपाळकाला. श्रीकृष्णाने हा काला वाटला. स्वर्गातून देव पाहत होते, पण त्यांना तो मिळाला नाही. स्वर्गसुखापेक्षाही याची गोडी अवीट होती. देव माशाचे रूप घेवून नदीत आले, पण भगवंतांनी कुणाला नदीवर पाठवले नाही. कारण नदीत हात धुतल्यावर गोपाळकाल्याचे काही कण देवांना मिळतील.

सर्वांनी आपले हात चड्डीला (टिरीला) पुसले आणि परतले.

प.पू. दासगणु म्हणतात -

।। श्लोक ।।

**काल्याचा मिळता प्रसाद लवही तापत्रया तो हरी।**
**हा काला नच काळ साच समजा पापाप्रती भूवरी।।**
**कष्टावाचूनी मानवा कलियुगी वैकुंठ हा देतसे।**
**बोले दासगणु आम्हा कथियले श्रीनिंबराजे असे।।**

श्री नरसिंह आख्यान, अन्य भागवतातील आख्याने प.पू. दासगणु महाराजांनी स्वरचित काव्यांनी लिहिली आहेत. अभ्यासूनी ती मुळातून वाचावीत.

नांदेड जवळील गोळेगाव येथील गोदावरी नदीकाठी असलेल्या राहेर या गावी त्यांना प्रत्यक्ष नरसिंहांनी दर्शन दिले आहे असे त्यांच्या पुढील दोन काव्य पंक्ती वरून दिसते. या पाई न पाहिला प्रभु आजवरी। उधळली सुरोनी सुमने राहुनी दुरी। प्रल्हाद पाय वंदीता शांत जाहला। तो नरसिंह म्या सिंहासनी देखिला।।

'इदम् न मम' असे म्हणत प्रबोधन, परोपकार आणि पारमार्थिक उन्नती या त्रयीसाठीच दासगणु महाराजांनी आयुष्याचा क्षण न् क्षण कारणी लावला आणि समाजसेवा, राष्ट्रसेवा आणि देवसेवा केली अशा महात्म्याला शतश: प्रणाम!

**श्री. शाम रघुनाथ साखरे**
सुमन निवास, खाणीवरील विठ्ठल मंदिर जवळ,
ब्राह्मणपुरी, मिरज, जिल्हा सांगली - ४१६४१०
फोन : ०२३३-२२२३८४३. मोबाईल : ९८५०३८०५३८

**(संदर्भ ग्रंथ : धर्मयज्ञ दिवाळी अंक २००७, श्रीदासगणु स्मरण महोत्सव २५ वे पुण्यस्मरण स्मरणिका, श्रीमत् सद्‌गुरू श्री दासगणु महाराज प्रतिष्ठान, मु.पो. गोरटे, कीर्तनाख्यान पुस्तिका)**

।। श्रीशंकर ।।

**दासगणुंची नमने :** नमनातील अनन्यता त्यांनी अनेक प्रकारे व्यक्त केली आहेत. खालील नमने लक्षणीय ठरतात -

१) **जग जन आणि जनार्दन । तूच एक परिपूर्ण ।**
**सगुण आणि निर्गुण । तूच की रे मायबापा ।।**
२) **शैव तुलाच शिव म्हणती । ब्रह्म बोलती वेदान्ती ।**
**रामानुजांचा सीतापती । वैष्णवांचा विष्णू तू ।।**
३) **तू आणि रुक्मिणीश । एक तत्त्व आहां खास ।**
**तोय, वारी, म्हटल्यास । काय जली भेद होतो?।।**

या तिन्ही ओव्यांमधून ईश्वराचे व्यापकत्व, मत-मतांतरांचा समन्वय आणि शिव-विष्णू अभेद उत्कटतेने व्यक्त झाला आहे. भाषा साधी-सोपी आहेच पण त्यांची नम्रताही त्यातून प्रगट होते.



# ।। अनाथजनवत्सल ।।

**सौ. वसुधा देशपांडे**
एम.ए., संस्कृत, गृहिणी, प.पू. अप्पांची नात

श्रीदासगणु महाराज म्हटले की, लगेच डोळ्यांसमोर उभी राहते ती त्यांची अजोड कीर्तनपरंपरा, अफाट काव्यसंपदा, अमोल संतकथा आणि त्यांनी घडविलेले अलौकिक, असामान्य व्यक्तिमत्त्व - प.पू. अप्पा। (श्री अ. दा. आठवले / स्वामी वरदानंद भारती). श्रीदासगणु महाराज हे थोर अधिकारी सत्पुरुष होते. रसाळ कीर्तनकार होते, श्रीसाईबाबांच्या आदेशानुसार संतचरित्रे लिहिणारे आधुनिक महिपती होते. तत्त्वज्ञानाचे जाणते होते आणि अनाथजनवत्सल होते.

श्रीदासगणु महाराजांचे आध्यात्मिक आणि वाङ्मयीन सामर्थ्य उभ्या महाराष्ट्रास परिचित आहेच. पण त्यांच्या हृदयाची कोमलता, वत्सलता ही तितकीच थक्क करणारी आहे. रसाळ, मर्मस्पर्शी काव्यरचनेमुळे त्यांचे हृदय एवढे हळूवार झाले होते की मनाच्या कोमलतेमुळे त्यांची काव्यरचना हृदयाचा ठाव घेणारी झाली होती हे ठरविता येणेच अवघड. 'अंतरीचे द्यावे - स्वभावे बाहेरी' याप्रमाणे त्यांच्या हृदयाची वत्सलताच शब्दांचे रूप घेऊन जणू साकार होत होती, उभ्या महाराष्ट्राला परमार्थाची वाट दाखवीत होती, खोडसाळपणा करणाऱ्या मनाला परखडपणे खडसावित होती, तशीच भवतापाने त्रासलेल्या भोळ्या भाविकांना आईच्या मायेने पोटाशीही धरीत होती.

वैयक्तिक आयुष्यातही श्रीदासगणु महाराजांनी एक लेकरू असेच हृदयाशी घट्ट धरून ठेवले होते. वात्सल्याचा अमृतवर्षाव केला होता. त्या वर्षावात चिंब न्हाऊन निघालेले ते लेकरूही तसेच विलक्षण होते. तेजस्वी होते. चंद्राच्या शीतल चांदव्याने प्रखर तेजस्वी, दैदिप्यमान सूर्याला घडविले होते. ते लेकरू होते प. पू. अप्पा, स्वामी वरदानंद भारती, श्रीदासगणु महाराज हे प.पू. अप्पांचे आजोबा होते. सद्गुरू होते. सर्वस्व होते. गुरूशिष्याची ही जोडी सवार्थाने अजोड होती.

श्रीदासगणु महाराज अकोळनेर या गावी श्रीदत्तात्रयपंत आणि सौ. सावित्रीबाई या दाम्पत्याच्या पोटी जन्मास आले. तो शुभदिन होता पौष शु. एकादशी शके १७८९. अतिशय बुद्धिमान असलेल्या बाल गणुला चाकोरीबद्ध शालेय अभ्यासात कधीच गोडी वाटली नाही. त्यात वाईट संगत लागल्याने गणु लावण्या, छक्कड यांचीच रचना करू लागला. पण त्याचे मन मात्र स्वच्छ होते, निर्मळ होते. पैठणीचा अस्सल जर जसा रंगीत वस्त्रासोबत असूनही त्याच्या रंगात रंगत नाही, तसेच श्रीदासगणुंचे बावन्नकशी सोन्यासारखे अस्सल अंतरंग, वाईट संगत, शृंगारिक काव्यरचना यांच्यासह असूनही त्यांच्या रंगात कधी रंगले नाही. ते तसेच पारदर्शी सात्त्विक राहिले. शिक्षणावरून त्यांची काकू एकदा त्यांना फारच टाकून बोलली. हा अपमान मानी श्रीदासगणुंना सहन झाला नाही. त्यांनी घर सोडले आणि पोलिसात नोकरी धरली. नोकरीच्या काळात त्यांची श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर यांच्याशी भेट झाली. वरिष्ठ सरकारी अधिकारी असलेल्या वामनशास्त्रींच्या आध्यात्मिक अधिकारही मोठा होता. त्यांच्याकडून श्रीदासगणुंनी मंत्रोपदेश घेतला. त्यांच्या आयुष्याला निराळे वळण मिळाले. परमार्थाच्या वाटेने वाटचाल सुरू झाली.

श्री वामनशास्त्रींनी सांगितल्याप्रमाणे श्रीदासगणु शिर्डीस गेले. तेथे त्यांना श्रीसाईबाबांच्या विभूतिमत्वाचा अनेकवार प्रत्यय आला. श्रीसाईबाबांनी श्रीदासगणूना पोलिसातली नोकरी सोडायला लावली आणि संतचरित्रे लिहिण्याचा आदेश दिला. संतचरित्रे लिहिताना श्रीदासगणूचे निष्पाप, सात्त्विक मन उचंबळून येऊ लागले. हळूवार अंत:करण भक्तिप्रेमाच्या स्पर्शाने अधिकच कोमल बनले. करुणरसाने ओतप्रोत भरलेल्या काव्यरचना एकामागोमाग एक निर्माण होऊ लागल्या. भाविकांच्या मनाला दिलासा देऊ लागल्या. आश्रय देऊ लागल्या. याच काळात त्यांची चि. दामोदर वामन आठवले या तेरा-चौदा वर्षांच्या मुलाशी भेट झाली. माधुकरी मागणाऱ्या चि. दामुअण्णांची सुधारणांच्या त्या काळातही सोवळ्या ओवळ्यावर असलेली निष्ठा पाहून श्रीदासगणु महाराज प्रभावित झाले. परिस्थितीने नाडलेल्या त्या ब्राह्मण कुमारास श्रीदासगणुंनी आपल्याजवळ ठेवून घेतले. त्याच्यावर पुत्रवत् प्रेम केले. श्री. दामुअण्णांनीही श्रीदासगणुंच्या प्रेमाचा प्रत्येक अंश सार्थ ठरविला. मोत्यासारखे टपोरे हस्ताक्षर असलेल्या श्री दामुअण्णांचा आवाजही मोठा पहाडी होता. अनेक दु:खांनी पोळलेल्या हृदयामुळे त्यांच्या आवाजाला भावस्पर्शी आर्तता लाभली होती. कीर्तनात ते श्रीदासगणु महाराजांना साथ करू लागले आणि कीर्तनाने अनोखी उंची गाठली. करुणरसाने ओथंबलेले

श्रीदासगणु महाराजांचे शब्द आणि श्रीदामुअण्णांचे पहाडी आर्त स्वर यांत श्रोते देहभान हरपून जात. जणू संतकथांची फुले आपल्या शब्दरूपी सूत्रात गुंफून श्रीदासगणुंनी सगुणभक्तीचा सुगंध असलेला सुमनहार निर्माण केला. एकेका फुलाचे सौंदर्य निराळे आणि अनेक फुले एकत्र गोवलेल्या हाराचेही सौंदर्य निराळे. तुळशीच्या मंजिरीप्रमाणे पवित्र पावन असलेल्या अनेकविध रचना आणि संतकथांची फुले यांनी श्रीदासगणु महाराजांनी श्री पांडुरंगाची पूजा बांधली. 'प्रेमाश्रू माझे हेचि जल' असे म्हणत पांडुरंगाचे पाय धुतले. त्यावर भक्तिरूपी चंदन लावले. मायेचा धूप जाळला. मोहरूपी दिवा लावला. क्रोधकर्पूर जाळून विठ्ठलास ओवाळले. अखंड हरिनामाचा नैवेद्य दाखविला. अशा पूजेने पांडुरंगही सुखावला. श्रीदासगणुंचे सारे मागणे त्याने पुरविले. ते मागणे तरी काय होते,

**सदा असावी आनंदी वृत्ती । भजनी तुझ्या राहो प्रीती ।।**
**क्लेश नुपजो कदा चित्ती । कवणाचाही पांडुरंगे ।।**
**नरदेहासी येवोनिया । जावो न तुझा दास वाया ।।**
**धावण्याधाव पंढरीराया । निष्ठुर कदा होऊ नको ।।**

असे म्हटल्यावर पंढरीरायाने निष्ठुर व्हावे तरी कसे! तो धावला... तो पावला... परमेश्वराच्या सर्व व्यापकतेचा अनुभव आलेल्या श्रीदासगणु महाराजांची वृत्ती-

**जे जे माझे भाषण । ते ते देवा तुझे भजन ।**
**तैसे हिंडणे फिरणे जाण । प्रदक्षिणा मायबापा ।।**

अशी एकरूप झाली. श्रीदासगणु आता संत श्रीदासगणु महाराज झाले. त्यांच्या संतत्वाचा अनुभव भोवतालच्या मंडळींना येऊ लागला. चांगदेव पासष्टी, अनुभवामृतमंजिरी या सारख्यात तत्त्वज्ञानपर ग्रंथांच्या रचनेने त्याच्यातील तत्त्ववेत्ताही प्रकट झाला. तत्त्वज्ञान आचरणात आणणारे थोर संत म्हणून साऱ्या महाराष्ट्रात त्यांची ख्याती पसरली.

अहंकाराचा वाराही त्यांना शिवला नाही. स्वत:ला संतांचा दास म्हणवून घेणाऱ्या श्रीदासगणुंचे राहणे अगदी साधे होते. श्रीविठ्ठलाचे नामस्मरणात आनंदात दिवस जात असताना अचानक दैवाने घाला घातला. क्षयाची बाधा होऊन श्री दामुअण्णांचे तरुण वयातच निधन झाले. हा आघात श्रीदासगणु महाराजांनी तर सोसलाच पण श्री दामुअण्णांची पत्नी श्री राधाबाई आणि त्यांची मुले चि. अनंता आणि चि.कु. गंगू यांना भरभक्कम आधार दिला. श्रीदासगणु महाराजांचे छायाछत्र एवढे विशाल होते की, राधाबाईंना अनाथपणाची जाणीव कधी झाली नाही. चि. अनंताला पोरके कधी वाटले नाही.

श्री. दादा आणि चि. अनंता हे आजोबा-नातवाचे नातेच काही वेगळे होते. चि. अनंताचा प्रत्येक हट्ट श्री. दादांनी पुरविला. 'एखादा राजपुत्र काय वाढेल एवढ्या लाडाकोडात पू. दादांनी मला वाढविले' असे खुद्द अप्पांनीच एके ठिकाणी म्हटले आहे. अनाथ म्हणून जग अनंताची हेटाळणी करीत असे पण अनंताला वाटे, 'दादांएवढे प्रेम करणारे, माझे आजोबा असताना मी अनाथ असेनच कसा!' श्रीदासगणु महाराज द्रष्टे होते. अनंताच्या अफाट सामर्थ्याची जाणीव त्यांना नक्कीच झाली असली पाहिजे. या जाणीवेमुळे असेल किंवा त्यांच्या मूळच्याच वत्सल अंत:करणामुळे असेल किंवा पित्याविना वाढणाऱ्या अनंताच्या जबाबदारीमुळे, काळजीमुळे असेल किंवा गतजन्मीचे काही ऋणानुबंध असल्यामुळे असेल श्री. दादांनी चि. अनंतावर अभूतपूर्व अपरंपार प्रेम केले. विश्वातील सारे मातृत्व एकवटले तरी या प्रेमाची, या वात्सल्याची सर त्यास येणे शक्य नाही. संतांची अपार करुणा, मातेचे वात्सल्य आणि पित्याचा दक्षपणा असलेल्या श्री. दादांच्या सावध नजरेखाली चि. अनंता निर्धास्त होता. श्रीकृष्णावर भार टाकून निर्धास्त असलेल्या अर्जुनासारखा. श्री. दादांनी दक्षपणे अनंतास घडविले. त्याच्या लोकोत्तर सामर्थ्यास योग्य दिशा दाखविली. अनंतानेही या प्रेमाचे पांग फेडले. श्री. दादांच्या इच्छेप्रमाणे त्याने आयुर्वेदात मोलाची ग्रंथनिर्मिती केली. श्री अनंतराव आठवले या नावाने सर्वदूर ख्यात झालेल्या अनंताने श्री. दादांचा प्रत्येक शब्द प्रमाण मानला. आपल्या अनंताची संशोधन, वाङ्मय या क्षेत्रांतील भरारी पाहून त्यांना समाधान वाटले. आणि अध्यात्म, धर्म-संस्कृती- परंपरा या क्षेत्रांतील श्री. अनंतरावांच्या कार्याने श्री. दादा कृतार्थ झाले. 'आपणासारिखे करिती तात्काळ' हे वचन श्री. दादांनी सार्थ करून दाखविले.

श्रीदासगणु महाराजांच्या आठवणीने पू. अप्पांचे सर्वांग पुलकित होई. लहानपणी वाट्यास आलेले आजारपण त्यांना मोठे भाग्याचे वाटे कारण आजारी असताना श्री. दादा अनंतावर आपले उपरणे पांघरून त्याच्या डोक्यावरून हात फिरवत बसत. तो अमृतस्पर्श अनुभवास आलेले अप्पा आणि अमृतवर्षाव करणारे श्री. दादा दोघेही अलौकिकच.

श्रीदासगणु महाराज अनेकांचे आश्रयस्थान होते. रक्ताच्या नात्याचे नसले तरी मायेच्या नात्याने जोडलेले त्यांचे कुटुंब मोठे होते. परिवार विशाल होता. वेगवेगळ्या कारणांमुळे अनेक लोक श्रीदासगणु महाराजांकडे रहात होते. त्यांत विशेष उल्लेखनिय असे तिघे म्हणता येतील. ते म्हणजे श्री. छगनराव बारटक्के, हभप श्री तुकारामबुवा आजेगावकर आणि श्री रामचंद्रपंत डोंगरे (श्री. डोंगरेमहाराज).

श्री छगनकाकांना लहानपणी शिक्षणाची आवड नव्हती. उलट पैसे चोरून, शाळा बुडवून सिनेमा बघण्याचा त्यांना नाद होता. त्यांच्या वडिलांनी छगनच्या सुधारण्याची आशाच सोडून दिली होती. संतापलेल्या वडिलांकडून बेदम मार खाताना छगनचे कळवळून ओरडणे श्री. दादांना सहन झाले नाही. त्यांचे अंत:करण द्रवले आणि त्यांनी छगनला आपल्याजवळ ठेवून घेतले. त्याच्यावरही अलोट माया केली. हळूहळू छगनला आपली चूक समजत गेली. श्री. दादांसारख्या संतांचे म्हणणे ऐकण्यातच आपले हित आहे हे त्याला उमगले आणि त्याचे भाग्य पालटले. *सगळ्यांच्या तिरस्कारास पात्र असणारा छगन सगळ्यांच्या आदराचे प्रेमाचे स्थान बनला. छगनकाका बनला.* श्री. छगनकाकांनी मारुतीरायाच्या सेवकभावाने श्री. दादांची निरलस सेवा केली. आपल्या मधुर आवाजाने पू. अप्पांना कीर्तनात सुरेल साथ केली. श्री. दादांनी छगनकाकांना घडविले तेही प्रेमानेच. करडी शिस्त, जबर धाक यांचा

कुठेही वापर न करता मनुष्याच्या मूळच्याच सद् - चित् ला साद घालून ते आनंदरूप बनविता येते हे श्री. दादांनी दाखवून दिले.

मातेचे प्रेम जसे निरपेक्ष असते, ते रूप, गुण यांची पर्वा न करता आपल्या तान्हुल्यावर जसे वर्षत असते तसेच श्री. दादांचे आपल्या परिवारावर आणि साऱ्या मनुष्यमात्रावर निरलस प्रेम होते. या प्रेमाने वात्सल्याने त्यांनी लोकांना घडविले. सन्मार्गाकडे वळविले. त्यांचे अमर वाङ्मय आजही दीपस्तंभासारखे उभे आहे. वाट चुकलेल्यांना मार्गदर्शन करीत आहे. पोळलेल्या जीवांना आईप्रमाणे हृदयाशी धरीत आहे. त्यांच्या वाङ्मयमूर्तीच्या आश्रयास आपण जाऊ. अमृताचा वर्षाव होतोच आहे त्यात आपणही चिंब न्हाऊ. आपण भाग्यवान आहोतच... भाग्याची अनुभूतीही घेऊ...

आपलेही आयुष्य निश्चितपणे घडेल! अनाथजनवत्सल श्रीदासगणु महाराज तसे आश्वासनच देत आहेत.

**- सौ. वसुधा देशपांडे**
अमेरिका.

***





# श्री दासगणु महाराजांची श्रीपासष्टी भावदीपिका

**डॉ. कल्याण काळे**

संत साहित्यात पीएच.डी. (परांडे येथील हंसराज स्वामी) पुणे विद्यापीठात रीडर म्हणून काम केले. पुणे विद्यापीठात मराठी विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. शोध निबंधासाठी १५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. स्वामी हंसराज यांच्या वाङ्‌मयावर ४ पुस्तकांचे लिखाण आणि दोन पुस्तकांचे काम चालू.

श्री दासगणु महाराजांना आपण आधुनिक महीपती म्हणून ओळखतो. त्यांनी लिहिलेल्या संतचरित्रांच्या पार्श्वभूमीवर त्यांना ही पदवी शोभणारी आहे. पण त्यांच्या या चरित्रलेखनामुळे वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू म्हणवणारे काही विद्वान त्यांच्याकडे उपेक्षेने पाहत असत. एका प्रसिद्ध प्रवचनकाराने त्यांना काऊ चिऊच्या गोष्टी सांगणे बंद करून अध्यात्माचा अभ्यास करायला सांगितले. त्या प्रवचनकाराने त्यांना आपल्याजवळ राहून अध्यात्माचे धडे गिरवण्यासही सांगितले. दासगणु महाराजांना त्यांचा अनौचित्यपूर्ण सल्ला आवडला नाही. 'पांडुरंगाची कृपा असेल तर मी स्वप्रयत्नाने आध्यात्मिक ग्रंथ लिहीन. त्यासाठी आपल्याकडे राहून अध्यात्माचे धडे घेण्याची मला गरज वाटत नाही' असे बाणेदार उत्तर देऊन त्यांनी त्या प्रवचनकाराला गप्प बसविले. बोलल्याप्रमाणे त्यांनी खरोखरच एक नव्हे, दोन नव्हे तर तब्बल पंधरा आध्यात्मिक ग्रंथांची निर्मिती करून दाखवली आणि वारकरी पंथातील त्यांना उपेक्षेने वागवणाऱ्या इतर विद्वानांची तोंडे बंद केली. केशवमहाराज देशमुखांसारखे अधिकारी विद्वानही त्यांना सन्मानाने वागवू लागले. या पंधरा ग्रंथांपैकी चार अपूर्ण टीका धरून एकूण अकरा टीका संस्कृत ग्रंथांवरील टीका आहेत तर तीन टीका मराठी ग्रंथांवरील आहेत आणि एक टीका हिंदी ग्रंथावरील आहे. दासगणु महाराजांच्या या सर्वच टीका अत्यंत प्रासादिक आणि रसाळ आहेत. ती त्यांची ग्रंथलेखनाची शैलीच झाली आहे. विशेष म्हणजे संस्कृतचे औपचारिक शिक्षण घेतले नसतानाही त्यांनी अकरा संस्कृत ग्रंथांवर अतिशय सुबोध अशा टीका लिहिल्या आहेत. त्या त्यांच्या संस्कृतवरील प्रभुत्वाच्या आणि अध्यात्मातील अधिकाराच्या निर्देशक आहेत. मराठीतील दोन टीका ज्ञानेश्वर महाराजांच्या अनुक्रमे अमृतानुभव आणि चांगदेव पासष्टी या दोन ग्रंथांवरील असून तिसरी समर्थ रामदासांच्या दासबोध या ग्रंथावरील आहे. ते समर्थ संप्रदायाचे असूनही त्यांचे वारकरी संप्रदायावरही तेवढेच प्रेम होते. त्यांची दृष्टी समन्वयाची होती. आता या लेखात त्यांच्या 'श्रीपासष्टी भावदीपिका' या ग्रंथाचा परिचय करून घ्यावयाचा आहे.

चांगदेव पासष्टी हे या ग्रंथाचे मूळ नाव नाही. तसा तो ग्रंथही नाही. ते एक पत्र आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी चांगदेवांना उद्देशून पासष्ट ओव्यांचे जे पत्र लिहिले त्यालाच लोकरूढीने, चांगदेवपासष्टी असे नाव प्राप्त झाले आहे. चांगदेवांचे सविस्तर चरित्र उपलब्ध नाही. पण ते तापी आणि पयोष्णी या नद्यांच्या संगमस्थानी प्रगट झाले. ते स्थळ त्यांच्याच नावाने प्रसिद्ध आहे. ते वटेश्वराचे म्हणजे शिवाचे मंदिर आहे. त्यामुळे चांगदेवांना 'वटेश्वर चांगा' म्हणून ओळखले जाते. त्यांनी योगसामर्थ्याने मृत्यूवर मात केली होती. ते १४०० वर्षे तपश्चर्या करीत होते. त्यांना अनेक सिद्धी प्राप्त झाल्या होत्या. अनेक शिष्य त्यांना मिळाले होते. सर्व शास्त्रात त्यांना गती होती. त्यांना संगीत कलेची ही आवड होती. सर्व सुखे त्यांना प्राप्त होती. पण चांगदेवांना त्यात समाधान वाटत नव्हते. बाहेरून वैभवसंपन्न जीवन ते जगत होते पण मनात मात्र ते अस्वस्थ होते. त्यांना वटेश्वराची कृपा प्राप्त झाली नव्हती. अशा परिस्थितीत श्री ज्ञानेश्वर महाराजांची कीर्ती त्यांच्या कानावर आली. त्यांना ज्ञानेश्वरांना भेटण्याची इच्छा झाली. त्या ऊर्मीसरशी त्यांनी ज्ञानेश्वरांना पत्र लिहावयास घेतले. या ज्ञानेश्वरांना तीर्थरूप म्हणावे की चिरंजीव या प्रश्नाशी ते अडून बसले आणि शेवटी काहीच न लिहिता कोरेच पत्र त्यांनी ज्ञानदेवांकडे पाठविले. ज्ञानेश्वरांच्या सर्व भावंडांनी ते पत्र पाहिले. सर्वांना गंमत वाटली. पण मुक्ताबाई मात्र फटकळपणाने बोलून गेल्या 'चौदाशे वर्षेतप करूनही चांगदेव कोराच राहिला की!' पण निवृत्तीनाथांनी त्याचा वेगळाच अर्थ लावला. ते म्हणाले, "चांगदेव मनाने कोरा आहे. त्याचे अंत:करण निर्मळ आहे." असे म्हणून त्यांनी ज्ञानदेवांना चांगदेवाला उद्देशून पत्र लिहायला सांगिले. ज्ञानदेवांनाही चांगदेवांचा अधिकार कळून आला होता. त्यांनी अगदी आपुलकीने मोठ्या जिव्हाळ्याने चांगदेवांना त्यांच्या अधिकाराला धक्का न लावता पत्र लिहिले. हीच चांगदेव पासष्टीची पार्श्वभूमी!

ज्ञानेश्वर महाराजांच्या नावावर २४-२५ ग्रंथ सांगितले जातात. परंतु त्यातील विषय, भाषा आणि शैली पाहता हे सगळेच्या सगळे ग्रंथ ज्ञानेश्वरांचे नसावेत असे विद्वानांचे मत आहे. वारकरी संप्रदायाची परंपराही ज्ञानेश्वर महाराजांच्या ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, चांगदेव पासष्टी आणि अभंगांची गाथा एवढ्याच ग्रंथांना प्रमाण मानते. ते ग्रंथ याच

क्रमाने लिहिले गेले असावेत अशी परंपरेची धारणा आहे. ज्ञानेश्वरीत भक्ती, कर्म, ज्ञान आणि योग या सर्व मार्गांचा समन्वय साधणारे समावेशक धोरण ज्ञानेश्वरांनी सांभाळले आहे. अमृतानुभवात ज्ञानेश्वरीत सांगितलेले गाभ्याचे तत्त्वज्ञान त्यांनी मांडले आहे. आणि चांगदेव पासष्टीत त्याही तत्त्वज्ञानाचे सार त्यांनी सांगितले आहे. अशी ही ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची प्रस्थानत्रयी आहे. चांगदेव पासष्टीत त्या तत्त्वज्ञानाचे सार एकवटले आहे. म्हणून तो ग्रंथ आकाराने लहान असला तरी तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अतिशय महत्वाचा आहे. तो अल्पाक्षर रमणीय तर आहेच पण त्यातील विचारांची थोरवी तो एका अत्युच्च उदात्त पातळीवरून लिहिलेला ग्रंथ आहे हे लक्षात येते. तो संवादशैलीत लिहिलेला असून त्यात नाट्यात्मकता आहे. प्राचीन काळातील उपनिषदांच्या शैलीचा गोडवा त्यात उतरला आहे. म्हणून डॉ. व दि. कुलकर्णी, स्वामी शिवतत्त्वानंद या विद्वानांनी पासष्टीचा 'ज्ञानेश्वरोपनिषद' म्हणून गौरव केला आहे. डॉ. प्रभाकर अडसुळे यांना तर तिच्यात आधुनिक नवविज्ञानाची बीजे सापडली. त्यांनी तिच्यात प्रकाशपुंज सिद्धान्त, अणुविघटन आणि सापेक्षतावाद या नवविज्ञानातील संकल्पनांशी तिचा संबंध जोडला आहे.

ज्ञानेश्वरांनी चांगदेवांना हे जे पत्र लिहिलेले आहे, त्याचे काही विशेष नजरेत भरतात. चांगदेवांनी पत्रारंभी चिरंजीव लिहायचं की तीर्थरूप अशा प्रकारच्या समस्येनं गोंधळून जाऊन ज्ञानेश्वरांना पत्र कोरंच पाठवलं. पण ज्ञानेश्वर जेव्हा त्या कोऱ्या पत्राला उत्तर लिहायला बसले. त्यावेळी त्यांना असा प्रश्न मुळीच पडला नाही. त्यांनी सरळ चांगदेवाच्या आराध्य दैवताचा म्हणजे श्रीवटेशांचा निर्देश करून 'स्वस्ति' या शब्दाने क्षेम कळविले आणि ते मोकळे झाले. त्यांनी सरळ विषयाला सुरुवात केली. चांगदेवांनी कोरेच पत्र पाठविले आणि ज्ञानेश्वरांनी मौनाची अक्षर लिहिली. त्या अक्षरातून अरूपाचे रूप स्पष्ट केले. या पत्राच्या निमित्ताने त्यांनी आणखी एक औचित्यपूर्ण गोष्ट केली. त्यांनी चांगदेवाच्या मर्मालाच हात घातला. त्यांनी लिहिलं 'स्वस्ति श्रीवटेशु'. वटेशु हे शंकराचे नाव ते चांगदेवांचे आराध्य दैवत. त्याचा पत्रारंभीच अनपेक्षितपणे निर्देश करून त्यांनी चांगदेवांच हृदय जिंकलं आणि आपला त्यांच्याबद्दलचा मित्रभाव व्यक्त केला. पुढेही सदतिसाव्या ओवीत 'तया तू पुत्र वटेश्वरा'चा असा त्याचा गौरव करून तो मित्रभाव आणखी दृढ केला. एक ते छत्तीस या ओव्यांत या पत्राचा पूर्वार्ध पूर्ण झाला आहे. या पूर्वार्धात त्यांनी वटेश्वराचंच तात्त्विक पातळीवरून वर्णन केले आहे. त्यांनी या पूर्वार्धात चांगदेवाला 'तत्त्वमसि' या उपनिषद्वाक्याचा उपदेश केला आहे. त्यामध्ये वटेश हेच विश्वाच्या मुळाशी असलेलं अंतिम तत्त्व असल्याचे सांगून त्याचंच वर्णन या छत्तीस ओव्यांमध्ये केलं आहे. आपल्या आराध्य दैवताचा एवढा आदरपूर्वक उल्लेख पाहून चांगदेवांना किती कृतज्ञता वाटली असेल. ज्ञानदेवांनी आपला हा मित्रभाव आणखी एका वेगळ्या प्रकाराने व्यक्त केला आहे. चांगदेवाबद्दल अरे-तुरेची भाषा वापरून त्यांनी आणखी जवळीक वाढवली आहे. त्याबरोबरच सखया, चांगया अशा प्रेमळ संबोधनांनीही ती जवळीक अधिक दृढ केली आहे. ज्ञानदेवांच्या अशा प्रकारच्या भाषाव्यवहाराने हे दोघेजण एकदम जवळ आले आणि त्यांच्यातील हृदयसंवाद अधिकच हृद्य झाला.

या ग्रंथात प्रामुख्याने ब्रह्मात्मैक्य, विश्वाची उत्पत्ती, आत्मा आणि विश्व यांचे संबंध या प्रकारच्या विषयाचा ऊहापोह झाला आहे. विश्वाच्या उत्पत्तीसंबंधात भारतीय दर्शनात तीन प्रकारची मते मांडण्यात आली आहेत. त्यांना वाद असे म्हणतात. हे तीन वाद म्हणजे आरंभवाद परिणामवाद आणि विवर्तवाद हे होत. त्यापैकी वैज्ञानिकांनी सृष्टीची उत्पत्ती स्पष्ट करताना आरंभवाद (Theory of creation) स्वीकारला आहे. एखाद्या कार्याच्या निर्मितीसाठी अनेक कारणांची अपेक्षा असते. तेव्हा त्या निर्मितीप्रक्रियेला आरंभवाद असे म्हणतात. घराच्या निष्पत्तीला मृत्तिका, कुंभार, कुंभाराचे चाक, पाणी इ. अनेक कारणे उपस्थित असावी लागतात. हे आरंभवादाचे उदाहरण होय. या प्रकाराने निष्पन्न होणारे कार्य सर्व कारणांपेक्षा नवेच असते. सांख्यांनी परिणामवादाचा स्वीकार केला आहे. (Theory of transformation) कारण नष्ट होऊन कार्यामध्ये त्याची परिणती होते. कारण नष्ट होते आणि कार्य निर्माण होते. दुधाचे दही होताना दुधाची परिणती दह्यामध्ये होते. हे परिणामवादाचे उदाहरण होय. अद्वैत वेदान्तात मात्र या दोन्ही वादांचा विचार न स्वीकारता विवर्तवादाचा स्वीकार केला जातो. (Theory of illusion). मूळ कारणात काहीही विकार न होता त्याजागी तद्भिन्न अशा वेगळ्याच भासमान कार्याची निर्मिती होते. येथे मूळ कारण अविकृत असते. त्यात भासलेली विकृती ही आभासित असते. त्यामुळे ती मिथ्या म्हणजे नश्वर असते. दोरीच्या जागी सर्प दिसणे, शिंपल्याच्या जागी चांदी दिसेण ही या संदर्भातील उदाहरणे होत. या वादाला मायावाद असे म्हणतात. तो शंकराचार्यांच्या नावाने प्रसिद्ध आहे. मायावादी विचारसरणीनुसार ब्रह्म हेच एकमेव सत्य असून त्याच्याजागी दिसणारे विश्व हा त्यावरील विवर्त असून तो मिथ्या आहे. 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' असं म्हटलं गेलेलं आहे. अद्वैत वेदान्ताच्या प्रतिपादनामध्ये विवर्त दोन प्रकारचा मानतात. अधिष्ठानाला आवृत्त करणारा म्हणजे झाकून टाकणारा तो आवृत्त विवर्त होय. उदा. रज्जूच्या जागी दिसणारा सर्प हे आवृत्त विवर्ताचे उदाहरण आहे. अधिष्ठानाला न झाकता होणारा विवर्त हा अनावृत्त विवर्त होय. सुवर्ण आणि अलंकार, पाणी आणि त्यावरील तरंग ही त्याची उदाहरणे होत. या मतानुसार ब्रह्म सत्य आहे तसेच जगही सत्य आहे. जग हे ब्रह्माचाच विलास आहे. या पक्षाला चिद्विलासवाद असे म्हटले जाते. गुलाबराव महाराज यालाच अनध्यस्त विवर्त म्हणतात. ज्ञानेश्वर महाराजांच्या अमृतानुभव चांगदेव पासष्टी या ग्रंथात या पक्षाचे विवेचन आढळते. ज्ञानेश्वरीत सुद्धा चौदाव्या अध्यायात हाच पक्ष त्यांनी मांडला आहे. पण ज्ञानेश्वर सुद्धा अनेकवेळा मायावादी दृष्टान्तांच्या साहाय्याने विवेचन करताना आढळतात. शंकराचार्यांना मायावादी म्हणतात. पण ते सुद्धा अनेक ठिकाणी अनध्यस्त विवर्त अथवा चिद्विलासवादी दृष्टान्त देतात. शंकराचार्य दुःखनिवृत्ती कशी करावी यासाठी अध्यस्त विवर्ताच्या दृष्टान्तांनी विवेचन करतात पण

परमानंद प्राप्तीसाठी अनध्यस्त विवर्ताचा मार्ग अवलंबताना दिसतात. उदा.

**'दन्तिनि दारुविकारे दारु तिरोभवति सोऽपि तत्रैव।**
**जगति तथा परमात्मा परमात्मन्यपि जगत्तिरोधत्ते।।'**

वास्तविक आज भासवलं जातंय तसं मायावाद आणि चिद्विलासवाद यात विरोध नाहीच. उलट ते वेदान्ताच्या यथार्थ आकलनासाठी परस्परपूरक आहेत. विश्वातील नानात्वाचा निषेध करत करत सत्यस्वरूपाची सिद्धी करणे यास व्यतिरेक पक्ष म्हणतात. मायावादी विवेचन या पद्धतीचं असतं आणि ब्रह्मीभूत अवस्थेकडून विश्वाचा विचार करताना ब्रह्माच्या विभुत्वामुळे सर्व विश्वच त्यात समाविष्ट असल्याचं जाणवतं. हा अन्वयपक्ष होय. ज्ञानेश्वर महाराज अमृतानुभवात म्हणतात 'इथे स्फूर्तिचिये कडो। नाही स्फूर्तिमात्र वाचौनि।।'

(अमृता. ७.२४४) अशा प्रकारे अन्वयव्यतिरेकाच्या साहाय्याने सिद्धान्ताची मांडणी करण्याची प्राचीन ग्रंथकारांची पद्धत होती. चांगदेव पासष्टीत ज्ञानदेव ब्रह्मरूपाच्या अंगाने विश्वाकडे पाहात आहेत. त्यामुळे त्यांना विश्वाचे नानात्व, त्याचे विकारित्व, नश्वरत्व या गोष्टी जाणवत नाहीत. त्यामुळे या ग्रंथाची मांडणी अन्वय पद्धतीची आहे. तथापि प्रसंगपरत्वे याही ग्रंथात त्यांनी मायावादी व्यतिरेक पद्धतीचा अवलंब केलेला आढळतो. उदाहरणच द्यायचे झाल्यास चांगदेव पासष्टीच्या पहिल्या दोन ओव्या मायावादी पद्धतीच्या आहेत.

चांगदेव पासष्टी या ग्रंथाचे दोन भाग पडतात. एक ते छत्तीस या ओव्यांचा पूर्वार्ध आणि सदतीस ते पासष्ट या ओव्यांचा उत्तरार्ध. पूर्वार्धात चांगदेवांचे आराध्यदैवत जे वटेश्वर त्यालाच मुख्य आत्मतत्त्व समजून त्याचे स्वरूप स्पष्ट केले आहे. उत्तरार्धात तेच आत्मतत्त्व चांगदेवांच्या आणि ज्ञानदेवांच्या ठिकाणी व्यापून असल्यामुळे त्या दोन व्यक्ती दिसत असल्या तरी त्या वस्तुत: एकच आहेत. अशावेळी त्या दोघांची भेट ही केवळ शाब्दिक आणि औपचारिक ठरते. या दोघांच्या अभेद्य ऐक्याचा विचार चांगदेवांच्या मनावर ठसविला आहे. या मुख्य विचाराची मांडणी ज्ञानेश्वर महाराजांनी निरनिराळे दृष्टांत देऊन अतिशय प्रभावी पद्धतीने केली आहे. वर सांगितल्याप्रमाणे ही मांडणी साहजिकच चिद्विलासवादी किंवा अनध्यस्त विवर्ताची अथवा अन्वय पद्धतीची झाली आहे. मधून मधून कोठेकोठे मायावादी विचारही डोकावतो.

दासगणु महाराजांनी या सर्व पासष्ट ओव्यांचा भावार्थ अधिक स्पष्ट करून सांगितला आहे. ज्ञानेश्वर महाराजांचे दृष्टांत प्राचीन भाषेमुळे व त्यातील सूक्ष्मार्थ प्रतिपादनामुळे आज समजायला कठीण वाटतात. ते दासगणु महाराजांनी त्यांच्या आशयाला धक्का न लावता आजच्या भाषेमध्ये आणि विस्तारपूर्वक उलगडून सांगितले असल्यामुळे ही टीका खरोखरच भावदीपिका झाली आहे. ती विस्ताराच्या दृष्टीने मूळ ग्रंथाच्या नऊपट झाली आहे. त्यामुळे ती अधिक सुबोध झाली आहे. दासगणु महाराजांच्या या टीकेचे स्थूल मानाने चार भाग पडतात. पहिल्या सतरा ओव्यांच्या भागात त्यांना नमन केले आहे. दुसऱ्या अठरा ते दोनशे चौसष्ट या ओव्यांच्या भागात या टीकेचा पूर्वार्ध आला आहे. दोनशे पासष्ट ते चारशे चव्वेचाळीस या ओव्यात सदोतीस ते साठ या मूळ ओव्यांवरील टीका आहे. एकसष्ट ते पासष्ट या भागात पासष्टीचा समारोप आहे. त्यावर दासगणु महाराजांच्या चारशे पंचेचाळीस ते पाचशे त्र्याण्णव म्हणजे एकशे अठ्ठेचाळीस ओव्या आल्या आहेत. त्यामुळे शेवटच्या या भागात दासगणु महाराजांनी स्वतंत्र विषयांचा समावेश केला आहे.

नमनाच्या भागात दासगणु महाराजांनी पांडुरंग, तुळजा भवानी, समर्थ रामदास, तुकाराम महाराज, श्रीसाईबाबा, त्यांचे गुरू श्री वामनशास्त्री इस्लामपूरकर यांना वंदन केले आहे. त्यानंतर शेवटी ज्ञानेश्वर महाराजांना वंदन केले आहे. त्यांचे वर्णन करताना त्यांनी अध्यात्माचा पंचानन, संतमालेचा मेरूमणी, महाराष्ट्र भाषेचे भूषण, इंद्रायणी तट विहारी अशा शब्दात केले आहे.

पहिल्या दोन ओव्यात वटेश्वराचे आत्मतत्त्वाशी एकरूपत्व कल्पून त्याचे व्यतिरेक पद्धतीने वर्णन केले आहे. वटेश्वर जेव्हा प्रकट असतो तेव्हा जग लोप पावलेले असते आणि वटेश जेव्हा लपलेला असतो तेव्हा जग हे प्रकट रूपात असते. पण प्रत्यक्षात तो लपलेला नसतो. कारण तोच स्वत: जगरूपाने प्रकट झालेला असतो. त्यासाठी त्याला काहीच व्हावे लागत नाही की करावे लागत नाही. कारण तो स्वत:च जगरूपात आहे. मृत्तिकेचा घट केला तरी मृत्तिका घटात असतेच. सूर्याचा उदय होत नाही. तसाच अस्तही होत नाही. त्याप्रमाणे आत्मवस्तू ही प्रकटही नसते अथवा झाकलेलीही नसते. ती सर्व विश्व व्यापून असते. आत्माच नाना रूपांनी नटलेला असला तरी त्याच्या ठिकाणी नामरूपे नसतातच. त्याच्या ठिकाणी आकार, विकार, नामे रूपे यापैकी काहीच नसते. आपल्याला वस्तूच्या ठिकाणी नामे रूपे जाणवतात ती अज्ञानाने होत असे दासगणु महाराज मानतात. (ओवी ४५).

याच गोष्टीच्या स्पष्टीकरणार्थ जग आणि आत्मवस्तू यांच्या संदर्भात त्यांनी दागिने आणि सुवर्ण यांचा दृष्टांत दिला आहे. सोन्याचा दागिना बनवला तरी दागिन्यामध्ये सोने असतेच. त्याप्रमाणे नामरूपात्मक जगाच्या रूपाने आत्मवस्तूच नटलेली असते. आता मृत्तिकेचे घटरूप, सुवर्णाचे अलंकाररूप, जलाचे तरंगरूप ही सर्व क्षणिक असतात. त्यांची स्थिर शाश्वत रूपे अनुक्रमे मृत्तिका, सुवर्ण आणि जल हीच असतात. तसे जगत् हे मिथ्या (अशाश्वत) असून परमात्मरूपच स्थिर आणि शाश्वत असते. पण या घट, अलंकार, लाटा यांच्यात मूळ मृत्तिका, सुवर्ण आणि जल या वस्तू असतातच. तसेच जगाच्या विविधरूपात परमात्म्याचे अस्तित्व असतेच. जग आणि परमात्मा कधीही भिन्न नसतात. चंद्र आणि त्याच्या कला, अग्नी आणि ज्योत यात अभेदच असतो. कला, ज्योत इ. नामरूपे म्हणजे केवळ वाणीचा विलासच आहे. त्याला दासगणु महाराज वाचारंभण असे म्हणतात.

याच संदर्भात ज्ञानेश्वरांनी अग्नी आणि ज्योत यांचा दृष्टांत दिलेला आहे. (वन्हि दीपपणे आन न होये ओ.७) यात अग्नी द्रष्टा असून दीप हे दृश्य आहे. हे दोन्ही भेद जाणवत असले तरी अग्नीच्या ठिकाणी भेदाची वार्ता नसते. ज्योतरूपाने अग्नीच असतो. वस्त्ररूपाने सूतच असते.

घटाच्या रूपाने मृत्तिकाच असते. ज्योतीला, सुताला अथवा घटाला त्यांच्या मूळ कारणापेक्षा स्वतंत्र अस्तित्व नसते. या वस्तू केवळ उपरोधिक होत असे दासगणु महाराज म्हणतात. उपरोधिक वस्तू स्वयंसिद्ध नसतात.

आत्म्याला ज्ञानेश्वर महाराज आणि दासगणु महाराज दृष्टांत असे म्हणतात. कारण तो द्रष्टा आणि दृश्य यांच्यापेक्षा निराळाच असतो. द्रष्टा आणि दृश्य ह्या वस्तू परस्पर सापेक्ष आहे. आत्मा त्यांच्यापेक्षा वेगळा आहे. तो ज्ञाता आणि ज्ञेय यांच्यापेक्षाही वेगळाच असतो. तो केवळ ज्ञानरूप असतो. भिंतीवरील चित्रे बदलत राहतात. भिंत मात्र स्थिर असते. नामरूपात्मक जग बदलत असते पण आत्मा अविकारी असतो. तो आकाररहित असतो. आकार तेवढे भासमय असतात. 'भासात्रिया पलीकडे। आकारी' काही न सापडे। नामरूप हे रोकडे। आहे विबुध हो मायामयी ।। (११४)

गुळाची ढेप म्हणजे गोडी नव्हे. गोडी ढेपीपेक्षा वेगळीच असते. त्याप्रमाणे संविद (ज्ञानरूप) आत्मा जगापेक्षा वेगळा असतो. वस्त्र हे घडीच्या रूपात दिसते. पण घडी म्हणजे वस्त्र नव्हे. घडीचा आकार बदलल्याने वस्त्राचे वस्त्रपण बिघडत नाही. तसे आत्म्याचे आत्मत्व जगाच्या नानात्वामुळे बिघडत नाही. अविकृत आत्म्याला नामरूप कशामुळे प्राप्त होते. आत्म्याच्या स्फुरणामुळे त्याच्या ठिकाणी नामरूपे निर्माण होतात असे दासगणु महाराज म्हणतात.

जे अवाढव्य जगत। जे जगरूपात्मक भासत।

तेच आत्म्याचे स्फुरण सत्य। सुखदुःखातील असे ।। (१२६)

सुखदु:खे देखील कल्पनाजनित असतात. सुख तेही भ्रामक। दु:ख तेही भ्रामक। भ्रमावीण तेथे देख। आन काही असेना। (१२८) सुख म्हणजे दु:खाचा प्रतियोगी. ते दोन्ही शब्द परस्पर सापेक्ष आहेत. आत्मा या सापेक्षधर्मापेक्षा वेगळा असतो. आत्म्याच्या स्फुरणामुळे दृश्य द्रष्टा दर्शन अशी त्रिपुटी निर्माण होते. ही त्रिपुटी असली तरी त्या तीन्ही घटकात एक आत्माच असतो. पांढरे, गोड आणि पातळ अशा तीन रूपात एक दूधच असते. तद्वत् द्रष्टा, दृश्य, दर्शन अशा त्रिविध रूपात एक आत्माच नांदत असतो.

समुद्रात पाण्याच्या लाटा उठतात. पण लहर पकडायला गेलो तर पाण्याखेरीज हाती काहीच लागत नाही. त्यात लहरी अथवा लाट हिला स्वतंत्र अस्तित्व नाही. लाट म्हणजे पाण्याचेच स्फुरण होय. त्याप्रमाणे ब्रह्मांड म्हणजे आत्म्याचेच स्फुरण होय. (२०७) ब्रह्मांडाला आत्म वस्तूशिवाय अस्तित्व नाही. आत्मवस्तूचे अस्तित्व म्हणजे काष्ठातील सुप्त अग्नी, वाद्यातील अप्रकट ध्वनी याप्रमाणे होय. म्हणून तिला दृङ्गात्र म्हटले आहे. डोळ्यातील बुबुळ डोळ्याला दिसत नाही म्हणून ते नसतेच असे म्हणता येत नाही. अंधार हा प्रकाशाचा प्रतियोगी आहे. पण अंधार आणि प्रकाश दोन्हीही एका दृङ्गात्रामुळेच अस्तित्वात येतात. पण दृङ्गात्र स्वत:ला पाहू शकत नाही. म्हणून ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

यालागी मौनेंचि बोलिजे। काही न होनि सर्व होई जे।

नव्हता लाहिजे। सर्व काही ।।३३ ।।.

दासगणु महाराज म्हणतात "म्हणजे मौन हेच भजन। सहजस्थितीमाजी राहणे। हेच आहे आचरण। ये ठायी ।। २४५ ।।

आत्मस्वरूप हे स्वयंसिद्ध असते. त्याचे ज्ञान होण्यासाठी अन्य साधनांचा उपयोग होत नाही. आत्म्याचा आहेपणा सिद्ध करण्याची आवश्यकता नाही. कारण आत्म्याच्या ठिकाणी नाहीपणाला वावच नाही. (२६५) येथे दासगणु महाराजांच्या टीकेचा पूर्वार्ध संपतो.

वटेश्वरांचे आत्मस्वरूप दृष्टातांच्या साहाय्याने यथार्थ रीतीने स्पष्ट केल्यानंतर ज्ञानेश्वर महाराज आता चांगदेवाला सांगत आहेत की त्या वटेश्वराचाच तू पुत्र आहेस. कापूर आणि कापराच्या कणात वस्तुत: काहीच फरक नाही. दोन्हीही कापूरच. त्याप्रमाणे वटेश्वराचा पुत्र (शिष्य अथवा भक्त) आणि वटेश्वर दोन्हीही एकच आत्मतत्त्व होत आणि आत्मतत्त्वाच्या ठिकाणी तर भेद मुळीच नसतो. माझ्याही ठिकाणी तेच आत्मतत्त्व असल्याने तू आणि मी दोघेही सारखेच आहोत. आपल्या दोघांमध्ये आत्मैक्य आहे. त्यामुळे आपली दोघांची भेट आत्म्याच्या पातळीवर अगोदरच झाली आहे. तेव्हा आता औपचारिक भेटीचे प्रयोजनच राहिलेले नाही.

चांगदेवा, तुझी माझी भेट म्हणजे तळहाताने तळहाताला भेट देणे होय. दोन्ही तळहात एकाच शरीराचे अवयव होत. तसेच आपण एकाच आत्म्याचे अंश आहोत. ऐक्य परमात्मस्वरूप तूही। आणि तैसाच आहे मीही। तू मी हा भेद पाही। अविद्येने वाटत ।।२९० ।।

तेव्हा 'तू मी' ची भाषा अविद्याजनित आहे. या अविद्येचा नाश कसा होतो?

अविद्येचा विसर पडणे। म्हणजे अविद्या स्वरूपा येणे। आणि आत्म्याचे ज्ञान होणे। म्हणजेच आहे नाश तिचा ।।२९३ ।। या ठिकाणी दासगणु महाराज अविद्या अथवा अज्ञान स्वीकारताना दिसतात. तसेच त्या अज्ञानाच्या परिहारासाठी 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' या ज्ञानमार्गी तत्त्वाचा पुरस्कार करताना दिसतात. पुढे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, की दोघेही एकाच आत्मतत्त्वाचे अंश असल्याने दोघेही सारखेच आहात. तेव्हा आपली भेट म्हणजे गोडीने गोडीची चव पाहावी. सोन्यानेच सोन्याचा कस पाहावा तसाच प्रकार होय. तो प्रकार निरर्थकच ठरेल (३१२) आपली ही भेट सिद्धभेट आहे.

यानंतर ज्ञानदेव वेगळा विचार मांडतात, ते म्हणतात,

'सखया तुझेनि उद्देशे। भेटावया जीवन उल्हासे।

की सिद्ध भेटी विसकुसे। ऐशिया निहे ।।४२ ।।

चांगदेवा, तुला भेटण्यास जीव उत्सुक आहे, पण आपली ही सिद्धभेट विसकटून जाईल का याची मला भीती वाटते. आपल्या मूळच्या ऐक्याला बाधा येईल. अस्ति भाति प्रिय ही आत्म्याची लक्षणे त्रिकालाबाधित आहेत. आपली नामरूपे भिन्न असली म्हणून काय झाले? ती तर उपरोधिक आहेत. केवळ वाचारंभणापुरती आहेत. तेव्हा आपण दोघे एकच आहोत. आता अशा पार्श्वभूमीवर तुला येऊन भेटणे म्हणजे ही सिद्धभेट नाकारण्यासारखे ठरेल. आत्मतत्त्वाच्या ठिकाणी द्वैताला वाव नाही.

तुला भेटावे असे खूप वाटते. पण ज्या ज्या वेळी असे होते त्या त्या वेळी माझे मन आत्माकार होते. तेव्हा त्या अवस्थेत आपल्या भेटीचा व्यवहार व्यर्थ वाटू लागतो तेथे सर्व उपाधी नष्ट होतात. आणि भेटीला तर उपाधिजन्य द्वैताची अपेक्षा असते. ते द्वैतच मिटल्यानंतर भेटीची इच्छा मावळणारच.

पाण्याला भेटायला मीठ गेले तर तेच तद्रूप होऊन गेले. तसा मी तुझ्या आत्मस्वरूपाला भेटायला गेलो तेव्हा मीच स्वत:ला हरपून गेलो आणि तुझ्याशी एकरूप झालो. अशा वेगवेगळ्या दृष्टातांनी ज्ञानदेवांनी आत्मैक्याच्या पातळीवर उभयतांची भेट प्रयोजनशून्य निरर्थक आणि अनावश्यक असल्याचे पटवून दिले आहे. शेवटी ते म्हणतात, मी तुझ्या भेटीचा विचार करतो तेव्हा तुझ्यातला तूपणा व माझ्यातला मीपणा दोन्ही मावळतात आणि उरलेल्या आत्मतत्त्वाने आपण एकरूप होऊन जातो (३७८) तुझी माझी भेट होणे म्हणजे रूचीने रूचीचा स्वाद घेण्यासारखे आहे.

शेवटी ज्ञानदेव म्हणतात, माझे हे पत्र म्हणजे तैसी अप्रमेये प्रमेये भरली। मौनाची अक्षरे भली रचोनि गोष्टी। नेकियेची (चां.पा. ५५)

ही त्यांची भाषा आणि ज्ञानेश्वरीतील 'बोली अरूपाचे रूप दावीन' या उद्‌गारात काहीच फरक नाही. तेव्हा ज्ञानदेव चांगदेवाला सांगतात, ''तू नामरूपातीत आत्मभाव यथार्थ जाणून घे आणि स्वानंद सुखाच्या सेवनाने तू सर्वदा सुखी रहा.'' वेद्य वेद्यकातीत। जे आहे निजपद सत्य। त्या पदीं होई स्थित। यत्किंचितही ढळू नको। (पासष्टी भावदीपिक ४३०) तुझ्या घरी या पत्राच्या रूपातही आत्मज्ञान संपत्तीच आली आहे. ''तैसी आत्मज्ञान संपत्ती। आली तुझिया घराप्रती। तिचा आदर करून सत्त्वर गति कल्याण करून घ्यावे।'' (पासष्टी भाव. ४४४)

चांगदेव पासष्टीतील शेवटच्या पाच ओव्या ह्या समारोपाच्या ओव्या आहेत. ज्ञानदेव म्हणतात,

''चांगदेवा तुझेनि व्याजें। माउलिया श्रीनिवृत्तिराजें।

स्वानुभव रसाळ खाजें। दिधलें लोभें'' ।।६१ ।।

निवृत्तिनाथांनी हा स्वानुभवरूपी रसाळ खाऊच दिला आहे. तो सर्वश्रेष्ठ खाऊ आहे. तो दिसत नाही. तो हातात घेता येत नाही. जीभ त्याचा स्वाद घ्यायला समर्थ नाही. तो खाऊ सेवन करण्याचा एकच मार्ग आहे तो मार्ग म्हणजे विचाराचा मार्ग होय.

''हे खाजें सेवण्या साचार। एक समर्थ आहे विचार।

नेत्र जिव्हा आणि कर। तोच (विचारच) या खाजाचा म्हणून विचारे सेवा यासी। आणि पावे निजात्मपदासी। म्हणजे निवृत्तिनाथ माउलीसी। महदानंद होईल । जो आनंद च्युतिरहित। गुरुशिष्य भावे विवर्जित। जेथे तू, मी आणि निवृत्तिनाथ। एकरूप हेच कळे।। (पासष्टी भावदीपिका ४५६-४५८)

तेव्हा ज्ञानदेव म्हणतात, एवं ज्ञानदेव चक्रपाणी ऐसे। दोन्ही डोळस आरिसे। परस्पर पाहतां कैसे। मुकले भेदा।।६२।। (चां. पा.६२)

भेदरहित होणेचे हे सुख चांगदेवाच्या निमित्ताने निवृत्तिराजांनी ज्ञानदेवांच्या माध्यमातून सर्वांना दिले आहे. ''तियेपरी जा इया। दर्पण करील ओविया। तो आत्मा एवढिया। मिळेल सुख।।'' (चां. पा. ६३) पासष्टीच्या या समारोपाच्या ओव्यांच्या निमित्ताने दासगणु महाराजांनी काही स्वतंत्र विवेचन केले आहे. त्यात त्यांनी आरशासाठी काच आणि पारा यांची गरज असते. येथे पत्र म्हणजे पारा आणि काच म्हणजे दोघांचे नेत्र. हे दोन्ही एकत्र येऊन त्यांना त्या आरशात आत्मप्रतिबिंबच दिसले इ. रूपक विस्ताराने स्पष्ट केले आहे. पुढे ते म्हणतात, की असे आत्मज्ञान आपोआप प्राप्त होत नाही. त्यासाठी सत्‌संप्रदायाची गरज आहे.

''तैसे हे आत्मज्ञान। जीवा व्हावया आकलन।

कर्मभक्तीचे प्रयोजन। अवश्य आहे।।'' (पा. भा. ५०७)

कर्म हे शास्त्राच्या आधारे करावे हे सांगताना त्यांनी पंढरपूरला जाणाऱ्यांनी पांडुरंगाचे दर्शन घेण्याचा विधियुक्त मार्ग स्पष्ट केला आहे. त्यारीतीने पांडुरंगाचे दर्शन घ्यावे. तोंडाने 'तो हा विठ्ठल बरवा' हा अभंग म्हणावा आणि पांडुरंगाचा विचाराने शोध घ्यावा असे त्यांनी सांगितले आहे. पांडुरंगाची भक्ती पूर्वभाग्यावाचून प्राप्त होत नाही. (५२६) असे सांगताना त्यांनी म्हटले आहे ''विष्णुमय जग वैष्णवाचा धर्म। या गोष्टीचे कळाया वर्म। अवजरून घातिला नेम। संतचरण वंदण्याचा।।'' (५२८). या पांडुरंग दर्शनाचा समारोप करताना ते म्हणतात, ''सप्रेम भजन करावे। निष्कलंक भक्त व्हावे। तर्क वितर्का टाकावे। विश्वास ठेवून दृढतर।। (५३२) आणि पहावे पासष्टीसी। त्या ज्ञानेशविरचित लिखितासी। ऐसा पाहणारा निश्चयेंसी। ब्रह्मपदा जाणार आहे।।'' (५३३). चौसष्टाव्या ओवीच्या भाष्यात ते म्हणातात, ''प्रत्यय आत्मानुभवाचा। तेव्हाच आहे यावयाचा। की जेव्हा द्वैतभावाचा। पत्ता समूळ मोडेल।।''(५३७) या चौसष्टाव्या ओव्यांच्या निमित्ताने त्यांनी त्या आत्मानुभवाचे सविस्तर वर्णन केले आहे. पासष्टाव्या ओवीच्या निमित्ताने त्यांनी पासष्टी ही गंगा आहे असे रूपक करून त्या गंगेचे सुंदर रूपकात्मक वर्णन केले आहे.

शेवटी हा ग्रंथ रचण्याचा विचार गोदावरीच्या तीरावर मनात आला. पण तो अरण या सावता माळ्याच्या गावामध्ये. शके अठराशे बावन्नमध्ये माघ शुद्ध पंचमीस. तो ग्रंथ पूर्ण झाला. हा ग्रंथ पांडुरंगाच्या कृपेने पूर्ण झाला. त्याची फलश्रुती सांगताना ते म्हणतात.

''लेखक झाला विठ्ठल। ग्रंथ अती रसाळ।

अहंकाराचा निमाल्या मळ। याची प्रचीती येईल की।।''

(पा. भा. ५९१)

दासगणु महाराजांचा हा ग्रंथ त्यांनी म्हटल्याप्रमाणे अतिशय रसाळ झालाच आहे. अगोदरच ज्ञानेश्वर महाराजांनी दिलेल्या मार्मिक दृष्टांताची गोडी त्यात आहेच. त्यांच्या भरीला दासगणु महाराजांचे विवेचन व दृष्टांत ती गोडी वाढवतात. त्याची प्रासादिकता तर अवर्णनीय आहे.

**- डॉ. कल्याण काळे**

अे-५ प्रज्ञानगर, नवशा मारुती परिसर,

हरिप्रिया कार्यालयासमोर, सिंहगड रोड, पुणे ४११०३०

फोन - २४२५३१३६



# ऋणानुबंध
## (संतकवी आणि सौ. शांताबाई)

**सौ. वसुधा ग. परांजपे**
बी.ए. (आनर्स) साहित्यप्राज्ञ, रा.भ. रत्न, भारत हायस्कूलमध्ये ३० वर्षे शिक्षिका. अध्यात्म विषयावर प्रवचने, राणी लक्ष्मीबाई मंडळ मध्ये कार्यकारी विश्वस्त, विपुल ग्रंथ लेखन, विविध मासिकांतून लेखांचे लिखाण.

१९५० सालची गोष्ट. आषाढ अधिक होता. या अधिकमासाचा उत्सव सर्वच्या सर्व, म्हणजे पवमानाचा दैनंदिन अभिषेक, ब्राह्मणभोजन, दुपारच्या वेळी भागवत पुराण व संध्याकाळची कीर्तने हे सर्व सद्‌गुरू श्री दादांच्या म्हणजे पू. दासगणु महाराजांच्या उपस्थितीत आपल्या हातून पुण्यात व्हावे असे अप्पांना म्हणजे त्यांचे शिष्योत्तम श्री अनंत दामोदर आठवले यांना वाटले; कारण नांदेड, गोरटे या गावी जर उत्सव झाला तर अप्पांना पूर्ण महिनाभर उत्सवासाठी, रहाता येणार नव्हते, त्यांची त्या काळातच परीक्षा येत होती. महाराजही थकलेले होते, त्यांनाही विश्रांतीची गरज होती व ही विश्रांती नांदेड, गोरटे येथे मिळणार नाही, पुण्याला उत्सव केला तर मिळेल असेही वाटत होते.

पू. अप्पांनी आपला हा विचार महारांजाना कळवला. महाराज म्हणाले, 'अधिकमासाचा उत्सव हा पावनक्षेत्रात गोदाकाठीच झाला पाहिजे, काहीही झाले तरी मी उत्सवासाठी पुण्यात येणार नाही' हे ऐकताच पू. अप्पा उदास झाले, त्यांना खिन्नता आली; पण जिद्द होती, प्रयत्न सुरू होते. त्यांनी पनवेलचे रावसाहेब गोखले, पुण्यातील गर्देवकील, बापुराव बोरावके यांना आपला विचार बोलून दाखवला. हे सर्व महाराजांचे शिष्य होते. त्यांना विचार पटला, आम्ही तुला सर्व प्रकारचे सहाय्य करू व महाराजांचे त्यासाठी मन ही वळवू असे आश्वासन दिले आणि खरोखरच भक्तांच्या हट्टापुढे देवाचे काही चालत नाही तसे झाले. पू. दासगणु महाराजांनी अधिकमास उत्सव पुण्यात करण्यासाठी मान्यता दिली. ते यायला तयार झाले.

आता जागेचा प्रश्न! पूर्ण महिनाभर महाराजांना राहण्यासाठी, अभिषेक, ब्राह्मणभोजन, सांगतेचा यज्ञ व कीर्तन यासाठी मोठी जागा हवी. आपल्या अधिकमास महोत्सव वर्णन या काव्यात पू. अप्पा लिहितात,

**'सोयीची मोकळी जागा, पाहुण्यासह राहण्या ।**
**आहे का पुसतांना हे, दातांच्या जाहल्या कण्या ।।५४।।**
**कार्यालये मंदिरे हि, जुने वाडेहि पाहिले ।**
**'नाही' स्पष्ट म्हणे तो, मी खेटे संतत घातिले ।।५६।।**

अखेर एक ठिकाणी (आनंदाश्रम) जागा मिळाली; आणि ते सांगण्यासाठी पू. अप्पा लोणावळ्याला गेले. महाराजांचा मुक्काम तिथे होता.

महाराजांनी चतुर्दशीला पुण्यात यावे असे सांगून ते तडक पुण्याला आले व जागा ताब्यात घ्यावी म्हणून तिकडे किल्ली मागण्यासाठी गेले अन् अनपेक्षितपणे त्यांनी 'चिठ्ठी आणा म्हणजे किल्ली देतो' असे सांगितले. ते चिठ्ठीसाठी निघाले तो दारातच सौ. शांताबाई गोखले भेटल्या त्यांनी १७ जून झाशीच्या राणीच्या पुण्यतिथी निमित्त कीर्तनाचे आमंत्रण अप्पांना दिले. त्यांनी कीर्तन करण्याचे मान्य केले. सौ. शांताबाई म्हणाल्या, 'बरे झाले इथे जागा मिळाली. नाहीतर रहाण्यापुरती मीही जागा दिली असती.'

पू. अप्पा चिठ्ठी आणायला गेले असता व्यवस्थापकांनी नकार दिला. म्हणाला कायदे विचित्र आहेत तेव्हा जागा देता येत नाही. ऐकले मात्र, पू. अप्पांच्या मनाचा बांध फुटला. दादा तर येतील ठरल्याप्रमाणे, कुठे सोय करावी? गर्देवकीलांकडे गेले ते म्हणाले, 'माझ्याकडे राहतील अन् कीर्तने आपण रहाळकर राम मंदिरात करू. तिथल्या मालकीण बाई होय म्हणाल्या आहेत ना! अन् एकदम आठवले, तिथे जवळच शांताबाई रहातात, त्या जागा देईन म्हणाल्या होत्या. बघुया जाऊन. त्याप्रमाणे ते त्यांच्या घरी गेले. त्यांची मुलगी घरी होती. ती म्हणाली, दोन खोल्या आहेत पण एका खोलीत उद्योग मंदिराची पोती भरली आहेत. दुसरीत हिंदीचे वर्ग भरतात.' निराश झालेले अप्पा तसेच देवावर हवाला ठेवून स्टेशनवर महाराजांना आणायला गेले. त्या दिवशी गाडीही साडेसात ऐवजी रात्री दहाला आली तीही पुणे स्टेशनला.

श्री. बोरावके व महाजन यांनी महाराजांना उतरवून वाहनात बसवले होते, अप्पा आल्यावर निघायचे म्हणून त्यांचीच वाट पहात थांबले होते, आनंदाश्रम मिळाला नाही हे कसे सांगावे? महाराज तापट. तेथून परस्पर नांदेडलाच जातील? काय करावे दुचाकीवरून निघालेल्या अप्पांच्या मनात विचारांचे काहूर माजले होते. महाराजांना घेऊन सर्व मंडळी अप्पा बळवंत चौकात सोनुताअी गाडगीळ यांच्या घरी गेली.

अप्पा त्यांच्या घरात गेलेच नाहीच. थोडा वेळ बाहेरच थांबले होते. अन् तेव्हढ्यात सौ. शांताबाई गोखले तिथे आल्या अन् म्हणाल्या, ''तुमच्यासाठी जागा रिकामी करून ठेवली आहे. संकोच न करता तुमच्या सोयीने केव्हाही या. उद्या आवस आहे. आजही आलात तरी चालेल प्रतिपदेला आलात तरी चालेल.'' परमेश्वर पाठीशी आहे याची जणू प्रचिती आली, अप्पांना. महाराज आषाढ शुद्ध प्रतिपदेला सौ. शांताबाई गोखले यांच्या वाड्यात आले व अधिक मास संपेपर्यंत राहिले. सर्व उत्सव अप्पांच्या मनाप्रमाणे पार पडला. अप्पा वर्णन करतात ते असे,

**''नांवाला दिधल्या होत्या, खोल्या दोन आम्हाप्रती ।**
**साऱ्या घरातची आम्ही, नांदलो मोकळ्या रिती ।।१३१।।**

सौ. शांताबाई गोखल्यांनी पू. दासगणु महाराजांना जागा दिली त्या मागचे कारणही मजेशीर आहे. त्यांच्या शब्दांत वाचावे ते. त्या लिहितात, १९४९ च्या माघ महिन्यात एकदा एक गृहस्थ मी कीर्तनकार, हे ऐकून माझ्याकडे स्वरचित आख्याने घेऊन आले. मी त्यांना म्हटले, मी स्वरचित आख्याने लावते तेव्हा मला तुमची आख्याने पहावयाचे काही कारण नाही.'' ते ऐकून त्यांनी विचारले, ''आपण दासगणु महाराजांना ओळखता?'' ''नाही. मी कीर्तन करीत असले तरी महाराज या पदापासून लांब आहे. मी सावरकरवादी आहे. गुरू, तेथे एकारलेली वृत्ती रहाते, मग बुवाबाजी, त्यामुळे भारावलेला समाज काही करण्याच्या वृत्तीचा रहात नाही. राजकारणात तर या बुवाबाजीने धुमाकूळ घातलाय.'' ते गृहस्थ म्हणाले, ''खरंय तुमचं हे म्हणणं, दासगणु महाराज मोठे अधिकारी पुरुष आहेत. सध्या ते पुण्यातच आहेत. तुम्ही त्यांचे दर्शन घ्याच.''

ते गृहस्थ निघून गेले; पण ज्या भावनेपासून मी लांब होते ती भावना प्रकट झाली आणि मी दर्शनाला गेले. नारळ व सव्वा रुपया ठेवून नमस्कार करताच ते म्हणाले, ''तू फार चांगली कीर्तनकार आहेस म्हणे'', तेव्हा मी म्हणाले, ''मला तत्त्वज्ञान व इतिहास आवडतो. पण संतांच्या चमत्कारांवर माझा विश्वास नाही.'' महाराजांच्या अवतीभोवती बरेच लोक होते. महाराज त्या वेळी बॅ. गाडगीळ यांच्याकडे उतरले होते. आजारी होते. माझ्या या स्पष्ट वक्तेपणामुळे त्यांना क्रोध आला असावा. भोवतालची मंडळीही अचंबित झाली होती. महाराज म्हणाले, 'बाई, तू जा आता' तेव्हढ्यात गोरक्षण संस्थेतून महाराजांना निरोप आला, ''आज गाईचे दूध येणार नाही.'' महाराज आजारी होते. म्हणून मी म्हणाले, ''माझ्या घरी दुभती गाय आहे. मी आपणास दूध पाठवू का?'' त्यावर महाराज म्हणाले, ''बाओ, तुझ्याकडचे दूध सुद्धा नको'' संत रागवतात, तर त्यांना मोठे कसे म्हणावे? असे पुटपुटत मी उठले. निघाले तेव्हा महाराजांनी मला हाक मारून म्हटले, ''तू बरीच फटकळ बाओ दिसतेस. पण हे बघ, आमचेकडे नाथषष्ठीला उत्सव असतो. त्या उत्सवात आमचा अनंता कीर्तन करतो. तू वाटलं तर त्या कीर्तनाला ये.''

मी घरी आले (पुत्रशोक) मोठ्या दुःखाने मन हललेच होते. आपण चुकीचे बोललो का? असे मनाला वाटत होते. त्या रूखरुखीतूनच मी मनाच्या स्थैर्याकरता संतचरित्रे वाचावयास प्रारंभ केला. त्यामुळेच नाथषष्ठीच्या उत्सवात कीर्तनाला गेले. कीर्तनाची धाटणी-मांडणी-चाली मला आवडल्या. भावना उचंबळून अश्रूही आले. अनंतराव कीर्तनक्षेत्रात सिद्धहस्त आहेत हे जाणवले. मनाला फारच आनंद झाला. तो दासगणु महाराजांना सांगून मी घरी निघाले. तो महाराज म्हणाले, ''तुझे कीर्तन मला ऐकावयाचे आहे. करशील?'' मी 'हो' म्हणाले. तेव्हा सभोवतीच्या मंडळींना ते म्हणाले, ''हिच्या कीर्तनाला सर्वांनी यायचे बरं का.'' त्याप्रमाणे रामचरित मानसावर आधारित नारद व्यामोह हे स्वरचित आख्यान मी लावले. महाराजांना व इतर सर्वांनाही कीर्तन आवडले.''

त्यानंतर काही दिवसांनी महाराज पुण्याला पुन्हा बॅ. गाडगीळ यांच्याकडे उतरले असता त्यांनी सौ. शांताबाई मेहेंदळे (बॅ. गाडगीळांची कन्या) यांच्यातर्फे सौ. शांताबाई गोखले यांना बोलावून घेतले. यावेळी सौ. शांताबाई आपल्या पतिराजांसह आल्या होत्या. त्यांना महाराज म्हणाले, ''तुझी बायको फणसासारखी आहे. बरीच हुशारही आहे.'' त्याच बैठकीत महाराजांनी सौ. शांताबाईंना म्हटले, ''मी तुला माझी सर्व आख्याने व ग्रंथ देतो. तू माझी आख्याने चांगली रंगवशील'' सौ. शांताबाई फटकळ त्या आधी निग्रहाने नाहीच म्हणाल्या. पण त्या लिहितात त्यांची आग्रहाची मागणी मला मोडवेना. मी हो म्हटले व त्यांच्या आदेशाप्रमाणे शिर्डीच्या उत्सवात त्यांच्या आख्यानवर कीर्तन केले. त्यानंतरही जेव्हा भेट झाली तेव्हा दासगणु महाराजांनी आख्यानाबद्दल विचारताच त्या म्हणाल्या होत्या, ''तुमच्या आख्यानांना माझ्या कीर्तनात राजकीय रंग येईल. मी स्पष्टवक्ती. तुमची चरित्रे म्हणून सांगेन. कदाचित त्यामुळे तुम्हाला कारावास ही भोगावा लागेल. चालेल?'' महाराज म्हणायचे, ''चालेल पण तू माझी संतचरित्रे लावत जा.''

अशा भेटी होत होत्या. दासगणु महाराज सर्व विसरले होते. पण 'तुझ्या हातचे दूध ही नको' हे वाक्य स्वाभिमानी शांताबाईंना सारखे सलत होते. कदाचित त्यामुळेच की काय सौ. शांताबाईंची वृत्ती संतचरित्रे वाचून, अनंतरावांची कीर्तने ऐकून संत चरित्रातील चमत्कारांबद्दलची त्यांची मते बदलली होती व संतसेवा घडावी या हेतूने त्यांनी महाराजांसाठी जागा दिली होती. १९७१ सालापर्यंत पू. दासगणु महाराज व अनंतराव आठवले आपल्या कुटुंबकबिल्यासह सौ. शांताबाई गोखले यांच्या वाड्यात रहात होते. सायंकाळच्या वेळी महाराज त्या खिडकीत उभे असलेले अनेकांनी पाहिले आहेत. महाराज पुण्यात सौ. शांताबाई गोखले यांचे कडे निवासाला आले की महाराज, मनू नाहीतर छगनरावांना सांगत जा त्या देवळातल्या गणूला सांग 'मी आलोय, तुला बोलावलय' मग आम्ही उभयता रोजच त्यांच्या दर्शनाला जात होतो. अनेक गमतीदार गप्पा होत असत. माझ्या सासुबाईंनीही महाराजांचा अनुग्रह घेतला होता.

पण सांगायचे विशेष ते असे की, पू. दासगणु महाराज अधिक मास

महोत्सवाच्या निमित्ताने जेव्हा सौ. शांताबाईंकडे राहायला आले. त्यावेळी दर्शनाला येणाऱ्यांना ते कौतुकाने सांगत, ''हिला मी तुझ्याकडचे दूधही नको म्हणालो; तर हिने आपल्या भक्तिभावाने मलाच आपल्या वाड्यात बांधून आणले, ही महाविष्णूला सुद्धा आपल्या भक्तीप्रेमाने बांधून आणील'' महाराजांच्या तोंडचे हे शब्द ऐकताच सौ. शांताबाईंच्या मनातील रुखरुख पार नष्ट झाली.

सौ. शांताबाई कट्टर हिंदुत्ववादी. पण महाराजांचे बरेचसे शिष्य काँग्रेसचे होते. त्यांचेही येणेजाणे सौ. शांताबाईंकडे महाराजांचेमुळे घडले. भारताचे पारतंत्र्य व समाजाची विपन्नावस्था महाराजांना फार खटके. आपल्या साहित्यात वेळप्रसंगी या विषयी त्यांनी लिहिलेले आहे. देशभक्तीबद्दल त्यांच्या मनात अति आदराची भावना होती म्हणूनच स्वातंत्र्यवीर सावरकरांना भेटण्याची ओढ होती, ती त्यांनी शांताबाईंना बोलून दाखवली होती. तो योग ५ ऑगस्ट १९५६ या दिवशी आला. महाराज थकलेले होते. तरीही स्वातंत्र्यवीर येताच ते स्वागतासाठी दारात गेले. त्यांचा हात मोठ्या प्रेमाने धरून अत्यंत आदराने घरात नेऊन बैठकीवर आपल्या शेजारी बसवले. देशभक्तीच्या ज्वलंत तेजोराशी हिंदूहृदयसम्राट स्वातंत्र्यवीर तात्यारावांचा कणखर हात श्रीदासगणु महाराजांनी अत्यंत राष्ट्रभक्तीने पुलकित होत श्रद्धायुक्त अंत:करणाने आपल्या हातात घेऊन आपल्या मस्तकावर फिरवून घेतला. शीघ्रकवी अशा श्रीमहाराजांनी त्यांच्याबद्दलची भावना लगेचच श्लोकबद्ध केली, तो श्लोक असा,

**''हे, श्रेष्ठ वीर पुरुषा, तुज ईश देवो ।**
**आयू विपूल बल पाठिस नित्य राहो ।।**
**द्याया यशा प्रभु तुझ्या अवघ्या कृतीला ।**
**तू एक भूषण असा नग भारतीला ।।**

असे होते महाराजांचे व सौ. शांताबाई गोखले यांचे ऋणानुबंध. सौ. शांताबाईंनी स्वरचित आख्यानांचे 'कमलपुष्प' या नावाने पुस्तक काढले. त्यात प्रस्तावनेत त्या लिहितात ''ती. दादांच्या आख्यानांमुळे माझ्या कीर्तन भूमिकेला एक निश्चित स्वरूपाचे उत्तम वळण लागले. ती. दादांच्या आख्यानाची छाया माझ्या कीर्तन भूमिकेवर व आख्यान निर्मितीवर पडली. महाराजांच्या रसाळ रचनेचे सोज्वळ स्वरूप प्राप्त झाले. मी ती. दादांनी रचलेली १५, २० आख्यान- चरित्रे लावीत असे. ती दादांकडे मी माझ्या प्रकाशनाला आशीर्वाद मागितले तेव्हा त्यांनी ते काव्यबद्ध करून पाठवले.

**श्रीशंकर**

**कृपा सच्चिदानंदाची!**
**हे चंद्रभागातट- निवासिया । भक्तवत्सला पंढरीराया**
**साष्टांग नमन तुझ्या पाया । करीतसे दासगणु ।।**
**आपण आहा देशभक्त । कार्य आपुले विस्तृत ।**
**त्यातुनी वेळ काढुनि खचित । आख्याने जी लिहिलीत ।**
**ती हरीकृपेने छापण्याचा । योग आला आता साचा ।**
**हाच सच्चिदानंदाच्या कृपेचा । लाभ समजा विशेष ।।**
**कमलपुष्प हा आदर्श । तुम्ही ठेवोनिया विशेष ।**
**कार्य केले सुरू खास । ते पूर्ण होवो हरिकृपे ।।**

१९५० ते ७१ अशी २१ वर्षेप्राचार्य अ. दा. आठवले यांचे बिऱ्हाड सौ. शांताबाई गोखले यांच्या वाड्यात होते. या कालखंडात महाराज जेव्हा जेव्हा पुण्याला येत तेव्हा तिथेच रहात. ते नेहमी म्हणत, ''मी या वास्तूला सोडून पुण्यात इतरत्र कोठेही राहणार नाही.''

पू.श्रीदासगणु महाराजांना वंदन करून लेखणीला विराम देते.

ॐश्री

संदर्भ : १) एक झुंझार स्त्री- चरित्र ग्रंथ
२) संतकवि श्रीदासगणु महाराज- चरित्र

**- सौ. वसुधा ग. परांजपे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठलनगरी,
उपाशी विठोबा मंदिरा शेजारी, पुणे ४११०३०
फोन : २४४७११०९

***





# श्री भक्तिरसायन – भावप्रकाशिका

**डॉ. कमलताई वैद्य**
एम्.ए.पीएच.डी, निवृत्त प्राध्यापक, श्रीराम चरितमानस मंडळाच्या माजी अध्यक्षा, दासबोध मराठी गद्ये अनुवाद, वाल्मिकी रामायण मराठी अनुवाद, प.पू. स्वामी प्रज्ञानंद सरस्वतींच्या शिष्या.

संतकवि श्रीदासगणु महाराज विरचित 'श्री भक्तिरसायन भावप्रकाशिका हा ग्रंथ, संपादक – अ. दा. आठवले यांनी श्रीक्षेत्र पंढरपूर येथे शके १८८९ मध्ये प्रबोधिनी एकादशीला प्रकाशित केला. संपादकीयमध्ये श्री. आठवले म्हणतात, 'अध्यात्मशास्त्र मूळातच सामान्यांच्या ज्ञानशक्ती पलीकडचे अत्यंत श्रेष्ठप्रतीचे पण एक गूढ शास्त्र आहे. या शास्त्राच्या अभ्यासात सर्वच व्यक्ती या एक प्रकारची बालके आहेत. बालकाला जसे अन्न तेच पण विशेष रीतीने शिजवून मऊ गुरगुटे करून काऊचिऊच्या गोष्टी सांगत लहान लहान घासांनी पण अत्यंत वात्सल्याने भरवावे लागते; अध्यात्मशास्त्रही समजावून देताना याच पद्धतीचा अवलंब करावा लागतो. महाराष्ट्रापुरते तरी श्री ज्ञानोबारायांनी या पद्धतीचा अवलंब उत्कृष्ट रीतीने केला आणि म्हणूनच सगळा भाविक समाज श्रीज्ञानेश्वर महाराजांना परमप्रेमादराने 'माऊली' म्हणून संबोधितो. श्री सद्गुरू दासगणु महाराज हे त्याच परंपरेचे उत्तराधिकारी आहेत. हेच शांडिल्यसूत्र, भक्तिरसायन इत्यादी इतर ग्रंथाविषयी म्हणता येईल.

या ग्रंथाच्या साहाय्याने अध्यात्मशास्त्रातील अनेक प्रमेये अनेक विचार बोधाप्रत येतील व गहन गूढ स्थले ज्ञानाच्या आवाक्यात आल्यासारखी वाटतील यात शंका नाही. या प्रासादिक वाणीचा रसास्वादपूर्वक अभ्यास करून जीवनामध्ये शांती समाधानासाठी अत्यंत आवश्यक असलेले अध्यात्मशास्त्र जिज्ञासूंनी आपलेसे करावे व कृतार्थ व्हावे हीच भगवंताचे चरणी प्रार्थना.

परमहंस परिव्राजकचार्य श्री मधुसूदन सरस्वती यांचा ग्रंथ 'श्रीभगवद् भक्तिरसायन' हा अत्यंत विद्वत्मान्य असून त्यांच्या या ग्रंथामुळेच साहित्यात भक्तिला स्वतंत्र रस म्हणून मान्यता मिळाली. गुरुदेव रानडे यांनी हिंदी साहित्यावर आधारित 'परमार्थ सोपान' या ग्रंथात रसासंबंधी जे विवेचन केलेले आहे ते लक्षणीय आहे. ते म्हणतात 'पारंपरिक रसचर्चेतील सर्वात मोठा दोष हा आहे की तिच्यात भक्तिला रस म्हणून मान्यता दिली गेलेली नाही. शांतीला स्थान देऊन भक्तीला वगळणे ही मानवी विचारांची निकृष्टता होय असे त्यांनी म्हटले आहे. ध्वनिपूर्व परंपरेतील भरत, भामहा, आणि दंडिन् आणि नंतरचे आनंदवर्धन, अभिनव गुप्ता आणि मम्मट यांनी कुणीही भक्तीला रस म्हणून मान्यता दिली नव्हती. श्रीमधुसूदन सरस्वती यांनीच भक्तीला तिच्या योग्य स्थानी अभिषिक्त केले. गुरुदेवांच्या मते भक्ती हा केवळ रसच नाही तर त्याच्या स्वाभाविक हक्काने तो मर्धन्यरस – सर्व रसांचा राजा आहे; या सर्व विवेचनावरून प.पू. श्री मधुसूदन सरस्वतीनी हा ग्रंथ लिहून केवढे महत्त्वाचे कार्य केले आहे हे लक्षात येईल.

इतका महत्त्वाचा विद्वत्मान्य ग्रंथ असून आणि त्यातील संदर्भ अनेक मान्यवर संतांच्या वाङ्मयात येत असूनही या ग्रंथाचा प्रथम हिंदी अनुवाद शके २०३३ मध्ये वाराणसी येथून श्री. गिरिजेशकुमार पाण्डेय यांनी मूळ ग्रंथ व पू. जनार्दन शास्त्री पाण्डेय यांच्या हिंदी अनुवाद व निवृत्तीसह प्रथम विक्रमसंवत २०१८ मध्ये प्रथम आवृत्ती, दुसरी आवृत्ती संवत् २०३३ मध्ये आणि तृतीय आवृत्ती चौवम्बा विद्याभवन, वाराणसी तर्फे इ.स. १९९८ मध्ये प्रकाशित झाली आहे. मात्र या ग्रंथावर मराठी ग्रंथ एकमेव श्री. दासगणु महाराज यांचाच उपलब्ध आहे व तोही आता दुर्मिळच झाला आहे. त्यांचा समग्र वाङ्मयात खंड नववा म्हणून याचे प्रकाशन झाले आहे.

या ग्रंथात एकूण तीन उल्लास आहेत. प्रथम उल्लासावरील श्रीमधुसूदन सरस्वती यांची विस्तृत संस्कृत टीकाही उपलब्ध आहे. श्री पाण्डेयजीनी त्या टीकेचा शब्दश: हिंदी अनुवाद दिलेला आहे पण श्री दासगणु महाराजांनी तिचा शब्दश: मराठी अनुवाद न देता तिच्यातील भावार्थ प्रकट केला आहे. हे करताना काही ठिकाणी स्वत:चे भावही प्रकट केले आहेत. म्हणून त्यांनी दिलेले 'भाव-प्रकाशिका' हे नाव अगदी सार्थ आहे. हिंदी अनुवादात प्रथम उल्लासातील कारिकांची संख्या एकूण ३७ आहे तर श्रीदासगणुंच्या ग्रंथात ती ३५ आहे. पहिल्या २३ कारिका दोन्ही ग्रंथात सारख्यात आहेत. नंतर हिंदी ग्रंथातील दोन कारिका (२४, २५) या श्रीदासगणुंच्या ग्रंथात आढळत नाहीत. पुढील सर्व कारिका दोन्ही ग्रंथात सारख्याच आहेत. पण क्रमांकात त्यामुळे फरक पडला आहे याची कृपाया नोंद घ्यावी. हिंदी अनुवाद शब्दश:

आहे तर श्रीदासगणुंचा अनुवाद भावाला प्राधान्य देणारा असल्याने तो अधिक रसाळ झाला आहे हे निश्चित! दुसऱ्या आणि तिसऱ्या उल्लासावरील श्री. मधुसूदन सरस्वतींची संस्कृत टीका (व्याख्या) उपलब्ध नसल्याने श्री दासगणुंची मध्वमतानुयायी श्री दामोदर पंडित जे काशीत राहत होते, त्यांच्या सुंदर टीकेच्या आधारे विवेचन केले आहे.

मूळ ग्रंथात ३ उल्लास आहेत. पहिल्या उल्लासांत ३७ कारिका, दुसऱ्या उल्लासांत ७९ कारिका आणि तिसऱ्या उल्लासात ३० कारिका आहेत. तर श्रीदासगणुंच्या ग्रंथात पहिल्या उल्लासांत ३५ कारिका, दुसऱ्या उल्लासात ८० कारिका आणि तिसऱ्या उल्लासात ३० कारिका आहेत. मूळ ग्रंथात ५८ वी कारिका दुसऱ्या उल्लासांतील यानंतरची जी कारिका श्री दासगणुंच्या ग्रंथात आहे ती हिंदी टीकाकारांनी प्रक्षिप्त मानून तिची गणना केलेली नाही. त्यामुळे क्रमांकात असा फरक पडला आहे. हिंदीत अध्याय नाहीत. श्री दासगणुंच्या ग्रंथात एकंदर चौदा अध्याय आहेत. त्यापैकी १ ते ७ पहिल्या उल्लासावर ८ ते ११ दुसऱ्या उल्लासावर, अध्याय १२ व १३ तृतीय उल्लासावर आहेत व चौदावा अध्याय कळसाध्याय असून त्यात क्रमश: प्रत्येक अध्यायात आलेल्या विषयांची अनुक्रमणिका व ग्रंथाचे एकंदर सार अंतर्भुत करण्यात आले असून ग्रंथाचा उपसंहार केला गेला आहे. एकूण ओवीसंख्या २९४५ इतकी आहे.

हा 'भक्तिरसायन' ग्रंथ हरिभक्तांना भक्तीचा साक्षात्कार करविण्यात साह्य करील. भक्ती ही पंचम पुरुषार्थ कसा आहे हे ठरविण्यासाठीच श्री मधुसुदन सरस्वतीनी हा ग्रंथ निर्मिला आहे. निष्काम भक्ती भाग्यवानांनाच प्राप्त होते. तिची थोरवी शब्दात वर्णन केली जात नाही. श्री व्यासांनी भागवतात भक्तीचे जे स्वरूप वर्णिले आहे. तिचाच शास्त्रदृष्ट्या विचार अत्यंत बहारीने ग्रंथाकारांनी केला आहे. 'भक्ती उत्पन्न झाल्यावरच या ग्रंथाचा खरा उपयोग साधकास होणार आहे हे विसरू नये' असे दासगणु महाराज म्हणतात.

''सहजासहजी समजणारा हा ग्रंथ नाही. पण भक्तीसंबंधी खोल विचार यात केला आहे. मराठी वाचकांनो, मोठ्या प्रयत्नपूर्वक हा ग्रंथ मराठीत पूर्ण केला आहे. याचे जो जो वाचन कराल तसतसे तुमचे मन सुसंस्कृत होईल आणि सुखद भक्तीपंथास लागेल. 'भक्तीरसायन' मूळचा संस्कृत ग्रंथ असून तो प्रसिद्ध आहे. त्या ग्रंथावर ही मराठी टीका श्री गोदावरीच्या तीरावर उत्तर तीरी कोपरगाव नावाच्या नगरीत गोवर्धन धारीच्या मंदिरात पूर्ण झाली. हे मंदिर शूर राघोबा दादा पेशव्यांनी बांधले आहे. हा ग्रंथ येथे पूर्ण व्हावयाचा होता म्हणून ही जागा मिळविण्यासाठी बापू राघूने खटपट केली. या बापूरावांनी देवासकरांना विनंती करून या बेटातील जागेचे बक्षीसपत्र करून दिले. अलीकडील कायद्याने वांदा आला म्हणून दासगणुंचे तेथे येणे झाले. तेथे श्रीगोवर्धन धारीच्या कृपेने हा ग्रंथ कळसास गेला. शके १८७२ विकृति नाम संवत्सरात श्रावण वद्य अष्टमीस गोकुळाष्टमीस पुरा झाला व विठ्ठलास अर्पण केला'' असे दासगणु महाराज म्हणतात.

ते पुढे म्हणतात की, ''आता ग्रंथ करणे उरले नाही. चतुर्थाश्रम घेऊन स्वस्थचित्ते श्रीगोदावरीच्या तीरी राहावयास सांपडावे व या ग्रंथाचे मनन करावे अशी इच्छा आहे. हे कोडकौतुक ईश्वराने पुरवावे. माझी भक्ती साक्षात्कारास यावी, श्री विठ्ठलांनी सगुण भेटी देऊन डोळ्यांचे पारणे फेडावे. या ग्रंथाचे लेखन छगन मारूतीने केले असून त्याचे अक्षर सुरेख वळणदार आहे. हा छापण्यास ज्यांनी मदत केली त्यांना श्रीनिवास सर्व बाजूने सुखी करो. लक्ष लावून पूर्णपणे वाचतील त्यांना हरीचे दर्शन होऊन डोळ्यांचे पारणे फिटेल. मनातील किल्मिष जाऊन हरीचे सद्‌भक्त होतील. सत्पुरुषांच्या ठायी पूर्ण निष्ठा ठेवून प्रयत्न करून पहा. नि:संशय प्रयत्न विफल होणार नाही. पंढरीनाथ तुम्हाला भेटतील – या ग्रंथाप्रती त्रिवार शांती असो.''

अध्याय चौदामध्ये श्रीदासगणु महाराज यांनी या ग्रंथाचे सार सांगितले आहे. ते म्हणतात शास्त्रात चार पुरुषार्थ सांगितले आहेत. त्यापेक्षा पाचवा पुरुषार्थ श्रेष्ठ असून विद्वान, ज्ञाते आणि साधु त्यास भक्ती असे नाव देतात. श्रीकृष्ण परमात्म्याची भक्ती हीच उत्तमोत्तम असून त्या भक्तीची बरोबरी कोणीच करू शकत नाही. फक्त मानव देहातच हा परम पुरुषार्थ साध्य करता येतो. भक्त आणि भगवंत यांच्यात किंचितही भेद न उरणे यालाच भक्ती म्हणतात. मग ती नवरसासहित असो अथवा एकटी स्वतंत्र असो. तिचा विषय मात्र भगवंतच असला पाहिजे. भक्तीसुखाच्या ठायी दु:खाची वार्ताच नसते. ज्ञान हेच भक्तीचे स्वरूप असते. ती उत्पन्न व्हावी म्हणून काही क्रिया कराव्या लागतात. त्या केल्याशिवाय भक्तीचा उदय होत नाही. शास्त्रकारांनी जे शृंगार, वीर, करुण, अद्‌भुत, हास्य, भयानक, रौद्र, बिभत्स व शांत असे नवरस वर्णन केले आहेत, त्यांच्या सेवनाने चित्तात भक्तीचा उदय होतो. अथवा या रसावाचूनही भक्ती जागृत होऊ शकते. भागवताच्या अकराव्या स्कंदात कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग असे तीनच मार्ग सांगितले आहे. या ग्रंथात अष्टांग योगही सांगितला आहे. तो ज्ञानयोगातच गृहित धरला आहे हे लक्षात घ्यावे. अष्टांग योग साध्य होण्यासाठी यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी ही साधने करावी लागतात असे पंतजली दर्शनात दिले आहे. ही साधने न करता कुणी योगेश्वराचे सोंग आणू नये असे श्री दासगणु महाराज बजावतात.

कर्ममार्ग कष्टाचा आहे. त्यात गर्भाधानापासून अंत्येष्टिपर्यंत सोळा संस्कार सांगितले आहेत. या संस्काराने अंत:करण शुद्धी होते तेव्हा भगवद्‌भक्तीस प्रारंभ होतो. सांग कर्मानुष्ठान झाले तर फळ तात्काळ मिळते तेथे उधारी नसते असे दासगणु महाराज ठासून सांगतात. मात्र ते सशास्त्र झाले पाहिजे त्यात संकर झाला तर ते मातीत मिळते. याची महती अंत:करणशुद्धी होईपर्यंत असते. मात्र अंत:करणशुद्धीसाठी कर्ममार्गावाचून दुसरा उपाय नाही. कर्मानुष्ठानाने मन निर्विकार स्थितीमध्ये येते. त्यामुळे अंत:करण कोमल होते. पण एखाद्याचे अंत:करण समजा कोमल न झाले तर त्या व्यक्तीने तात्काळ वैराग्यपर्वूक तत्वज्ञान आत्मसात करावे. बैठक ढळू न देता खडतर अभ्यास करावा. ज्याचे अंत:करण चित्तशुद्धीनंतर कोमल होते त्याने तात्काळ अत्यादरे भगवद्‌गुण श्रवण करावे. श्रवणानेच राजा परीक्षिती महाज्ञानी झाला.

निष्ठावान श्रवणालाच श्रवणभक्ती म्हणतात.

अंत:करण शुद्ध झाले की ते अष्टांग योग साधण्यास पात्र ठरते. अष्टांग योगाने मन भगवंतावर एकाग्र करावे. प्रवाहाची धार अखंड वाहते तशी मनाची स्थिती झाली पाहिजे. तसे मन सतत भगवंताकडे लागून राहिले पाहिजे. दुसरा विषय चित्तात येता कामा नये. इंद्रिये आवरून धरावी. विषयी उदासीन असावे म्हणजे एकाग्रता होते. हे एकदम जमत नसेल तर मन जिकडे धावत असेल तिकडे थोडेसे जावे. मन हे उनाड घोड्याप्रमाणे आहे. त्यास लगाम घालून आवरून ठेवणे आवश्यक आहे. मन स्थिर झाल्यावर भगवत् गीता अध्याय १३ वा यात सांगितल्याप्रमाणे 'अमानित्व मदंभित्व' या श्लोकात वर्णन केल्याप्रमाणे वागावे. ज्ञानेश्वरीत याचे सुंदर वर्णन केले आहे. ते पाहून आचरणात आणावे असे श्री दासगणु महाराज म्हणतात.

पूजा, ध्यान, मनन, स्मरण अथवा अनन्य भजन निरलसपणे केल्याने भगवत् भक्तीचा उदय होतो. भक्ती ही ज्ञानाची परिसीमा होय. हे जाणून घ्यावे. चित्तात भगवंत ठसले की इतरांचा जोर चालत नाही. अंत:करण द्रवीभूत व्हावयास या गोष्टी अपेक्षित आहेत. चित्त द्रवीभूत झाले की सर्व दोष जाऊन भगवंत चित्तात सहजासहजी समावतात. तसे भगवंत ठसले की विभाव, अनुभाव, व्यभिचारी भाव उत्पन्न होतात. त्यांच्या संयोगाने रस उत्पन्न होतो. विभाव दोन प्रकारचे असतात. (१) अलंबन विभाव - अंत:करणात भगवंताच्या आकार ठसावणे, (२) उद्दीपनविभाव तुलसी, चंदन, पुष्पमाला, अर्चा, मूर्तीचे सौंदर्य पाहून मनाची जी स्थिती होते तिला उद्दीपन विभाव म्हणातत. त्या विभावामुळे मूर्तीच्या ठायी वृत्तीचे आकर्षण होते यास अनुभाव म्हणातत. त्याची लक्षणे आनंदाश्रु, रोमांच, निश्चल शरीर होणं, कंठ दाटून येणे ही आहेत. आर्तता आणि संसार विरक्ती होणे या दोन्हीला व्यभिचारी भाव म्हणतात. भावांची जी निश्चलता तोच स्थायीभाव होय. येथे अवांतर भाववार्ता मुळीच नसते. या स्थायीभावापासून परमानंदप्राप्ती होते. तिलाच भगवद् भक्ती म्हणतात. या निरतिशयानंदास परम पुरुषार्थ म्हणतात. यात ज्ञानवैराग्याची कमतरता नसते. 'तपश्चर्येने जे श्रेय मिळते ते माझ्या भक्तांना भक्तीने मिळते' असे भगवान म्हणतात.

धर्म, अर्थ, काम, मोक्ष यांना पुरुषार्थ म्हटले जाते. पण वास्तविक हे चार पुरुषार्थ सुखोत्पत्तिची साधन आहेत. साधनालाच कित्येकदा साध्याच्या जागी नेऊन बसविले जाते. पण यांना साध्य म्हणणे केवळ औपचारिक आहे. जसे 'नांगर हे माझे जीवित आहे' हे म्हणणे औपचारिक असते, वास्तविक ध्यान हेच जीवित असते. वरील चार पुरुषार्थांना औपचारिकपणे पुरुषार्थ म्हटले जाते. तसे भक्तीचे नाही. ती परम पुरुषार्थ स्वरूप आहे. जेथे सुख असते तेथे दु:खाचा पूर्ण अभाव असतो. पण दु:खाचा पूर्ण अभाव असेल तेथे सुख असतेच असे नाही. सुषुप्तित किंवा प्रलयकारी दु:खाचा अभाव असतो पण सुख असते असे म्हणता येत नाही. असे श्री मधुसूदन सरस्वती म्हणतात. येथे श्रीदासगणूनी क्लोरोफॉर्मचे उदाहरण दिले आहे. क्लोरोफॉर्ममुळे यातना, वेदना जाणवत नाहीत म्हणजे दु:ख जरी गेले तरी सुखाचा प्रत्यय येत नाही. पण भक्तीच्या ठिकाणी दु:खाचा लेशही नसतो ती सर्वदा परमानंदरूपच असते. म्हणून चारी पुरुषार्थाशी तिची तुलनाच करता येत नाही. म्हणूनच पराभक्तीला पंचम पुरुषार्थ म्हणतात.

भक्तीत दोन भेद आहेत. परा आणि अपरा. अपरा भक्ती हे परेचे कारण होऊ शकते. पण येथे मुख्य स्थान पराभक्तीला आहे. म्हणजे ती साध्य आहे. म्हणून अपरा भक्तीही पाचवा पुरुषार्थ असे विद्वान लोक म्हणतात. अपरा भक्ती केल्याशिवाय परेचा उदय होत नाही. जसे जो मनुष्य प्रथम लहान असतो तो पुढे मोठा होतो तसाच हा न्याय आहे. भक्ती मुकुंदाची म्हणजे सर्वांतर्यामी सर्वेश्वराची करावी. एखाद्या मनुष्याने उत्तम प्रकारे धर्माचरण केले असेल पण त्याला भगवत्कथेबद्दल प्रेम उत्पन्न झाले नसेल तर ते सर्व निरर्थक झाले. एखादा नुसता शब्दपरायण झाला, शब्दांचे श्रवण केले तरी प्रेम उत्पन्न झाले नाही तर ते फोल ठरते. भगवंताची कथा सांगताना आणि ऐकताना दोन्ही वेळी मनात प्रेम दाटून आले पाहिजे. श्रीकृष्ण भक्ती उत्पन्न झाली पाहिजे. त्यासाठी अंत:करण अत्यंत शुद्ध झाले पाहिजे असे सांगितले आहे. ती उत्पन्न होत नसेल तर सर्व साधने निरर्थक झाली असे जाणावे. कारण हे सर्व करण्यामागे श्रीकृष्णभक्ती उत्पन्न व्हावी हाच हेतू असतो.

भक्ती अवघीच प्रेममयी असते. भगवंताशिवाय इतर कशाचा अंशही तिच्यात नसतो. भक्ती वैराग्य उपजविते, तिच्यामुळे ज्ञानही प्राप्त होते. म्हणजे ती पुरुषार्थाचे साधन आहे. पण हे वचन साधनभक्तीविषयी खरे आहे. पण फलभक्तीचे स्वरूप अगदी निराळे असते.

भक्ती या शब्दाची भावव्युत्पत्ति करावी. भक्ती हेच भजन आहे. भगवदाकार मन होणे दुसरे काहीही तेथे नसणे हाच अर्थ प्रशस्त आहे असा अर्थ केला की भक्ती परम पुरुषार्थ आहे याविषयी संशय राहत नाही. 'भज्यते सेव्यते अनन्यया' असा अर्थ केला तर भक्तीच्या ठायी साधनत्व येते. भगवदाकार मन ज्या योगे होते ती सर्व साधने असा करणव्युत्पत्तियोगाने तिचा अर्थ होईल. श्रवणादि नवविधा भक्तीच्या ठायी असाच अर्थ केला जातो. त्यामुळे ती भगवत् प्राप्तीची साधने ठरतात. बृहदारण्यकात 'विज्ञानमानन्दोब्रह्म' या वाक्यात 'विज्ञान' शब्दाची भावव्युत्पत्ति 'विज्ञप्ति: इति विज्ञान' अशी केली की 'विज्ञानरूप ब्रह्म असते' असा अर्थ निघतो. तैत्तरीय उपनिषदात 'विज्ञानं यज्ञं तनुते' यात विज्ञानं या शब्दाला करणव्युत्पत्ति लावली. 'विज्ञायते अनने' अशी व्युत्पत्ति लावून 'विज्ञानं' म्हणजे अंत:करण असे ठरवले. म्हणजे व्याकरण शास्त्रामुळे विज्ञान शब्दाचे दोन अर्थ झाले. ही पंडितांची कला आहे. शब्दशास्त्रामध्ये सावधगिरी ठेवली पाहिजे आणि सारासार विचारही केला पाहिजे. पहा 'वि' उपसर्ग लावून 'विधवा' शब्दाचे दोन अर्थ होतात. 'विगतो धवा यस्या' सा विधवा किंवा 'विपुला धवा यस्या: सा विधवा' शब्द चित्र दाखविण्यापुरते हे उदाहरण श्री दासगणु महाराजांनी दिले आहे.

भक्ती शब्दापासून साधन आणि फल असे दोन अर्थ निघतात असे मानण्याचे मुळीच कारण नाही. जसे अक्षर ओळख व्हावी म्हणून साधक

अक्षरे गिरवतो. अक्षरज्ञान झाल्यावरही तशीच अक्षरे काढतो. अक्षरांच्या मांडणीत काही फरक नसतो. ती जशीच्या तशीच असतात. फरक इतकाच असतो अक्षरे गिरवताना तो गुरूची मदत घेतो. तीच अक्षरे चित्तात ठसली की मग कुणाचीही किंचितही मदत त्याला लागत नाही. यात अक्षरांची मांडणी पहिली आणि अखेरची तीच असते म्हणजे साधनभक्ती आणि फलभक्ती निश्चितच एकरूप असतात. पण हे म्हणणे चिकित्सकांना पटणार नाही. कारण श्रेष्ठ प्रतीच्या साधकांच्या ठिकाणी भगवन्नामस्मरणात चिंतनाने नाना विकार होतात. कुणी रडतात, कुणी हसतात, कुणी गातात, कुणी नाचतात, कुणी भगवत् स्वरूपात तल्लीन होऊन जातात. म्हणजे त्यांना परम पुरुषार्थ प्राप्त होतो. स्वस्थ, सुखी आणि शांत होऊन ते बसतात. म्हणजे अक्षरग्रहण साधनाने अर्थज्ञान हे फल पूर्णपणे पदरात पडते.

तपश्चर्या, वेदपठण, यज्ञादि कर्म, दान, ज्ञान-विज्ञान देणे यापासून जे फळ तेच हरीचे नामस्मरण होय. हरीचे गुणवर्णन भवरोगांतून मुक्त करणारे असून ते कर्णमधूर आणि सेवनाने मनाला आनंद देणारे आहे. असे सर्व विद्वान कंठरवाने सांगतात. सर्व सुकृताचे फळ ब्रह्मविद्या आहे या कारणाने भक्तीलाही ब्रह्मविद्यत्व येते. मग हा भक्तिप्रतिपादनाचा खटाटोप का केला असे कित्येक जण म्हणतील यात शंका नाही. पण श्री मधुसूदन सरस्वती म्हणतात की ब्रह्मविद्या भक्तीसारखी नाही ती निराळीच आहे. या दोहोमध्ये फार मोठा फरक आहे. भक्तिस्वरूप या प्रकारचे आहे की चित्ताला द्रवत्व येऊन पूर्णपणे भगवदाकार वृत्ती व्हावी लागते. ब्रह्मविद्येत निश्चितच मनोवृत्ती निर्विकल्प झाली पाहिजे. पण तिला चित्तद्रवत्वाची आवश्यकता नाही. ब्रह्मविद्येचे साधन 'तत्त्वमसि' आदि वेदांत श्रवण असून भगवद्विषयक प्रेम हे भक्तीचे साधन आहे. सर्व अनर्थाला कारण जो संसार त्यापासून पूर्ण निवृत्त होणे हे फळ असून साधन चतुष्ट्य संपन्न असेल तोच ब्रह्मविद्येचा अधिकारी ठरतो. भगवत् भक्तीचे अधिकारी भूमीवरील सर्व प्राणिमात्र आहेत मात्र अंतरी भगवत्प्रेम मात्र उपजले पाहिजे. या दोन्ही साठी पूर्व सुकृताची अपेक्षा आहे. ज्याचे पूर्ण सुकृत असेल त्यालाच हे साधते.

साधन एक असले तरी त्यापासून एकच कार्य उत्पन्न होत नाही. ब्रह्म विद्या आणि भक्ती यांची साधने जरी सारखी असली तरी सामुग्रीत तफावत आहे. आता ब्रह्मविद्या आणि अपराभक्तीत खरोखर फरक आहे. असे मानले तरी त्या दोहीस पुरुषार्थत्व येत नाही. पराभक्तीचे तसे नाही. ती ठायीच्या ठायी सुखरूप असून तिचा नाश कधी होत नाही असे भागवत सांगते. म्हणून स्वर्ग सुखापाशी भक्तीला कधी बसवू नये. कारण ती परमपुरुषार्थरूपच आहे. हेच सिद्ध होते म्हणून भक्तिरस हा प्रधान आहे. इतर सर्व रसात अशी थोरवी नाही. पातक नाश होण्याच्या दृष्टीने इतर सर्व रस फुकट आहेत, तसे भक्तीचे नाही. कारण तिच्यात भक्तिरस प्रधान असतो. भक्तिरसामुळे दृष्ट आणि अदृष्ट दोन्हीची प्राप्ती कर्त्यास होते हे विसरू नये. भाग स्कंध १ अध्याय ७ मध्ये म्हटले आहे की ज्यांची अज्ञानरूपी हृदयग्रंथी निश्चित तुटून गेली आहे असे ब्रह्मनिष्ठ मुनीही श्रीविष्णुची भक्ति करतात. या योग्यांची ही भक्ती अहेतुक स्वरूपाची असते. या अहेतुक भक्तीलाच पराभक्ती म्हणतात. जी पराभक्ती मानवाला कशा रीतीने साध्य होईल हेच या भक्तिरसायन ग्रंथात सांगितले आहे. श्रीदासगणु महाराज म्हणतात की संसारमायेने संत्रस्त झालेल्या मनाचे निरसन करण्यास भक्तिरसायन हाच एक उत्तम मार्ग आहे. या ग्रंथासारखा दुसरा सुलभ उपाय नाही. हा ग्रंथ संसारतापाचे निरसन करून श्रीहरीचे दिव्यचरण तुम्हाला भेटतील याबद्दल शंका नको. या ग्रंथासारखा ग्रंथ या भूमीवर आजवर निर्माण झाला नाही हे त्रिवाचा सत्य आहे. हे भक्तिरसायन तुम्ही कितीही प्राशन केले तरी यास ओहोटी लागणार नाही. ते कधीच संपत नाही आणि शिल्लक राहत नाही. अशी याची थोरवी शास्त्रात वर्णिली आहे. भक्ती ही अवघी रसरूप असून परम पुरुषार्थरूप आहे हे निश्चित. कोणतेही साधन हिची बरोबरी करू शकत नाही.

आता भक्ती कशास म्हणावे ते ऐका. त्यासाठी आधी चित्त द्रुत व्हावे लागते. चित्त द्रुत होणे म्हणजे मनाचे जे कठीणपण ते श्रीहरीच्या प्रेमाने निरसून गेले पाहिजे आणि त्याच प्रेमाला सुखसागर जो श्रीहरी त्याच्याशी एकरूप होण्यासाठी गती मिळाली पाहिजे आणि तो प्रेम प्रवाह अखंडित वाहत राहिला पाहिजे. यालाच श्रीहरीची भक्ती म्हणतात. अशी भक्ती जेव्हा मनात उत्पन्न होते तेव्हा तिला परम पुरुषार्थ म्हटले जाते. चित्ताची भगवदाकारता म्हणजेच स्थिरता होय, म्हणजे चित्ताच्या ठायी सर्वदा हरीच असला पाहिजे. हे चित्त स्वभावत:च लाखेप्रमाणे आहे, ते पातळ किंवा कठीण होते. अग्निच्या स्पर्शानेच लाख पातळ होते. उन्हामुळे ती थोडी मृदु, शिथिल होते. पण अग्निशिवाय पातळ होत नाही.

आता उन्हाप्रमाणे तापविणारे सप्त विषय असतात ते म्हणजे काम, क्रोध, स्नेह, भय, हर्ष, शोक आणि दया हे होत. हे अंत:करणास मृदु करतात पण संबंध सुटल्यावर ते कठीण होते. ज्या विषयाचे आधिक्य झाले असेल त्याची झाक मनावर उठते आणि त्यावेळी मनाचा जो आकार होतो तो कायम राहतो. चित्त द्रुत झाल्यावर ज्या वस्तूचा आकार मनावर ठसून कायम राहतो त्यालाच भावना अथवा वासना म्हणतात. सामान्य जे ताप देणारे विषय त्यापासून चित्त शिथिल होत हे खरे पण ते द्रुत (द्रवरूप) मात्र होत नाही. चित्त शिथिल झाल्यावर काही आकार उठले तरी तो आकारभास मात्र असतो हे विसरू नये. चित्त द्रुत झाल्यावर त्यात वासना उत्पन्न होते. शिथिल झाल्यावर तसे होत नाही. त्यावेळी नुसता वासनाभास उत्पन्न होतो. भासाठायी सत्यत्वास जराही जागा नसते. पहा दोरीवर सर्पाचा भास झाला तरी ज्ञान झाल्यावर तो दूर होतो. तसेच येथे आहे.

द्रुत अवस्थेत चित्त ज्या प्रकारे होते तो तो आकार कधी नाहीसा होत नाही. पातळ झालेल्या लाखेत रंग मिसळला तर ती लाख स्वत:च त्या रंगाप्रमाणे होते मग ती परत कठीण होवो, अथवा तशीच पातळ राहो किंवा तिला काही आकार प्राप्त होवो तरी ती रंग मात्र कोणत्याही अवस्थेत बदलत नाही. त्याप्रमाणे द्रुत चित्त भगवदाकार झाले की तेथे कशाचीही भीती उरत नाही. भगवदाकार झालेले चित्त विषयाशी खेळले

तरी त्याने ते मळत नाही. एखादा ज्ञानी पुरुष पोरांबरोबर घटकाभर खेळला तरी तो आपुल्या मूळस्वरूपी स्थिर असतो. उदाहरणार्थ, राजा जनक चित्तात विरक्त असून राज्यादि संपत्ति भोगतच होता. याउलट शुकाचार्य सर्वथा दिगंबर योगी. दोघांचेही चित्त भगवदाकार झालेले होते हेच खरे! दोघांच्या स्थितीचे निरीक्षण केले तर ती अगदी भिन्न आहे. पण राज्यादिकास पाहून शुकाचार्यांचे मन वेडावून गेले नाही किंवा जनकांनाही सर्व सोडून शुकासारखे जगभर लंगोटी सोडून फिरत राहावे असे वाटले नाही. ते परिस्थितीनुसार वागले असे दासगणु महाराज म्हणतात. एवंच प्राणिमात्राच्या ठायी जो भगवदाकार पहातो अथवा भगवंताठायी जो सर्व भूतांना पाहतो तोच उत्तम भगवद्‌भक्त असे (भाग स्कंध ११-२ अ) मध्ये म्हटले आहे. चित्ताच्या द्रवावस्थेत जो भगवदाकार बनला जातो तो सहज रित्या चहूकडे भगवंतास पाहू शकतो. हा जो झालेला संस्कार तो तिळभरही नाश पावत नाही. म्हणून ब्रह्मवेत्ता नर भगवत भक्त असतोच असे नाही कारण ब्रह्मवेत्त्यास द्रुतचित्त आवश्यक नसते. म्हणून त्यांच्यामध्ये उत्तम, मध्यम, कनिष्ठ भेद करता येत नाही. भक्तांमध्ये हे तीन भेद निर्माण होतात. पूर्ण द्रुत चित्त झालेला तो उत्तम भक्त जाणावा. ज्याच्या मनाची शिथिलावस्था झाली असेल तो मध्यम भक्ताची पदवी प्राप्त करतो. चित्ताला द्रवत्व आलेले नाही अथवा ते शिथिलही झालेले नाही पण भगवद्‌भक्तीचे अनुष्ठान नियमाने चालले आहे तो कनिष्ठ भक्त म्हणावे. अनुष्ठानाने क्रमाने मध्यम आणि उत्तम भगवद्‌भक्त तो होऊ शकतो. म्हणजे कनिष्ठ प्राकृताचे जवळ सामुग्री सर्व जमा झाली आहे पण स्वयंपाक झालेला नाही असे समजावे. ज्याचा स्वयंपाक झालेला आहे त्यास मध्यम म्हणावे आणि जो भोजनास बसला आहे तो उत्तम भक्त होय. हे उदाहरण फक्त क्रम समजण्यासाठी दिले आहे असे दासगणु महाराज म्हणतात.

उत्तम भक्ताला मी आणि भगवंत द्वैत संपून एकरूप झालो असे वाटते. एका परमात्म्यांवाचून या जगात काहीच नाही या भावनेच्या ठायी तो स्थिर असतो. चित्त द्रुत झाल्यावर ज्या चित्तात भगवदाकार संचार करू लागतो त्यास स्थायीभाव म्हणतात. हा स्थायीभाव तीन भावाने प्रकट होतो म्हणजे हे तीन भाव वरचेवर दिसू लागतात, ते म्हणजे विभाव, अनुभाव आणि व्यभिचारी भाव याच स्थायीभावास रस असे म्हणतात. भगवान स्वत: शुद्ध परमानंदरूप आहेत. ते चित्तात ठसले म्हणजे रस परिपूर्ण होतो. भगवदाकार हा परमानंदरूप आहे. हाच भक्तीचा स्थायीभाव आहे म्हणून भक्तीरस हाही परमानंदरूपच असणार यात शंका नाही. म्हणून इतर रसांना भक्तिरसाच्या पंक्तीत आणून बसवू नये.

सत् चित्त स्वरूप असलेले आणि अज्ञात असे ब्रह्म आनंदावरूनच ज्ञात होते, ब्रह्म सर्वत्र चोहीकडे भरून राहिलेले आहे म्हणून त्याचा विचार केल्यावर ते सापडते. कांतादि विषयापासून आनंद मिळतो म्हणून तेथे चैतन्य आहे हे स्पष्ट होते. परमात्मा जर जड असता तर त्याला विषयानंद कळला नसता. तो चैतन्यरूप आहे म्हणूच तो विषयानंदास जाणतो. आता ब्रह्माला कशाचेच भान नसते म्हणून त्याला आवरण, विक्षेप नाही. ते चैतन्य स्वयंप्रकाश आहे आणि नाही यालाही तेच आधार आहे. लौकिक विषयामुळे जेव्हा चित्त द्रुत होते तेव्हाच त्यात चैतन्य प्रवेश करीत असते. पण लौकिक विषयांशी जडाचा संबंध असल्याने त्यास रसपूर्ततेचा मान मिळत नाही. भक्तिरसाचे तसे नाही. ती परमानंदरूप असल्याने रसपूर्ततेचा प्रत्यय येतो. साऱ्या विषयादि सुखात रसात खऱ्या सुखाचा अंशही नसतो केवळ सुखाभास असतो. परमात्म्याच्या भक्तिठायीच पूर्ण सुख असते. म्हणून तीच सेवन करण्यास योग्य ठरते. येथपर्यंत वेदांताचे सिद्धान्त उपयोगात आणून रसोत्पत्तीचे सत्य कथन केले आहे.

सांख्य सिद्धांतास धरून जगाचे मुख्य कारण पूर्ण प्रकृतीच आहे. ती प्रकृती त्रिगुणात्मक असून जगात एकही वस्तू त्रिगुणांवाचून नाही. म्हणून त्या सुख-दुःख मोहात्मक आहेत. मृत्तिकेच्या पात्राचा आकार बदलला तरी मातीच्या ठायी फरक पडत नाही. तसेच या जगात प्रकृतिशिवाय काहीही नाही. आपल्या मानसिक भावना जशा असतील त्याप्रमाणे जग दृष्टिगोचर होते. एकच वस्तू तिघांना निरनिराळी दिसते. सर्वांच्या चित्तीचा भाव जर एक असता तर ती सर्वांना समान दिसली असती, तसे होत नाही. श्रीदासगणु महाराज म्हणतात सात्त्विक युधिष्ठिराला जग चांगलेच भासते तर तेच रजोगुणी दुर्योधनाला दोषी दिसले कारण तो स्वत:च दोषी होता.

मनाठायी जेव्हा सुखाकार प्रविष्ट होतो तेव्हा तोच भाव स्थायी होऊन रस होतो. रजतमाचेही असेच आहे. ज्या गुणाचे आधिक्य असेल त्याप्रमाणे सुखदुःख मोह यांचा प्रत्यय येतो. हे श्री मधुसूदन सरस्वतींचे बोल अमोल आहेत असे श्रीदासगणु महाराज म्हणतात.

डोळ्याचा स्वच्छपणा जसा दृष्टीस कारणीभूत ठरतो तसा मनाचा सत्त्वगुण समजावा. मनाच्या ठायी रजतमापेक्षा सत्त्वगुणाचे प्रमाण जास्त असते हे ख्यातच आहे. सुख, दुःख, इच्छा, द्वेष हे विकार उद्‌भविण्यास मन हेच कारण असते. म्हणून सर्व शरीरभर त्याची प्रचिती येते म्हणजे मन हे सर्व शरीरास व्यापून राहते. जसे डोळे दोन असले तरी वस्तू दोन न दिसता एकच दिसते, तसे इंद्रियद्वारा जे वस्तूमान मनाला होते ते एकच परिपूर्ण असते. पृथक् पृथक् इंद्रियांची ज्ञाने मनाला एकाच वेळी कळतात ही गंमतच आहे. म्हणजे एकाचवेळी शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध मनास कळून येतात. सर्व भिन्न भिन्न विषयांचे ग्रहण मन एकाच वेळी करते. आरशाप्रमाणे हे विषयग्रहण मन करते याविषयी वेदांती आणि सांख्य यांचे एकमत आहे. विषयासी संयोग झाल्यावर मन तदाकार होते. या म्हणण्यालाही मोठमोठ्यांचा आधार आहे. चित्त द्रुत होऊन विषयाकार होते. जसे कचारी (काचेच्या वस्तू बनविणारा), तांबट (तांब्या पितळेच्या वस्तू बनविणारा) वा सोनार यांच्या व्यवसायाचा विचार करावा. कचारी मूष (पात्रविशेष) ठेवतो, अग्निच्या संयोगाने तो (मूष) काचेचा रस बनविते, तो बांगड्यांच्या ठशात ओतला गेला की त्याची बांगडी होते. तांबे, रूपे किंवा सोने (२४ नंबरी) मूषीत पडल्यावर त्यांची अशीच स्थिती होते. द्रव्याचा पूर्ण रस बनला की प्रथम त्या रसाला मूषीचा आकार प्राप्त होतो. मग व्यापारी तो ठशात ओततो तेव्हा त्याच

रसाच्या नानाविध मूर्ती बनतात. तसेच द्रुत झालेलं चित्त नेत्राद्वारे त्या वस्तुप्रत प्रेम अथवा द्वेषाने पोहोचते, तेव्हा ते तदाकार होते. प्रेमापाशी गेले तर प्रेमरूप होते, द्वेषापाशी गेले तर द्वेषी होते. श्री दासगणु महाराज म्हणतात की मनाची अशी स्थिती होते याविषयी शंका घेऊ नये. श्री मधुसूदन सरस्वतींच्या सारखा ग्रंथकार आता होणे नाही.

सर्वांवर प्रेम करावे यात संशय नाही. पण व्यवहारात भिन्नता प्रत्ययास येते. कांतेच्या प्रेमात श्रृंगार प्रत्ययास येतो तर मातेच्या ठायी मूर्तीमंत वात्सल्य प्रेम असते. म्हणजे क्रियेची आणि प्रेमाच्या प्रकाराची वाटणी झाली पण स्त्री या व्यक्तीची वाटणी अणूमात्र झाली नाही. स्त्रियांप्रमाणे पुरुषातही जावई, सासरा, मुलगा, बंधु, चुलता इत्यादी प्रकार घडून येतात. म्हणजे एकत्व आणि अनेकत्व एकाच ठायी नांदते हे सिद्ध करण्यासाठी वरील उदाहरणाने दिले आहे.

बुद्धी कठीण असेल तर चित्तास द्रुतता येत नाही अथवा ती शिथिल असली तरी काही उपयोग चित्त द्रुत करण्यासाठी बुद्धी साक्षात सुकाणूप्रमाणे आहे म्हणून येथे चित्त द्रुत करण्यासाठी समस्त भक्तीपोषक गोष्टीच मनात आणाव्या आणि विषयाकडे नेणाऱ्या गोष्टी वर्ज्य कराव्या ह्या चित्त वळविण्यासाठी पायऱ्या आहेत. संगतीचा परिणाम चित्तावर होतो म्हणून वासनामूलक गोष्टी टाळाव्या.

चित्त द्रुत झाल्याविना भगवदाकार स्थिरावत नाही. जसे लाख पातळ झाल्यावर रंग मिसळत नाही. म्हणून जो आकार पसंत नसेल त्याची साधकाने उपेक्षाच केली पाहिजे. भगवदाकार चित्त द्रुत झाले असे त्याच वेळी म्हणता येते की ज्यावेळी त्यात अष्टसात्विक भाव प्रगट होतात. असे भाव उमटले म्हणजेच चित्ताला मोक्षदायी द्रवता आली असे जाणावे. असा साधक सहजच कृतार्थ होतो. म्हणून बुद्धीचे काठिण्य भगवत्प्राप्तीकरता मुळीच उपयोगी नाही. ते विषयांच्या ठायी योजावे. अष्ट सात्त्विक भावाना जेव्हा चित्तात स्थान मिळते तेव्हा ते भगवद्भक्तिमध्ये डुंबू लागते. अशी स्थिती जोवर होत नाही तोपर्यंत साजिरी चित्तशुद्धी झालेली नाही असे समजावे.

चित्त मूळचेच अत्यंत शुद्ध आहे. त्यात जराही किल्मिष नाही. ते विषयाच्या संगाने विकारी होते पण उपाधि गेली की ते मूळचे जसे आहे तसेच परत होते यात जराही संशय नाही. चित्त हे मूळचे विषयाकार नाहीच नाही. त्याची भूमिका फार स्वच्छ आहे. ते आगंतूक कारणांनी विषयाकार होते. म्हणून त्या कारणांचा ज्ञात्यांनी त्याग केला पाहिजे तरच त्या चित्ताची मूळची शुद्धता तत्त्वत: त्याला लाभेल. म्हणून साधकाने निरंतर आदराने ब्रह्मविचार केला पाहिजे. क्षणभर विषयाच्या संसर्गाने चित्त विषयाकार होते. पण ते कायम टिकत नाही. ही विषयाकार होण्याची ती वावटळ उठते ती शांत करण्याचे उपाय शास्त्रात सांगितले आहेत. भगवंताने निर्माण केलेला हा सनातन धर्म खरोखर धन्य आहे. याचा विचार केला असता खरेखोटे सर्व काही कळते. कठीण आणि द्रुत हे सापेक्ष धर्म आहेत खरे पण भक्ति शास्त्रात दोन्हीची अपेक्षा आहे. भगवदाकार होण्याचा चित्ताचा स्वभाव धर्मच आहे कारण की त्याचा परमेश्वराशी नित्य संबंध आहे.

येथे अशी शंका येते की चित्त जर भगवदाकारच होत असेल तर मग शास्त्राचा उपयोग करण्यास जागाच राहत नाही. पण नैसर्गिक रीतीने चित्ताचे जे भरून जाणे म्हणजे भगवदकार होणे ते कोणालाच विरोध करीत नाही. नैसर्गिक जी भगवदाकारता ती निसर्गाची सत्ता आहे. तिला दुसऱ्या भरण्याने बाध आणता येत नाही. पहा भांड्यात आकाश ओतप्रोत भरलेले होते पण कुणी त्यात पाणी ओतले तर त्याने त्या पाण्याला यत्किंचितही विरोध केला नाही. जसजसे जल भरत गेले तसतसे आकाश नाहीसे होत गेले हा अनुभव सर्वांना येतो. शास्त्राभ्यासे करून जे मन, चित्त भगवदाकार होते ते इतर विषयांना प्रतिबंध करते, त्यांना ठरूच देत नाही. सर्व विषयांचे अवगुण प्रथम जाणून ते आपले प्रथमचे स्वरूप – भगवदाकार होणे – नि:संशय टिकवीलच.

ब्रह्माची जी चिच्छक्ती तीच प्रकृति असून ब्रह्माप्रमाणे तिची व्याप्तीही अवघ्या जगभर आहे. प्रकृतीच्या गुणानेच मन विषयाकार होते. मनाची स्वाभाविक विषयकारता हीच प्रकृति होय. सनकादिकांनी ब्रह्मदेवास विचारले की चित्त विषयामध्ये शिरते आणि विषय चित्ताला सोडीत नाहीत तर संसार कसा तरावा? हे ऐकून भगवान हंसरूपाने तेथे आले आणि म्हणाले की, मी जीव ब्रह्माचा साक्षात अंश आहे. सर्व वृत्तींचा केवळ साक्षी आहे. या जागृत, स्वप्न, सुषुप्ति इत्यादी वृत्ती उठल्या हा सर्व प्रवृत्तीचा खेळ आहे. असे ज्ञान साधकाला झाले म्हणजे विषय व चित्त म्हणजे मन हे अलग होण्याचे मुळी कारणच राहणार नाही. यत्न न करता हे दोन्ही प्रकार नाहीसे होतील. यच्चावत् वस्तू, सर्व विषय भगवंताच्या ठायी अभ्यस्त आहेत. म्हणून घटपटाचा खेळ त्याच्या बळावर चालतो. म्हणून 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हे वर्म कधी सोडू नये. सर्व वस्तू भगवंताच्या ठायी अध्यस्त आहेत. त्या त्याला किंचितही सोडत नाहीत. भगवान् हे सर्वांचे अधिष्ठान आहेत हे जर मनामध्ये ठाम बाणले तर भासरूपी ज्ञान (खरे तर अज्ञान) तेथे टिकत नाही.''

यानंतर चार प्रकारच्या वैराग्याचे वर्णन आले आहे. यतमान, व्यतिरेक, एकेंद्रिय व वशीकार वैराग्य. वशीकार वैराग्य म्हणजेच अवर वैराग्य होय. इहपरलोकीचे भोग तुच्छ मानणे हेच एक वशीकार वैराग्याचे एक अंग आहे. अपर वैराग्यात मोक्षेच्छा बलवत्तर असते. मात्र वशीकार अथवा अपर वैराग्यात श्रमाची पराकाष्ठा होत नाही. परवैराग्य याहून श्रेष्ठ असते. यात भगवद् विषयक प्रेम आनंदभराने पराकोटीला गेलेले असते. पराभक्तीच्या ठायी भक्तिप्रकर्ष सदा राहतो म्हणून कृतकृत्यता येते. असे श्रेष्ठ भक्त मोक्षपदापर्यंतची सर्व सुखे तुच्छ समजतात. फक्त भगवंताच्या भक्तीशिवाय त्याचे मन काहीही इच्छित नाही. येथे मुचकुंद, प्रल्हाद, ध्रुव, वृत्रासूर इत्यादीची उदाहरणे दिली आहेत. जो भगवत्सेवा करतो त्याला ज्ञानवैराग्य मेवा भगवान अर्पण करतात. तो मिळाला की परमशांती मिळते.

नंतर आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी या चार प्रकारच्या भक्तात ज्ञान होऊन निष्काम झालेले भक्तच श्रेष्ठ असतात. त्यांनाच 'महात्मा' हे विशेषण शोभते. कारण त्यांच्यात आणि भगवंतात काहीच भेद नसतो. त्याला कशाचीच इच्छा नसते. त्याला यच्चावत वस्तूंच्या ठायी

भगवानच दिसतात. ज्याची दृष्टी ज्ञानबळाने सम झाली असेल त्याच्याच इच्छेचे निर्मूलन झाले आहे असे समजावे.

परब्रह्माच्या ठायी मन निश्चय होत नसेल तर त्यासाठी उपाय सांगितले आहेत. हेच भागवतधर्म आहेत. श्री सद्गुरूकडे जाऊन ते सर्व शिकून घ्यावे. गुरूगृही गेल्यावर मन नि:संग करून सत्संगतीचा मार्ग सदैव धरावा. ब्रह्मचर्य, शौच, तितीक्षा ही पथ्ये पाळावी. कशाच्याही योगे अंत:करणात खळबळ माजू देऊ नये. मन संतुष्ट असावे. अचल श्रद्धा ठेवून भागवतशास्त्र पहावे. भागवत धर्म आचरावे. इतर शास्त्रांची उपेक्षा करावी. नवविधा भक्तीचे अनुष्ठान करावे. कृष्ण भक्ताची संगत करावी. सज्जनांशी स्नेह करावा, त्यातच सदा तल्लीन व्हावे म्हणजे भगवद्भक्ती उत्पन्न होऊन अष्टभावांची प्रचिती येऊन कायमची शांती मिळेल.

भागवताच्या प्रथम स्कंधात अधिकार भेदाने नारदांनी जे उपाय सांगितले आहेत ते पाहू या. भक्तीच्या या अकरा भूमिका आहेत. (१) सज्जनांची सेवा करणे, (२) त्यांच्या कृपेला पात्र होण्याचा अधिकार प्राप्त करणे, (३) सज्जनांच्या धर्माचे सर्व बाजूने अनुकरण करणे, (४) सत्श्रद्धेने हरिगुणश्रवण करणे, (५) हरीच्या ठायी प्रेम उत्पन्न होणे, (६) भगवत् स्वरूपाचे ज्ञान होणे, (७) प्रेमातिशयाने परमानंदात रममाण होणे, (८) भगवत्साक्षात्कार होणे, (९) भागवतधर्मावर निष्ठा दृढ होणे, (१०) भगवद् गुणांचा अविर्भाव वरचेवर होणे, (११) पराकाष्ठेचे प्रेम असणे.

यांत नारदांनी आपल्या पूर्वजन्मीची हकिगत सांगितली आहे.

यात पहिल्या पायरीत दोन प्रकार सांगितले : (१) साक्षात भगवंताची संगति, (२) भगवत् भक्तांची संगति. येथे भगवत् भक्तांची लक्षणे दिली आहेत. तसेच साधकाच्या अंगी काही विशिष्ट सद्गुण नसतील तर सत्समागम असून काही फायदा होत नाही. असे सांगून श्री दासगणु महाराजांनी तुकाराम महाराजांचे उदाहरण दिले आहे की सर्व देहू गावाला त्यांची संगत असूनही फक्त चौदा टाळकरी उद्धरले. नंतर सज्जनांच्या दयेला पात्र होणे यातही दोन प्रकार : (१) यदृच्छेने होणारी कृपा तीच खरी कृपा, (२) आपण प्रयत्न करून सत्पुरुषांची कृपा संपादन करणे ही होय. पहिलीचे उदाहरण प्रचेतसांच्यावर भगवान उमापतीनी केलेली कृपा हे दिले असून दुसरीचे उदाहरण ध्रुवावर नारदांनी केलेल्या कृपेचे दिले आहे. चौथ्या भूमिकेचे वर्णन करताना श्री दासगणु महाराजांनी तुकाराम महाराजांचे उदाहरण दिले आहे. त्यांची इच्छा नसता सवंगड्यांनी त्यांना जबरदस्तीने चावडीवर तमाशा पहायला नेले तर त्यादिवशी तमाशातील पोऱ्या लावणी न म्हणता वेदान्तच बोलू लागला!

पाचव्या भूमिकेत भक्ती स्थायीभावाला पोहोचली पाहिजे असे म्हटले आहे. सहाव्या भूमिकेत प्रकृति जरी सर्व करते तरी ते आत्म्याच्या बळावरच करते हे कळले की मोह नाहीसा होतो. आत्म्याची बारा लक्षणे ध्यानात धरली की 'त्व' पदाचा लक्ष्यार्थ जाणला जातो व मग 'तत्' पदाचा लक्ष्यार्थही कळतो. यालाच विज्ञान म्हणतात. असे सर्व प्राणिमात्रांचा आत्मा कृष्णच आहे असा मनाचा अनुभवजन्य सिद्धांत झाला पाहिजे, तसा झाला की वैराग्याची उच्च पायरी प्राप्त होऊन भक्ती दृढ होते ही सातवी भूमिका आहे. आठवी भूमिका म्हणजे भगवत् भक्तीचा प्रेमातिशय - यात अष्टसात्त्विक भाव प्रकटतात. चित्तात ईश्वराचे साक्षात् स्फुरण होते. ते झाल्यावर वाटेल तो साक्षात्कार होतो ही आठवी भूमिका आहे. भगवद्-धर्मनिष्ठा साधनरूप व तीच फलरूप ही भक्ताची नववी भूमिका आहे. दहाव्या भूमिकेत भगवंताचे गुण भक्तात येतात. म्हणजे तो प्रतिभगवंतच होतो. श्रीदासगणुंनी ज्ञानेश्वर महाराजांनी पैठणात टोणग्याच्या मुखांतून वेद वदविले, श्रीरामदासस्वामींनी जननीच्या नेत्रावरून हात फिरवून दृष्टी आणली. सावतामाळ्याने आपल्या उदरात साक्षात् भगवंत नामदेवांना दाखविला, श्री तुकारामांनी क्षुद्र धोंड्याला हात लावून देहूत त्याचा परीस केला. तेलाऐवजी पाणी घालून श्रीसाईनी शिर्डीत असंख्य दीप लावले ही उदाहरणे दिली आहेत. अकरावी भूमिका प्रेमाची पराकाष्ठा होणे ही आहे. याचे उदाहरण भागवत दशमस्कंधात गोवींले आहे. याप्रमाणे भगवद् भक्तीची लक्षणे आणि तिची सर्व साधने यांचे अकरा भूमिकांसह बहारदार वर्णन श्रीमत् परमहंस परिव्राजकाचार्य श्री मधुसूदन सरस्वतीनी केले आहे. येथे या ग्रंथातील प्रथम उल्लास समाप्त झाला आहे.

दृष्टादृष्ट दोन्ही फळे भक्तीपासून मिळतात. पण राजसी व तामसी भक्ती अदृष्ट फल देतात. दृष्ट फल (म्हणजे परमानंद) देण्याची शक्ती या दोन्हीत नाही. जीवन्मुक्त योग्यांना अदृष्ट फल प्राप्त नाही. त्यांना वर्तमान देहातच दृष्ट फल प्राप्त होते. अदृष्ट फळाची प्राप्ती भावी देहात होत असते. राजसी, तामसी भक्तीत रति उत्पन्न होत नाही म्हणून त्या दोन्ही व्यर्थ आहेत. रजोगुणी भक्तीत जो प्रबल सत्त्वांश असतो त्याने द्वेषच उत्पन्न होतो. तसेच तमोगुणी भक्तीत भय व द्वेष उत्पन्न होतात. मथुरानाथ कंस या भक्तीनेच मरण पावला. शिशुपाल आणि कंसाला जो कृष्ण ध्यास लागला त्या ध्यासाने त्यांना विपरीत फल प्राप्त झाले. त्या दोघांचे चित्त द्रुत झाले होते पण भगवद् भक्तीवाचून.

नंतर रतिचे स्वरूप सांगून तिचे प्रकार त्यांच्या स्वरूपासह उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहेत. उपाधिरहित भक्ती आणि मिश्रभक्ती कशास म्हणावे हे सांगून कामना, संबंधजा, भयजा हे भक्तीचे प्रकार स्वरूपासह सांगून ही नावे केव्हा देतात हेही सांगितले आहे. श्रीदासगणु महाराज म्हणतात श्रीमधुसूदन सरस्वती धन्य आहेत. त्यांच्या समान पुरुष होणेच नाही. नंतर मिश्रामिश्ररसं मधुरत्व कसे येते हे आम्रपन्ह्याचा दृष्टांत देऊन सांगितले आहे. भक्तीत अन्य अन्य भक्तींचे मिश्रण झाले की मधुरत्व कसे येते हे गोपिकांचे उदाहरण देऊन सांगितले आहे. कोणत्या भक्तीला चित्तरसाचे स्वरूप येते हे सांगून ज्या भक्तीत इतर रसांचे मिश्रण नसेल तिचे नाव शांतरस असून सनाकादिकांची भक्ती याच प्रकारची होती, तिची सर कुणालाही येणार नाही असे म्हटले आहे. परमानंद हेच भक्तीचे पूर्ण स्वरूप आहे कारण परमात्मा हा एकच परमानंदरूप असतो. इतर देवतांची भक्ती परमानंद स्वरूप होत नाही ती काजव्याप्रमाणे असते. तर परमात्म्याची भक्ती प्रकाशमय सूर्याप्रमाणे असते.

अध्याय १२ मध्ये तिसरा उल्लास सुरू होतो. यात (१) रस कशास म्हणावे, (२) ते कोठे पहावे, (३) त्यांचा अनुभव कसा घ्यावा, (४) अनुभवाचे रूप काय हे चार प्रश्न ग्रथित केले असून व्यभिचारी भावाचे तेहतीस प्रकार वर्णन केले आहेत. अध्याय तेरामध्ये सुखस्वरूप रसाचे आणि स्थायीभावाच्या दोन भेदांचे वर्णन केले असून सर्व भावांवर व्याख्यान केले आहे. श्रीदासगणु महाराज म्हणतात, 'ते सर्व लक्ष लावून अंतरी दृढ भावे धरावे म्हणजे भक्तीचा साक्षात्कार होईल. हा सर्व विषय शास्त्रीय पद्धतीचा आहे. तो मूळातून पहावा. गोषवारा थोडक्यात सांगता येत नाही. या भक्तीचे मुख्यांग म्हणजे श्रीहरीचे नामसंकीर्तन आणि त्याच्याच विषयी पूर्ण प्रेम, आदर असणे हे होय.''

याप्रमाणे या श्रीदासगणु महाराजांच्या 'श्रीभक्तिरसायन भावप्रकाशिका' या ग्रंथाचे रसग्रहणात्मक आस्वादन करण्याचा प्रयत्न येथे यथामति श्रीसद्गुरुकृपेने केला गेला आहे. गेले वर्ष दोन वर्षेया ग्रंथाचा अभ्यास काही ना काही निमित्ताने घडत गेला आणि श्रीसद्गुरुकृपेने परमानंदाचा लाभ झाला. श्री मधुसूदन सरस्वती यांनी भक्तीचा जो सर्वांगाने विस्तृत विचार केला आहे तो पाहून थक्क व्हायला होते. हा ग्रंथ इतका महत्त्वाचा असूनही त्याचा हिंदी वा मराठीत फक्त एकेकच अनुवाद उपलब्ध आहे. श्रीदासगणु महाराजांच्या ग्रंथाच्या प्रतीही आता उपलब्ध नाहीत असे कळते. या ग्रंथाबद्दल प्रेम उत्पन्न झाल्याने या अल्पपरिचित ग्रंथाचा लाभ मराठी वाचकांना व्हावा म्हणून विस्तारभयाचा विचार बाजूस सारून हा दीर्घ लेख लिहिण्याचे धाडस केले आहे. हा लेख वाचून वाचकांना जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यांनी श्री दासगणु संस्थानाकडे या ग्रंथाची नवीन आवृत्ती काढण्याची मागणी करावी अशी ही अपेक्षा आहे. वाचकांनी या लेखाबद्दल आपले अभिप्राय कळविल्यास आनंद वाटेल. शेवटी परत परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमधुसूदन सरस्वती स्वामी महाराज आणि श्री दासगणु महाराज यांच्या चरणी विनम्र अभिवादन करून लेखणी खाली ठेवते.

हरि: ॐ तत् सत्


**- डॉ. कमलताई वैद्य**

होलीमॉन्ट, ३५, विजयनगर,
श्री शिल्प चिंतामणी को.ऑप.हौसिग सोसायटी,
वानलेसवाडी, सांगली - ४१६४१४
दूरध्वनी : (०२३३) २६०१२१९


***



# संत दासगणु महाराजांचे फटके आणि पोवाडे

**श्री. सुनीलजी चिंचोळकर**

बी.कॉम., १२ वर्षे सज्जनगड येथे व्यवस्थापन, ३२ पुस्तके प्रकाशित, शिवचरित्र, ज्ञानेश्वरी, दासबोध गीता यावर प्रवचने, समर्थ व्यासपीठ व समर्थ संस्थानचा पुरस्कार प्राप्त.

माझ्या एका प्रवचनाला एक वरिष्ठ पोलिस अधिकारी अध्यक्ष होते. 'प्रत्येक वर्णात आणि व्यवसायात संत होऊन गेले' या माझ्या वाक्यावरून त्यांनी मला विचारले, ''पोलिस खात्यात कोणी संत झाले का?'' तेव्हा मी त्यांना सांगितले की, दासगणूमहाराज हे पोलिस खात्यातील संत आहेत. पोलिस खात्याचे वैशिष्ट्य म्हणजे गुन्हेगार शोधणारी करडी नजर आणि एखादा गुन्हा कबूल करीत नसल्यास फटके लगावून त्याच्याकडून गुन्हा कबूल करवून घेणे. पोलिस खात्यातून निवृत्त झाल्यानंतरही फटके मारण्याची सवय दासगणु महाराजांची कायम राहिली. फक्त फटक्यांचे स्वरूप बदलले. दांभिकता आणि अंधश्रद्धा यांच्यावर आसूड हे त्यांच्या फटक्यांचे स्वरूप होते. सगळ्याच संतांनी बुवाबाजीचा निषेध केला आहे पण बुवाबाजीवर सडेतोडपणे कुणी फटके लगावले असतील तर ते म्हणजे समर्थ रामदास आणि दासगणु महाराज. दासगणु महाराज मुळात रामदासी असल्यामुळे समर्थांचा परखडपणा त्यांच्यात मुरलेला होता. त्यांनी कठोर शब्दात बुवाबाजीवर किंवा अंधश्रद्धेवर हल्ले चढविले आहेत. विशेष म्हणजे दासगणु महाराजांकडे केवळ दोषदृष्टी नव्हती तर राजहंसाचा विवेक सुद्धा होता. त्यामुळे भक्तीरसाने भरलेली हजारो कवने त्यांच्या लेखणीतून अवतरली.

देशकाल परिस्थितीचे भान हे रामदासी वाङ्मयाचे वैशिष्ट्य दासगणु महाराजांच्या काव्यात पानोपानी भरलेले आढळते. ते स्वत: उत्तम कवी आणि कीर्तनकार होते. आपल्याच क्षेत्रात चाललेला गोंधळ स्पष्टपणे मांडताना जशी धाडसाची आवश्यकता आहे तशी शुद्ध चारित्र्याचीसुद्धा आवश्यकता आहे. दासगणु महाराजांकडे तसे धवल चारित्र्य असल्यामुळे एवढ्या निर्भयपणे मठा-महंतांवर फटके लगावू शकले. त्यांनी कोणाचीही भीड बाळगली नाही. समाजात सर्वकाळ दांभिकतेने पोळलेला आणि म्हणून दांभिकतेला विरोध करणारा विचारवंतांचा वर्ग असतो. या विचारवंतांकडे प्रकटीकरणाची प्रतिभा असली तरी साहस नसते. या सर्व मंडळींनी दासगणु महाराजांना डोक्यावर घेतले. त्यांचे फटके ऐकण्यासाठी त्यांच्या कीर्तनाला तुफान गर्दी होऊ लागली. सत्ययुगातील उच्चत्तम आदर्श पुन्हा समाजात प्रस्थापित व्हावेत याची अत्यंत प्रामाणिक तळमळ त्यांच्या फटक्यातून व्यक्त होते. पूर्वीच्या काळातील आदर्शवाद आणि वर्तमानातील पतनाची परिसीमा याची तुलना ते वारंवार करीत राहतात. त्यांच्या मनाची अस्वस्थता या फटक्यातून प्रखरतेने जाणवते. किंबहुना फटक्याचा हा काव्यप्रकार महाराजांनीच लोकप्रिय केला.

'कुठून आठवले ढंग तुम्हाला बदफैलीमधे काय मजा?' या फटक्यामध्ये महाराजांनी प्रकृतीसंबंधी एक गहन सिद्धांत सांगितला. वेगवेगळ्या प्रकारच्या रोगराई, अकाली मृत्यू, दुष्काळ या सगळ्या संकटांना माणूस जबाबदार असून त्याच्या पापाचरणामुळे निसर्गही लहरीपणाने वागतो. आयुष्यभर वेदविद्या जतन करणाऱ्या अग्निहोत्र्याला मूठभर तांदूळ न देणारा गृहस्थाश्रमी मनुष्य जावई येताच शिरापुरीवर ताव मारतो. मंदिरांना रंग लावायला कोणाला वेळ नाही, हॉटेल्स् मात्र अलिशान पद्धतीने रंगविलेली असतात. कीर्तन, प्रवचन ओस पडतात तर सिनेमाला आणि नाटकाला प्रचंड गर्दी असते. ज्ञानेश्वरी आणि भागवत यापेक्षा भाकड कादंबऱ्या आणि नाटके यांना सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त होते. माणसाने आश्रम आणि वर्ण यांचे नियम तोडल्यामुळे त्याची ही दैन्यावस्था झाली आहे. प्रकरणाच्या शेवटी सदाचाराचा उपदेश करताना महाराज एक गोष्ट विनम्रपणे सांगतात की कोणाच्या वर्मावर बोट ठेवणे हा माझा हेतू नाही.

समर्थ रामदासांनी मनाच्या श्लोकात मनाला उपदेश केला आहे. त्याप्रमाणे 'मना सज्जना सावध व्हावे' या फटक्यात दासगणु महाराजांनी व्यावहारिक शिकवणुकीचा उपदेश केला आहे. गप्पा ठोकीत फिरणे, वेळ वाया घालविणे, ऋण काढून सण साजरा करणे, छानछोकीने रहाणे, फाजील तर्कट करून वाद घालणे, व्यसनाधीन होणे या विविध दोषांवर प्रहार केले असून मनाला त्यापासून अलिप्त रहायला सांगितले आहे. 'खरा धर्म तो पार बुडाला' या फटक्यात धर्माच्या नावाखाली लोक कसा पैशाचा खेळ खेळतात याचे परखड चित्रण करीत असताना महाराजांनी विविध संप्रदायातील बुवाबाजीला चांगलेच ठोकून काढले आहे. शंकराचार्यांची पीठे अथवा वारकऱ्यांचे फड यांचीसुद्धा महाराज

कानउघाडणी करतात. सामान्य माणसाची धार्मिक भावना लक्षात घेऊन त्याचे आर्थिक शोषण करणाऱ्या पोषाखी साधूंवर महाराजांनी चांगलेच आसूड ओढले आहेत. दुसऱ्याचे दोष पहाण्यापेक्षा स्वत:तील दोष पाहून माणसाने आत्मोन्नती करावी असे महाराज म्हणतात.

महाराजांनी जसे फटके रचले आहेत तसेच पोवाडेही लिहिले आहेत. रंगपंचमीचा पोवाडा, उसाचा पोवाडा, तानाजी मालुसरे आणि झाशीची राणी यांच्या पराक्रमाचे वर्णन करणारे पोवाडे महाराजांनी लिहिले आहेत. रंगपंचमीच्या पोवाड्यात पुण्यात माधवराव पेशव्यांच्या काळात रंगपंचमीचा सण कसा थाटामाटात साजरा केला जात असे त्याचे अत्यंत बहारदार वर्णन महाराज करतात. नाना फडणीस, महादजी शिंदे खुद्द माधवराव पेशवे रंगपंचमीत सहभागी होऊन आनंदसागरात कसे डुंबून जात त्याचे जिवंत चित्र महाराज उभे करतात. अनेक सरदार घराण्यांचा उल्लेख करतात. उत्तरार्धात महाराजांनी पोवाड्याला अगदी वेगळे वळण दिले आहे. पेशव्यांच्या रंगपंचमीचे वर्णन ऐकून महाराज मुद्दाम पुण्याची रंगपंचमी पहाण्यासाठी पुण्यात आले. बदललेले पुणे पाहून महाराजांना फार वाईट वाटले. आता हत्ती आणि घोडे यांच्या ऐवजी सायकली आणि मोटारी रस्त्यावर दिसू लागल्या. महाराज म्हणतात,

**मावळले शौर्य, पोकळ वाद माजला ।**
**सर्वत्र पुस्तकी ज्ञानासी पूर आला ।**
**अनीतिचा जाहला जोर, भाव दारूला ।**
**डोइचा पदर बायांनि खालि टाकिला ।**
**चहाकाफिची झालि दुकाने शक्तीचें ठाणे उठलें ।**
**देशामध्ये किति संपत्ति हे नोटांनी सांगितलें ।।**

इंग्रजी शिक्षणामुळे आणि पाश्चात्त्यांच्या अंधानुकरणामुळे पुण्यात नैतिक मूल्यांचा झालेला ऱ्हास पाहून महाराजांच्या मनाला यातना होतात.

उसाच्या पोवाड्यामध्ये भरपूर पैसा मिळण्याच्या आशेने ऊस लावणाऱ्या शेतकऱ्याच्या सगळ्या आशा कशा धुळीला मिळाल्या याचे हृदयद्रावक वर्णन महाराज करतात. हा पोवाडा वाचताना सरकारच्या चुकीच्या धोरणांमुळे शेतकऱ्यांवर आत्महत्त्या करण्याचा भीषण प्रसंग कसा येत असेल याची कल्पना करता येते. प्रत्येकजण शेतकऱ्याचा अंत पहातो. बिचारा शेतकरी ऊस विकून झाल्यावर चार पैसे प्राप्त होतील म्हणून आशेने सरकारी कचेरीत जातो तर तेथे त्याला पैसे मिळणे तर सोडाच पण कर्ज फेडायला सांगतात तेव्हा अशा धक्क्याने शेतकरी कोलमडून पडला तर आश्चर्य कसले? शेतकऱ्याच्या अज्ञानाचा आणि दारिद्र्याचा फायदा घेऊन सरकारी अधिकारी त्याला कसे भिकेला लावतात ते ऊसाच्या पोवाड्यात कळते. झाशीची राणी हिने इंग्रजांशी दिलेला लढा अथवा तानाजी मालुसरे यांनी सिंहगडावर केलेला पराक्रम याचे जिवंत चित्रण महाराज करतात. अशाप्रकारे वीररसाने भरलेले प्रभावी वर्णन महाराज करतात. एका पोवाड्यात हिंदू समाजाला कसे कठीण दिवस आले आहेत याचेही वर्णन आहे. थोडक्यात फटके आणि पोवाडे यांच्या माध्यमातून महाराजांनी तत्कालिन देशस्थितीवर आणि समाजव्यवस्थेवर लख्खप्रकाश टाकला आहे.

**– श्री. सुनीलजी चिंचोलकर**
अजिंक्यनगर, सिंहगड रोड, हिंगणे खुर्द, पुणे ४११०५१.
फोन : २४३४८०७०

।। श्रीशंकर ।।

**अभेद भक्तीचे सर्वोत्तम उदाहरण**

पांडुरंगाची शपथ मोडल्याबद्दल शिक्षा म्हणून संत गोरोबांनी स्वत:चे हात तोडून घेतल्याची कथा आख्यानांत आहे. ही वस्तुस्थिती वेगळ्याच कल्पकतेने मांडून देवभक्तांचे ऐक्य मनोरमपणे श्रीदासगणूंनी दाखविले आहे. भक्त श्रेष्ठ गोरोबांची अभेद भक्ती त्यातून त्यांनी व्यक्त केली आहे. 'माझे पण ते त्याने हरिले' या वचनातून व्यक्त होणारी अभेद भक्ती मोठी लक्षणीय आहे–

पद असे :

**कर माझे छेदिले** (देव रुक्मिणीला म्हणतात)
**भक्तवराने कमले माझ्या,**
**कां की गोरस गोकुळात मी याच करें हरिले ।।**
**त्याचे नच ते माझे तुटले ।**
**माझेपण ते त्याने हरिले ।**
**चित्त तयाचे अभेद गे, गणुने ज्या गायिले ।।**



# श्री व्यंकटेशाष्टक : एक नेत्रांजन

**श्री. सचिन बोरकर**
आर्किटेक्ट- लेखनाची आवड

श्री व्यंकटेश स्तोत्राव्यतिरीक्त व्यंकटेशाच्या दर्शनास गेल्यावर आलेल्या अनुभवानुसार श्रीदासगणुंनी हे श्री व्यंकटेशाष्टक स्तोत्र रचिले

श्रीसद्‌गुरु दासगणूमहाराज विरचित श्री व्यंकटेशाष्टक हे एक अद्‌भुत स्तोत्र आहे. सामान्यत: स्तोत्र हे भगवंताच्या रुपगुणैश्वर्याचे वर्णन करणारे, त्याची करुणा भाकणारे असे असते. परंतु हे स्तोत्र ह्या पठडीसाठी निश्चित एक अपवाद आहे.

स्तोत्राचा श्रीगणेश 'अपांपतिसुतापते' अर्थात सागरतनया श्री लक्ष्मीचा पती अशा संबोधनाने केला आहे. पुढील स्तोत्राचा आशय पाहता तो खूप सूचक व नेमका आहे. प्रथम चरणात पापहारी, कृपानिधी, शरणागतवत्सल व्यंकटेशाच्या विभुत्वाचे स्मरण करीत त्यास नमन केले आहे.

दुसऱ्या चरणात तू पतितोद्धाराच्या कार्यासाठी भूतली आला असतानाही या ठिकाणी दीन, धनहिनांस दूर का ठेवतोस? असा थेट सवाल केला आहे.

तृतीयचरणात भगवंताची जगत्रयाची जननी अशा मातृभावात आळवणी करून त्याच्याशिवाय बालकावर कृपा करणारे कोण आहे? व आई बालकास त्यजून दूर रहात नाही. मग तू धनहीन लेकरांस दूर का ठेवतोस? अशी भावस्पर्शी विचारणा केली आहे.

जर तुला दर्शनार्थ धन हवे असेल; तर आधी समस्त जगास धनाढ्य करून ठेव. मगच तुझी ही कृती साजेशी होईल असा सल्ला ते चतुर्थ चरणात देतात.

अशा प्रकारचा सराफीचा पायंडा पाडून तू आपले दीनवत्सल हे ब्रीद डागाळून घेऊ नकोस असे पुढील चरणी सांगतात. तुझ्या चरणावर माथा ठेवण्यासाठी पुजाऱ्याला पैसे द्यावे लागत असल्याने ह्या तुझ्या चरणांची मालकीही आता तुझ्याकडे राहिलेली नाही अशी मार्मिक टिप्पणी करून सज्जन लोक दिलेले दान परत घेत नाहीत; मग सर्व जगास दाता असणारा असा तू, तुच भक्ताला दिलेले परत कसे मागतोस? असा रोखठोक प्रश्न ते सहाव्या चरणात करतात. तर, सातव्या चरणात तू विश्वाचा माता-पिता असल्याने व साक्षात लक्ष्मी तुझे दास्य करीत असल्याने तुला धनाची जराही उणीव नाही. त्यामुळे तुझ्या चरणी नत होणाऱ्याच्या शिरी तुझ्या अभयंकरांखेरीज कोणताही दुसरा कर नसावा, अशी विनंती करतात.

पावन पंढरपुरी, चंद्रभागेतीरी तू जसा स्थित आहेस तसाच तू व्यंकटाचली सदैव वास कर. ह्या दासगणूच्या आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक त्रितापांचे हरण कर अशी विनंती करीत ते अष्टकाचा समारोप करतात.

हे स्तोत्र-आजही तिरुमलई-तिरुपती येथे, सर्वसामान्यांना येणाऱ्या अनुभवाने व्यथित झालेल्या एका भक्ताने भगवंताशी साधलेला संवाद आहे.

भगवंताचा एक दास भगवंताच्याच दारात त्याच्याच आचरणावर ताशेरे ओढतो, त्यास जाब विचारतो आणि त्याच्या भगवंताप्रतीच्या गाऱ्हाण्याचे एका स्तोत्ररुपात सृजन होते ही घटनाच मोठी विलक्षण आहे. एका भक्तास एवढा अधिकार, एवढे धैर्य कसे काय प्राप्त होते? ह्या प्रश्नाचा विचार करण्यापूर्वी ह्या स्तोत्राच्या सृजनांच्या प्रसंगाचा संक्षिप्त धांडोळा घेऊ या. श्रीसद्‌गुरु दासगणूमहाराज व्यंकटाचली दर्शनार्थ गेले असता त्यांस प्रवेशासाठी पैसे न दिल्याने मंदिरात प्रवेश नाकारला गेला. त्याप्रसंगी त्यांनी देवळाबाहेर दर्शनार्थ धरणे धरले. आपल्या भक्तास असे अडविलेले पाहून प्रत्यक्ष व्यंकटेशाने पुजाऱ्यास 'बाहेर दासगणु आला आहे, त्यास आत घेऊन या' असा दृष्टांत दिला. विस्मित पुजाऱ्यांनी बाहेर येऊन श्री दासगणूमहाराजांचा शोध घेऊन त्यांना आत नेले. ह्या भेटीच्या प्रसंगी ह्या भक्ताने मांडलेली आपल्या अंतरीची तळमळ स्तोत्र रूपाने प्रगटली.

आता उपरोक्त प्रश्नाचा विचार करूया. प्रत्यक्ष भगवंताच्या वर्तणुकीवर प्रश्नचिन्ह उमटविण्याची ताकद याच भक्तात कोठून आली? ह्यांच्या भक्तीचे स्वरूप कसे होते? दर्शनार्थ आलेले इतर भक्त असा विलक्षण प्रश्न का विचारू शकत नव्हते? कारण स्पष्ट आहे. त्या भक्तांचे भगवंताकडे काहीतरी काम होते. कोणी स्वदुरितांच्या नाशासाठी, कोणी अभ्युदयासाठी, काही ना काही देवाकडे

मागण्यासाठी रांगेत उभे होते. त्यामुळे प्रचलित व्यवस्थेवर बोट ठेवण्याचे नैतिक धैर्य, याचक भावात असल्याने त्यांच्या अंगी नव्हते. भक्तीच्या निर्हेतुक व निर्मळ स्वरूपामुळे श्री दासगणु महाराज व्यंकटेश्वराशी असा मोकळा संवाद साधू शकत होते.

वस्तूत: आपल्या पूर्वसुरींनी व संतांनी आत्मप्रचितीने जो भक्तिमार्ग आचरला व एकमुखाने प्रतिपादित केला त्यात भक्तीच्या विहंगम स्वरूपाचे दर्शन होते. विविध ग्रंथांमधून ह्या दार्शनिकांनी जरी वेगवेगळ्या रूपकांची व शब्दांची गुंफण केली असली तरी सर्वांचा लक्षार्थ एकाच समत्वपूर्ण जीवनमुक्त जीवनावस्थेकडे नेतो. अशा मानवीमनाच्या परमोच्च भावावस्थेत स्थिर असलेल्या दार्शनिकांनी भक्तीविषयक केलेल्या चिंतनाचे काही दाखले पाहूया.

परमभक्तशिरोमणी रामहृदय श्री हनुमंत आपल्या भक्तीचे स्वरूप विशद करताना श्रीरामांना सांगतात,

**देहबुद्ध्या तु दासोऽस्मि जीवबुद्ध्या त्वदंशक:।**
**आत्मबुद्ध्या त्वमेवाऽहं इति मे निश्चिता मति:।।**

भगवत्स्वरुपी अनन्यभावे तदाकार होण्याचे हे सूत्र उलगडताना शोधात समर्थ रामदास म्हणतात,

**मी भक्त ऐसे म्हणावे। आणि विभक्तपणेचि भजावे।**
**हे अवघेच जाणावे। विलक्षण।। ४.९.४।।**
**भक्त म्हणिजे विभक्त नव्हे। आणि विभक्त म्हणिजे भक्त नव्हे।**
**विचारेंविण काहीच नव्हे। समाधान।।४.९.६।।**

तत्त्व झाडा करून, आपले स्वरूप व भगवंत यांच्या अभिन्नत्वाचा शोध घेऊन, देहअहंतादि उपाधींचा निरास करून, दृढबुद्धीने अनन्यभावे स्वरूपी स्थिरावण्यास समर्थ 'नवमे भक्तीचे (आत्मनिवेदन) लक्षण' असे म्हणतात. तर,

**स्वस्वरुपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते।। वि.चु.३२।।**

अशी भक्तीची व्याख्या जगद्गुरु आद्य शंकराचार्य विवेकचूडामणी ग्रंथात करतात. श्री ज्ञानेश्वर माउली अशा भक्तांस 'समबुद्धी' व 'सर्वभूतहितेरत' अशा गुणवाचक विशेषणांनी गौरवितात.

आता इथे एक गोष्ट स्पष्ट होते की, जेव्हा आपण भगवंताकडे आर्ततेने संकटमोचनासाठी धाव घेतो, कधी अर्थकामादि भौतिक सुखांच्या प्राप्तीसाठी याचना करतो, किंवा भयापोटी भगवंताचे स्मरण करतो; तेव्हा आपल्या मनातील भाव सकाम असल्याने कामनेच्या स्वरूपानुसार तम, रज अथवा सत्वगुणांनी विकसित असतो. परिणामी, आपल्याला दयाळू भगवंताच्या कृपेची प्राप्ती होते; परंतु भगवतप्राप्तीपासून आपण दुरावतो. भगवंताचा जो खरा ज्ञानी भक्त असतो तो भगवंताशी पूर्णपणे एकरूप झालेला असतो. त्याला मुक्तीचेही प्राप्तव्य उरलेले नसते. सर्वांठायी भगवंताचे अस्तित्व प्रत्यंतरास येत असल्याने तो समबुद्धी व सर्वभूतहितेरत अशा भावावस्थेत पोचलेला विदेही जीवन्मुक्तच असतो. भक्तीचे असे 'निर्गुण' स्वरूप परम विशुद्ध आहे. अशी ही भक्तीची भावावस्था ईश्वरोपासनेपुरती सीमित नसून अखंड आचरणाचा विषय आहे. तसे नसेल तर त्यास केवळ 'विडम्बन' असे श्रीमत् भागवतात म्हटले आहे. तृतीय स्कंधात माता देवहुतीस कपिल भगवान सांगतात,

**अहं सर्वेषु भूतेषु भूतात्मावस्थित: सदा।**
**तमवज्ञाय मां मर्त्य: कुरुतेऽर्चा विडम्बनम्।। ३.२९.२१।।**

(मी आत्मरुपाने सर्व जीवांमध्ये राहतो, त्या मज परमात्म्याचा अनादर करून जे प्रतिमारुपातच माझी पूजा करतात, त्यांची ती पूजा म्हणजे केवळ 'देखावा' होय.)

**यो मां सर्वेषु भूतेषु सन्तमान्मानमीश्वरम्।**
**हित्वार्चां भजते मौढ्याभ्दस्मन्येव जुहोति स:।। ३.२९.२२।।**

(सर्व भूतमात्रांमध्ये स्थित, सर्वांचा आत्मा, परमेश्वर अशा माझी मूर्खपणाने उपेक्षा करून केवळ प्रतिमा-पूजनातच जो गढलेला असतो. तो जणू अग्नी सोडून भस्मामध्येच हवन करतो)

भक्तीच्या ह्या पूर्वसुरींनी सांगितलेल्या ह्या कसोट्यांवर आपल्या मनातील भक्ती घासून पाहिली की तिच्यातील पितळ उघडे पडते व संत भगवंताशी इतका सहज संवाद कसे साधू शकत होते याचेही उत्तर मिळते.

ह्याच विशुद्ध भक्तीतत्त्वाचा प्रतिष्ठापनेसाठी याच व्यंकटेशाने चंद्रभागातटी पांडुरंगरुपात, ज्यावेळी आपल्या लाडक्या भक्तास मंदिर प्रवेश नाकारला गेला होता तेव्हा मंदिर सोडून त्या भक्ताच्या हृदयात विसावा घेऊन अशाच एका अद्भुत लीलेचे प्रत्यंतर दिले आहे.

आज कलिकाळ व स्वकर्मगतीने प्राप्त गुणदोषांनी आलेली तमांधता व तज्जन्य आत्मविस्मृती यांनी ग्रस्त झालेल्या, आत्मज्ञानाचा सूर्योदय करून ईश्वरप्राप्त करवून देणारे सद्गुरू न भेटलेल्या; परिणामी भक्तीच्या विशुद्ध 'निर्गुण' स्वरूपापासून भरकटलेल्या माझ्यासारख्या लोकांसाठी त्या दयाघन नाना नाटकसुत्रधाराने आपलेच स्वरूप असणाऱ्या आपल्या भक्ताच्या माध्यमातून खऱ्या विशुद्ध भक्तीचे नेत्रांजन, अज्ञ, आर्त व अर्थार्थी भक्तांच्या डोळ्यात घालण्यासाठी, निष्काम भक्तीची महती अधोरेखित करण्यासाठी, रचलेली लीला म्हणजे ह्या स्तोत्राचे अवतरण होय.

।। ॐ तत् सत्।।

**- श्री. सचिन बोरकर**
फ्लॅट नं. ६, अरविंद कॉम्प्लेक्स,
२५/६ हिंगणे खुर्द, नित्यानंद हॉल शेजारी, सिंहगड रोड,
पुणे - ४११०५१ मोबाईल ९९७५५६८४४३

***





# कवी थोरले अनंत (घोलप) फंदी व कवी दासगणु साम्यस्थळे

**डॉ. मधुकर काशिनाथ मोंढे**
एम.अे. पीएच.डी. शिक्षण खात्यात ३८ वर्षे सेवा, शाहिरी वाङ्मयाचा अभ्यास, तीन गद्य व तीन पद्य पुस्तकांचे लेखन. कविता व स्फुट लेखांचे सातत्याने लेखन, सातवे पुस्तक प्रकाशनाच्या मार्गावर.

थोरले अनंत फंदी हे कवी व शाहीर होते. ते अहमदनगर जिल्ह्यातील तालुक्याचे गाव संगमनेरचे. ते अतिशय हूड व उनाड होते. दिवसभर मित्रांसमवेत गावभर फिरत भटकत, पितृहीन अनंताच्या वागण्याला आई कंटाळली होती. बरं, शिक्षणाचा आणि त्याचा छत्तीसाचा आकडा.

संगमनेरला हायवेवर केशवतीर्थाचा घाट आहे. याठिकाणी भवानी नावाचे उन्मनी अवस्थेत फिरणारे शुद्ध वैराग्यशाली साधुपुरुष राहत होते. ते सप्तशृंगी देवीचे नि:स्मित भक्त होते. सिद्धावस्था प्राप्त भवानीबुवांच्या भोवती गावातील तरुण जमत. त्यामध्ये अनंतही असे. अशा ह्या थोर अवलियाची अनंतावर कृपा झाली. अन् काय आश्चर्य अनंताला कवित्त्व स्फुरले.

गणपती दत्तात्रेय सहस्रबुद्धे उर्फ दासगणूही लहानपणी अतिशय हूड व उनाड होते. शिक्षणाच्या वयात शाळेचा उंबरठा ओलांडला नाही. फक्त जेवण्यापुरता घरात बाकीचा वेळ मित्रासमवेत खोड्या, उनाडक्या व वात्रटपणातच जाई. अध्ययनात गोडी न वाटता शिक्षणाबद्दल तिटकारा वाढला. मित्रांच्या संगतीत स्वैरपणे भटकण्यात दिवसचे दिवस जाऊ लागले.

वयाच्या सोळाव्या वर्षी स्वारी कशीबशी इंग्रजी तिसऱ्या इयत्तेत शिकू लागली. चुलते जनार्दनपंत मामलेदार होते. इ.स. १८८८-८९ मध्ये ते संगमनेर येथे मामलेदार होते. इथे चुलत्यांनी गणपतीला इंग्रजी शिक्षणार्थ खासगी वर्गामध्ये घातले. गणपती वयाने मोठा असल्याने विद्यार्थ्यांमध्ये मिसळू शकला नाही.

संगमनेर येथे गोंधळी, तमासगीर व विद्याविहीन तरुणांमध्येच तो रमला. संगमनेर येथे असतानाच गणपती उर्फ गणू उत्तर पेशवाईतील सहा शाहिराप्रमाणे पोवाडे, लावण्या इत्यादी रचना करू लागले. संगमनेर येथे शाहीर व तमाशाफडाचे वातावरण असल्याने त्याचा व एकूण इथल्या उनाड, उंडारलेल्या व गावात चकाट्या पिटणाऱ्या मित्रपरिवाराचा गणेशाच्या मनावर तसेच संस्कार होऊन त्याने शाहिरी वाङ्मय रचणेस सुरूवात केली. गणूला कवित्त्व स्फुर्ती येथेच स्फुरली. चुलत्यास चुकवून गणू तमाशाचा जाऊ लागला.

थोडक्यात थोरले अनंत फंदी व गणेश सहस्रबुद्धे सारखेच छंदी फंदी व तमाशाशोकीन होते.

इंग्रजी चौथीत असतानाच गणूने शाळा सोडली. वयाची २०/२२ वर्षेयाप्रकारे वाया गेली. लोकवाङ्मयनिर्मिती व लोककलेचा मार्ग त्यांनी स्वीकारला.

थोरले अनंत फंदी यांचे आध्यात्मिक गुरू श्रीभवानीबुवा तर गणूचे आध्यात्मिक गुरू वामनशास्त्री इस्लामपूरकर होते.

थोरले अनंत फंदी यांनी ऐन तारुण्यात वयाच्या पंचविसीत तमाशा फड उभा केला. या तमाशाफडात मलिक फंदी, रतन फंदी आणि आणखी एक फंदी असे तिघे साथीदार होते. मलिक फंदी तमाशात रचना गात असे. रतन फंदी नाच्या होता. अनंत फंदी यांनी आपल्या तमाशाफडाचे ठिकठिकाणी दौरे केले.

श्रीगणूनी तमाशाफड उभा केला नाही. त्यांच्यासमवेत तमासगीर, गोंधळी पोलिसांतील हवालदार असत. डफ, तुणतुणे यावर ग्राम्य गीते (पोवाडे, लावण्या) इत्यादी गायली जाऊन मैफल खूप रंगत असे. हवालदार हयातखाँ सरदारखाँ गणूंच्या रचना खड्या आवाजात म्हणत असत. भालू गोंधळी, त्याची मुले रामा व पांडू, रंगोबा लोहोकरे, श्री बापू डोंगरे, भाऊराव सातवडकर, बापू वाडकर हे त्यांचे स्नेही होते. गोंधळी व तमासगीरांचे तर ते अन्नदाते होते. जामखेडच्या तुळशीराम दळवी यांनी लेखकु बनून त्यांचे काव्य लिहिण्याचे काम केले.

थोरले अनंत फंदी यांचे आठ पोवाडे उपलब्ध आहेत. दासगणुंचेही आठ पोवाडे उपलब्ध आहेत. अनंत फंदी यांनी उपदेशपर फटके लिहिले. दासगणुंनी ही फटके लिहिले आहेत.

थोरले अनंत फंदी हे पुण्यश्लोक अहिल्याबाईंच्या दरबारी गेले होते, तेथे त्यांनी तमाशा सादर केला. तमाशा आटोपल्या वर अहिल्याबाईंना दु:ख झाले. त्या म्हणाल्या, ''फंदीबुवा आपण ब्राह्मण या पद्धतीने तमाशा करता हे बरे नव्हे. आपली वाणी आपण देवकार्यी, धर्मकार्यी वाहिली तर किती बरे होईल.'' अनंत फंदीनी तत्काळ

हातातील डफ फोडून तेथून पुढे कीर्तने करण्याची निग्रही पणाने प्रतिज्ञा घेतली आणि ते हरदासी कीर्तनाकडे वळले.

कवी दासगणुंच्याबाबतीतही असेच घडले.

श्री दासणूंच्या अंत:करणात ईशभक्तीची ओढ निर्माण झाली. भक्तिलीलामृत हा ग्रंथ श्रीदासगणुंनी सीता बेदरी या बाईस सांगितला आहे. श्री दासगणुंनी रचलेल्या लावण्याही बाई तमाशात म्हणत असे. त्यांनी तरी शृंगारिक लावण्या लिहिल्या असल्या तरी ते वृत्तीने अनासक्त होते. ईशभक्तीचा प्रभाव व साधक अवस्था, मूळातच अनासक्त, अलिप्त अन् निर्लेप प्रवृत्तीच्या श्री दासणगूंनी तमाशाचा नाद संपूर्णपणे सोडून देण्याचा निश्चय केला. मात्र त्यासाठी त्यांनी श्री मोहनीराजापुढे शेवटचा तमाशा करून तो सोडून देण्याचे ठरविले. श्रीविष्णूंनी मोहिनीरूप धारण करून नटनर्तन केले. त्याबरहुकूम भस्मासूर राक्षसही वाचला व स्वत:नेच आपल्या डोक्यावर हात ठेवून भस्म झाला. ठरल्याप्रमाणे श्री दासगणुंनी श्रीमोहनीराजापुढे शेवटचा तमाशा केला व तमाशा झाल्यावर डफावर थाप मारून तो फोडला. लोकगीत व लोककलेला कायमचे सोडले. तमाशाा, शाहिरीवाङ्मय व ग्राम्य गीतांना कायमचे सोडले. सर्व शृंगारिक लावण्या व शाहिरीवाङ्मय फाडून व जाळून टाकले.

त्यानंतर श्रीसाईबाबांच्या सान्निध्यात आल्यावर कीर्तन करावयास सुरुवात केली. कीर्तन नारदीय पद्धतीचे, परंपरेचे. कमरेला फक्त नेसूचे धोतर, हातात टाळ व चिपळ्या. कीर्तनासाठी कधी कपर्दिकेला ही स्पर्श केला नाही. कारण श्रीसाईबाबांचा उपदेश व आज्ञा.

थोरले अनंत फंदी यांना दुसरे बाजीराव पेशवे यांनी नाशिकची जहागीर देऊ केली होती. निर्मोही, निर्लोभी अनंत फंदी यांनी ती नम्रतेने नाकारली. श्री दागणूंचे सद्‌गुरू वामनशास्त्री इस्लामपूरकर यांनी मृत्यूपत्राने आपली सर्व इस्टेट आपल्या शिष्याच्या नावे केली होती. संपत्ती मोठी होती. श्री दासगणुंनी त्याप्रती अभिलाषा, हाव, मोह, लोभ न ठेवता ती सर्व संपत्ती गुरूमातेला अर्पण केली. केवढे हे विशुद्ध वैराग्य व कमालीची अनासक्ती व पराकोटीचा त्याग.

तर अशी ही कवी व शाहीर थोरले अनंत फंदी व कवी दासगणु यांच्या चरित्रातील ठळक अशी साम्यस्थळे.


**– डॉ. मधुकर काशीनाथ मोंढे**

'मधुपुष्प' पाषाणकर बाग, मु. पो. लोणीकाळभोर गांव,

ता. हवेली, जि. पुणे ४१२२०१


***





# विवेकदृष्टी आणि समन्वय (पुनर्मुद्रण)

कै. श्री. अनंत दामोदर आठवले (प.पू. वरदानंद भारती)

श्रीदासगणु महाराजांच्या जीवनात भक्तिभाव, कवित्व, निस्पृहता, समाजाभिमुखता, धर्मनिष्ठा, स्वदेशाविषयी प्रेमादर, लौकिकांतील सरळ साधे वर्तन, लोककल्याणाची तळमळ हे कुणाही आदरणीय पुरुषाच्या अंत:करणात दिसणारे भाव त्यांच्या सहवासांत येणाऱ्या जाणत्याच्या आणि सामान्याच्याहि सहजपणे लक्षात येते. त्यांतील कुणी कशाकडे, कुणी कशाकडे आकर्षित होऊन श्रीदासगणूच्या परिवारांत समाविष्ट होण्यात अभिमान बाळगीत. श्रीदासगणुंचा परिवार कोणतीहि संघटना बांधण्याची वा संप्रदायाचे वैशिष्ट्य प्रचारण्याची त्यांची भूमिका नसताहि पुष्कळ विशाल आहे. त्यांत सुशिक्षित, अशिक्षित, अधिकारी, कामकरी, श्रीमंत-दरिद्री, विद्वान् आणि अडाणी या सर्वांचा समावेश आहे. ज्यांना सामान्य जन म्हणून संबोधिले जाते त्यांच्यात श्रीदासगणु अधिक रमत. प्रतिष्ठित वर्गाशी थोड्या दुराव्यानेच वागत. हे सर्व त्यांच्या निरीक्षण, परीक्षण, चिंतन, मनन, यातून निर्माण झालेले होते. त्यामुळे विवेकदुष्टी आणि समन्वय हा त्यांच्या आचारविचाराचा स्थायीभाव होता.

त्यांचे गुरू श्रीवामनशास्त्री इस्लामपूरकर हे रामदासी पंथांतील कल्याण स्वामींच्या परंपरेतले. पण त्यांनी आपल्या या एकुलत्या एक आणि कट्टर शिवभक्त असलेल्या शिष्याला पंढरपूरची वारी करण्याचा आदेश दिला. शिष्याने तो निष्ठेने शेवटपर्यंत पाळला. आराध्यदैवत म्हणून शंकराचे प्रेम, गुरुपरंपरेने आलेला रामदासी पंथ, पंढरपूरच्या वारीचा नियम आणि अंत:करणाची स्वाभाविक निरागसता, वागण्यातला साधेपणा यांच्या प्रभावाने श्रीदासगणुंचे सर्व जीवन विवेकदृष्टी आणि समन्वय या दोन चाकाच्या गाडीतून आयुष्यभर कृतिशील राहिले.

त्यांना वर्ण आणि जातीची उपयुक्तता मान्य होती. जाति मोडल्या पाहिजेत, वर्णभेद नष्ट झाले पाहिजेत असे श्रीज्ञानेश्वर तुकारामादि सत्पुरुषांप्रमाणेच त्यांनीही कधी प्रतिपादिले नाही.

**''जाति शुद्ध राखुनीच । एकी शीघ्र होऊ दे ।''**

असे त्यांनी भगवंताला प्रार्थिले आहे. समाजसुधारकांनाहि त्यांनी आवर्जून सांगितले आहे की बाबांनो,

**''हिंदुधर्म हा तरुवर मोठा अनंत जाति तत् शाखा ।**
**म्हणुन तयाला शोभा आली राहू द्या त्या तोडु नका ।।''**

त्यांच्या या भूमिकेमागे एक विवेकदृष्टि आणि समाज-कल्याणासाठी अत्यंत आवश्यक असलेली विविधतेतील वैषम्य काढून एकता निर्माण करणारी समन्वयाची भूमिका आहे. असे असताही ख्रिश्चनाशी आणि मुसलमानांशी खेळीमेळीने वागणारा, त्या गोमांसभक्षक परधर्मियांना विहिरीवर पाणी भरू देणारा, स्वत:च्या घरच्या बैठकीत त्यांचे स्वागत करणारा पण महार-मांगांना अस्पृश्य मानणारा, हीनतेने वागविणारा, सनातनीपणा त्यांना तिरस्कारार्ह वाटे. सोवळ्यांची पवित्रता त्यांना अमान्य नव्हती. पण सोवळेपणातला दंभाचार त्यांना कधी रुचला नाही.

समाजाचे कल्याण खरोखरीच साधावयाचे तर समाजहितसाधकांनी कोणतीही टोकाची भूमिका घेऊ नये, त्यामुळे एक गट सुखावला तरी दुसरा गट दुखावतो व त्यायोगाने समाजस्थिति पुन्हा तशीच दयनीय राहते या विचाराचा ते पुरस्कार करीत.

कर्म, भक्ती, ज्ञान, योग या चतुर्विध साधनांची आपापल्या परीने उपयुक्तता आहे. म्हणून कोणत्याही मार्गाने जाणाराने दुसऱ्या मार्गाने साधना करणाऱ्याची अवहेलना करू नये असे श्रीदासगणु महाराज आग्रहाने प्रतिपादितात. मार्गांची भिन्नता ही त्या त्या व्यक्तींच्या प्रकृतीला अनुसरून उपयुक्त ठरावयाची असते. प्रत्येक विविधतेला जे वैशिष्ट्य प्राप्त होते, ते ती कोणाला तरी अधिक अनुकूल वाटते, अधिक सोयीची वाटते म्हणूनच. माणसाच्या मनोवृत्तीचे अनंत प्रकार असतात. त्यामुळे त्या सर्वांना त्यांच्या त्यांच्या कल्याणासाठी एका साच्यात ठोकून बसविणे योग्य नसते. आपल्या धर्मात उपासना आणि सिद्धांत याची जी उदंड विविधता निर्माण झालेली दिसते, तिच्यामागे माणसाचा स्वभावविशेष हेच कारण आहे.

माणसाचे वय वाढले तरी त्याची समज वाढलेली असतेच असे नाही. त्यामुळे आपल्या उपास्यावर, उपासनेवर वा सिद्धांतावर त्याची

निष्ठा दृढ रहावी म्हणून त्या त्या उपास्याचे वा सिद्धांताचे श्रेष्ठत्व हिरीरीने प्रतिपादावे लागते आणि त्यापेक्षा इतरांची अवहेलना वा निंदा करावी लागते. माझ्या प्रकृतीला अनुकूल म्हणून मी हे स्वीकारले आहे. असे मानण्याइतकी प्रगल्भता थोड्यांच्याच बुद्धीत असते. बहुतेकांना हे श्रेष्ठ आहे म्हणून मी स्वीकारले आहे, असे वाटत असते. अर्थातच-

**''न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।**
**जोषयेत् सर्वकर्माणि विद्वान्युक्त: समाचरन् ।।''**

या गीतेच्या नियमाप्रमाणे पंथ प्रचारकांना वा प्रवर्तकांना हाच मार्ग श्रेष्ठ आहे म्हणून तो तुम्ही स्वीकारा असे सांगावे लागते. तू स्वीकारलेस ते इतरांच्यापेक्षा श्रेष्ठ आहे असे म्हटले की, त्या त्या साधकाचा अहंकार सुखावतो आणि तो उत्साहाने वाटचाल करू लागतो. पण प्रतिपादनाच्या या भूमिकेमागचा हेतू लक्षात घेतला नाही म्हणजे मग त्यातूनच सांप्रदायिक अहंकार आणि इतरांविषयीची तुच्छता वा द्वेषभावना निर्माण होते. एकतेला, समाजहित भावनेला त्यामुळे चूड लागते. आणि देशाला दैन्य भोगावे लागते. हेहि विसरता येत नाही.

इतर सांप्रदायिकांचा द्वेष का करता? त्यांच्याशी सौजन्याने मिळून मिसळून का वागत नाही? तुमची भूमिका इतरांना तोडून टाकणारी, एकांड्या शिलेदारासारखी का असते? असे जर एखाद्या हट्टी सांप्रदायिकाला विचारले तर ''एकाविधा भाव भक्तांचा स्वधर्म।'' ''पतिव्रता नेणे आणिकाची स्तुति'' इत्यादी संतवचनाच्या आधारावर इतर सांप्रदायिकाविषयी वाटणाऱ्या स्वत:च्या वृत्तीतील तिरस्काराचे वा द्वेषबुद्धीचे समर्थन केले जाते.

पतिव्रतेची निष्ठा सांप्रदायिकाच्या अंत:करणात अवश्य असावी. पण त्या एकनिष्ठ पतिव्रतेला सासू-सासरा, आई-बाप, जावा-नणंदा, लहान-मोठे दीर, स्वत:च्या पतीचे मित्रमंडळ, आला गेला, पै पाहुणा यांच्याशी सौजन्याने वागणे, त्यांची प्रसंगाविषयी सेवाशुश्रूषा करणे, त्यांच्या खाण्या-पिण्याची व्यवस्था ठेवणे त्याकरिता निरलसपणे कष्ट करणे हेहि करावेच लागते. इतकेच नव्हे तर अत्यंत पतिव्रता असलेल्या गृहिणीच्या कर्तव्याचा तो एक भाग आहे. आपल्या संप्रदायाविषयी आपण पतिव्रतेच्या निष्ठेने वागतो असे म्हणणारे सांप्रदायिक मात्र हा विचार करीत नाहीत.

आपापला संप्रदाय प्रत्येकाला श्रेष्ठ वाटलाच पाहिजे. पण तो इतरांनी स्वीकारावा असा आग्रह धरणे आणि असा त्यांनी स्वीकारला तरच मी त्याला आपला म्हणेन, त्याच्याशी सौजन्याने वागेन, असे म्हणणे मात्र न शोभणारे आहे. पतिव्रतेच्या निष्ठेशीहि ते विसंगत आहे. पतिव्रता स्त्री, क्वचित कधी तिला एखादी दुसरी सवत असली तरी स्वत:चा जळफळाट होऊ देणार नाही, तिच्याशी सौजन्याने, आपलेपणाने वागेलही. तिला सखी व बहिणही मानेल पण 'माझ्या नवऱ्याची बायको होशील तरच मी तुला आपली समजेन'' असे ती कोण्या स्त्रीला कधी म्हणणार नाही. तसे बोलणे तिच्या मनातही येणार नाही आणि ती तसा प्रचारही करणार नाही. पतिव्रता स्वत:प्रमाणेच दुसऱ्या स्त्रीनेही आपापल्या पतीशी एकनिष्ठेने राहावे असेच मानील. आणि तशी जी राहते, तिच्याशीच स्नेहभावाने वागेल. प्रत्येक सांप्रदायिकाने प्रतिव्रतेची ही भूमिकाही नीट समजावून घेतली पाहिजे. यामुळेच श्रीदासगणु महाराजांच्या जीवनात स्वत:च्या संप्रदायांतील आचार-विचारांचे स्तोम आणि इतर सांप्रदायिकांचा दुजाभाव वा तिरस्कार अल्पांशानेही कधी दिसला नाही. त्यांना तिरस्कार होता तो दंभाचा, त्याविषयात त्यांनी कोणाची भीडही ठेवली नाही. 'तीक्ष्ण उत्तरे । हाती घेऊन बाण फिरे' हा श्रीतुकोबारायांचा बाणा त्यांनी चालविला होता.

स्वत:च्या संप्रदायावर निष्ठा असूनही इतर सांप्रदायिकाविषयी विशेषत: त्यांच्या प्रवर्तकाविषयी वा आचार्यांविषयी त्यांनी आपला आदरभाव अनेक प्रकारांनी व्यक्त केला आहे. त्यांनी श्रीमद्शंकराचार्यांचे ओवीबद्ध चरित्र लिहिले तसेच श्रीमत् मध्वाचार्यांचेही लिहिले श्रीशंकराचार्यांच्या चरित्रात श्रीरामानुजाचार्य, श्रीवल्लभाचार्य, श्रीनिंबार्काचार्य यांचीही चरित्रे त्यांनी संक्षिप्त स्वरूपात समाविष्ट केली आहेत. आणि त्यासर्व आचार्यांविषयी स्वत:च्या अंत:करणातील प्रेमादर मोकळ्या मनाने व्यक्त केला आहे. या प्रकरणाचा उपसंहार करताना ते लिहितात,

**या चारी आचार्यांनी । परिस्थितीला पाहुनी ।**
**आपुली मते स्थापुनी । उपासनेसी जीवविले ।।**
**जगद्गुरूंनी अध्यात्म कथिले । यांनी उपासनेला जीवविले ।**
**एवंच पांचानीहि केले । वैदिक धर्माचे संरक्षण ।।**
**हे पंचमुखी परमेश्वर । वा हे पांच पांडव साचार ।**
**या पांची जणांना नमस्कार । करणे भाग प्रत्येका ।।**

या ओव्यांतून त्यांची संप्रदायाविषयीची धारणा स्पष्टपणे व्यक्त होते. सगळे संप्रदाय व त्यांचे सिद्धांत अवस्थाभेदाने वा प्रकृतिभेदाने परस्परास उपकारक आहेत. म्हणून समाजकल्याणाच्या दृष्टीने प्रत्येकाने इतरांकडे आदराने पहावे व सर्वांविषयी सौजन्याने वागावे. मानापमानाच्या वा श्रेष्ठ कनिष्ठतेच्या कल्पना आपल्या घरापुरत्या मर्यादित ठेवाव्यात. सामाजिक कार्यात सर्वांनी समान भूमिकेवर खेळी-मेळीने वागावे. असे ती. दादा अनेकवेळा अनेक प्रसंगाने सांगत व स्वत:ही त्याचप्रमाणे वागत. तत्त्ववेत्ता आणि संत या विभूतींच्या विषयी त्यांना परमादर असे. तेथे ते संप्रदायाचा वा जातीचा विचार पूर्णपणे दूर सारीत. त्यांनी अनेक संतांची कीर्तनोपयोगी आख्याने रचली आणि ओवीबद्ध चरित्रेही रसाळपणे वर्णन केली. त्यांत श्री ज्ञानेश्वर, एकनाथ, दामाजी यासारखे ब्राह्मण संत आहेत तसेच चोखोबाराय, रोहिदास यांच्यासारखे अस्पृश्य गणल्या गेलेल्या जातीत जन्माला आलेले संतही गौरवाने भक्तियुक्त अंत:करणाने वर्णिलेले आहेत. अशी कीर्तनाख्याने ७०-८० आहेत.

ओवीबद्ध संतचरित्रांचे तीन ग्रंथ आहेत. त्यांत सर्व जातिधर्मांच्या संतांचा समावेश आहे आणि त्यांची चरित्रे त्यांनी सारख्याच आत्मीयतेने आणि श्रद्धेने गायिलेली आहेत.

कर्म, भक्ती, ज्ञान यासंदर्भात श्रीदासगणु महाराज म्हणतात- कर्म हे बालपण आहे, भक्ती हे तारुण्य आहे आणि ज्ञान हा म्हातारपण आहे.

निसर्गक्रमाने [illegible] [illegible] अवस्था जशा प्राप्त होतात तसेच साधकाचेही [illegible].

एके [illegible] रूपकाच्या माध्यमांत त्यांनी हा विषय उत्तमरीतीने समजावून दिला आहे. ''शेतामधे जोंधळा पेरला आणि त्याला कणीस न येऊ देता राखले तर ते बाटुक होते, पशूचे खाद्य ठरते. केवळ कर्मकांडाचे स्वरूप असे आहे. जोंधळा जो पेरला जातो तो केवळ कडब्यासाठी पेरला जात नाही. पेरणाराच्या अंत:करणांत त्याला चांगली कणसे यावीत आणि त्या कणसांत टपोरे दाणे दाटपणे भरावेत अशीच इच्छा असते. त्याप्रमाणे साधकाने आपली साधना कर्म, उपासना, ज्ञान या अवस्थांतून विकसित होत परिपूर्णतेला जावी यादृष्टीनेच प्रयत्नशील राहिले पाहिजे. तारतम्याने सर्व काही उपयोगी पडते हे अद्वैत तत्त्वज्ञानाचा सिद्धांत मानणाराने तरी कधी विसरू नये.'' असे ते म्हणतात.

''कर्मरूपी काढ्यांत अद्वैताची मात्रा उगाळावी अणि त्यांत भक्तीचा मध घालून ती भवरोगाने पीडित झालेल्यांना पाजावी'' असेही वर्णन त्यांनी एकेठिकाणी केले आहे.

विवेकदृष्टी आणि समन्वयवादी विचारसरणी यामुळे परमार्थ साधनेत निमग्न असतानाहि त्यांचे व्यवहाराचे भान कधी सुटले नाही. राष्ट्राचा उद्धार व्हावा असे वाटत असेल तर त्यासाठी सत्पुरुष, संशोधक तत्त्ववेत्ते, कवि ग्रंथकार आणि शूर-वीर असे चारही प्रकारचे पुरुष लागतात.

सत्पुरुष निस्वार्थी, हरिभक्त, साक्षात्कारी, सर्वांविषयी कल्याणाची, वात्सल्याची, करुणेची भावना बाळगणारा, निस्पृह, विरक्त, सदाचरणी असा असला पाहिजे. त्याची ईश्वरनिष्ठा आणि जगत् कल्याणाची इच्छा प्रामाणिक असली पाहिजे. अशा पुरुषाच्या आशीर्वादाने, आदर्शाने, समाजाला वा त्यांतील कार्यकर्त्या व्यक्तीला नैतिक पाठबळ मिळते आणि कर्तव्याची प्रेरणा लाभते.

संशोधक तत्त्ववेत्त्यांनी पांचभौतिक सृष्टीच्या स्वरूपाचे सखोल निरीक्षण करून चिंतनाने व प्रत्यक्ष प्रयोगाने सृष्टीतील अनेक प्रकारचे नियम शोधून काढले पाहिजेत. सृष्ट पदार्थांच्या स्वरूपाची मुलभूतता शोधून काढली पाहिजे. त्या बळावर मानवी जीवन सुखी आणि राष्ट्रसंपन्न होईल, समर्थ होईल असा प्रयत्न केला पाहिजे.

तसेच तत्त्वसंशोधकांनी जीव जगत् - जगदीश्वर- यांच्यातील परस्पर संबंधाचा विचार करून मानवी जीवन प्रगत- विकसित उन्नत होत जाईल असे सिद्धांत प्रस्थापित केले पाहिजेत. मानवाला अनेक प्रकारच्या संकटांना तोंड देण्याचा प्रसंग येतो त्या सर्व प्रकारच्या आपत्तीतून बाहेर पडण्याचा मार्ग संशोधकांनी मानव जातीस दाखविला पाहिजे.

कवी, लेखक, ग्रंथकार यांनी चांगले काय, वाईट काय हे नीट पारखून ते समाजापुढे योग्यरीतीने मांडले पाहिजे. मानवाचे वैयक्तिक आणि सामाजिक जीवन अनेक विकाराने भरलेले राहते, त्याच्या भाव-भावना, प्रेम आणि द्वेष, वात्सल्य आणि तिरस्कार, त्याग आणि स्वार्थ इत्यादि विकारांनी संकुलित झालेल्या असतात. अशा वेळी प्रत्यक्षपणे वा अप्रत्यक्षपणे सदाचरण, नीति यांचे स्वरूप स्पष्ट करून मानवाच्या आयुष्यात ज्याच्यामुळे सुख, समाधान, संतोष, सौजन्य यांची वाढ होईल, मन बुद्धीवर ताण न येता सदुपदेशाचे ग्रहण होईल, मनोरंजनास वेच मनबुद्धीचा विकासही होईल, इष्टानिष्टाचा विवेक करता येईल अशा स्वरूपाचे लेखन त्यांनी ललित वा वैचारिक वाङ्मयाच्या द्वारा केले पाहिजे. तत्त्ववेत्त्यांनी प्रस्थापित केलेले सिद्धांत जनसामान्यांपर्यंत पोचवण्याची व्यवथा केली पाहिजे. त्यांची लेखणी निर्भीड असली पाहिजे. त्याने कोणत्याहि मोहाला बळी पडून कुणापुढेहि लाचार होता कामा नये. समाजातल्या सशक्तांना आणि सत्ताधाऱ्यांना त्याच्या लेखणीचा धाक वाटला पाहिजे.

शूर-वीर तो, जो स्वदेशाच्या-स्वधर्माच्या रक्षणासाठी आपल्या प्राणाचेही मोल द्यावयास सिद्ध असतो. ज्याचे मन निग्रही आणि मनगट बळकट असते. कोणत्याही प्रकारची परतंत्रता ज्याला विषासारखी वाटते, कोणत्याही आपत्तीने वा अपयशाने ज्याचे धैर्य खचून जात नाही, उत्साह उणावत नाही, देशाच्या सेवेचे वा समाजाच्या हिताचे काम करीत असताना जो सुखासीन होत नाही, कष्टाला कंटाळत नाही, जो आपल्या कष्टाचे, पराक्रमाचे वा सेवेचे मोल अधिकार म्हणून मागत नाही, सत्ता-संपत्ती वा मान-मान्यता, प्रतिष्ठा याचा याला लोभ नसतो.

असे चारी प्रकारचे पुरुष राष्ट्रोद्धारासाठी लागतात हे जणू राष्ट्राच्या सिंहासनाचे चार बळकट खांब आहेत. यातला कोणताही खांब दुर्बल वा आखुड असून चालणार नाही. कोणाही एकाला इतरांचे स्थान खऱ्या अर्थाने घेता येणार नाही. एक दोघांची आवश्यकता मानून इतरांची अवहेलना करणे विचारवंतास शोभणारे नाही.

सांप्रदायिकांच्या हट्टाग्रहाविषयी जसे- श्रीदासगणु महाराजांनी समन्वयात्मक दृष्टीने विचार मांडले आहेत. त्याप्रमाणेच उपास्य देवतेच्या प्रकरणीही त्यांचा विचार समन्वयाचाच आहे.

समन्वयाची धारणा ही नवीन नाही तसेच ती केवळ श्रीदासगणु महाराजांनी पुरस्कारिली असेही नाही. थेट वेदामध्ये सुद्धा देवता आणि तत्त्वज्ञान या संबंधिची भूमिका समन्वयाचीच आहे. त्यामुळेच भिन्न मतांना आणि भिन्न उपासनांना वेदवचनाचा आधार असल्याचे सांप्रदायिकांना दाखविता येते. त्यामुळे वादविवादांना ऊत मात्र येतो. तर्क मुळात अप्रतिष्ठ असल्याने कोणताही सिद्धांत कौशल्याच्या बळावर सिद्ध होतो असे दाखविणे वा खंडित होतो असे मानणे सोपे जाते. पंडित रघुनाथ या तर्कशास्त्र पारंगत विद्वानाने तर एकाच वस्तूचे खंडन वा मंडन सारख्याच कौशल्याने करता येते हे तर्काचे सामर्थ्य आपल्या ठिकाणी असल्याचे भूषण म्हणून मिरविले आहे. ते म्हणतात-

**विदुषां निवहैरिहैकमत्या**
**यददुष्टं निरटंकि यच्च दुष्टम ।**
**मयि जल्पति कल्पनाधिनाथे**
**रघुनाथें तदु तन्यतेऽ न्यथैव ।।**

तर्काचे हे सामर्थ मानावयाचे? की यावरून तर्काचे

अविश्वसनीयता सिद्ध होते? ते आता जिज्ञासूंनीच ठरविले पाहिजे. तर्क किती अविश्वसनीय आहे हेच खरे तर वरील श्लोकांतील अर्थावरून स्पष्ट होते.

दुष्टपणा आणि मूर्खपणा वगळला तर प्रचलित झालेल्या सर्व मतमतांतरांत उण्या अधिक प्रमाणात ग्राह्यांश असतो, आणि त्यांच्या बळावर अनुक्रमाने अवस्थाभेदाने वा प्रकृति-परवशतेने कोणा न कोणाला तरी आपली साधना आरंभिता येते वा प्रगतीला पाठबळ मिळविता येते. हे व्यवहारात आणि परमार्थात दोन्हीकडे सारखेच खरे आहे.

विविधतेतील ही उपयुक्तता तत्त्ववेत्त्यांनी, मतवाद्यांनी सांप्रदायिकांनी वा पक्षप्रचारकांनी जरी दुर्लक्षिली असली आपल्या अहंकाराने तिरस्कारलि असली तरी जगताचे कल्याण अभिप्रेत असणाऱ्या संतसत्पुरुषांनी मात्र कोणताही हट्टाग्रह न मानता सदाचार सन्नीतीचा पुरस्कार केला आहे. उपासनेच्या दृष्टीने विविध तत्त्वज्ञानांचा, साधनांचा आणि देवतांचा समन्वय प्रतिपादिला आहे. हट्ट आणि दुराग्रह एकीकडे सारण्यास उपदेशिले आहे. श्रीदासगणु महाराज या संत परंपरेतीलच निष्ठांवत कवी आहेत, संतकवी आहेत.

अद्वैतवादी शंकराचार्यांनी जशी अनेक देवदेवतांची भावमधुर रसकोमल अशी स्तोत्रे रचिली आहेत, तसेच श्रीदासगणुंनीही अनेक देवदेवतांची ओवीबद्ध वा श्लोकबद्ध स्तोत्रे रचिली आहेत. पण त्यात कुठेहि ''एकसद् विप्राः बहुदा वदन्ति'' हा वैदिक सिद्धांत दृष्टिआड होऊ दिलेला नाही. रामेश्वर-व्यंकटेश, अंबा, डाकुरनाथ, गजानन, समर्थ रामदास इत्यादि ३०-३२ श्लोकबद्ध अष्टके आणि व्यंकटेश स्तोत्रे, मोहिनीराज स्तोत्र, साईनाथ स्तवनमंजिरी, पांडुरंग स्तोत्र, गणेश स्तवराज, महालक्ष्मी स्तोत्र इत्यादि १०-१२ ओवीबद्ध स्तोत्रे त्या सर्वात त्यांचा हा समन्वयाचा दृष्टिकोण नानाप्रकारांनी व्यक्त झाला आहे. त्या सर्वांचाच विचार करणे फार विस्ताराचे होईल आणि तसा विचार करणे आवश्यकही नाही. उदाहरण म्हणून केवळ पांडुरंग स्तोत्राचा विचार केला तरी चालण्यासारखे आहे.

श्रीपांडुरंग हे दासगणु महाराजांचे आराध्य दैवत. पांडुरंगाची प्रार्थना करताना ते म्हणतात -

**जैसे जैसे भेंटती भक्त । तैसा तुं नटसी अनंत ।**

**वेदांहि न लागला अंत । तुझा बापा नारायणा ।।**

**अयोध्या गोकुळ वृंदावन** ही आणि यासारखी जी विष्णुक्षेत्रे आहेत, तेथे विष्णु स्वरुप असलेल्या पांडुरंगाचे वा विठ्ठलाचे अधिष्ठान मानणे हे सहज आहे. पण पांडुरंगाची प्रार्थना करताना दासगणु म्हणतात-

**भिलवडी करवीर औदुंबर** इत्यादि दत्तक्षेत्रात तू अत्रीचा कुमार होऊन भक्तांना भेटतोस. **मैलार माळेगाव जेजुरी** इत्यादी खंडोबाच्या ठिकाणीही तुझाच वास आहे. **केदार, सोमनाथ, गोकर्ण, रामेश्वर** येथील शिवरुपा गुरुनानक हे निर्गुणाचे उपासक म्हणून प्रसिद्ध आहेत. शीखपंथ त्यांच्या पासून आरंभला, ती. दादा लिहितात-

**पिपाजी नानक सूरदास तुज । आवडती विशेष ।**

कबीरपुत्र कमाल, रामभक्त तुलसीदास, मीराबाई हे सर्व, हे विठ्ठल! तुझेच भक्त आहेत आणि तू त्यांच्यासाठी अनेक लीला केल्यास इतकेच नव्हे तर मुसलमान ज्याला इलाहि म्हणतात- तोहि तूच आहेस.

गिरिवरचा व्यंकटेश बालाजी हे पांडुरंगाचेच स्वरुप असल्याचे त्यांनी वर्णिले आहे. इतकेच नव्हे तर त्यांनी व्यंकटेशाला विनोदाने म्हटले आहे की, देवा! पंढरपुरात तुम्ही पैशावर दृष्टी ठेवली नाही. आपल्या पायांना मोकळेपणाने स्पर्श करू देता, पण या क्षेत्राच्या माहिमा मात्र काही निराळा केलात.

**पदां न कुणा शिवुं देता । तुम्हीं आपुल्या भगवंता ।**

**दर्शनासाठी कुणी येता । पैसे मागतां त्याते बहू ।।**

देवदर्शन पैशाने होणे या पद्धतीचा केलेला उपहास येथे लडिवाळपणे प्रगट झाला आहे. या व्यंकटेश स्तोत्रांतच ती. दादांनी स्पष्टपणे म्हटले आहे की-

**कोठे बनून अहिंसक । झालात जैन मताचे पोषक ।**

**कोठे नीति व्यावहारिक । बौद्ध होऊन सांगितली ।।**

**कोठे झगा घातिला । शांतपणाचा कळस केला ।**

**कोठे होऊन राहिला । पारशांसाठी अग्नि तुम्ही ।।**

**समूळ जटेचा त्याग केला । अल्लाइल्लाहि तुम्हीच बनला ।**

**पूजे ऐवजी निर्मिला । नमाज तेथे तुम्हीच ।।**

ज्या सर्व धर्म समभावाचा राजकारणी लोक प्रचार करू इच्छितात. तो विचार संत परंपरेतल्या श्रेष्ठांनी आत्मसात केला आहे. आणि अनेक प्रकारांनी उपदेशिलाही आहे. हिंदुधर्माला तरी सर्वधर्म समभाव ही संकल्पना नवीन नाही आणि परकी पण नाही इतर धर्मियांनाच ते नीट समजावून सांगितले पाहिजे. पण राज्यकर्तेत्यांचे हट्ट लाडाने पुरवितात. त्यांच्यापुढे लाचार अनुनयाने वागतात आणि हिंदु धर्माचा कोणी उल्लेख करताच त्यांवर तोंड टाकतात. हिंदु समाजालाच सर्व धर्म समभावाचा उपदेश करतात. परिणाम म्हणून इतर धर्मीय शेफारतात. आणि हिंदूंना मात्र आपल्या न्याय अधिकारांनाही वंचित व्हावे लागते. असो.

वरील लेखनावरून कोणाच्याही सहज लक्षात येईल की विवेकदृष्टी आणि समन्वय हा संतांच्या विचारसरणीचा महत्त्वाचा भाग आहे, श्रीदासगणु महाराजांनीही तीच भूमिका स्वीकारून अनेक ठिकाणी प्रतिपादन केले आहे. यथाशक्ती मी ते या स्मरणिकेच्या निमित्ताने आपणापुढे सादर केले आहे.

- **श्रीदासगणु स्मरणिका,** (श्रीदासगणु स्मरण मंडळ, नांदेड) यातून पुनर्मुद्रित

***



# श्रीमत् संत दासगणुंच्या साहित्यातील राष्ट्रीय विचारधन (पुनर्मुद्रण)

**श्री. सुधाकर देशपांडे**
विद्यावाचस्पति. पिपल्स महाविद्यालय नांदेड येथून इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून निवृत्त, इतिहासावरील ग्रंथलेखन, सध्या मुंबई येथील स्वातंत्र्यवीर सावरकर स्मारक समितीचे अध्यक्ष

संत महंत म्हटलं की धर्मधारणा, भगवत्भक्ती, परमार्थ परायण प्रवृत्ती ह्याच बाबी काय त्या प्रकर्षानं डोळ्यापुढं येतात. अनेकदा 'ठेविले अनंते तैसेचि रहावे । चित्ति असो द्यावे समाधान ।' अशा प्रकारच्या आत्म नि अल्पसंतुष्ट विचाराची शिकवण देऊन कर्तृत्वापासून परावृत्त करणाऱ्या, एकप्रकारच्या दैववादाचा पुरस्कार करणाऱ्या, ईश्वरभक्तीतच सदा तल्लीन राहून लोकविन्मुख राहणाऱ्यांची प्रतिमाच काय ती आपल्या मनावर अुमटते. संतांच्या टाळकुटेपणातून कर्तृत्वशून्यता, गबाळेपणा, अजागळपणा नि त्या बरोबरच दांभिकता, बुवाबाजी, भावुकपणा, भोळसटपणा, भाबडेपणा आदींचा भक्ष्य ठरलेल्या समाजाची एक प्रकारची चीड विचारवंतांच्या मनात स्वाभाविकपणे निर्माण झाल्याचे दिसून येते. देशाच्या, राष्ट्राच्या दुर्दशेचं कारण या टाळकुटेपणातून निर्माण होणाऱ्या कर्तृत्वहीनतेत असल्याचा आरोपही कित्येकदा करण्यात येतो.

संत नि संत वाङ्मयाविषयीची ही दृष्टी, ही भावना, वास्तव तर नाहीच नाही उलट ती अगदी एकांगी नि म्हणूनच अन्याय्य तशीच अनर्थावह असल्याची इतिहासाची साक्ष असल्याचे जाणकरांच्या दृष्टीस आल्याविना राहात नाही. संतानुयायी नि बरेचदा संतभक्त यांच्या वर्तन-व्यवहारातून अनेकदा असे अपसमज पसरतात नि त्यात सत्त्यांश मुळीच नाही असेही नाही. परंतु तरीही अशा आरोपात सत्याचा विपर्यासच अधिक असल्याचं प्रत्ययास येईल. वास्तविक पाहता वस्तुस्थितीच सम्यक दर्शन घेऊन योग्य नि आवश्यक त्या दिशेने वेगळी वाटचाल करणे नि देशाला दिशा दाखविणं हेच संतांचं मोठं नि मोलाच सातत्यानं कार्य राहिलय. 'सुधारणा' 'सुधारणा' म्हणतात त्याची वैचारिक मांडणी करण्याचा पहिला मान जर कोणाचा असेल तर तो संत नि संतवाङ्मय विचाराचाच काय तो होय। ह्या देशाच्या इतिहासाची साक्ष तशीच निघते नि महाराष्ट्राची तर निश्चितच.

'देववाणी', गीर्वाण भाषा. म्हणून एक प्रकारचे पावित्र्य प्रदान केलेल्या भाषेतील तत्वचिंतनाला 'संस्कृतताचि तीरे' तोडून लोकभाषेत आणण्याचं नि विचारगंगा लोकमुखापर्यंत पोचविण्याचं पहिलं काम केलं ते आद्यसंत ज्ञानेश्वरांनीच. वेद वाङ्मयाच्या अभ्यासाला त्रैवर्णिकाची मर्यादा घातलेली पाहून 'वेद् सम्पन्न जर परिकृपणु' ठरविण्याचं बौद्धिक धैर्य कोणी दाखविलं असेल तर ते संत ज्ञानदेवांनीच ना? देवभक्तीच्या द्वारी 'जाति अप्रमाण' अशी बंडखोरी सर्वप्रथम कोणी केली? ह्याच आद्यसंतानं तसेच 'भले तरी देऊ कासेचि लंगोटी । नाठाळाचे पाठी देऊ काठी । ह्या शब्दातून मैत्रीचं प्रेमाचं महात्म्य नि दुष्ट, दुर्जनांशी वागण्याचा रोखठोक व्यवहारमंत्र कोणी सांगितला. भगवा भक्तिचा अभंग. सेतू उभारून भवसागर तरुन जाण्याची किमया सर्वसामान्यांना कोणी दिली? संत तुकोबांनीच ना? 'सावधान' शब्द कानी पडताच प्रपंचापासून पळून जाणाऱ्या संत रामदासांनी जनतेला जो आदेश दिला, जो संदेश दिला तो 'प्रपंच करावा नेटका' असाच ना? खटनटासि खटनट । अुद्धटासि अुद्धट, 'मनुष्य राजी राखणे' 'तुळजा भवानि माता प्रतापेचि प्रकटली' असे विचार मांडून 'लोकी हिंमत धरावी । शक्तीची तरवार करावी ।' अशी प्रयत्नाची महती गायिली ती संत रामदासांनीच नाही का?

राष्ट्रधर्मात धर्मपरायणता गवसावी ह्यात संत परंपरेची जाणिव असणाऱ्यांना नवल वाटण्यासारखं काही नाही. श्री दासगणु महाराजांच्या काव्यसृष्टीत आढळणारं हे राष्ट्रीय विचारधन माझ्या सारख्याचे लक्ष इतर अनेक विचारापेक्षा नि भावभावनेपेक्षा अधिक वेधून घेते. कारण आजच्या संदर्भात मला त्यांच्या काव्याचं हे अंग अधिक महत्त्वाचं नि मोलाचं जाणवतं.

सारा समाज पारतंत्र्यात खिचपत पडलेला पाहून ह्या देवभक्त संताचं राष्ट्रभक्त मन 'मराठशाही सगळी बुडाली । कठीण काळ बहु आला ।' म्हणून नुसतं कळवळतं । कारण आपल्या समाजबांधवाची दुर्दशा त्यांना दिसत होती । 'नोटा राहतील, दौलत जाअील । निघून सर्व विलायतेला।' हे दृश्य त्यांच्या डोळ्यांना स्पष्ट दिसत होतं. स्वाभाविकपणे मग देवभक्त सन्ताचं राष्ट्रभक्त मन देवाला साकडं घालतं, देशाकरिता देवाकडे वळून टाहो फोडताना दिसतं ते 'छत्रपती राज्य बुडाले गेलि पेशवाअी । कशी पातळ माया केलींस विठाबाअी ।' म्हणणाऱ्या श्रीदासगणु महाराजांना ओढ होती ती स्वातंत्र्यातच परमब्रह्म

शोधण्याची, ब्रह्मानंद सुखाची त्यांना 'स्वराज्य सुखाची वैभव खाणी' वाटते नि स्वराज्याचं वैभव नभीच्या वासरमणि असल्याचा साक्षात्कार अनुभवाला येतो. स्वातंत्र्यवीर नि श्रीसंत दासगणु यांच्या भूमिकेतील साम्य पाहिलं म्हणजे या देशात देवभक्त असल्याचा नि देशभक्त- देवभक्त- असल्याचा साक्षात्कार सहज जाणवतो.

स्वराज्य स्वातंत्र्याविषयीचा नुसता असा कळवळाच कविवर्य श्रीदासगणु व्यक्त करीत नाहीत तर पुढे जावून ते प्राप्त करून घेण्यासाठी सैनिकी सामर्थ्य नि सांघिकतेची, एकीची आवश्यकताही प्रतिपादन करतात. तरवारींच्या विळ्या जाहल्या' म्हणूनि आला 'काळ किती विपरीत । असं सांगून कोणी मारवाडी, कोणी कानडी', कोणी बंगाली, कुणी द्राविडी, ह्यातूनच बेकी निर्माण झाली. कोणी हिंदू न राहुन एकी नष्ट झाली व 'भारता आले दुबळेपण असा स्पष्ट विचार कवी श्रीदासगणु मांडून जाताना दिसतात. स्वराज्य स्वातंत्र्य प्राप्त होत ते शक्तीने- सामर्थ्यानं याची जाण तर श्रीदासगणु महाराज व्यक्त करतातच. परंतु शेवटी सैन्य चालतं, गाजतं, जिंकतं ते भरल्या पोटाचं म्हणून त्याचहि भान कवी विसरत नाही. 'शेती राष्ट्राचे भूषण' अशी त्यांची विचारसरणी होती. 'जय जवान, जय किसान'ची आजची घोषणा नि सैनिकांचे जोरावर । स्वराज्य रक्षणे साचार असा विचार व्यक्त करणारे श्रीदासगणु यांच्यातील विचार साम्य लक्ष वेधून घेणारेच नाही काय?

श्रीदासगणु महाराज मुळत: सन्त खरेच. देवधर्माची आराधना त्यांच्या शब्दा शब्दातून मुख्यता प्रकट होणे अगदी अपरिहार्यच. परंतु त्याचवेळी हे लक्षात येते की कवीवर्य श्रीदासगणु देशात देवाचं दर्शन घेतात. निधर्माकडे राष्ट्रीय दृष्टीनं पाहतात. त्यांच्या धर्म भावनेत धर्म भोळेपणा नाही, धर्मभ्रमिष्टपणाला तेथे स्थान नाही. राष्ट्रप्रेमाच्या आणि राष्ट्रोद्धाराच्या पोट तिडकीतूनच त्याच्या लेखणीतून उतरले राष्ट्रोद्धारासाठी आवश्यक असणारे चार पुरुष.

### राष्ट्रोद्धारास चार प्रकारचे पुरुष

''बुधहो राष्ट्रोद्धाराचे । काम चार प्रकारचे ।
पुरुष लागती साचे । त्याविण ना होय काही ।।
आशीर्वादाकारण । साक्षात्कारी साधूजन ।
व्हावे लागते अवतीर्ण । प्रथमत: त्या देशी ।।
कोणत्या वस्तूत काय गुण । ईश्वरे ठेविला भरून ।
याचे कराया संशोधन । अपेक्षा तत्त्ववेत्त्यांची ।।
तिसरे कवि, ग्रंथकार । कोठे चुकतो व्यवहार ।
हे दाविण्या साचार । पाहिजेत की अवतरले ।।
चौथे ते शूर नर । विवेकी तलवारबहाद्दर ।
स्वदेश हाच साचार । प्राण वाटे जयांना ।।
साधू तेच निश्चिती । नि:स्वार्थी, हरीचे प्रेम अती ।
अलौकिक कृत्ये घडती । सहज हाती जयांच्या ।।
अग्नि, वायू, पर्जन्य । यांचे गुणधर्म पाहून ।
यंत्रे केली निर्माण । ज्यांनी तेच संशोधक ।।
सुख होईल मानवाशी । आपत्ती टळतील विशेषी ।
रोग निश्चये लयाशी । जातील ऐसे संशोधन ।।
राष्ट्राची निर्बलता । येईल कैसी काढितां ।
याच चिंतनी तत्वतां । तत्ववेत्ता सदा असे ।।
तोच कवि ग्रंथकार । भीड न कोणाची तिळभर ।
सत्यासत्य प्रकार । निजवाणीने वर्णी जो ।।
विक्रय निजवाणीचा । खरा कवी न करी साचा ।
कंटाळा व्याजस्तुतीचा । मनापासून जयाते ।।
तोच म्हणावा खरा वीर । की परवशता जया जहर ।
वाटतसे निरंतर । स्वातंत्र्याचा भोक्ता जो ।।''

– श्रीदासगणु

श्रीदासगणु स्मरणिका, (श्रीदासगणु स्मरण मंडळ, नांदेड) यातून पुनर्मुद्रित

***





# आधुनिक महिपतींचे दर्शन

**सौ. मृणाल सुहास थोरात**
एम्.एस्सी. (स्टॅटिस्टीक्स्) राष्ट्रीयकृत बँकेत नोकरी, लेखनाची आवड.

भारताच्या इतिहासात महाराष्ट्राचे स्थान केवळ कीर्तिमान, पराक्रमी, बुद्धिमान अशा रत्नांनीच सर्वांत अग्रगण्य आहे. त्यातीलच रत्नागिरीतील 'कोतवडे' नावाच्या लहानश्या गावात 'सहस्रबुद्धे' आडनावाचे असेच एक अमूल्य, तेजस्वी रत्न उदयास आले. श्री. एकनाथपंत व सौ. सरस्वतीबाई यांच्यासारखे सत्त्वशील, निरभिमानी, धार्मिक, आतिथ्यशील आजी-आजोबा लाभल्यावर श्री दासगणु महाराजांसारखे अमूल्य, तेजस्वी रत्न उदयास न आले तरच नवल. आई-वडील श्री. दत्तात्रय व सौ. सावित्रीबाई यांना पौष शु. एकादशी शके १७८९ ला अेकोळनेर गावी (ता. ६ जानेवारी १८६८) रोजी सकाळचे सूर्योदयाचे प्रसन्न वेळी पुत्ररत्न प्राप्त झाले. आजोबा एकनाथपंतांनी नातवास पाहून 'नारायण' नावाचे ऐवजी गणपती नाव ठेवले. नातवाचे सर्वतोपरी लालनपोषण आजी सरस्वतीबाईंनीच केले. आईचे वडील श्री. अप्पाजी रामचंद्र दाभोळकर व बंधू काशीनाथपंत ह्यांच्या सात्त्विक व धार्मिक वृत्तीमुळे हरिभक्तिचे बीजारोपण नकळतच चिमुकल्या श्री दासगणुंच्या देहात रुजले जाऊन त्याचा मोठा वटवृक्ष उत्तर आयुष्यात बहरत गेला.

श्री. दासगणुंच्या सातव्या वर्षी सहस्रबुद्धे मंडळी नगर येथील कोडत गल्लीत स्वत:च्या वाड्यात रहावयास गेली. तेथील विठ्ठलमंदिरात विठ्ठलाचे दर्शन घेऊन छोट्या संत दासगणूचे डोळे पाणावत. त्यांना लहानपणापासूनच शिक्षणात रस नव्हता. पण त्यांच्या काव्यप्रतिभेला स्फुरण चढून लावण्या, पोवाडे, ग्राम्यगीते त्याच्याकडून लिहिली गेली.

शके १८१३ मध्ये जामखेड तालुक्यातील बोरले अष्ट्याचे जहागीरदार नारायणराव रानडे यांच्या कन्येशी श्री दासगणु महाराजांचा विवाह झाला. त्यांचा चुलतीकडून (जनार्दनपंतांच्या पत्नी) झालेला अपमान सहन न झाल्यामुळे ते कायमचे घराबाहेर पडले. नगरला रस्त्यांवरून हिंडताना एके दिवशी पोलीस सुपरिटेंडेंट 'एम केनेडी' ह्या युरोपियन गृहस्थाशी गाठ पडली. त्यांच्या ओळखीने पोलीस खात्यात त्यांना नोकरी मिळाली. त्यांचे बक्कल नं. ७२७ होते.

नोकरीवर असतानाच श्री दासगणुंचे काव्यगुणांचे पैलू तेजाने चमकू लागले. नोकरी चालू असतानाच श्री. वामनशास्त्री इस्लामपूरकर यांना भेटले आणि त्यांनी श्री दासगणुंना मंत्रोपदेश करून शिष्यत्व प्रदान केले. त्यानंतर ते 'दासगणू' म्हणूनच प्रसिद्धीस पावले. काव्यातून ते आपल्या गुरूविषयी आस्थेने लिहीत.

**गणूदास रची हे कवनगाथा सुंदर।**
**वामनशास्त्रींचा हस्त मस्तकावर।**

गुरुआज्ञेनुसार पंढरपूरच्या वारींना प्रारंभ झाला व ह्या वारीतूनच त्याचे अंत:करण विठ्ठल नामाने भरून गेले. श्री. वामनशास्त्रींच्या शेवटच्या काळात भुसावळच्या रेल्वेप्रवासात गुरुशिष्यामधील गहन, गूढ, सखोल असे हृदयस्पर्शी संभाषण झाले की, शांडिल्याच्या अर्थगूढ भक्तिसूत्राचा मार्मिक भावार्थ श्री दासगणु महाराज सहजपणे सांगू शकले. श्री. वामनशास्त्रीकडून रामदासी संप्रदायाची दीक्षा मिळताच श्री दासगणुंनी एकांतात वास करून आपल्या बुद्धीची उदात्तता, प्रसन्नता वाढविली. जामखेडास एका उत्सवप्रसंगी आमंत्रण दिलेल्या हरिदासाच्या गैरहजेरीमुळे मामलेदार शेटफळकर यांच्यामुळे श्री दासगणुंना एकादशीला कीर्तन करण्याचा योग आला. कीर्तनातील जिव्हाळ्याची भाषा, हृदयातून उमटणारे भक्तिप्रेम व अतिशय मधुर भावोत्कट काव्य ह्यामुळे संपूर्ण जनवृंद अगदी मंत्रमुग्ध होऊन गेला. त्यानंतर अनेक कीर्तनातून अस्सल छक्कड फटके क्वचित लावणीसारखे ढंगदार छंद असे अनेक काव्यप्रकार त्यांनी सादर केले.

श्री साईबाबांचे भक्त नानासाहेब चांदोरकर यांच्या आग्रहाखातर ते १८९६ मध्ये श्री साईबाबांच्या दर्शनास शिर्डीत आले. श्री साईबाबा ही एक अलौकिक विभूती आहे, याची साक्ष पटून श्री साईबाबांच्या चरणी श्री दासगणुंची निष्ठा स्थिरावली. शेवटी तर

**'शिरडी माझे पंढरपूर। साईबाबा रमावर।**
**शुद्ध भक्ति चंद्रभागा। भाव पुंडलिक जागा।**
**गणू म्हणे माझे साई। धाव पाव माझे आई।**

श्री साईबाबांच्या आज्ञेनुसार 'भक्तिलीलामृत' लिहावयास घेऊन संतचरित्रे आपल्या निर्मळ सोज्वळ वाणीने गात असताना श्री दासगणुंचे

पवित्र शुद्ध स्वरूप हळूहळू प्रकट होऊ लागले. तरी एकीकडे पोलीस चाकरी चालू होतीच. चाकरीत असताना त्यांना नानाविध संकटांना तोंड द्यावे लागले. सन १८८९ मध्ये 'कान्ह्या भिल्ल' ह्या दरोडेखोराच्या तपासासाठी गुप्तहेराची भूमिकाही त्यांना बजावावी लागली.

अनंत काळापासून ऋषितुल्य व्यक्तींचे आशीर्वाद, भक्तियुक्त वात्सल्यमय अंत:करण, नानाविध अमृतरूपी साहित्याचा कृपाप्रसाद आपणाला मिळत गेला आहे. श्री दासगणुंचा व्यापक दृष्टिकोन, नि:स्पृहता, सौजन्यता निगर्वीपणा पाहून शेगावचे संस्थापक श्री. रामचंद्र कृष्णाजी पाटील व इतर व्यवस्थापक मंडळींनी श्री दासगणु महाराजांकडून 'गजानन विजय' हा गजानन महाराजांच्या जीवनावरचा महान ग्रंथ लिहून घेतला ह्या ग्रंथाची महती व उत्कट, रोमहर्षक अनुभव अनेकांनी घेतल्याची उदाहरणे आहेत. आयुष्यभर भक्तिमार्गाचा प्रसार श्री दासगणुंनी आपल्या सरळ, सोप्या काव्य रचनांमधून करून मराठी वाङ्मयाला एक उच्च दर्जा मिळवून दिला. शिर्डीत श्री साईबाबा व श्री दासगणु यांनी प्रेम भक्ति नामाचा जणू घाटच उभारला होता. स्वत: श्री दासगणुंनी शिरडी संस्थानचे १९२३ सालापासून ३६ वर्ष अध्यक्ष म्हणून काम पाहिले.

समाजाचे जीवन शांत, प्रसन्न व प्रगत करण्यासाठी त्यांना लागणारे नैतिक धैर्य व ईश्वरभक्तीचा मार्ग अनुसरण्याचे मार्गदर्शन श्री दासगणु महाराजांनी वेळोवेळी केले.

**निवृत्ती ज्ञानेश ईश्वरी अवतार। परी गुरूवर गहिनी केला।**
**गुरुकृपेवीण एकालाही जनी। विठू चक्रपाणी भेटला ना।**
**पंढरीरायाची मनी असल्या आस। सद्‌गुरूची कास दृढ धरा।**
**गणू म्हणे तया भवाचे ना भय। ज्यांचे चित्ती पाय सद्‌गुरूचे।**

अशी आपली सेवाभक्ति शिरडी निवासी श्री साईबाबांच्या चरणी अर्पण केली. त्यांनी श्री साईबाबांच्या कृपेने जवळ जवळ २ लाख ओव्यांची उच्च प्रतीची काव्यरचना केली.

श्री दासगणुंचे राष्ट्रहिताकडेही बारकाईने लक्ष होते. त्यांच्या मते राष्ट्रोद्धारासाठी चार प्रकारचे पुरुष कार्यरत असावे लागतात.

१) साक्षात्कारी साधू

२) संशोधक तत्त्ववेत्ता

३) कवी ग्रंथकार

४) शूर विवेकी ह्या सर्वांच्या मदतीशिवाय बलवान समाज तयार होत नाही असे त्यांचे स्पष्ट मत होते. समाजातील स्त्रीवर्गही सुशिक्षित झाला पाहिजे. त्यांना योग्य शिक्षण देऊन बुद्धिमान बनविण्याचा त्यांचा प्रयास होता. तसेच गैरमार्गाने जाणाऱ्या ढोंगी वृत्तीच्या लोकांच्या दांभिकतेवर श्री दासगणुंनी घणाघाती प्रहार केले.

**जातिजातीचे समाज निघाले।**
**ऐक्यवर्धन नाव तया।**
**झाड पडले धरणीवरती।**
**फांद्या लागल्या नाचाया।**
**नकली साधुसंत निघाले।**
**वरवर झाकी पाहून घ्या।**
**उत्सव, चातुर्मास, पुण्यतिथी।**
**ह्याच ज्याच्या आहेत सुग्या।**

हे त्यांच्याच शब्दात वाचल्याशिवाय त्यांची पोटतिडिक तळमळ व समाजहिताची जाण लक्षात येणार नाही.

कर्म, भक्ति, ज्ञान, उपासना प्रयत्न व सातत्य या सर्वांना आत्मानुभवाची साथ देऊन श्री दासगणु महाराजांचा पारमार्थिक आयुष्याचा चढता आलेख उत्तरोत्तर अनेकांना अनुभवण्यास मिळाला. अखेर त्यांची प्राणज्योत रविवार २६ नोव्हेंबर १९६२ च्या सकाळी ८.३६ ला ईश्वरचरणी विलीन झाली.

**– सौ. मृणाल सुहास थोरात**
४८१ पर्वती दर्शन, फुले मॅन्शन फ्लॉट नं. २,
पुणे ४११००९. फोन : २४४४८५०१

***





# मानवोद्धाराप्रती संत शिकवण

**श्री. श्रीराम रोडे**
एम्.ए. (मराठी, संस्कृत व हिंदी), बी.एड्. अध्यापक, कालिदास विद्यापीठ, नागपूर, कीर्तनशास्त्र प्रथम क्रमांक, राष्ट्रीय कीर्तनकार, महाराष्ट्रांत सर्व मुख्य शहरांतून किर्तने.

।। श्रीराम समर्थ ।।

नरजन्माचे सार्थक करण्यासाठी संतानी भक्तिमार्ग सांगितला आहे.

**श्रवणं कीर्तनं विष्णो:स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वंदनं दास्यं, सख्यं आत्मनिवेदनम् ।।**

उपरोक्त नवविधा भक्ति प्रकारात प्रत्येक भक्तिमुक्ती प्राप्त करून देण्यास समर्थ आहे. श्रवण ही पहिली तर कीर्तन ही दुसरी भक्ती आहे. कीर्तनाचे प्रयोजन ईश्वरप्राप्ती आहे. ईश्वराचे नाम गावे, ईश्वराची कीर्ती वर्णावी, सर्वांना भक्तिमार्गाला लावावे, वृत्ती सदाचारी व्हावी यासाठी कीर्तन करावे. सर्वांनी भगवत भक्त व्हावे. यासाठी कीर्तन ऐकावे. सर्व संतांनी कीर्तनाचे गोडवे गायिले आहेत. संत नामदेव महाराज म्हणतात – 'नाचू कीर्तनाचे रंगी, ज्ञानदीप लावू जगी ।'

नारदीय कीर्तन प्रकारात उत्तररंग व पूर्वरंग असे भाग पडतात. पूर्वरंगामध्ये अभंग निरुपण तर उत्तररंगामध्ये पूर्वरंगाला अनुरूप आख्यान सांगितले जाते. श्री संत दासगणु महाराजांनी अभंग रचना केली व त्याला अनुरूप अशी आख्याने कीर्तनकारांना आख्यान सांगणे सोपे जावे म्हणून लिहिली. अत्यंत प्रासादिक रचनेमुळे ही आख्याने प्रसंग उभा करण्यास कीर्तनकारांना संजीवनी ठरली. त्यांच्या काव्यरचनेत कल्पनाशक्ति, काव्यालंकार, रसपरिपोष, भाषासौंदर्य, वर्णनशैली, अनुभवपूर्ण दाखले, बहुश्रुतपण, समाजाच्या उद्धाराची तळमळ, दंभाची मनस्वी चिड तत्त्वज्ञान इत्यादींचे दर्शन यथार्थपणे घडते. श्री संतदागणू महाराजांची केवळ संख्यात्मक ओवी रचना नसून अनुभवजन्य गुणात्मक काव्यरचना पहावयास मिळते.

श्री दासगणूमहाराजांच्या विपुल काव्य संपदेचा विचार केल्यास त्यात संतचरित्रे नुसती वर्णनपर वा गुणगानपर नसून संतांनी जो भक्तिमार्ग लोकांसमोर ठेवला त्यातील भक्तित्व लोकांच्या हृदयी ठसविणे, आणि त्यातूनच लोकजागृती करणे हा महानमानस श्री संतदासगणू महाराजांचा काव्य निर्मिती मागील होता. त्यांच्या उपदेशपर भक्तिकाव्यात नरजन्म सार्थकी लागावा, हरिगुण गावे, अखंड नामस्मरण करावे, नीति-नियमाने वागावे, धर्मरक्षण व्हावे ही मुख्य शिकवण दिली. संत दासगणु महाराज एका अभंगात सांगतात –

**'भक्ति तीच खरी । हरिची भक्ति तीच खरी ।।धृ ।।**
**दंभा फाटा अद्वेष्टीमन, संनीतीला आचरी ।**
**नामस्मरणावाचुनी आवडे, गोष्ट न ज्या दुसरी ।**
**निश्चय ज्याचा कधि न ढळे की, जैसा अचल गिरी ।**
**परोत्कर्षेदु:ख न मानी, उलटी मदत करी ।**
**शांत, सदय, शुचि मन ते ज्याचे, विषया धरित दुरी ।**
**दासगणु म्हणे, असा असे जो, त्याचे मी पायधरी ।''**

संत दासगणु महाराज उपरोक्त अभंगात श्रीमदभगवद्गीतेच्या १२ व्या अध्यायातील खऱ्या भक्ताची लक्षणे सांगतात. भक्ति करणे हा परमार्थ मार्गातील ईश्वर प्राप्तीचा सर्वात सोपा मार्ग आहे. भक्ति करण्याची पद्धत संतांनी इतकी सोपी केली, इतकी सोपी केली की ते म्हणतात – काही करू नका.

**'चाल केलासी मोकळा, बोल विठ्ठल वेळोवेळा ।**
**परमेश्वराची भक्ति करताना – भक्ति कशी करावी ?**
**भक्ति कशी असावी ? भक्ति कोणाची करावी ?'**

याचे उत्तर संतांनी फार सोप्या शब्दात दिले आहे. संत ज्ञानदेव हरिपाठात सांगतात –

**हरिमुखे म्हणा, हरमुखे म्हणा । पुण्याची गणना, कोण करी ।।**

नामस्मरण हा भक्तिचा सर्वात सोपा आणि साधा मार्ग असून सर्वात समर्थ प्रकार आहे. मनुष्याने श्रद्धा ठेवावी पण ती परमेश्वरावर ठेवावी. आज समाजामध्ये नास्तिकता तोंड काढू पाहत आहे. तरी सुद्धा आस्तिक लोकांची संख्या अधिकाधिक वाढत आहे. नास्तिक राहणे अवघड असून आस्तिक राहणे सोपे आहे. आस्तिकाला आधार असून नास्तिक निराधार आहे. भक्तिची टिंगल करणारे मूर्तिमध्ये देव नाही म्हणणारे टिंगल-टवाळखोर घरांमध्ये नट्यांचे फोटो का लावतात. जयंत्या-पुण्यतिथ्या का साजऱ्या करतात हे कळत नाही. अरे श्रद्धा ठेवायची असेल तर हजारो वर्षापासून चालत आलेल्या परंपरेवर, संतांवर, संतवचनावर ठेवावी.

टिळकांचे शिक्षक केरूनाना छत्रे हे नास्तिक होते. नास्तिकतेवर ते

भाषणे देत, परमेश्वर नाही असे ते सांगत. पण त्यांच्या चरित्रातील एक प्रसंग मोठा बोलका आहे. इंग्रज काळामध्ये नास्तिकतेचा अधिक प्रचार झाल्यामुळे टिळकांची पहिली पिढी नास्तिकतेकडे झुकली होती. केरूनाना छत्रे यांच्याबरोबर प्रवासामध्ये अण्णासाहेब पटवर्धन होते. पहाटेच्या वेळी आपल्या मच्छरदाणीमध्ये केरूनाना काहीतरी पुटपुटत आहे हे अण्णाभाऊंनी पाहिले ते म्हणाले, ''केरूनाना आपण काय म्हणत आहात.'' त्यावेळी केरूनाना म्हणाले, ''कोणास सांगू नका. मी विष्णुसहस्रनाम म्हणतो आहे. त्याचे कारण सांगतो, माझ्या बुद्धीच्या कक्षेत कोठे परमेश्वर दिसत नाही पण माझ्या बुद्धीच्या कक्षेत येते तेवढेच खरे आहे, असेही मी मानू शकत नाही. जर माझ्या बुद्धी पलीकडे जे आहे त्यात जर परमेश्वर असेल तर? म्हणून त्यासाठी विष्णू सहस्रनाम म्हणतो आहे. केरूनाना सज्जन आणि प्रामाणिक होते. अप्रामाणिक माणसं असेच करतात पण चोरून करतात. निवडणुकीचे पत्रक भरतात पण मुहूर्त पाहून भरतात. घरात सप्तशतीचे पाठ करतात आणि बाहेर मात्र इहवादाचा आणि अधार्मिकतेचा टेंभा मिरवितात. म्हणून अशा खोट्या दंभाचाऱ्यापेक्षा नास्तिक बरा. म्हणून दासगणु महाराज अभंगात कळकळीने सांगतात –

**'भक्ति तीच खरी। हरिची भक्ति तीच खरी।**
**दंभाफाटा अद्वेष्टीमन, सन्नीतीला आचरी।।''**

दंभाचार सोडून माणूस अद्वेष्टा व्हावे म्हणजे कोणाचाही द्वेष करू नये. संत तुकोबाराय म्हणतात –

**''कोण्याही जीवाचा न घडो मत्सर। वर्म सर्वेश्वर पूजनाचे।।''**

आपल्या मनाला सत्प्रवृत्त करणे यालाच हरिभक्ती म्हणतात. जोवर मन शुद्ध नाही तोवर भक्तिचा मळा फुलू शकत नाही. राष्ट्रगुरू समर्थ रामदासांनी २०५ मनाच्या श्लोकांची रचना मनाला वळण लावण्यासाठीच केली आहे. ते म्हणतात –

**''मना सज्जना भक्ति पंथेची जावे।**
**तरी श्रीहरी पावी जे तो स्वभावे।**
**जनी निंद्यते सर्व सोडूनी द्यावे।**
**जनी वंद्यते सर्व भावे करावे।।''**

भक्ति सामर्थ्याने दुराचारी मनुष्य सुद्धा उद्धरून जातो पण तो दंभाचारी नसावा.

दासगणु महाराजांनी भक्तिचा तिसरा प्रकार नामस्मरण सांगितला आहे. जो भक्त असतो तो भगवंताशी एकनिष्ठ असतो. भक्त म्हणजे विभक्त न होणे. जो परमेश्वरापेक्षा वेगळा आहे त्याला भक्त कसे म्हणता येईल. मुखाने सदैव परमेश्वराचे नाव घेतो अशा साधकाला सर्वत्र परमेश्वर दिसतो. खराभक्त दुसऱ्याच्या उत्कर्षात आनंद मानतो. त्याला मदत करतो. ज्याचा निश्चय पर्वताप्रमाणे अचल असतो. शांतमन, शुद्धमन, दयाशील अंत:करण हे उत्कट भक्तिचे लक्षण आहे.

**''दृष्टी पूतंन्यसेत् पादम्, वस्त्रपुतं पिबेद्जलम्।**
**सत्य पूतां वदेत् वाणीम्, मन:पूतम समाचारेत्।।**

पाहून पाऊल टाकावे. गाळून पाणी प्यावे. वाणीने सत्य बोलावे आणि मनाने शुद्ध आचरण करावे. यामुळे शरीर आणि मन यांना स्वास्थ्य प्राप्त होते. मनापासून कोणतीही गोष्ट करा, भगवत् भावाने करा म्हणजे भगवंत प्रसन्न होतो. यापेक्षा ईश्वरप्राप्तीचे सोपे साधन दुसरे नाही.

मोलकरणीला उकळलेल्या चहाच्या पत्तीत पाणी टाकून चहा पाजणे, वाया जाईल म्हणून कोणाला जबरदस्तीने खाऊ घालणे, मी धार्मिक आहे हे दाखविण्यासाठी कपाळी टिळा व गळ्यात माळा घालून शरीर सजवणे ह्या सर्व गोष्टी खऱ्या भक्तिच्यामध्ये येणाऱ्या बाधा आहेत म्हणून काय करावे ते संत सांगतात –

प्रामाणिकपणाने वागा, कोणाचा द्वेष करू नका, सर्वांशी आत्मियता ठेवा, भजन-पूजन नामस्मरण यांची कास धरा. आपले चारित्र्य शुद्ध ठेवा. हे सारे निष्ठेने करा. कोणत्याही देवाची भक्ति करा, कारण ईश्वर एक आहे. भगवंत विविध रूपाने नटला आहे. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज म्हणतात – ''तेरे नाम अनेक, तू एक ही है।''

असे सर्व सद्गुण ज्या नराच्या अंगी आहेत अशाचे मी चरणी लीन आहे. असे शेवटी संत दासगणु महाराज सांगतात.

**''दासगणु म्हणे असा असे जो त्याचे मी पायधरी।''**

जीवन घडविण्यासाठी श्री संतदासगणु महाराजांचे अभंग संजीवनी प्रमाणे काम करतात.

संतांची वचने अमृताप्रमाणे आहेत संत आणि संतवचनांचे काय वर्णन करावे. म्हणून तुकोबारायांच्या शब्दात सांगतो.

**काय वानू आता, नपुरे ही वाणी। मस्तक चरणी, ठेवितसे।।**

।। जय जय रघुवीर समर्थ।।


**– श्री. श्रीराम रोडे**

'अयोध्या', गजानन नगर, सेलू रोड– मालेगांव,
जि. वाशिम – ४४४५०३.


।। श्रीशंकर ।।

**नवे 'वृत्त'** : मात्रा, छंद, जाति इ. प्रमाणे समर्थपणे त्यांनी अक्षरगणवृत्तांत ही रचना केली आहे. शिखरिणी, शार्दुलविक्रीडित, शालिनी, मंदाक्रांता इ. अनेक अक्षर– गणवृतांचा सफाइदारपणे उपयोग केलेला आढळतो. अन्यत्र ओवी छंदाचा वापर मात्र फार मोठ्या प्रमाणात आहे.

जगन्नाथ पंडित या आख्यानात त्यांनी गौतमी नावाचे एक स्वतंत्र नवे वृत्त योजिले आहे. तो श्लोक असा–

**निरखोनिया पाहुन पंडितास । वदले अपय्या अपुल्या मनास ।।**
**यवनीचिया पाहुन संगतीला । जगतात हा निंद्य सदैव झाला ।।**

(६१)

''हे वृत्त त्यांनी नव्यानेच निर्मिले असून त्याचे गण स य स य असून अक्षरे बारा आहेत'' असे स्पष्टीकरण त्यांच्या अनेक आख्यानांचे प्रकाशक व प्रस्तावना लेखक कै. श्री. वि. ल. सुबंध यांनीच केलेले आहे.



# संत कवी श्री दासगणु महाराज : एक आधुनिक महिपती

**श्री. बाळकृष्ण भागवत पेटकर**
बी.ई. सिव्हील, पुणे कॅन्टोनमेंट बोर्डातून सिव्हील इंजिनियर म्हणून निवृत्त.

इ. स. १९६२ च्या नोव्हेंबर महिन्याचा २६ वा दिवस माझ्यासारख्या शालेय विद्यार्थ्यांच्या जीवनात असा तो काय असणार? नाही; पण तो संतश्रेष्ठ श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यतिथीचा दिवस. श्री पांडुरंगाच्या एका निष्ठावंत भक्ताने केलेल्या मागणीच्या पूर्ततेचा दिवस आणि म्हणूनच की काय, ती तिथी थोडीशी मागे रेंगाळली होती. विठ्ठलाच्या चेहऱ्यावरची मूळचीच प्रभा आणखीनच तेजाने झळकत होती. कारण मागणीच तशी होती.

**''भक्तित तुझ्या अंतर कधीही नसावे।**
**मागे पुढे आमुचिया विठू तु असावे।**
**त्वा भक्तवत्सल अशा धरिले नावा।**
**या दीन दासगणूला पदि दे विसावा।।''**

असा श्री पांडुरंगाचा निष्ठावंत भक्त होता तरी कोण? तो म्हणजे संत कवी 'श्री दासगणु महाराज' ज्यांना आधुनिक 'महिपती' म्हणून संबोधले जाते आणि परिवारामध्ये ते 'दादा' या नावाने सुपरिचित आहेत.

'दासगणु महाराज गेले' ही दु:खद वार्ता गावामध्ये पसरण्यास वेळ लागला नाही. नागरिक स्त्री पुरुष, आबालवृद्ध अंत्यदर्शनासाठी जड अंत:करणाने येऊन परतत होते. आख्खे पंढरपूर शोकसागरात बुडून गेले. लोक सहस्रकरांनी दादांच्या पार्थिवावर बुक्का-फुले वाहून आपला भक्तिभाव प्रकट करत होते.

सायंकाळी महायात्रेस प्रारंभ झाला. विमान तोरणपुष्पांनी सजवले होते. भाविकांची दिंडी देहभान विसरून मृदंग-टाळाच्या तालात हरिनामाचा गजर करीत होती. भजने म्हणत संतांचे अभंग गाईले जात होते. नगरप्रदक्षिणेच्या रस्त्याने शेकडो स्त्री पुरुष मागून चालत होते. ठिकठिकाणी हार समर्पिले जात होते.

रात्री साठेआठच्या सुमारास दत्तघाटाच्या उजव्या बाजूस यथायोग्य ते अंत्यविधी झाल्यानंतर दादांचा पवित्र देह अग्निनारायणाने आपल्या भडकत्या ज्वालांनी आत्मसात केला. हा सोहळा 'याचि देहि, याचि डोळा' पाहण्याचे महद्‌भाग्य लाभले.

भारतभूमी ही संतांची खाणच आहे. त्यातही महाराष्ट्रात जी अनेक नवरत्ने जन्माला आली त्यापैकीच एक होते श्री दासगणु महाराज. प.पू. स्वामी स्वरूपानंद 'संत कसे ओळखावे' हे सांगताना म्हणतात -

**''आणिकांचे दु:ख देखोनिया डोळा।**
**येई कळवळा। तोचि संत।।**
**लोक कल्याणार्थ वेचि जो जीवित।**
**संत तो महंत। स्वामी म्हणे।।**
**स्वामी म्हणे संत प्रहम मूर्तिमंत।**
**विश्वकल्याणार्थ वावरती।।''**

वरील गुणांनी युक्त तसेच भगवंतालाही ज्याच्याबद्दल उत्कंठा लागते असे हे संतकवी दासगणु महाराज कोण होते, कसे होते याचा मागोवा घेत असता ते 'संतकवी' म्हणजे 'संतांचे कवी' किंवा 'संत असलेले कवी' होते. याचा प्रत्यय येतो. कारण आयुष्यभर त्यांनी संतांच्या कीर्तीचे पोवाडे गाण्यापलीकडे दुसरे काही केलेच नाही. म्हणूनच श्रीदेवाने म्हटले आहे ते किती खरे आहे ते पहा. 'संतकळीचा भाट तुझा हा दासगणु आला।''

संतांचे साहित्य म्हणजे नुसत्या मठपती आणि नामधारी महंतांनी निर्माण केलेले साहित्य नव्हे! क्रियाशील वृत्तीने, समाजाच्या सदाचरणाची तळमळ बाळगणाऱ्यां महापुरुषाचे ते साहित्य असते. दासगणु महाराज याच पठडीतले संत होते.

लौकिकार्थाने ते विद्वान नव्हते, की पंडित. म्हणूनच त्यांचे काव्य नैसर्गिक व सहजसुंदर आहे. त्यात भाषासौष्ठव, नाट्य, रसपोष, अलंकार, भव्य व उदात्त विचारांची अन् कल्पनाशक्तीची रेलचेल आहे. सर्वधर्मसमभावाबरोबरच देशभक्तीचाही विचार ते मांडतात. त्यांच्या काव्यात ज्ञानेश्वरांची मधुरता, नामदेवांची भक्ती, एकनाथांची रूपक शैली, तुकारामांचा फटकळपणा पुरेपूर उतरला आहे. शाहिरी ढंगामुळे त्याला गेयता अन् ठसका लाभला आहे.

कै. द. वा. पोतदारांनी म्हटल्याप्रमाणे त्यांची सारी रचना 'जुळणीची' नसून 'स्फूरणीची' आहे. 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेर' या जातीची आहे. आणि म्हणूनच ते जेव्हा एखाद्या प्रसंगाचे, निसर्गाचे वा

व्यक्तीचे वर्णन करतात तेव्हा ते सारे डोळ्यासमोर प्रत्यक्ष उभे राहते. त्यांनी निर्माण केलेले काव्य एखाद्या सागराप्रमाणे विशाल, शिवाय गोडही आहे.

माऊली म्हणतात त्याप्रमाणे 'ते तीर्थ ते क्षेत्र। जगी तेची पवित्र। भक्ती कथेसी मैत्र। जया पुरुषा।। (१२.२३५) त्यांनी ज्यांना ज्यांना संत म्हणून ओळखले त्यांच्या संतत्वाच्या खुणांसह त्या त्या संतांची चरित्रे गाईली.

संतकथा हा जरी त्यांच्या कवितेचा आत्मा असला तरी त्यांच्या रचना चौफेर होत्या. त्यांच्या कीर्तनोपयोगी आख्यानांनी जनमानसावर एक वेगळाच ठसा उमटवला आहे.

दासगणु महाराजांची पदे ही नुसती प्रासादिकच नाही, तर नित्यपरिचयातले असलेले त्यातले शब्दसुद्धा, महाराजांच्या स्पर्शाने सजीव होऊन रसिकांच्या ह्रदयाचा ठाव घेतात. प्रसादगुण तर त्यात काबुली द्राक्षातील मधुर रसाप्रमाणे ओतप्रोत भरून राहिला आहे. ज्ञानेश्वर माऊलींनी केलेले काव्यगुणांचे वर्णन – ''वाचे बरवे कवित्व। कवित्व की रसिकत्व। रसिकत्व परतत्व। स्पर्शू जैसा।। त्यांना तंतोतंत लागू पडते.

दादांच्या काव्यगुणांचे एक एक जरी उदाहरण द्यायचे झाले तरी एक छोटी पुस्तिकाच तयार होईल. त्यांचे कल्पनारम्य काव्य 'शृंगाराला कसे पवित्र करून सौम्य करते हे पाहण्यासाठी 'संत गोरा कुंभार' मधील प्रसंग पहा. गोरोबाच्या दोन्ही स्त्रियांची कामातुर अवस्था दादांच्या काव्यशक्तीने सात्त्विक पण रमणीय केली आहे.

**''देतो मन्मथ ताप फार म्हणूनी तत्परिपत्यास्तव।**
**पुजू गे प्रभू नीलकंठ भगवान जो का मृडाणीधव।**
**शाळुंका निज वक्ष कल्पुनी बरे वक्षोजा लिंगावरी।**
**गोऱ्याचे 'कर' बिल्वपत्र सखे वाहू गडे लौकरी।।''**

वक्षस्थळाला महादेवाच्या पिंडीचे रूपक, अन् गोरोबाच्या हाताला बिल्वपत्राचे; हे रमणीय आहेच पण शृंगार मात्र सात्त्विक.

'पंडितराज जगन्नाथ' या नाटकाचे लेखक श्री. विद्याधर गोखले म्हणतात. दासगणुंचे 'श्री जगन्नाथ पंडित' हे आख्यान म्हणजे एक नाटकच आहे. या आख्यानाचा शेवटचा प्रसंग – गंगेची जगन्नाथांनी केलेली प्रार्थना अन् गंगेचे प्रकट होऊन यवनीसह जगन्नाथाचा केलेला उद्धार इतका नाट्यमय आहे, की एखाद्या नाटकाचा तो परमोच्च बिंदू ठरावा.

त्यांची व्यक्तिचित्रे किती जिवंत असतात. 'लाखा कोल्हाटी' या आख्यानात जगन्माता श्री रुक्मिणी जेव्हा कोल्हाट्याच्या मुलीच्या रूपात येते, तेव्हाचे वर्णन पहा –

**''झाली श्री अंबा कोल्हाटीण जगदंबा।**
**वेणी फुलांची सोडूनी बांधी, अंबाडा आदिशक्ती।**
**पचंग घालुनी लुगडे किंवा पिवळी माती।।**
**बाह्या बुगड्या पार काटिल्या डूल दोन्ही कानांत।।**
**अंगी चोळी तंग अतिशय उरोभाग ठसठशीत।।**
**गाल गुलाबी भृकुटी धनूसम शंखाकृती ती मान।**
**दासगणु म्हणे सिंहकटी ती अनुपम ते लावण्य।।''**

दुसरे एका पतिव्रता स्त्रीचे वर्णन. 'मातृत्व' कितीही मंगल असले तरी ते पातिव्रत्याच्या अधिष्ठानावर असेल तरच. अन्यथा नाही. देहान्त प्रायश्चित घेण्यासाठी श्री ज्ञानेश्वरांचे आई-वडील घराबाहेर पडले आहेत. अशावेळी लहानगी मुक्ताई आईला अडवत आहे. त्यावेळीस दादांनी त्या आईच्या भावनांचे वर्णन केले आहे.

**''पति जिकडे, तिकडे कांता। धावते सिंधूकडे सरिता।**
**त्यागि प्रभा कदापि न सविता। रहा म्हणोनी मुलांनो राजी।।**

असेच निसर्गाचे वर्णनही दादा किती प्रभावीपणे करतात –

**''नामरूप करंडा। भरला अंधकार काजळाने।**
**रात्र झाली दोन प्रहर। कृष्ण शालू चराचर।**
**रजनी वाटे नेसली। नक्षत्रे त्या शालूवर खडी वाटे साचार।**
**आकाशगंगा हाच पदर। शोभे तथा शालूवर।।''**

त्यांचे हे मोग़लाई चे वर्णन आजही किती तंतोतंत लागू पडते पहा –

**''आदिलशाही तक्त विजापूर गादी बादशाहची रियासत मुसलमानाची।**
**बेबंद, कायदा धुंद, दादा तो लगती कवणाची।**
**खिरापत हमेशा पैशाची।**
**मनगटी असे ना जोर, तोच शिरजोर मजा त्याची**
**खबर ना कुणास कवणाची।**
**सरदार अमिर उमराव 'गणपति' अडचण खुर्चीला।**
**कायदा मुळीच मरून गेला।**
**नाझम, मुळीच बेफाम, दिसाआड कचेरीस येती।**
**बसुनि सदरेस झोप घेती।**
**कसा करील जो सैल तयावर बहाल मर्जी त्याची।**
**गरिबा गाठ दंडुक्याची।''**

परमार्थात अधिकार प्राप्त व्हावा असे वाटत असेल तर 'मीपण' जाळून टाकावे लागते. हे साधले की भक्ती साध्य होते. अंगी वैराग्य बाणते. मग नामरूपी अलंकार आवडू लागतात. याचे वर्णन संत जनाबाईंच्या आख्यानात केले आहे. राजाने आणलेला आहेर नाकारताना जनाबाई म्हणते –

**''नको मज साडी – नसे मी रे उघडी।**
**भक्तीची पैठणी नेसुनी बसल्ये राजा। भवि मन विटले।।**
**वैराग्याची अंगात चोळी 'केशव' 'राघव' नग हे मी ल्याले।।**
**'मीपण' जाळून काजळ केले। त्यायोगे हे जग हरिरूप दिसले।।**
**सद्भावाचे कुंकू कपाळी। गुरुरायाने मज लावियले।।**
**त्यापुढती या भवभूषणांची। किंमत ना मज दासगणु बोले।।''**

भारतीय इतिहासामध्ये श्री वेदव्यासांपासून ते ज्ञातअज्ञात अशा संतांनी समाजाच्या निकोप धारणेसाठी नैतिक मूल्ये रुजवली, जोपासली, वाढीस लावली. महाराष्ट्रातील दैदीप्यमान अशा संतपरंपरेने तर

धर्माचरणातील अतिरेकी कर्मकांडाला बाजूस करून खऱ्या सद्धर्माचा विचार मांडला. समाजाला आदर्श नीतिमूल्ये शिकवली. समाजातील बिघडलेली मने याच संतांनी ताळ्यावर आणली. हेच कार्य दासगणु महाराजांनी पुढे चालवले हीच परंपरा जोपासली.

आज सगळीकडेच भ्रष्टाचार बोकाळलेला दिसतो. हा केवळ कोणत्या एखाद्या क्षेत्रापुरता मर्यादित राहिलेला नसून, कोणतेही क्षेत्र असे राहिले नाही जिथे भ्रष्टाचार हा शिष्टाचार झालेला नाही. याचे एकमेव कारण नैतिक मूल्यांचा ऱ्हास हे होय.

भौतिक प्रगतीने फारतर सुशिक्षितपणा वाटेल. जगाचे भरणपोषण होईल पण जगाचे रक्षण व्हायचे असेल तर समाजघटकांच्या ठिकाणी नैतिक मूल्यांचे अस्तित्व असणे गरजेचे आहे, त्याचे निष्ठापूर्वक आचरण असले पाहिजे.

यासाठीच दासगणु महाराजांची त्रिसूत्री – 'सदाचार', 'सन्नीती' आणि 'सद्वासना' हा तीन कलमी कार्यक्रम प्रत्येक नागरिकाने अंगी बाणवून अमलात आणला पाहिजे म्हणूनच ते म्हणतात ''सदाचार, सन्नीती, तशीच तिसरी सद्वासना जागृत असल्या रक्षण होते जगताचे सज्जना।।''

चौऱ्याऐंशी लक्ष योनी फिरून आल्यावर दुर्लभ, दुष्प्राप्त अशा नरदेहाचे काही सार्थक करण्याऐवजी मनुष्यप्राणी भौतिक सुखातच रममाण होतो. परिणामी षड्रिपुंच्या भोवऱ्यात अडकून मायाजालात फसतो.

यातून सुटण्यासाठीचा उपाय दासगणु महाराज सांगतात, ''नरतनू तुला लाभली पर्वणी भली तरुनी जा भय रे। मद मत्सर माया लोभ अहंता भव रे।।''

यासाठी काय करावे हे सांगताना दादा म्हणतात,

**''निष्पाप करि वा चित्त आणि आपुले।**
**तैसेच जाळणे कुकल्पनांची मुळे।**
**दुष्कर्म त्यजुनिया नीतीमध्ये या बळें।**
**वैराग्याला जागृत ठेवून लीनतेस वरि मना।।''**

त्याचबरोबर

**''अभिमानाधिन होऊ नको रे बुडवील तुज तो नरा।**
**नको रे गाफील राहूस जरा।।''**

मग काय करावे हे सांगताना ते पुढे म्हणतात –

**''आल्या संसारी होई जागा। गव्हारा ध्यायी पांडुरंगा।।''**

शेवटी मागणे एकच जे प.पू. स्वामी वरदानंदांनी मागितले आहे.

**''तुम्हातील असा मिळो त्व तरी जिव्हाळा आम्हा।**
**अनंत आपुला म्हणा मग नसे कशाची तमा।।''**

।। हरि: ॐ तत् सत् ।।

**श्री. बाळकृष्ण भागवत पेटकर**
फ्लॅट नं. ५१५, ३ 'ब', ११७/अ, मंगलमूर्ती कॉम्प्लेक्स,
सिंहगड रोड, पुणे ४११०३० फोन : २४२५१४००



# श्रीदासगणु महाराजांचा प्रतिवार्षिक कार्यक्रम व प्रवास

**श्री. प्रकाशराव मेहेंदळे**
राधादामोदर प्रतिष्ठान अंतर्गत संतविद्याप्रबोधिनीचे कार्यवाह

शिर्डीस श्रीसाईबाबा असल्या वेळेपासून रामनवमीच्या उत्सवाची माळ श्रीदासगणु महाराजांच्या (ती. दादांच्या) गळ्यात पडली होती. तेव्हापासून सन १९५४ पर्यंत शिर्डीची वारी त्यांनी कधी चुकविली नाही. १९५४ नंतर मात्र प्रकृती-अस्वास्थ्यामुळे ते शिर्डीस रामनवमीकरिता गेले नाहीत. (१९५४ सालापासून ती.दादांची परंपरा श्री.अ.दा. आठवले यांनी (ती.अप्पांनी) पुढे चालू ठेवली. त्यानंतर श्रीदासगणु महाराज प्रतिष्ठानने ही परंपरा चालू ठेवली आहे. सध्या श्री. विक्रम नांदेडकर यांची कीर्तने या उत्सवात तेथे होतात.) रामनवमीच्या दिवशी गंगेच्या कावडी आणण्याची प्रथा महाराजांनी चालू केली. सर्व जाती-पंथाचे शे-दीडशे लोक कोपरगावाहून गोदावरीचे जल कावडीत घेऊन येत. त्यांची वाजत गाजत मिरवणूक निघे आणि नंतर त्या गोदाजलाने श्रीसाईबाबांच्या समाधीस स्नान घालण्यात येई. कावडी आणणाऱ्यास प्रसाद म्हणून ती.दादांकडून श्रीफल देण्यात येई. कावडींची संख्या वाढत वाढत ७५० पर्यंत गेली व पुढे आणखीन जास्त वाढत गेल्याने लहान मुलांना मात्र महाग झालेल्या नारळाऐवजी केळे, पेरू, मोसंब असे एखादे फळ देण्यास सुरुवात झाली. समाधी मंदिराच्या बाजूच्या दोन खोल्या व वरील सर्व खोल्या, हॉल व सज्जे ती.दादांकडे असत व मुंबई, पुणे, मराठवाडा, वऱ्हाड, मध्यप्रदेश येथून येणाऱ्या सर्वांची निवास व भोजनाची व्यवस्था तेथे केली जाई. उत्सवाचे पहिले दिवशी संतचरित्रावर, मुख्य दिवशी रामजन्माख्यानावर तर तिसरे दिवशी गोपाळकाल्याचे अशी तीन कीर्तने समाधीमंदीराचे समोरचे मंडपात होत.

पूर्वी १९३७ पर्यंत महाराज रामनवमीपर्यंत दोन अडीच महिने शिर्डीस राहात व तेथून ज्ञानेश्वरांच्या पालखीचे दर्शनासाठी पुण्यास येत. १९३७ साली ते न्यूमोनियाने बरेच आजारी पडले. डॉ. भडकमकरांनी चांगल्या हवेवर जाण्याचा सल्ला दिल्याने व नागपूरच्या श्री.कृ.वा. जोशी यांच्या आग्रहावरून ते १९३७ साली प्रथम लोणावळ्यास गेले. तेथील उन्हाळ्यातील हवा त्यांच्या प्रकृतीस चांगली मानवली. भांगरवाडीतील राममंदिरात तीन खोल्या घेऊन महाराज राहिले होते त्यावेळी पनवेलचे श्री. जाईल व लोणावळा येथील इनामदार श्री. हरिभाऊ भोंडे या राममंदिराच्या विश्वस्तांनी महाराजांना प्रतिवर्षी उन्हाळ्यात लोणावळ्यास यावे अशी विनंती केली आणि राममंदिराच्या आवारातील जागा त्यांना उतरण्यासाठी प्रतिवर्षी कोणतेहि भाडे न आकारता द्यावी असा कार्यकारी मंडळाने ठराव केला. मंदिराचे विश्वस्त व राममंदिराचे पुजारी श्री. विश्वनाथभाई जोशी महाराजांचे अनुग्रहीतच बनले. या ऋणानुबंधामुळे व चांगल्या हवेमुळे महाराज प्रतिवर्षी लोणावळ्यास जाऊ लागले. आम्ही सर्व मुले उन्हाळ्याच्या सुट्टीमुळे तेथे जात असूच. श्रीपरशुराम जयंती, श्रीशंकराचार्य जयंती, श्री. नृसिंहजयंती हे उत्सव मग लोणावळ्यासच होऊ लागले. दशहराच्या उत्सवाला तेथे मोठे स्वरूप प्राप्त झाले. या उत्सवात दहा दिवसपर्यंत रोज सकाळी रूद्राभिषेक व संध्याकाळी गंगामहात्म्याचे वाचन, गंगालहरीवर प्रवचन व बसून कीर्तन असा कार्यक्रम असे. ज्येष्ठ शु. दशमीच्या दिवशी श्रीजगन्नाथ पंडितांचे चरित्र लावले जाई व गोदेच्या समाराधनेनिमित्त दीड दोनशे पानही होत असे.

लोणावळ्याहून ज्ञानेश्वरांच्या पालखीच्या दर्शनासाठी महाराज पुण्यास येत. त्यांच्या गुरूंची- श्रीसद्गुरू वामनशास्त्री इस्लामपूरकर यांची- पुण्यतिथी ज्येष्ठ वद्य एकादशीस असते. हा उत्सव दशमी, एकादशी, द्वादशी असा तीन दिवसांचा असतो. तिन्ही दिवस कीर्तने होत. शेवटचे कीतर्न काल्याचे होई. १९४८ सालापर्यंत महाराज पुण्याच्या मुक्कामात श्री. वहिनीबाई जोगळेकर यांच्या बिऱ्हाडी आनंदाश्रमाच्या समोरील महाजनींच्या वाड्यात रहात. त्यावेळी या उत्सवाची कीर्तने मंडईजवळील साखरे महाराजांच्या मठात होत असत. एकदा ती. दादा बॅ. गाडगीळ रस्त्यावरील बॅ. गाडगीळांकडे मुक्कामास होते. पुढे हिंदुमहासभेच्या सौ.शांताबाई गोखले यांच्या सदाशिव पेठेतील वाड्यात ती.अप्पांनी बिऱ्हाड केल्यापासून महाराज तेथे राहू लागले. या ठिकाणापासून गायआळीतील श्री. रहाळकरांचे राममंदिर अगदी जवळ असल्याने या उत्सवाची कीर्तने तेथे होऊ लागली. द्वादशीचे दिवशी समाप्तीस शे-सव्वाशे पान होई. पुण्यातील महाराजांचा मुक्काम श्रावणी होताच बहुधा हलत असे.

इतिहास संशोधक श्री. दत्तो वामन पोतदार व श्रीदासगणु

महाराजांचा जुना परिचय व ऋणानुबंध. वर्षातून एकदा तरी ते ती. दादांच्या दर्शनभेटीसाठी येऊन जात. सद्गुरू श्रीवामनशास्त्री यांच्या पुण्यतिथी उत्सवात श्री. पोतदार घरातून सोवळ्याचा पीतांबर व वर अंगरखा पगडी असा पोषाख करून भोजन प्रसादासाठी रिक्षातून येत. पुढे ते पुणे विद्यापीठाचे कुलगुरू झाले त्यावेळी त्यांनी आपल्या गाडीतून ती. दादांना पुणे विद्यापीठ दाखविण्यासाठी नेले होते.

शके १८६७ पासून पुढे दरवर्षी आषाढ शु. षष्ठीला श्री. नारायणराव गर्दे(वकील) यांचे खास आग्रहास्तव त्यांचे घरी श्री. बाबा गर्देयांचे पुण्यतिथीनिमित्त ती. अप्पांचे कीर्तन होऊ लागले. ती. दादांच्या त्या काळात पुण्यात मुक्काम असल्याने त्यांचे उपस्थितीत ते कीर्तन होई.

पुण्यातील मुक्कामात मधुन मधून ती. दादा श्रीरामाचे दर्शन घेण्यास तुळशीबागेत पायी जात व दर्शनानंतर श्रीविष्णुसहस्रनामाचापाठ करून घरी परत येत. तसेच श्रीनारायणराव गर्देयांचे गाडीतून एकदातरी श्रीमहाराज श्रीक्षेत्र आळंदी व देहू येथे दर्शनासाठी जाऊन येत असत.

समर्थभक्त श्री. चौंडे महाराज व श्रीदासगणु महाराज यांचा घनिष्ट परिचय. गुरूपर्व काळात आषाढ शु. प्रतिपदा ते पौर्णिमा भिकारदास मारूती मंदिरात दोघांची भेट व्हायचीच. तेथे ती. दादांची कीर्तनेही व्हायची.

१९५० साली पुण्यात अधिकमास झाला. तो उत्सव करताना किती अडचणी आल्या, उत्सवाचे स्वरूप कसे असते इ. वर्णन ती. अप्पांच्या 'श्रीअधिकमास महोत्सव' या काव्यातून पहावे.

पुणे किंवा लोणावळे मुक्कामात श्री. बालगंधर्व ती. दादांचे दर्शनभेटीसाठी येत असत आणि ती. दादांचे समोर बसून 'जोहार मायबाप, अगा वैकुंठीचा राजा', इ. पदे म्हणून आपली सेवा सादर करीत असत. पुणे मुक्कामी कधीतरी श्री. पंडितराव नगरकर व मास्टर कृष्णराव पण आपली सेवा सादर करीत. तसेच एक शाहीर (बहुधा तुकाराम नाव असावे त्यांचे) ती. दादांनी रचलेले 'तानाजी मालुसरे', 'झाशीची राणी'चे पोवाडे म्हणावयास येत असत.

पुण्यातून श्रीमहाराज नांदेडास जात. एखाद्या वर्षी मधेच थोडे दिवस अहमदनगर येथे श्री. नानासाहेब बागडे यांचेकडे राहून तेथून पुढे मराठवाड्यात जात. श्री. धोंडोपंत बाबासाहेब नांदेडकर वकील होते तोपर्यंत महाराज नांदेडास पुष्कळ दिवस राहात असत. नांदेडास कधी जाईन अशी ओढ त्यांना लागलेली असे. श्री. बाबासाहेबांविषयी महाराजांना अत्यंत जिव्हाळा होता. श्री. बाबासाहेबांनाही महाराजांचे बोलणे म्हणजे वेदवाक्य असे. श्री. बाबासाहेब १९४१ साली कैलासवासी झाले. त्यानंतर नांदेडचे प्रत्यक्ष राहण्याचे दिवस थोडे कमी झाले तरी बाबासाहेबांचे चिरंजीव श्री. दिगंबरनाना व श्री. प्रभाकरराव यांच्या प्रेमापोटी महाराज क्वचित नांदेडास जात.

आता महाराजांचे मोंगलाईतील राहणे उमरी स्टेशनहून कोसभर दूर असलेल्या गोरटे या गावी होऊ लागले. तेथील जमीनदार श्री. बाबासाहेब देशमुख यांच्या प्रेरणेने एक लहानसे घर मोंगलाईतील मंडळींनी महाराजांच्याकरिता बांधले आणि श्री. देशमुखांच्या प्रेमाखातर व हवापाण्याच्या दृष्टीने गोरटे गाव उत्तम असल्यामुळे महाराज तेथे बरेच दिवस राहू लागले.

मराठवाड्यातून दसऱ्याच्या वेळी महाराज पंढरपूरास येत. दरवर्षी वारी म्हणून ते अश्विन शुद्ध प्रतिपदेपासून मकरसंक्रांतीपर्यंत पंढरपूरात रहात. या काळात श्री. तानबा पुराणिक उंब्रजकर यांना ते श्रीमद् भागवतच्या दशमस्कंदावर पुराण सांगण्यासाठी पाचारण करीत. स्वत: ती. दादा एकाग्रतेने त्यांच्या पुराणकथनाचे श्रवण करीत. घरातील इतर मंडळी सुद्धा पुराण ऐकण्यास बसत असत. श्रीकृष्णाच्या बाललीला श्रवण करताना ती. दादांचे अष्टसात्त्विक भाव दाटून येत असत. पुराणाच्या समाप्तीचे दिवशी ती. दादा पुराणिकबुवांना एक चांगली धोतरजोडी, रूमाल (फेटा), सदऱ्याचे कापड, संभावनेचे पाकीट, नारळ देत व हार घालून त्यांचा सत्कार करीत. घरांतील सर्व मंडळींना पैसे देत व ते पोथीपुढे ठेवून नमस्कार करण्यास सांगत. तसेच इतर सर्व परिचित व पाहुणे मंडळींनाही भोजनास बसण्यापूर्वी पोथीपुढे पैसे ठेवून नमस्कार करा असे सांगत.

दसऱ्याचे दिवशी श्रीसाईबाबांची पुण्यतिथि येते. त्यानिमित्त सातआठ ब्राह्मणांचे द्वारा पवमान- रूद्राचा अभिषेक देवावर होऊन शिवविष्णूंच्या सहस्रनामाच्या उच्चारासह हजार बेल व हजार तुळशी वाहिल्या जात. दुपारी समाराधना व प्रसाद-भोजन होई. एकादशीचे दिवशी पंढरपूरातील महाराज मंडळींना फळे वाटप होई. मोसंबी, संत्री, चिक्कू, डाळिंब इ. फळे कोपरगावातील मोठे बागाईतदार व ती. दादांचे अनुग्रहित श्री. बापुराव बोरावके दरवर्षी पाठवत असत.

दीपावलीचे सणास ती. अप्पा व सौ. मामी यांचे काही नातेवाईक ती. दादांकडे येत असत. आम्ही सर्व मुले तेथे असूच. पहिले दिवशी पंढरपूरातील ६०-७० तरी स्नेही मंडळी सकाळी फराळास असत. वसूबारसपासून भाऊबीजेपर्यंत सर्व कार्यक्रम अतिशय आनंदात व उत्साहात पार पडत. कार्तिकी एकादशीनंतर तुलसी-विवाहही तेथे होत असे.

कार्तिक वद्यात येणारा श्रीज्ञानेश्वर महाराजांचा पुण्यतिथीचा उत्सव महाराज मोठ्या प्रेमाने साजरा करीत. हा उत्सव पाच दिवसांचा असतो. रोज सकाळी अभिषेक व निरनिराळ्या धार्मिक ग्रथांचे वाचन असा कार्यक्रम असे. संध्याकाळी कीर्तन होत असे. बहुतेक कीर्तने ती. अप्पा करीत. एखादेवेळेस एखादे कीर्तन श्री.तुकारामबुवा आजेगावकर करीत. पाचव्या दिवशी काला होत असे. कार्तिक वद्य त्रयोदशी या पुण्यतिथीच्या मुख्य दिवशी सकाळी पांच ब्राह्मणांकरवी पवमान रूद्राचा अभिषेक होई तसेच श्रीज्ञानेश्वरांचे पूजन होई.

वार्षिक कार्यक्रमामध्ये परिवारातील मंडळींना मकरसंक्रांतीच्या निमित्ताने पाच-सहाशे लोकांना काव्यमय संदेशासह तिळगूळ पाठवणे हे काम पंढरपूरातूनच होई. दरवर्षी नवीन उपदेशपर काव्य केले जाई. एकाच गावात राहणाऱ्या व एकमेकांशी परिचित असणाऱ्यांना क्वचित एकत्रही या पत्रिका पाठविल्या जात.

ती.दादांची प्रकृती चांगली होती तोपर्यंत ते रोज नगरप्रदक्षिणा

करून श्री. रुक्मिणी-पांडुरंगाचे दर्शन घेऊन येत असत. नंतर नंतर वृद्धापकाळात ते रोज दत्तघाटापर्यंत जात व तेथे श्रीविष्णुसहस्रनामाचा पाठ करून व श्रीदत्तात्रेयाचे दर्शन घेऊन घरी परतत.

श्री. सोनुमामा दांडेकरांचे दरवर्षी कार्तिक शु. प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत पंढरपूरात प्रवचन- कीर्तनाचे भरपूर कार्यक्रम होत असत. पंढरपूर मुक्कामात ती. दादांच्या दर्शन भेटीसाठी वेळात वेळ काढून निदान ५-१० मिनिटे तरी ते दामोदराश्रमात येऊन जात. श्री. सोनुमामांना अधिक वेळ असेल तर नवीन केलेल्या काव्याचे वा कीर्तनाख्यानाचे वाचन ती. छगनकाकांकडून ती.दादा करवून घेत. या कार्यक्रमानंतर श्री. सोनूमामांना बुक्का लावून ती.दादा त्यांच्या गळ्यात हार घालीत आणि त्यांना नमस्कार करीत. असा सत्कार करून घेण्यात श्री. सोनुमामांना संकोच वाटे व ते म्हणत, 'महाराज आपण वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध असून आपण केलेल्या अशा सत्कारामुळे मला संकोच वाटतो. आपल्या कीर्तनात जो भक्तिरस आणि प्रासादिक वाणीचा प्रभाव आहे, ते अधिष्ठान आमच्या मध्ये नाही. ती.दादा पण श्री.सोनुमामांना त्यांची योग्यता विषद करीत. त्या दोघांचा सुखसंवाद नेहमी होत असे.

दसऱ्यापासून मकरसंक्रांतीपर्यंत चार महिने महाराज पंढरपूरासच असत. संक्रांतीनंतर सामान्यत: पंढरपूराहून महाराजांचा मुक्काम हलत असे. १९३७ सालापर्यंत म्हणजे न्युमोनियाच्या मोठ्या दुखण्याने आजारी पडेपर्यंत प्रतिवर्षी महाराज मोडलिंबजवळील अरणास श्रीसावता माळी यांच्या समाधीचे दर्शनासाठी जात. तेथून दुसरे दिवशी पडसाळी स्टेशनाजवळ असलेल्या कूर्मदासांचे समाधीच्या दर्शनासाठी जात. व तेथून कुर्डुवाडी व पुढे परांडामार्गेश्रीकल्याणस्वामींच्या समाधी दर्शनास डोंबगाव येथे जावून परत परंड्यास हंसराज महाराजांच्या दर्शनासाठी येत व नंतर कुर्डुवाडी मार्गेमराठवाड्यात जात. कारण माघ वद्य नवमीचा श्रीरामदास्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव तिकडेच होत असे. पंढरपूर-अरण-पडसाळी-कुर्डुवाडी-परांडा-डोंबगाव-परांडा-कुर्डुवाडी अशा बैलगाडीच्या प्रवासात अंग ठेचकाळून अक्षरश: खिळखिळे होई पण तरीही महराजांना त्याचा शीण वाटत नसे. वयाच्या ७२ व्या वर्षापर्यंत ही यात्रा त्यांनी निष्ठेने केली.

श्रीदासनवमीचा उत्सव नारनाळी, गव्हाण, अतनूर, मुखेड, कळमनुरी, उमरी इत्यादि मराठवाड्यातील निरनिराळ्या ठिकाणी, तेथील मंडळींच्या आग्रहावरून महाराज तेथे करीत, कार्यक्रम इतर उत्सवाप्रमाणेच असे.

फाल्गुन वद्यातील श्रीतुकारामबीज व श्रीएकनाथषष्ठी हा बहुधा संयुक्तपणे होणारा उत्सव सुरुवातीस मोठ्या थाटाने बऱ्याच मोठ्या प्रमाणात नरनाळीस होत असे. पुढे तो गोरट्यास होवू लागला. महाराजांच्या प्रेरणेने श्रीतुकारामबीजेच्या दिवशी गोरट्यास एक अभिनव प्रथा सुरू झाली. दहा-बारा गावाहून गाड्या भरभरून भाकरी येत असत आणि गोरटयास आमटी तयार करून त्याचा भंडारा होत असे. दोन-तीन हजार लोक त्या दिवशी जेवून जात. या उत्सवातही कीर्तनादि कार्यक्रम नेहमीप्रमाणेच होत.

महाराजांच्या सर्वजनसुलभ अशा धार्मिक कार्यक्रमामुळे अनेकांना सदाचाराचे वळण लागले आहे. अनेकांनी मानसिक समाधान अनुभविले आहे. अनेक लोक आपल्या जीवनात स्थिर झाले आहेत. ईश्वरी कृपाप्रसाद हा इहलोकीहि मन:शांतीच्या दृष्टीने लाभदायक होतो, याचा प्रत्यय अनेकांनी घेतला आहे. अशा उत्सवात भाग घेण्याची संधी मिळावी व त्यानिमित्ताने श्रीमहाराजांच्या सहवासाचा लाभ मिळावा म्हणून महिनाभर आधीपासून लोक महाराजांकडे पत्रव्यवहार करीत.

ज्या वर्षी अधिकमास उत्सव असेल त्या वर्षी तर चार महिने आधीपासून असा पत्रव्यवहार सुरू होई. उत्सव तीस दिवसांचा व रोज कीर्तन यामुळे आपल्या गावीच हा उत्सव व्हावा अशी अहमहिका सुरू होई व त्यामुळे महाराजांचे अधिकमासाचे उत्सव निरनिराळ्या ठिकाणी झाले आहेत. श्री. बाबासाहेब नांदेडकर होते, तोपर्यंत मात्र बहुतेक सर्व अधिकमास नांदेडासच होत. १९५५ सालचा अधिकमास उमरी येथील श्रीविठ्ठल मंदिरात थाटाने झाला. हे मंदिर महाराजांच्या आज्ञेप्रमाणे उमरीकर मंडळींनी उत्तमप्रकारे बांधले आहे.

निरनिराळ्या ठिकाणच्या भाविक मंडळींच्या आग्रहावरून श्रीमहाराज आपल्या कार्यक्रमाव्यतिरिक्त सवड असेल, त्याप्रमाणे इतर ठिकाणीही काही दिवस जाऊन राहात. हे राहणे बहुधा पुण्याचा मुक्काम हल्ल्यानंतर काही दिवस आणि पंढरपूर येथील निवास संपल्यानंतर काही दिवस घडून येई. १९५४ मध्ये श्री. गोविंद दत्तात्रेय गोखले यांचे आग्रहावरून मुंबईस गेले होते व तेथून पुढे श्री. सुखदेव पाटील यांच्या लोभासाठी शेगावलाही गेले होते. दोन्ही ठिकाणी या खेपेस भेटावयास येणाऱ्या मंडळींची संख्या इतकी झाली की, शेवटी त्रासून महाराजांनी तेथून पळ काढला असे म्हटले तरी चालेल. शेगावास तर महाराजांना स्नानसंध्यादि कार्यक्रमासहि फुरसत मिळेना. दर्शनासाठी व भेटीसाठी येणाऱ्या लोकांच्या अक्षरश: बाऱ्या बसवाव्या लागल्या. प्रसिद्धीचा हव्यास नसलेल्या श्रीदासगणु महाराजांना या गर्दीचा त्रास झाला असेल यात नवल नाही. ('श्रीगजाननविजय' ग्रंथ लिखाणानंतर- शके १८६१ नंतर- श्रीदासगणु महाराज तीन वेळा शेगावास गेले आहेत.)

**विशेष गोष्टी**

**अखिल भारतीय साई संमेलन**

१९४७ च्या डिसेंबर महिन्यात श्रीदासगणु महाराज मद्रास प्रांतात गेले होते. मद्रास प्रांतात श्रीसाईबाबांच्या महात्म्याचा विशेष प्रसार करणाऱ्या श्री.नरसिंहस्वामी यांनी श्रीमहाराजांना कोईमतूरला होणाऱ्या अधिवेशनाचे अध्यक्षपद स्वीकारण्याची विनंती केली होती व श्रीदादांनी ती स्वीकारली होती. श्रीमहाराजांचे दर्शनासाठी अनेक मद्रासी साईभक्त येत. प्रत्येकजण अगदी सामान्य अडचणीच्या परिहारासाठी काय करावे एवढेच विचारी. उत्तर म्हणून ती. दादा 'श्रद्धा ठेवा, नामस्मरण करा' एवढचे सांगत. पण तेवढ्याने या अर्थाअर्थीचे समाधान होत नसे. ती.दादा या प्रकाराला फार कंटाळले. एकदा ते म्हणाले, 'श्रीज्ञानेश्वर-तुकारामांचे केवढे उपकार आहेत महाराष्ट्रीयांवर की त्यांनी विठ्ठलभक्तीला

अगदी सामान्य जनासही इतके कामनिक होऊ दिले नाही.

**नगर येथील सत्कार समारंभ**

प्रतिवर्षीच्या कार्यक्रमाप्रमाणे पुण्याहून नांदेडला जाताना श्रीदासगणु महाराज बहुधा नगरास राहून मग पुढे जात. नगर येथील संपन्न सद्गृहस्थ श्री. नानासाहेब बागडे व त्यांचे कुटुंब महाराजांचे अनुग्रहीत असल्याने त्यांच्या आग्रहामुळे श्री.दादा तेथे जात. तेथे एखादे कीर्तनही होई. ती.अप्पा त्यासाठी पुण्याहून २-३ दिवस जात. १९४२-४३ पासून या कार्यक्रमात फारसा अपवाद झाला नाही.

श्रीमहाराजांच्या सत्काराच्या योजना नांदेड, पंढरपूर, पुणे इ.ठिकाणी निरनिराळ्या वेळी व निरनिराळ्या निमित्ताने आखल्या गेल्या होत्या पण महाराजांच्या ठाम नकारामुळे त्या बारगळल्या गेल्या. १९५८ मध्ये महाराज नगरला येतील त्यावेळी त्यांचा सत्कार करावा असे ठरवून ती योजना कार्यवाहीत आणण्याचा नगरवासियांनी जोरदार प्रयत्न केला. त्यांनी नगरच्या नगराध्यक्षांच्या वतीने दि. २४-२-५८ ला ती.दादांना गोरटे येथे एक पत्र पाठवून सत्कार स्वीकारण्यासंबंधी आग्रहाची विनंती केली. ती. दादांनी दि. ३-३-५८ रोजी पत्राने कळविले की, 'आपण माझा सत्कार करणार असल्याचे समजले. यावरून नगरवासियांचे मजविषयी असलेले अकृत्रिम प्रेम व आपुलकी पाहून आनंद वाटला. मला नगरविषयी अभिमान वाटतो, कारण ती माझी जन्मभूमी आहे. पण सत्कार करून घ्यावा असा माझा मुळीच अधिकार नाही व सध्या माझी प्रकृतीही बरी नाही. ११-४-५८ ला नगराध्यक्षांनी पुन्हा विनंतीवजा पत्र पाठवले. त्यानंतर ती.दादा पुण्यात असताना श्री. बागडे व इतर मंडळी सत्कार स्वीकारण्यासंबंधीचा आग्रह धरून बसली. पुन्हा नगरास येईन तेव्हा पाहू एवढेच ती.दादा म्हणाले. पुढे १९५८च्या सप्टेंबरमध्ये महाराज नगरास गेले असताना त्यांचा होकार मिळविण्यात नगरकर मंडळी यशस्वी झाली. ३ ऑक्टोबर ५८ रोजी मोने कला मंदिरात सत्कार समारंभ आयोजित केला होता. त्यापूर्वी तीन दिवस ती. अप्पांची कीर्तने नगरपालिकेच्या रंगारी गल्लीतील मंगलकार्यालयात झाली. सत्कार समारंभात श्री.पु.ह. पटवर्धन, डॉ. भाऊराव पाटील, श्री.भाऊसाहेब फिरोदिया, श्री.दत्तात्रयशास्त्री कवीश्वर, सहकार मंत्री श्री. भारदे इ. व्यक्तींची भाषणे झाली. नगराध्यक्ष श्री. बार्शीकर यांनी पुष्पहार, शाल व श्रीफल अर्पण करून एक थैलीही भेट म्हणून दिली. ती. दादांनी ती तत्क्षणीच नगरवाचनालयास देणगी म्हणून देऊन टाकली.

उत्तरादाखल ती. दादा दोनच वाक्ये बोलले. ते म्हणाले, 'मी नगरचा आहे. नगरच मला फार अभिमान वाटतो. नगरच्या लोकांनी माझे कौतुक न करता मला जोडे मारले असते तरी मी ते स्वीकारले असते.' ही दोनच वाक्ये. वरवर दिसायला चमत्कारिकही, पण सर्व समाजावर मोठा विलक्षण प्रभाव पाडून गेली. सर्व सभा स्तिमित झाली आणि भारावलीही गेली. त्यांच्या या उद्गारात सरळपणा, निरागसता, अमानित्वादि ज्ञानाला साजेलसा निरहंकार, विनय, जन्मभूमीविषयी वाटणारे निरतिशय प्रेम, सत्कार समारंभाविषयी अप्रीति, नगरच्या लोकांविषयीची आत्मीयता आणि नगरच्या भूमीला शोभणारा फटकळपणा हे सर्व काही होते.

**महाप्रस्थान**

१९६२ साली श्रावण महिन्यात गोरटे येथे असताना ती.दादांना असलेल्या जुन्या आंतर्व्रणातून बराचसा रक्तस्राव होऊन फार अशक्तपणा आला. सर्वप्रकारचे उपचार चालू होते पण एकूण लक्षणे ठीक दिसत नव्हती. अशाही स्थितीत पंढरपूरला जाण्याचा त्यांचा आग्रह होताच. प्रकृती फारच क्षीण झाल्याने इतक्या लांबचा रेल्वेचा प्रवाससुद्धा वैद्य या नात्याने इष्ट न वाटल्याने ती.दादांना ती. अप्पा म्हणाले, 'तुमच्या प्रकृतीचा आता भरवसा देता येत नाही. कोणत्याही क्षणी काहीही घडू शकते. त्यातून तुम्ही आतापर्यंत आपला देह गोदेकाठी रहावा अशी इच्छा व्यक्त केलीत तेव्हा पंढरपूरला जाण्याचा आग्रह कशाकरिता?' तेव्हा ती.दादा उसळून ताडकन् म्हणाले, 'मोठा आलास शहाणा सांगणारा. पांडुरंगाचे पायापाशी माझी गोदावरी नाही काय?'' शेवटी प्रतिवर्षाप्रमाणे अश्विन मासाच्या पहिल्या आठवड्यात ते पंढरपूरास यावयाचे ते आलेच. प्रकृतीत सुधारणा होवू लागली पण क्षीणता तशीच राहिली. तरी त्यांचे रोजचे आन्हिकाचे कार्यक्रम - स्नान, संध्या, जपजाप्य, विष्णुसहस्रनामाचे पाठ, आल्यागेलेल्याशी गप्पा, परिचितांशी नेहमीप्रमाणे पत्रव्यवहार इत्यादि गोष्टी यथापूर्व चालू होत्या. दिवाळीच्या वेळी तर आम्ही सर्व नातवंडे पतवंडे दरवर्षी प्रमाणे पंढरपूरास आलो होतो. त्यावेळी ती. दादांचे समवेत सर्वांचे एक छायाचित्र काढले गेले.

प्रतिवर्षीप्रमाणे कार्तिक वद्यात कुळधर्म कुळाचार म्हणून पंढरपूरला श्रीज्ञानेश्वरांचा उत्सव चालू होता. या उत्सवासाठी कोणालाही आमंत्रण देण्याची पद्धत नव्हती. जिव्हाळ्याची मंडळी आपणहून उपस्थित रहात. पण यावर्षी मात्र ती. दादांचे इच्छेप्रमाणे साधारणत: ८०-८५ जणांना उत्सवास येण्यासंबंधी पत्रे पाठविण्यात आली. उत्सव चालू असताना श्रीज्ञानेश्वर महाराजांचे पुण्यतिथीचे दिवशीच म्हणजे कार्तिक व. १३ शके १८८४ रोजी ती.दादा श्रीपांडुरंगाचे चरणी विलीन झाले.

टीप : ती. दादांविषयी सविस्तर माहितीसाठी श्री.अ.दा.आठवले यांनी लिहिलेले 'संतकवि श्रीदासगणु महाराज चरित्र' वाचावे. तसेच ती. दादा आणि ती. अप्पांच्या विविध आठवणींसाठी श्री.छ.मा. बारटक्के यांनी लिहिलेले 'सत्संगती सुगंध' हे पुस्तक पहावे.

**- श्री. प्रकाशराव मेहेंदळे**
४०३/१, शनिवार पेठ, 'प्रतिक', मेहुणपुरा, पुणे ४११०३०
फोन : २४४५५३६५

***





# आधुनिक संत कवी श्रीदासगणु

**श्री. माधव द. पर्वते**

एम्.ए. (हिंदी), बी.अेड. राष्ट्रभाषारत्न वर्धा, मराठी साहित्य विशारद, मराठी साहित्य परिषद पुणे, प. दा. अ. अभ्यासक्रम पूर्ण, संगीत विषयक दोन परिक्षा, भारत गायन समाज पुणे.

सुमारे ९५ वर्षेया महाराष्ट्रात राहून ज्यांनी तुकारामांप्रमाणे 'पिटू भक्तीचा डांगोरा' या निश्चयाने उदंड कविता रचना केली व मराठी भाषेचा गौरव वाढविला त्यांना मी शाळेत शिकत असताना प्रा. अनंतराव आठवले यांच्या हरिकीर्तनात पाहिले आहे. २/३ तास समोर बसून ते कीर्तन ऐकत असत, त्यांची उग्र-गंभीर गौरवर्णी तेजस्वी मूर्ती अजून आठवते.

त्यांच्या काव्यातील सहज सोप्या वर्णनाने आणि प्रसंगानुकूल लोक गीतात्मक चालीने हरिकीर्तनात रंग भरणे त्यांच्या शिष्यवरांना सोपे जाई हे कविता पाठांतर करताना नवनवा उत्साह वाटे हे कै. छगन बारटक्के यांचे कीर्तनातील अलीकडचे मत पूर्वी प्रा. आठवले यांचे कीर्तनात मी अनुभवले आहे. नुसती संत चरित्रे ऐकवून रंजविण्याचा नि पैसे मिळविण्याचा तो व्यवसाय नव्हता. श्री साईनाथांच्या आज्ञेने दासगणुंनी तो लोकशिक्षणाचा मार्ग आवडीने स्वीकारला होता म्हणून तर त्यांच्या काळात त्यांना प्रचंड लोकप्रियता मिळाली. 'मोले कीर्तन करू नये' हा रामदासी संप्रदायाचा दंडक त्यांनी स्वीकारल्यामुळे तर श्रोते थक्क झाले! ३/३ तास स्वकृत कविता गाऊन त्यांनी कथानके रंगविल्यामुळे व फावल्या वेळात प्रचंड ओवीसंख्या असलेली १४० संतचरित्रे लिहिल्यामुळे त्यांचा 'आधुनिक महीपति' म्हणून सर्वत्र बोलबाला झाला यात नवल काय? लयबद्ध काव्यरचनेने, व्यापक बहुश्रुततेने व लोकव्यवहाराच्या सूक्ष्म ज्ञानाने त्यांच्या शालेय ज्ञानाबद्दल कधी कुणी विचारलेच नाही. २४ लाखाची, (३ वेळा) गायत्री मंत्र-पुरश्चरणे त्यांनी पार पाडली. रोज १२ वेळा विष्णुसहस्रनाम म्हणण्याचा नियम - ६२ वर्षेचालू होता इ. तपशील (चरित्रातील) वाचून त्यांची नियम निष्ठा समजते मात्र त्यांची अभेद बुद्धी व समन्वय भावना 'गुरू चरित्रसार' (२७३४ ओव्या) - या ग्रंथातील समारोपाच्या ओव्यात दिसून येईल. प्रार्थना काय? हे गुरू मूर्ती -

**''भेटवा मला रुक्मिणी पती। बाप माझा पांडुरंग।।''**
**मी पदरज अवघ्या संतांचा। शिष्य वामन शास्त्रींचा।**
**रामदासी पंथ साचा। असून झालो वारकरी।।**
**दत्त, पांडुरंग, शंकर। हे एकरूप साचार -**
**ऐसे माझे निरंतर। मन मानो निश्चयाने।।''**

येथेच असे लिहिलेले नाही, (१) भक्ति लीलामृत (२) संतकथामृत, (३) भक्तिसारामृत सर्व पोथ्यांमध्ये प्रार्थना तीच आहे - ''प्रत्यक्ष तो पांडुरंग भेटावा'' - लोकशिक्षण हा ही गौण हेतूच त्यांनी मानला म्हणून तर नुसते चरित्रकार, लेखक नव्हते.

त्यांच्या शिष्यवराने संत - कवी समास फोडला आहे संतश्चासौ कविश्च।

संत आणि कवी - स्वभावाने ते चरित्रे गाता गाता भक्त बनले।

खरेच संत बनले, जसे शाहीर म्हणतात 'शूरमर्दाचा पवाडा शूरमर्दाने गावा' तशीच संत चरित्रे या संत पुरुषाने गाइली आहेत. म्हणून ती हृदयंगम झाली आहेत. 'गजानन विजय' हे शेगावच्या महाराजांचे चरित्र त्यांचे एवढे लोकप्रिय का? संत रामदासांचे 'कवेश्वर वर्णन' म्हणून एक समासभर काव्य आहे ते म्हणतात - वाल्मिक ऋषी बोलिला नसता तरी आम्हांसी कैची रामकथा?

तसेच या गजानन विजयाबद्दल म्हणता येईल. त्या ग्रंथामुळे दासगणुंचे नाव सर्वत्र झाले व पुढेही राहील. श्री साईबाबांचे चरित्र एक आधुनिक संत म्हणून त्यांनीच स्वानुभवाने समाजात ठसविले. त्यांचे 'गुरूपाठाचे अभंग' या दृष्टीने दोन्ही संतांच्या संस्थानांनी जनतेसमोर सादर केले याचे रहस्य तेच आहे. श्री रामदासांचे प्रमाणे श्री दासगणुंचे फक्त ८ 'मनाचे श्लोक' आहेत वानगीदाखल सोपा -

- एक पहावा

**''मना भूतमात्री सदा प्रेम ठेवी**
**तशी ती मती रामपतये जडावी।**
**मनानित्य विश्वास नामीं धरावा**
**कदा रे मनीं गर्व-ताठा नसावा।।**

मकर संक्रांतीचे वेळी प्रतिवर्षी दासगणु पांच-सहाशे छापील पत्रे पाठवीत - मनोभावना मात्र एकच! ऐक्यची, प्रीतीची, स्वराष्ट्र हिताची - ३ श्लोकात, मात्र ३ वृत्तांचा वापर,

१. परस्परीं लोभ विशेष ठेवा – (इंद्रवज्रा)

२. स्वराष्ट्र – हित साधण्या सतत सज्ज कीं राहणे ।। (पृथ्वी)

३. झाले स्वराज्य अपुले, टिकवा तयाला ।। (व.ति)

त्यांचेबाबत व त्यांच्या काव्याविषयी तऱ्हेतऱ्हेने लिहिता येईल शिष्यवर आठवले यांनी चरित्र व काव्यविवेचन – एक ग्रंथच सिद्ध केला व त्यांना दाखविला. ते म्हणाले ठीक, आता पुरे. सभासंमेलनातून आता गौरव नको.

भगवंताची निर्गुण भक्ती श्रेष्ठ मान्य – तरीही त्यांचा ओढा सगुण भक्तीकडेच होता त्यांनी एक ओवी लिहिली आहे.

**न आचरिल्या सगुण भक्ती। निर्गुण न कळे कल्पांती।**
**जो न भोगे बालस्थिती। तो का तरुण होईल?**

त्यांच्या या अशा चपखल उदाहरणांनीच त्यांना महाराष्ट्रीय मनात कायम आदराचे स्थान मिळाले आहे.

**– श्री. माधव द. पर्वते**
बी-५, शिवसाई कॉम्प्लेक्स,
आनंद नगर, सिंहगड रोड, पुणे – ४११०५१.
फोन : २४३४७६०१

***





# 'गजानन विजय' ग्रंथाद्वारे अध्यात्म कळस गाठणारे 'साक्षात्कारी संत दासगणु महाराज'

**पंडित हिंगे**

ज्योतिर्भास्कर, ज्योतिर्भूषण, निवृत्त सरकारी कर्मचारी, साहित्य विशारद, ज्योतिष विशारद, ज्योतिष पंडित, ज्योतिष भास्कर, होराकमल विशारद व ज्योतिष महामहोपाध्याय

माणसांच्या प्रयत्नांसाठी काहीतरी ध्येयवादी - प्रेरणा आवश्यक असते. जणू ध्येय उर्मी हे रेल्वे-इंजिन असून मानवी प्रयत्न हे त्या रेल्वेचे डबेच आहेत. अशा वेळी ध्येयाचा उत्साह धावत्याच्या पायात बळ निर्माण करतो. त्यात देखील कर्तव्याची प्रीति ही ईश्वराची सर्वश्रेष्ठ भक्ती असते. कर्तव्य म्हणजे ईश्वर, त्यामुळेच अशा कर्तव्याबद्दल मात्र आपलेपणा प्रीती वाटणे. कार्य, आपण ईश्वराचे कार्य या भावनेने करू इच्छितो, ईश्वराचे हे कार्य करणे म्हणजेच त्याची भक्ती, त्याचे आज्ञापालनच होय. हाच महत्त्वाचा संदेश आपले मनात रुजवून 'गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे उर्फ दासगणु महाराज यांनी लहानपणापासूनच ईश्वर सेवेला अगदी मनापासून सुरुवात केली. बुद्धी माणसाला संपन्न करते, ती पुरुषार्थाची जननी आहे, पण केवळ बुद्धिचा विकास म्हणजे जीवनाचा विकास नव्हे. भावना हा मानवी जीवनाचा खरा अमृतरस आहे. जीवनातील प्रेम, प्रकाश आणि प्रसन्नता यांचा साक्षात्कार भावहीन अंत:करणात होऊ शकणार नाही. कारण बुद्धी आणि भावना हीच जीवनरथाची दोन चाके आहेत. बुद्धी आणि भावना यांचा समन्वय साधता येणे हीच खरी जीवनकला आहे. ती प्रत्येकास जमते असे नाही.

## दृढ संकल्पना अत्यंत महत्त्वाची

वरील दृढ संकल्पना मनाशी ठेवून विविध आध्यात्मिक कार्य करण्याची उर्मी घेतलेल्या या दासगणु महाराजांना त्यांच्या जन्म लग्न कुंडलीची तरी साथ होती का? असाही एक विचार मनात डोकावला गेला. अन् त्यांच्या कुंडलीचा शोध घेताना त्यांची जन्मतारीख, जन्मस्थळ अन् अंदाजे जन्मवेळ मिळाली.

गणेश दत्तात्रय सहस्रबुद्धे उर्फ दासगणु महाराज यांचे टिपण

जन्मतारीख : ६ जानेवारी १८६८

जन्मवेळ : सकाळी सूर्योदयी

जन्मस्थळ : अकोळनेर

अक्षांश : २१° = ०९' उत्तर, रेखांश = ७९° = ०७' पूर्व

**।। जन्मलग्न - कुंडली ।।**

गुरू ११ केतू
१० शुक्र
रवि
८ शनि
बुध ९ मंगळ
७
१२ नेपच्यून
६
१ प्लुटो
२ चंद्र
३ हर्षल
४
५ राहू

त्यांचे जन्मकुंडलीतील विविध असे ग्रहयोग तरी त्यांच्या कार्याला साथ देणारे आहेत किंवा कसे? असाही एक विचार पुढे आला, त्याच दृष्टीने त्यांच्या जन्मकुंडलीचे विश्लेषण पुढीलप्रमाणे वृषभ रास, कृतिका नक्षत्र तिसरे चरण!

विविध ग्रहयोग - पुढील प्रमाणे

रवि-मंगळ युती, चंद्र-शुक्र-त्रिकोण

बुध-रवि जवळ असूनही तो रविपासून १० अंश असल्यामुळे रविपासून मुक्त आहे.

१) रवि-लाभ-गुरू
२) शुक्र-लाभ-नेप
३) शुक्र नवपंचम् चंद्र
४) चंद्र-केंद्र-गुरू
५) मंगळ-प्रतियोग हर्शल
६) चंद्र-लाभ-नेपच्यून
७) बुध-युति-मंगळ
८) बुध-लाभ-गुरू
९) बुध-प्रतियोग-हर्शल
१०) बुध-केंद्र नेपच्यून
११) शुक्र-लाभ-शनि
१२) शुक्र-षडाष्टक हर्शल
१३) मंगळ-केंद्र-नेपच्युन
१४) गुरू-त्रिकोण-हर्शल
१५) शनि-त्रिकोण नेपच्युन

## कुंडलीतील ग्रहयोगांची फळे

वरील कुंडलीत पंचमेश आणि दशमेश यांचा अंशात्मक युतियोग असल्याने व भाग्याधिपती रवि लग्नी गुरूचे धनु राशीतच असल्याने आध्यात्मिक ओढा असताना देखील सुरुवातीला वरील ग्रहयोगांनी त्यांना पोलिसखात्याकडे आकर्षित केले होते. शुक्र-चंद्राचा नवपंचम योग काव्य/कला साहित्याची आवड देतो, ती आवड ते जपतच गेले.

रवि-गुरू योगामुळे उदार मोकळ्या मनाचे आणि दिलदार असून आपल्या क्षेत्रात देखील त्यांनी नावलौकिक मिळविला. शुक्र-नेपच्यून लाभयोग, चंद्र-शुक्र त्रिकोणयोग, चंद्र-गुरू-केंद्र या योगांनी त्यांना संगीत, काव्य, कला या बरोबरच बुद्धिमत्ता दिली. चंद्र-नेपच्यूनच्या लाभयोगाने त्यांना स्फूर्ति, कल्पना दिली. त्याचबरोबर गूढशास्त्र आवड निर्माण केली. याबाबत तर दासबोधात समर्थ रामदास स्वामींनी ज्या चार ओळी लिहिल्या आहेत, त्या दासगणु महाराजांना तंतोतंत लागू पडतात.

**''आता वंदु कवेश्वर। शब्द सृष्टीचे ईश्वर।**
**नातरी हे परमेश्वर। वेदावतारी ।।**
**कवी सृष्टीचा अलंकार। कवी लक्ष्मीचा शृंगार।**
**सकळ सिद्धिचा निर्धार। ते हे कवि''**

मंगळ बुध योगामुळे एक घाव दोन तुकडे - असा निर्णय घेणारे, चिकित्सक, तसेच ध्येयासाठी अव्याहत धडपड करणारे असे होते. त्यांच्या कुंडलीतील बुध-गुरूचा प्रथम आणि तृतीय स्थानातून होणारा लाभयोग त्यांना लेखक/शिक्षक/ग्रंथकार ते देखील ज्ञानक्षेत्रातील लौकिकासह देऊन जातो. त्यामुळे दासगणु महाराजांचे अनेक शिष्यगण होते. बुध-नेपच्युन केंद्र योगाने त्यांना उत्तम प्रतिभा, कल्पनाशक्ती दिली. शुक्र-शनिच्या लाभयोगाने लेखन कलेची जाण त्यांना उत्तम होती व त्यांची बैठकही उत्तम होती. मंगळ-नेपच्यून केंद्रयोग असल्याने गूढशास्त्र/योगाभ्यास चिंतन याची देखील उत्तम आवड होती.

शनि-नेपच्यून नवपंचम योगाने त्यांना प्रबळ इच्छाशक्ती दिली. जिद्द आणि ताकद देखील मिळाली. त्या बळावर त्यांनी अनेक ग्रंथांची निर्मिती केली. दासगणु महाराज तसे जन्मजात कवी होते. त्यात भक्तिरसाची उत्तम साथ मिळाल्यामुळे त्यांचे काव्य गंगेप्रमाणे उभय लोकी आनंद देणारे झाले. भाग्येश रवि लग्नी असल्यामुळे वयाच्या २२ व्या वर्षापासून उत्तम भाग्योदयाला सुरुवात झाली होती. भाग्यधिपति रवि याचा पराक्रमातील गुरूबरोबर लाभ-योग झाल्यामुळे धर्मज्ञान/तपाचरणाकडे ओढ लागलेली होती. त्यांनी अनेक संत चरित्रे काव्यातच लिहिली आहेत. कुंडलीतील मंगळ-हर्शल प्रतियोगाने त्यांना विशेष वैवाहिक सौख्य दिले नाही व शुक्र-हर्शलचा देखली षडाष्टक योग, त्यांच्या कुंडलीत आहे, तो सुद्धा वैवाहिक सौख्याला अनुकूल नसतोच.

## गजानन विजय ग्रंथ लेखन

त्यांच्या जन्म कुंडलीत चतुर्थेश, अष्टमेश - व्ययेश यांचे संबंध असल्याने वैराग्य अवस्था आणि परमार्थ प्रगतीची फळे त्यांना मिळालेली दिसतात. कुंडलीत चतुर्थ/अष्टम/व्ययेश यापैकी स्थानात मंगळ/गुरू/वा शनि यापैकीच दोन ग्रह असताना पारमार्थिक उन्नती होते, आवड निर्माण होते. दासगणु महाराज यांचे कुंडलीत मंगळाचे राशीत शनि असून तो व्ययस्थानी (द्वादश) आहे. जन्मकुंडलीत पंचमेश मंगळ लग्नी असून रवि-बुधाबरोबर धनु राशीत असल्याने त्यांचे हातून इतर अनेक ग्रंथाबरोबरच 'गजानन विजय' या ग्रंथाचे लेखन झालेले आहे.

## रसिक हृदयाला छेदून जाणारा ग्रंथ

दासगणु महाराजांच्या सिद्ध हस्त - अशा लेखणीतून चित्रित झालेले 'गजानन महाराज यांचे चरित्र वाचताना चित्त मात्र चित्राप्रमाणे निर्व्यापार होऊन जाते. त्यांच्या प्रेमळ आणि भक्तिरसपूर्ण कविता शक्तीची साक्ष तर देतात परंतु अनेक संत चरित्र देखील आनंद देतात. चित्त प्रसन्न करतात. अजरामर साहित्य - अविस्मरणीय असे शब्द, स्वर्गीय सूर आणि विलोभनीय चित्र या सगळ्या गोष्टी त्यांच्या काव्य आणि चरित्रामधून सर्वांना भावतात. याचे मुख्य कारण त्यांची निर्मिती करणाऱ्या कलावंताच्या हृदयातून, अंतरंगातून त्या मात्र उन्मलून येतात. या हृदयीचे त्या हृदयी घातले असे ज्या कलावंताच्या हातून घडतं त्याचीच निर्मिती रसिकांच्या हृदयाला छेदून जाते, अगदी तसेच या 'गजानन विजय' ग्रंथाच्या निर्मितीचे आहे. त्यांनी लिहिलेला हा ग्रंथ एवढा बहारदार, रसपूर्ण, अनुभवांनी भरलेला आहे की सध्या 'मी मराठी' या चॅनेल वरील 'ब्रह्मांड नायक' ही मालिका किती जिवंत वाटते, त्याचे सारेच मूळ श्रेय त्या ग्रंथाची निर्मिती करणाऱ्या दासगणु महाराजांनाच द्यायला हवे एवढे मात्र खरे!

## पसायदान

''आता विश्वात्मके देवे।
येणे वाऽगयज्ञे तोषावे।
तोषोनि मज द्यावे।
पसायदान है।।

विश्वरूप गजाननांनी।
आम्हा प्रसाद देऊनी।
नाश पावो अहंकार।
भक्तांचा खरा उद्धार।
जो जो जे इच्छिणार।
ते ते त्या पुरवावे।

अखिल मांगल्याचा वर्षाव।
गजानना वरी भक्तिभाव।
अंतरी असूनी सदभाव।
आशीर्वाद देऊनी।
आपण असूनही कल्पतरू।
भक्तांचे मनोरथ पूर्ण करू।

गजानन असूनी सद्‌गुरू ।
देऊनी अमृत ।।
चंद्राची शीतल किरणे ।
सूर्याचे जे तळपणे ।
वर्षाव आशीर्वादाचा करणे ।
होऊ द्या सुखी जीवन ।
ज्याचे सदा होईल कल्याण ।
गजानन उद्धरूनी ।
सुखी ठेवील ।।
जो करील ग्रंथाचे पठण ।
होईल त्याचे कल्याण ।
निश्चितपणे ।।

गजानन महाराजांच्या या पसायदानाने या लेखाची इथे सांगता करतो.

– पंडित हिंगे
अमरबाग सोसायटी, ई/१३, गाडीतळ, हडपसर,
पुणे ४११०२८
फोन : (०२०) २६९९०४३५

***



# श्रीदासगणु महाराज प्रतिष्ठान

**श्री. महेश आठवले**

एम्.कॉम., एल्.एल्.बी., अेफ्.सी.एस्. १९८९ पासून कंपनी सेक्रेटरी म्हणून व्यवसाय. विविध मान्यवर कंपन्यांचे व बँकांचे संचालक, विविध शैक्षणिक व व्यावसायिक संस्थांमध्ये व्याख्याते - श्रीदासगणु प्रतिष्ठान गोरटे, राधादामोदर प्रतिष्ठान, पुणे व डॉ. नानासाहेब परुळेकर - चॅरिटेबल ट्रस्ट सकाळ, पुणे येथे विश्वस्त.

'नांदेडास जा व संतचरित्रे लिही' ही साईबाबांची आज्ञा शिरसावंद्य मानून श्रीदासगणु महाराज पोलिसाची नोकरी सोडल्यानंतर मुख्यत: शिर्डीस रहात असले तरी मधून मधून बराच काळ ते नांदेडास राहू लागले. त्यावेळी अनेकदा त्यांची तेथे कीर्तने होत. आवाज मोठा किंचीत घोगरा पण त्या आवाजाला एक तऱ्हेचा जिव्हाळा आणि अंतरीच्या निष्ठेमुळे गोडी प्राप्त झाली होती. त्यांच्या अमोघ वाणीमुळे कीर्तनाला रंग चढत असे. श्रीदासगणु महाराजांविषयीचा आदर व सद्भाव लोकांच्या मनात वाढू लागला. श्री. पुंडलिकराव नांदेडकर वकिल, यांच्या सारख्यांनी श्रीदासगणु महाराजांचे शिष्यत्व पत्करले. हळूहळू नांदेडच्या आसपासही महाराजांचा लौकिक वाढू लागला. उमरीच्या काही भक्तमंडळींच्या प्रेमाग्रहाने श्रीदासगणु महाराज उमरीस आले. तेथील विठ्ठल मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी उमरीस कीर्तने केली. १९४०च्या सुमारास श्रीमती बाईसाहेब गोरठेकर उमरीला दादांचे कीर्तन ऐकण्यास आल्या होत्या. एवढा मोठा सत्पुरुष आपल्या गावीही यावा म्हणून त्यांनी इच्छा प्रदर्शित केली. त्याप्रमाणे महाराज गोरटयास आले आणि जणू गोरट्याच्या भाग्योदयाची मुहूर्तमेढ रोवली गेली. त्यानंतर गोरटेकर मंडळींच्या आग्रहाखातर महाराज प्रतिवर्षी गोरट्याला जाऊ लागले. त्यांचेबरोबर निदान १५-२० मंडळी तरी असत. महाराजांचेसह सर्व मंडळींची राहण्या-जेवण्याची व्यवस्था श्रीबाईसाहेब करीत. श्री. बाईसाहेबांची श्रीमहाराजांवरील निष्ठा अढळ होती. आणि त्यामुळे भक्तीचे फलस्वरूप म्हणून श्रीदादा दरवर्षी संक्रांतीच्या सुमारास दोन-तीन महिने गोरटयास राहू लागले. सूर्याच्या मागोमाग किरणे यायचीच. श्रीदादांकडे येणाऱ्या भक्तमंडळींची संख्या वाढू लागली. दादांची गैरसोय होऊ नये म्हणून महाराजांसाठी स्वतंत्र घर बांधून देण्याची व्यवस्था श्रीबाईसाहेबांनी केली. श्रीदासगणु महाराजांचे दासनवमी, बीजषष्ठी उत्सव गोरटयाला होऊ लागले. गावकऱ्यांची काहीतरी करण्याची उत्कट इच्छा पाहून श्री. दादांनी तुकाराम बीजेच्या उत्सवाची व्यवस्था गोरटे ग्रामस्थांकडे सोपविली. आसपासच्या खेडेगावातून भाकरी घेऊन लोक येत. त्यांच्यासाठी आमटी तयार केली जात असे. व अशाप्रकारे हजारो माणसे भाकरी-आमटीचा प्रसाद घेऊन जात. शके १८७२ च्या फाल्गुन एकादशीला ति. दादांनी गोरटे येथे विठ्ठल मंदिराची स्थापना केली. त्यानंतर शके १८७५ च्या फाल्गुन महिन्यात शनिदेवाची प्रतिष्ठापना केली. त्याचे प्रयोजन विचारताच ति. दादा म्हणाले, "शनीचा धाक वाटतो लोकांना, पांडुरंगाचा नाही. शनीच्या धाकाने लोक दर्शनाला येतील आणि मग मात्र माझ्या विठोबाला नमस्कार केल्याशिवाय जाणार नाहीत." आजही या गोष्टीचा प्रत्यय येतो.

शके १८८४ च्या श्रावण महिन्यात ति. दादांना आंत्रव्रणाचा त्रास झाला व त्यानंतर ते पंढरपूरास आले. जणू भविष्यकाळ त्यांना स्पष्टच दिसत होता. (कार्तिक वद्य १४ शके १८८४) २६ नोव्हेंबर १९६२ या दिवशी त्यांची भौतिक मूर्ती पंचमहाभूतात विलीन झाली. त्यांनी पंढरपूरलाच पांडुरंगाच्या चरणी चिरविश्रांती घेतली. एक क्षणभर मराठवाड्यातील भाविकांना पोरकेपणाची जाणीव झाली. पण प.पू. अप्पांच्या स्नेहमयी दृष्टीने ती जाणीव तत्क्षणी नष्टही झाली.

धार्मिक स्थान निर्माण करणे सोपे असते. पण त्या स्थानाचे पावित्र्य राखणे, तेथील शिस्त पाळणे या गोष्टी दिवसेंदिवस लोप पावत चाललेल्या अनेक धार्मिक संस्थांमधून निदर्शनास येते. त्यामुळे पू.दादांचे समाधिस्थान वेगळेपणानं निर्माण करणे याची आवश्यकता नाही असे पू. अप्पांचे स्पष्ट मत होते. पण मराठवाड्यातील सर्व मंडळींनी पू. दादांचे समाधिस्थान गोरटे येथे व्हावे याचा आग्रहच धरला व शके १८८५ (इ.स. १९६३) मध्ये समाधी सोहळा संपन्न झाला.

शके १८८० मध्ये पू.दादांचा जन्मशताब्दी महोत्सव गोरटयातच साजरा झाला. त्यावेळी श्री. सोनूमामा दांडेकरांसारख्या अलौकिक व्यक्तिमत्त्वाचे दर्शन गोरटे वासियांना घडले. त्यांचे वाणीचे सामर्थ्य असे अलौकिक होते की, श्रोतृवर्ग तासन् तास खिळून रहायचा. पू. अप्पांना त्यांच्याविषयी गुरूतुल्य आदर वाटे. तर त्यांना पू. अप्पांविषयी तितकाच जिव्हाळा. श्री. धुंडामहाराज देगलूरकर यांच्या वाक्पुष्पांची तोरणे समाधी मंदिरात बांधली गेली. त्याचवेळी या स्थानाची काही वेगळी व्यवस्था होणे आवश्यक असल्याची चर्चा झाली. कारण समाधी सोहळ्यापासून आतापर्यंत श्रीदासगणु मंदिराची सर्व व्यवस्था श्रीमती बाईसाहेब गोरटेकरच पाहात होत्या. दिवसेंदिवस भक्तगणांची आवक

वाढली. तेव्हा आता सर्व भार गोरटेकर कुटुंबावर पडू नये म्हणून 'श्रीदासगणु प्रतिष्ठान' अशी संस्था निर्माण करावी असा विचार श्री. आनंदीदासराव लव्हेकर, श्री. प्रभाकरराव नांदेडकर इत्यादी मंडळींनी व्यक्त केला. विचार झाला- शके १८९० (इ.स. १९६८) मध्ये; पण संस्था पंजीकृत झाली- पौष शके १८९६ (दि. १० जानेवारी, १९७४) रोजी. या संस्थेचे अध्यक्ष म्हणून श्री. बाबासाहेब गोरटेकर आणि प्रमुख विश्वस्त म्हणून श्री. प्रभाकरराव नांदेडकर व श्री. सूर्यकांत कवटिकवार यांची योजना झाली. सचिवाचे काम श्री. विनायकराव प्र. नांदेडकर यांचेकडे सोपवले. व्यवस्थापनाचे कार्य, सेवाभावाची आवड असलेल्या पू. दादांच्या अत्यंत निकटवर्ती असलेल्या मंडळींपैकी एक श्री. छगनराव बारटक्के यांचेकडे सोपवण्यात आले.

पू. अप्पांनी प्रतिष्ठान निर्मितीचे उद्देश स्पष्ट करून सांगितले. त्यातील प्रमुख उद्देश असे,

१) पू. दादांच्या व अन्य संतांच्या जीवनकार्याचा प्रसार करणे. त्या निमित्ताने समाजाचे वा व्यक्तीचे जीवन शांत, प्रसन्न, प्रगत, उज्ज्वल व्हावे व ईश्वरभक्ती खऱ्या अर्थाने वाढीस लागावी.

२) पू. दादांच्या परंपरेत श्रीरामनवमी, परशुराम जयंती, नृसिंह जयंती, दशहरा, श्रीवामनशास्त्री पुण्यतिथी, श्रीकृष्ण जन्म, श्रीसाईनाथ पुण्यतिथी, श्रीज्ञानेश्वर पुण्यतिथी, श्रीदासनवमी, श्रीतुकाराम बीज, श्रीनाथषष्ठि, अधिकमास इ. उत्सव साजरे होतात. पूजा, अभिषेक, प्रार्थना, कीर्तन, अन्नदान अशा स्वरूपात वरील उत्सव साजरे व्हावेत.

३) श्रीदासगणु महाराज जयंती उत्सव श्रीक्षेत्र गोरटयासच व्हावा.

या उद्दिष्टांच्या परिपूर्तीसाठी प्रतिष्ठानचे कार्य सुरू झाले.

श्रीदासगणु मंदिर व दामोदर वाटिकेची संपूर्ण जागा पू. दादांचे निष्ठावंत भक्त श्री.बाबासाहेब गोरटेकरांनी श्रीदासगणु प्रतिष्ठानला अर्पण केली आहे. या जागेवरील प्रत्यक्ष मंदिराचा गाभारा, पुढील सभागृह, मागील भक्तनिवासाच्या खोल्या, त्यामागील दोन्ही बाजूच्या ओवऱ्या, स्वयंपाकघर, मानसविहार, संजीवन स्मृतिदालन हे सर्व बांधकाम भक्तांच्या औदार्यामुळे व सद्‌भावामुळेच शक्य झाले आहे. या संदर्भात बऱ्याच भाविकांनी, धनाबरोबरच तना-मनानेही सेवा केली आहे. त्यात कारखानदारांपासून मोलमजुरीवर उपजीविका करणाऱ्यांपर्यंत सर्वांचा समावेश आहे. इथे व्यक्तिगत प्रतिष्ठेचा प्रश्नच नसतो. उल्लेख होतो तो भक्तीचा, गौरव होतो तो सद्‌भावपूर्वक केलेल्या कार्याचा आणि म्हणून प्रतिष्ठानच्या इंचभरही जागेवर कोण्या व्यक्तीचे नाव कोरलेले नाही.

गोरटे हे स्थान केवळ जत्रेचे स्थान होऊ नये तर हे स्थान साधना केंद्र या दृष्टीनेच जोपासले जावे या पू. अप्पांच्या उदात्त हेतूलाही दिवसेंदिवस यशाची प्राप्ती होत आहे. येथे होणाऱ्या कार्यक्रमांचे स्वरूप त्यादृष्टीनेच आखले जाते. आपल्या आयुष्यातील नेहमीच्या सवयी बाजूला ठेवून साधकही ते कार्यक्रम यशस्वी करण्याच्या दृष्टीने प्रयत्नशील असतात. पारमार्थिक शिबिराच्या कल्पनेचा स्रोत प्रथम गोरट्यातूनच प्रवाहित झाला. पहिले शिबीर गोरट्यात महाविद्यालयीन युवकांचे भरले. शके १९०६ मध्ये गोरटे येथे भागवत स्वाहाकार झाला. श्रीक्षेत्र आळंदी येथील कीर्तन महाविद्यालयातील विद्यार्थ्यांनी गोरटे येथे एक शिक्षणवर्ग घेतला. वैशाख शके १९०९ मध्ये (१९८७च्या मे महिन्यात) पू.अप्पांचे मार्गदर्शनाखाली गोरटे येथे १२ लाखांचे गायत्री पुरश्चरण पार पडले. श्रावण महिन्यात आणखी एक भव्य कार्यक्रम गोरट्यास झाला. 'जय जय रामकृष्ण हरी' नामजप यज्ञाचा. सव्वा कोटीचा हा जप म्हणजे एक अलौकिक सोहळा होता.

आजही पू. अप्पांनी ज्या उद्दिष्टांनी गोरटे येथे समाधी मंदिराची स्थापना केली ते उद्दिष्ट साधण्यासाठी प्रतिष्ठान प्रयत्नशील आहे. प्रामाणिक, जिज्ञासू साधकांना साधनेसाठी एक शांत पवित्र स्थान प्राप्त व्हावे, या ठिकाणी येऊन साधकांनी आपली पारमार्थिक प्रगती साधावी हा त्यामागील हेतू होता. आलेल्या साधकांची निवासाची व भोजनाची सोय केली जाते. समाजातील अनेक मान्यवर लोक येथे येऊन मन:शांतीचा लाभ करून घेत असतात.

पू. अप्पांच्या समाधीनंतर (इ.स. २००२) गोरटे प्रतिष्ठानात 'वरद चिंतनिका' स्थापन करण्यात आली. गोरट्यास येणाऱ्या भाविकांनी रोज काही काळ चिंतनिकेत बसावे आणि पू. अप्पांच्या ग्रंथातील जमेल तेवढ्या भागाचे वाचन करावे. पू. अप्पांच्या इच्छेप्रमाणे पू. अप्पांचे हे सर्वात चांगले स्मरण आहे. या धारणेने ही सोय उपलब्ध करून दिली आहे. पू. अप्पांची 'मी म्हणजे ना शरीर...' या आदेशाप्रमाणे समग्र वाङ्मयाच्या अभ्यासाची, वाचनाची संधी सर्वांना मिळावी हा त्या मागचा उद्देश आहे.

गोरटे येथे प्रतिष्ठानच्या आवारातच पू. अप्पांच्या स्मृति-दालनाचे कामही पूर्ण झाले आहे. तिथे पू. अप्पांचे चित्ररूप दर्शन, कीर्तन-प्रवचन ध्वनिफिती पाहण्यासाठी सभागृह व अभ्यासिका निर्माण केली आहे.

प्रतिष्ठानचा सध्याचा एक महत्त्वाचा उपक्रम म्हणजे 'हिच गुरुपूजा खरी।' हा आहे. 'माझ्या ग्रंथाचे वाचन- चिंतन हीच माझी पूजा' या पू. अप्पांच्या आदेशानुसार हा उपक्रम सुरू झाला. एका वर्षात पू. अप्पांची दोन-तीन पुस्तके निवडून प्रत्येक महिन्याला एक प्रश्नपत्रिका असे त्याचे साधारण स्वरूप आहे.

संतवाङ्मयाच्या व त्यांच्या कार्याच्या प्रचार-प्रसारासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले जातात.

समाज प्रबोधनासाठी युवा शिबीरे, त्याचबरोबर पारायणे, गीतापठण, संस्कृत स्तोत्रांची संथा, पू. दादांच्या कीर्तनाख्यानातील चालींचे मार्गदर्शन, आख्यानांची पुस्तके, ध्वनिफिती आदि द्वारा मार्गदर्शन केले जाते. पू. अप्पांच्या उपदेशाच्या छोट्या छोट्या पुस्तिका छापून त्या विनामूल्य वितरीत केल्या जातात.

पू. दादांनी घालून दिलेले आणि पू. अप्पांनी सांभाळलेले परंपरागत सर्व उत्सव- महोत्सव श्रीदासगणु प्रतिष्ठान त्याच पद्धतीने त्यांच्या पश्चातही साजरे करीत आहे. सर्व उत्सव नेमून दिल्याप्रमाणे त्या त्या स्थानावर साजरे केले जातात. यामध्ये एका नवीन उत्सवाची सुरुवात झाली ती म्हणजे पू.अप्पांचा स्मरण महोत्सव- म्हणजे समाराधना उत्सव. हा उत्सव श्रावण वद्य दशमी ते चतुर्दशी असा पाच दिवसांचा

साजरा केला जातो. यात त्रयोदशीस समाराधना केली जाते. सोळा ब्राह्मणांचे पूजन आणि भोजन असा यथासांग समाराधना उत्सव होतो.

सांप्रतकाळी गोरटे संस्थानमध्ये श्री. महेश आठवले, अध्यक्ष असून श्री. गोविंदराव शिरुरकर, श्री. विनायकराव नांदेडकर, श्री.वा.ना. उत्पात यांचेवर विश्वस्त म्हणनू दायित्व आहे. प्रतिष्ठानमध्ये आज अनेकजण कार्यरत आहेत. अत्यंत निरलसपणे या सर्वांची सेवा पू.दादांचेपाशी रूजू होते आहे. प्रतिष्ठानचे प्रथम अध्यक्ष श्री.बाबासाहेबांचे चिरंजीव श्री.बापूसाहेब गोरठेकर राजकारणातील सर्व व्याप सांभाळून उत्सव-महोत्सवांमध्ये तन-मन-धनाने सहभागी असतात. श्रीमती गार्गीताई देशपांडे, भारती तम्मेवार, तुळसाबाई शर्मा यांनी सर्वस्व प्रतिष्ठानला वाहिले आहे. दिवसाचे चोवीस तास आठवड्याचे सर्व दिवस त्या गोरटयास कार्यरत असतात.

प्रतिष्ठानचा संपूर्ण पत्ता असा : श्रीमत् सद्‌गुरू श्रीदासगणु महाराज प्रतिष्ठान, गोरटे, उमरी मार्गे, जि. नांदेड. दूरध्वनी : ०२४६७-२०२५१४.

वाचकांनी एकदा तरी प्रतिष्ठानला अवश्य भेट द्यावी, ही विनंती!

**- श्री. महेश आठवले**

'नंदनंदन' प्रभात रोड गल्ली क्र. १२ चे शेवटी,

कमला नेहरू पार्क जवळ, पुणे - ४११००४.

फोन : २५६७४४४८, मो. : ९८२२५९५७४१



**महाराष्ट्रीय भाषाया : भूषणं च महाकवीम्**

**प्रसाद कविताकांतं - वन्दे दासगणुं गुरुम् ।।**

**भक्तिगोदातीर वासं - भक्ति गोदाविहारिणं ।**

**भक्ति गोदाजले स्नानं - वन्दे दासगणुं गुरुम् ।।**

**सन्मार्ग दीपकं नाथं - प्रसन्न पावनं शुभम् ।**

**अनंत वरदं नित्यं - वन्दे दासगणु गुरुम् ।।**

- संजय अंबादासराव देशमुख

सौ. सुखदा संजय देशमुख

# संतकवी श्रीदासगणु महाराज

(एका दृष्टिक्षेपात)

सू. कीर्तनाख्याने, स्तोत्रे, अष्टके इ. मधील बरीच रचना अक्षर गण वृत्तात

| महाकाव्यसदृश | | |
|---|---|---|
| **बहुनायकात्मक चरित्रे** | **एकनायकात्मक चरित्रे** | **भावार्थ प्रतिपादक ग्रंथ** |
| **१) भक्तिलीलामृत, शके १८२८**<br>एकूण ३६ संतांची चरित्रे | **१) शंकराचार्य चरित्र,**<br>**शके १९३९** ओ. (५०९१) | **१) ईशावास्य उपनिषद्,**<br>**शके १९१५** ओ. (१३२८) |
| **२) संतकथामृत, शके १८३०**<br>एकूण ५० संतांची चरित्रे | **२) सुमध्वविजय,**<br>**शके १९३८** ओ. (१९२४) | **२) मांडुक्यंउपनिषद,**<br>**शके १८३८** ओवी (८८) |
| **३) भक्तिसारामृत, शके १८४७**<br>एकूण ५४ संतांची चरित्रे<br>ओवीसंख्या – अनुक्रमे<br>१) (५७१५)<br>२) (६३४३)<br>३) (१२८३६)<br>एकूण – (२५४९५) | **३) श्रीगजानन विजय,**<br>**शके १९३९** ओ. (३३६८) | **३) गौडपादकारिका,**<br>ओ (८५४) |
| | **४) संत ज्ञानेश्वर,**<br>**शके १९३०** ओ. (२५१) | **४) शांडिल्यभक्तिसूत्रे,**<br>**शके १८६०** ओ (१६३६) |
| | **५) पंतप्रतिनिधी भवानराव पंडित,**<br>ओ. (१५६) | **५) नारदभक्तिसूत्रे,**<br>**शके १८६०** ओ (१०४९) |
| | **६) केशवराव देशमुख महाराज,**<br>**शके १९३६,** ओ (१६०) | **६) भक्तिरसायन भावप्रकाश,**<br>**शके १८७२** ओ (२९४५) |
| | **७) आऊबाई डफळे (जत संस्थान)**<br>ओ (१९८) | **७) विष्णूसहस्रनाम बोधिनी,**<br>**शके १९३१** ओ (४१०) |
| | एकूण ओ (१३११०) | **८) अमृतानुभव भावार्थ मंजिरी**<br>**शके. १८४९,** ओ (३०६२) |
| | | **९) पासष्टी भावार्थ,**<br>**शके १८५२** ओ (५९३) |
| | | **१०) विचारसागर प्रदीप, शके १९०१**<br>ओ (९६८४) |
| | | एकूण : (१८६४७) |

# यांची वाङ्मय संपदा

डॉ. ग. प्र. परांजपे,
पुणे

(एका दृष्टिक्षेपात)

अन्य सर्व रचना ओवी वृत्तांत. कंसातले सर्व आकडे ओवी संख्येचे

**कीर्तनोपयोगी आख्याने व खंडकाव्ये**

**-: आख्याने :-**

१) लोकोत्तर व्यक्तींची सं. १३
(शंकराचार्य, जगन्नाथ पंडित इ.)

२) सर्व संतांची, सं. ३६
(ज्ञानदेव, लाखा, कूर्मदास साई)

३) जन्माख्याने, सं. ८
(वामन, राम, कृष्ण इ.)

४) सामाजिक आशयाचे सं १
(राजा-प्रजा संबंधावर आधारित)
नांव- धनेश्वर

५) पौराणिक, सं. ५
(वत्सलाहरण, गरुडगर्वहरण इ.)
काही संतांची ३/३, ४/४ भागात केलेली आहेत. उदा. एकनाथ ५ भाग
(प्रथम स्तंभ पहावा) एकूण ६३
साकी दिंडी पदे इ. (५७२६)

: खंडकाव्ये :

१) जलद दूत १२५ श्लोक
२) उद्धवागमन १९१
३) पोवाडे - पूर्ण ६
अपूर्ण ९

(एकूण ३३१)

**श्रीदासगणूंची स्फुटरचना**

**(भक्ती + कवित्व - मणिकांचनयोग)**

१) **माहात्म्ये :** गोदा माहात्म्य, नागझरी महात्म्य, मांगीश माहात्म्य, गुरुचरित्र सारामृत व शनि प्रताप. (एकूण ५)

२) **स्तवनपर :** पांडुरंग स्तोत्र, व्यंकटेश, मोहिनी राज, गणेश स्तवराज, अंबिका, महालक्ष्मी, गायत्रीस्तव, संतस्तोत्र, साईनाथ स्तवन मंजिरी, ईश प्रार्थना. (एकूण १०)

३) **अष्टके स्तोत्रे** इ. रामेश्वर, त्र्यंबकेश्वर, महांकाल, नागनाथ, भीमा, शंकर, वैजनाथ, व्यंकटेश, डाकूरनाथ, जगन्नाथ, मोहिनीराज, करवीर निवासिनी, तुळजापुर निवासिनी, मदुरा मीनाक्षी, सारंगपूर, मारूती (एकूण १४)

४) **आरत्या :** स्तवने, स्तोत्रे इ. ज्या देवदेवतांची आहेत त्यांच्यापैकी काही देवतांच्या आरत्या, भूपाळ्या, काकडे इ. आहेत.

५) **उपदेशपर :** मनाचे श्लोक, शिष्यबोध, छात्रबोध.

६) **इतर :** पत्रे, सत्कार, तिळगुळ, टिपणे, अभिष्टचिंत, मंगलाष्टके.

एकूण रचना (२०,४३२)

**श्रीदासगणूंच्या विविध विषयांवरील अपूर्ण रचना**

| | | ओवी |
|---|---|---|
| १) | भारत- करुण कहाणी | (१२७४) |
| २) | छत्रपती विजय | (९५) |
| ३) | अभागी भारत | (३०८) |
| ४) | पांडुरंग प्रार्थना | (४०३) |
| ५) | कर्मकहाणी | (१७७) |
| ६) | पुढाऱ्यांना विनंती | (८५) |
| ७) | हिंदू कैफियत | (५५) |
| ८) | पंढरीनाथ स्तोत्र | (४६२) |
| ९) | गीता बोधिनी/भाष्य | (२४०) |
| १०) | साहित्य सोपान | (६०) |
| ११) | अध्यात्म रामायण | (६०) |
| १२) | स्वप्नकथा | (१६०) |
| | एकूण | (३०७९) |

# श्रीसद्गुरुदासगणु महाराज प्रार्थना



सदा प्रभुपदावरी निजसमर्पिलीसे तनू ।
कथे मन गोविले कमल मालिकेसी जणू ।।
मुखातुन जसा झरा सगुणभक्तिचा वाहतो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।१।।

कवीस गिरिशापरी नगरदेश वेशे दिसे ।
गणेश करि सार्थ ते अवतरोनि ज्यांच्या मिषे ।
बघून मतिवैभवा विबुधसंघही डोलतो ।
समर्थ गणुदास ते सतत मी नमस्कारितो ।।२।।

जरी अधम चाकरी कवन हीनशी लावणी ।
निकृष्टजन भोवती परि न लिप्त तद्दुर्गुणी ।
पटासह असूनही जरा खरा न की रंगतो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।३।।

नवीन कविता जणो ह्रदय वाटिकेभीतरी ।
सदा उमलतात या तुळशीच्या शुचि मंजिरी ।
तीहिंचि परमादरे करुन पूजिला ईश तो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।४।।

जयास परमेश्वरे ह्रदय दूसरे मानिले ।
सुशब्दमयमंदिरी सकल संत ते स्थापिले ।।
महीपति जणो गमे फिरुन भूवरी शोभतो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।५।।

करी विशद भाव जी परिमले अशी मंजिरी ।
जयी विरचिली असे अनुभवामृताचे वरी ।।
म्हणून इतरेजना सुगम जाहला बोध तो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।६।।

यदीय हरिकीर्तने नयन ढाळिती आसवे ।
सुधाकरकरे जसा विमल चंद्रकांत स्रवे ।।
सदैव कर जोडुनी करुण ज्यापुढे ठाकतो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।७।।

प्रसाद कवितेमधे वसत कालिदासापरी ।
रसाळ बहु बोलणे जणु सुधेतली माधुरी ।
विराग ह्रदयामधे शुचिपणासवे नांदतो ।
समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।८।।

अनाथजनवत्सला गुरुवरा दयेच्या घना ।
त्वदीय चरणी असे विनत एकचि प्रार्थना ।।
तरंग उठती सदा विकृत संशयाचे जिथे ।
असे कुटिल जे करा सरळ सद्गुरो चित्त ते ।।९।।

अजून हरीच्या पदी मन मदीय हे ना जडे ।
मुखी भजन चालता नयन राहती कोरडे ।।
धरीत मति तर्कटा सरलतेसवे वाकडे ।
आता तुम्हिच वंचिले तरी बघू कुणाच्या कडे ।।१०।।

हरिस्मरण झालिया गहिवरून यावा गळा ।
उठोत पुलकावली नयन ढाळू द्या की जला ।।
तुम्हातिल असा मिळो लव तरी जिव्हाळा आम्हा ।
अनंत आपुला म्हणा मग नसे कशाची तमा ।।११।।

**।। श्रीसद्गुरु दासगणु महाराज की जय ।।**